श्री

# शूद्रकमलाकर

अथवा

# शूद्रधर्मतत्त्वप्रकाश

याचें

विद्वज्जनांकडून

महाराष्ट्रभाषेंत सुबोध भाषांतर करवून

भरपूर माहितीच्या टीपा देऊन

मूलग्रंथासहित

मुंबईमध्यें,

तुकाराम जावजी यांनीं छापवून प्रसिद्ध केलें.

आवृत्ति तिसरी.

शके १८३२ सन १९१०.

किंमत २ रुपये.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना.

**न जातु कामान्न भयान्न लोभाद्धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः ।**
**धर्मो नित्यः सुखदुःखे त्वनित्ये जीवो नित्यो हेतुरस्य त्वनित्यः ॥ १ ॥**

सांप्रतकालीं आपल्या देशांत विद्येचा दिवसानुदिवस विशेष फैलाव होत असल्याकारणानें ज्ञानाची वृद्धि होत आहे. त्यामुळें ज्ञानाचे अंकुर वाढत जात असून लौकिक व शास्त्रीय विषयांचा शोध करण्याकडे कित्येक सुशिक्षित लोकांचें लक्ष लागलें आहे. ही गोष्ट मोठी अभिनंदनीय आहे. आणि यावरून भावी उत्तम स्थितीचें अनुमान साहजिक होतें. आतां या सर्व गोष्टींला आपल्या देशांत छापण्याची कला प्रसृत होऊन तिच्या सुलभतेनें निरनिराळ्या विषयांचे जे अनेक ग्रंथ छापून प्रसिद्ध होत आहेत हें एक कारण आहे. याविषयीं एका कवीनें असें ह्मटलें आहे कीं–"ज्या देशांत ग्रंथ बहुत असतील, व जेथें त्यांचें मर्म जाणणारे विपुल असतील तेथें विद्या नृत्य करतात. तो देश स्वर्गापेक्षांही अधिक होय. कारण, स्वर्गांत याचा लाभ होत नाहीं यामुळें कित्येक देवांनीं लोकांतरांत जाऊन त्याचा लाभ घेतला आहे."

अस्तु. याप्रमाणें ज्ञानादिकांचा लाभ करून देणाऱ्या उत्तम ग्रंथांचें परिशीलन करणें हें अत्यावश्यक आहे.

सांप्रत लौकिकविषयांचें ज्ञान होण्यास साधनीभूत असे ग्रंथ बहुत होत आहेत व शास्त्रीय विषयांचींही देशभाषेंत भाषांतरें होत आहेत, परंतु पारलौकिक सुखप्राप्तीचें परम साधन जो धर्म तत्प्रतिपादक शास्त्राचें ज्ञान होणें हें अत्यावश्यक आहे. याकरितां धर्मशास्त्रीय ग्रंथांचीं देशभाषेंत भाषांतरें झालीं पाहिजेत. त्याप्रमाणें कांहीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. थोड्या दिवसांपूर्वीं सर्वमान्य **धर्मसिंधु** नांवाच्या ग्रंथाचें **मराठी** भाषांतर आह्मीं प्रसिद्ध केलें, त्या वेळेस कित्येक हितेच्छूंनीं **शूद्रकमलाकर** याचेंही भाषांतर करण्याविषयीं सुचविलें. त्याअन्वयें आह्मीं प्रसिद्ध महापंडित **कमलाकरभट्ट** यांनीं केलेल्या **शूद्रकमलाकर** अथवा **शूद्रधर्मतत्त्वप्रकाश** याचें मराठी भाषांतर करवून वाचकांस सादर केलें आहे. आतां या ग्रंथापासून उपयोग कितपत होईल हा निर्णय करण्याचें काम सुज्ञ वाचकांवर अवलंबून आहे.

हें भाषांतर आह्मीं वे० शा० रा० रा० **वामनशास्त्री इस्लामपूरकर** यांजकडून करविलें आहे.

**तुकाराम जावजी.**

---

या आवृत्तींत पुस्तकाची विशेष सुधारणा करून व ग्राहकांला सुलभ व्हावें ह्मणून पूर्वीं किंमत ३ रु० होती तरी पुस्तकाची साईज लहान डेमी अष्टपत्री व टैपही जरा बारीक घेऊन अगदीं कमी ह्मणजे २ रुपये ठेविली आहे.

# उपोद्घात.

हा ग्रंथ श्री **काशी** येथें राहणारा महापंडित **कमलाकर**भट्ट यानें केला आहे. या पंडिताचें इतिवृत्त आह्मास जें कांहीं उपलब्ध झालें आहे, तें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

पूर्वी दक्षिण देशांत **पैठण** नांवाच्या शहरांत **गोविंद**भट्ट नांवाचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण राहत होता. हा मोठा विद्वान् असून सदाचारसंपन्न होता. त्याला **रामेश्वर**भट्ट नांवाचा मुलगा झाला. तोही महापंडित असून सदाचारसंपन्न होता. त्याचें बरेंच वय झालें, तथापि याला संतति झाली नाहीं. त्यामुळें कांहीं वैराग्य उत्पन्न होऊन कांहीं दिवस **काशी**वास करावा ह्मणून सकुटुंब तो काशीयात्रेस गेला. तेथें नेहमीं अनेक विद्वानांचा सहवास, **श्रीभागीरथी**चें स्नान, **श्रीविश्वेश्वराचें** दर्शन इत्यादि प्रतिदिवशीं घडत होतें यामुळें त्याचें अंतःकरण तेथेंच रमलें. कांहीं दिवसांनीं त्याला असें वाटलें कीं, आतां हें क्षेत्र सोडून कोठें जाऊं नये. आणखी आपणाला घरीं जाऊन तरी काय कर्तव्य आहे? असें मनांत आणून **काशी**वास करण्याचा संकल्प करून तो तेथेंच राहिला.

**रामेश्वर**भट्ट हा मूळपासून **श्रीरामचंद्रा**चा उपासक होता. दिवसानुदिवस त्याचा तो मार्ग अत्यंत सुदृढ होत चालला होता. इतक्यांत **श्रीरामा**च्या कृपेनें ह्मणा अथवा कांहीं प्रारब्धयोगानें ह्मणा, त्याला ह्मातारपणांत **नारायण**भट्ट नांवाचा एक गुणवान् पुत्र झाला. त्याची कीर्ति वर्णन करावी तितकी थोडीच. **नारायण**भट्टानें मोठी विद्या संपादन केली होती, यामुळें त्याची कीर्ति अद्यापि सर्व पृथ्वीवर प्रसृत आहेच; पण त्याच्या अंगीं विनय, दाक्षिण्य, दया इत्यादि जे गुण होते त्यांहींकरून त्यावेळचे लोक असें ह्मणत असत कीं,–पूर्वी **रामा**वतारीं **दशरथ** राजाला वृद्धपणीं **रामचंद्रा**पासून कांहीं सौख्य मिळालें नाहीं, तें त्यास यावें ह्मणून **रामेश्वर**भट्ट हाच कोणी एक **दशरथ**राजा व त्याचे पोटीं वैदिकधर्मस्थापनार्थ हा **नारायण**भट्टनांवानें साक्षात् **रामचंद्र**च अवतीर्ण झाला आहे. याविषयीं **निर्णयसिंधू**च्या प्रारंभीं **कमलाकर**भट्टानें असें म्हटलें आहे कीं,–

**वेदार्थधर्मरक्षार्थं मायामानुषरूपिणम् ।**
**पितामहं हरिं वन्दे भट्टनारायणाह्वयम् ॥ १ ॥**

अस्तु. याप्रमाणें त्या गुणवान् पुत्राच्या योगानें त्याच्या आईबापांस परमानंद प्राप्त झाला. आधींच ह्मातारपणीं मूल झालें ह्मणजे आईबापांचा त्यावर अतिशय लळा असतो; त्यांतून तें गुणी निपजलें ह्मणजे विशेषच असतो यांत संशय नाहीं. **नारायण**भट्टासारखा गुणवान्, विनयी व सदाचारसंपन्न असून पितृभक्त अशा एकुलत्या पुत्रावर त्याच्या पुत्रवत्सल पित्याचें प्रेम किती असेल याचें अनुमान करतां येत नाहीं. अस्तु.

यथाप्रमाणें त्याचें लालन करीत व लोकांनीं वर्णन केलेल्या त्याच्या कीर्ति श्रवण करीत करीत परमानंदित होत्साता **रामेश्वर**भट्ट, उत्तम पुत्राच्या लाभानें ज्याचा शेवट गोड झाला आहे अशा संसाराचा अनुभव घेऊन सतत निरिच्छपणानें केलेल्या श्रीरामोपासनेच्या प्रभावानें जीर्ण झालेल्या स्वकलेवराचा त्याग करून श्रीरामचंद्राच्या चरणकमलासंनिध गेला. यानें कांहीं ग्रंथ वगैरे केल्याची प्रसिद्धि नाहीं.

**नारायण**भट्ट हा लहानपणापासून विद्याविनयसंपन्न होता, असें वर सांगितलेंच आहे; व याच्या अंगीं इतर सर्व गुणांपेक्षां ब्रह्मवर्चस फार प्रज्वलित होतें, त्यामुळें सर्व लोकांची त्याच्याविषयीं अतिशय पूज्यबुद्धि होती.

त्या काळीं आपल्या हिंदुस्थानांत मुसलमानांचें प्राबल्य होतें. मुसलमान लोक हे हिंदुधर्माचा नुस्ता द्वेषच करून राहत नसत, तर आपल्या सत्तेच्या जोरानें अनेकप्रकारें त्यांचा नाश करीत, हें सर्वांस विदित आहेच. एके समयीं त्यांच्या मनांत असें आलें कीं,—"हिंदु लोकांच्या पवित्र क्षेत्रांत **काशी** हें मुख्य क्षेत्र आहे; आणि सर्व देवस्थानांत **विश्वेश्वरा**चें स्थान हें मुख्य आहे; आणि या क्षेत्राचें माहात्म्य वाढविण्यास हा **विश्वेश्वर**च कारण आहे. तेव्हां याचा उच्छेद करावा ह्मणजे हिंदुधर्माचा बऱ्याच अंशीं मोड होईल." असें मनांत आणून त्यांनीं **श्रीविश्वेश्वरा**चें मंदिर उच्छिन्न केलें. त्याविषयीं सर्व हिंदुलोकांस फार वाईट वाटलें. पण कोणाचा कांहीं इलाज चालला नाहीं. सर्व लोक दुःखी होऊन आपआपल्या ठिकाणीं स्वस्थ बसले.

त्याच संधीस ईश्वरी क्षोभानें ह्मणा किंवा अन्य कोणत्याही कारणानें ह्मणा, सर्वत्र अवर्षण पडलें, त्यामुळें जिकडेतिकडे हाहाकार झाला. ह्या प्रसंगींची अशी एक चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं, **नारायण**भट्टाचें साधुत्व व तपोबल किती आहे हें पाहण्याकरितां यवन अधिकारी त्यांजकडे गेले, आणि तुह्मी पर्जन्य पाडाल काय ? ह्मणून विचारूं लागले. **नारायण**भट्टानें उत्तर दिलें कीं, **श्रीविश्वेश्वरा**च्या मंदिराचा तुह्मीं उच्छेद केल्यामुळें त्याच्या क्षोभाचा हा परिणाम आहे; ह्यासाठीं तें मंदिर बांधण्याची जर तुह्मी मला परवानगी द्याल तर तोच **विश्वेश्वर** सन्तुष्ट होऊन आलेलें विघ्न निवारील, यवन ह्मणाले "आणि पर्जन्य पडला नाहीं तर ?" **नारायण**भट्ट ह्मणाले "नाहीं पडला तर मीं यवनधर्म स्वीकारीन अशी प्रतिज्ञा करितों." ही प्रतिज्ञा श्रवण करतांच त्या दुष्ट यवनांनीं, **नारायण**भट्टास आतां खचित मुसलमान व्हावें लागेल असें मनांत समजून व त्याबद्दल अन्तर्यामीं संतोष मानून आजच पर्जन्य पडला तर मंदिर बांधण्याची तुह्मांस परवानगी मिळेल, आणि न पडला तर तुह्मांस मुसलमान करूं असें सांगितलें. तेव्हां चमत्कार असा झाला कीं, त्याच दिवशीं पर्जन्य पुष्कळ पडून सर्वत्र आनंद झाला, व यवनांची **नारायणभट्टा**विषयीं परम पूज्यबुद्धि होऊन संकेताप्रमाणें मंदिर बांधण्याची परवानगी देणें त्यांस भाग पडलें. नंतर यानें उत्तम मंदिर बांधून श्रीविश्वेश्वराची स्थापना केली, त्यावेळीं सर्वांस परमानंद झाला, व त्यांनीं **नारायण**भट्टास **जगद्गुरु** ही पदवी दिली. आणि त्यास सर्वप्रसंगीं अग्रपूजा मिळावी असा ठराव केला. ती अग्रपूजा अद्यापि त्याच्या

वंशजांस मिळत असल्याची प्रसिद्धि आहे. जगद्गुरु ही पदवी त्यालाच मात्र मिळाली होती. ती पुढें चालू राहिली नाहीं.

पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, **रामेश्वरभट्ट** हा श्रीरामचंद्राचा परम भक्त होता; ह्मणून तीच रामोपासना पुढें त्याच्या वंशक्रमानें चालू होती. **नारायण**भट्ट हाही मोठा रामोपासक होता.

याचा जन्मकाल व मरणकाल निश्चयानें सांगवत नाहीं, तथापि विक्रम शकाच्या १६ व्या शतकांत याचा जीवनसमय असावा असें अनुमान होतें. यानें केलेले **त्रिस्थलीसेतु** व **प्रयोगरत्न** ( नारायणभट्टी ) हे दोन ग्रंथ सर्वत्र प्रसिद्ध आहेत. ब्राह्मण लोकांत विवाहादि सर्व संस्कार बहुतकरून **प्रयोगरत्ना**च्या आधारें चालतात. याशिवाय अन्यही ग्रंथ त्यानें केल्याची प्रसिद्धि आहे, पण त्यांच्याविषयीं विशेष माहिती मिळाली नाहीं. याला दोन पुत्र होते. पहिल्याचें नांव **रामकृष्ण**भट्ट, हा प्रकृत ग्रंथकर्त्याचा बाप होय, व दुसऱ्याचें **शंकर**भट्ट. हे दोघेही महापंडित असून सदाचारसंपन्न होते. **रामकृष्ण**भट्टानें अनेक ग्रंथ केले आहेत. त्यांत **तंत्रवार्तिक** नांवाच्या प्रसिद्ध ग्रंथाची **व्याख्या** हा मुख्य होय. याशिवाय **जीवत्पितृकनिर्णय** इत्यादि बहुत आहेत. याप्रमाणें **शंकर**भट्टानेंही **द्वैतनिर्णय** नांवाचा मोठा ग्रंथ केला आहे.

**रामकृष्ण**भट्टास तीन पुत्र होते. वडील पुत्राचें नांव **दिनकर**भट्ट हा प्रकृत ग्रंथकर्त्याचा वडील बंधु होय. याची विद्वत्ता किती होती याचें अनुमान त्याच्या ग्रंथांवरून होतें. हा मोठा मीमांसक होता. याच्या ग्रंथांची भाषासरणी मोठी मार्मिक असून प्रौढ आहे. याचा मासला त्यानें **भाट्टदिनकर** नांवाचा **मीमांसे**वर मोठा ग्रंथ केला आहे त्याच्या प्रारंभीं पुढील श्लोक आहे त्यावरून सहज समजेलः—

**दारेष्विव निबन्धेषु जीर्णेषु सुधियां ग्रहः ।**
**वयसः क्षपणायैव न रसाय कदाचन ॥ १ ॥**

ही उक्ति मोठी मार्मिक आहे. याशिवाय त्याचे **उद्योत**, **शान्तिसार** इत्यादि अन्यही ग्रंथ सर्वमान्य आहेत. यालाच **दिवाकर**भट्ट ह्मणत असत. याविषयीं **निर्णयसिन्धू**च्या आरंभीं—

**बिन्दुमाधवपादाब्जरोलम्बीकृतविग्रहम् ।**
**ज्यायांसं भ्रातरं भट्टदिवाकरमुपास्महे ॥ १ ॥**

असा एक श्लोक असून त्याच ग्रंथांत प्रत्येक प्रकरणाच्या शेवटीं—**दिनकरभट्टानुजकमलाकरभट्टविरचिते**" असें ह्मटलें आहे. यावरून **दिवाकर**, आणि **दिनकर** हीं एकाचींच नांवें असावीं असें वाटतें. वस्तुतः हे दोन्ही शब्द एकमेकांचे पर्याय आहेत व अर्थही एकच आहे, तेव्हां असें असण्याचा संभव आहे. याचाही जन्मकाल वगैरे नीट समजत नाहीं. याला **विश्वेश्वर**भट्ट नांवाचा एकच पुत्र होता. हा मह्रा-

पंडित आपल्या महाराष्ट्र देशांत फार प्रसिद्ध आहे. यालाच **गागाभट्ट** ह्मणत. याविषयीं तत्कृत **कायस्थधर्मदीप** नामक ग्रंथाच्या प्रारंभीं—

**गागाभट्टापराख्यस्य विश्वेश्वरमनीषिणः ।**
**सुमनोमानसे शर्म मम निर्मातु निर्मितिः ॥ १ ॥**

असा श्लोक आहे. इसवी सन १६७४ रांत रायगडावर **शिवाजी** राजाला राज्याभिषेक करणारा जो **गागाभट्ट** तो हाच असावा. यानें **भाट्टचिंतामणि** इत्यादि अनेक ग्रंथ केले आहेत. याला संतति नव्हती. याचा स्थितिसमय वर सांगितलेल्या गोष्टीवरून सहज कळतो.

**रामकृष्ण**भट्टाचा कनिष्ठ पुत्र **लक्ष्मण**भट्ट[१] हा मोठा विद्वान् असल्याची प्रसिद्धि आहे; त्यानेंही **आचाररत्न** इत्यादि ग्रंथ केल्याची माहिती आहे. यालाही कांहीं संतान नव्हतें.

**रामकृष्ण**भट्टाचा द्वितीय पुत्र **कमलाकर**भट्ट हा प्रकृत ग्रंथाचा कर्ता होय. हा महापंडित असून रामोपासक होता. याच्या आईचें नांव **उमा.** याविषयीं यानेंच **निर्णयसिंधू**च्या प्रारंभीं—

**सर्वकल्याणसन्दोहनिदानं यत्पदद्वयम् ॥**
**द्युनदीसोदरीमम्बामुमाख्यां नौमि सादरम् ॥ १ ॥**

असा श्लोक घातला आहे. याला तीन मुलगे होते. थोरल्याचें नांव **अनंत**भट्ट, दुसरा **प्रभाकर**भट्ट आणि तिसरा **शाम**भट्ट. यांतून **अनंत**भट्ट हा मोठा विद्वान् होता. यानें **रामकल्पद्रुम** नांवाचा ग्रंथ केला आहे. **रामकृष्ण**भट्टाच्या तिघां पुत्रांत **कमलाकर**भट्टच वंशस्थापक झाला. याचा वंश उत्तरोत्तर अधिकाधिक वाढत गेला. याच्या वंशांतले सुमारें १७ । १८ पुरुष **काशी**क्षेत्रांत सांप्रत हयात आहेत असें चांगल्या आधारावरून आह्मांस कळलें आहे. यानें **निर्णयसिन्धु** नांवाचा सर्वमान्य ग्रंथ केला आहे. हा ग्रंथ सर्व हिंदुस्थानांत धर्मशास्त्रनिर्णयाविषयीं प्रमाण मानतात. याशिवाय यानें **पूर्तकमलाकर, शान्तिकमलाकर** इत्यादि धर्मशास्त्रग्रंथ केले आहेत. व्यवहारांत **विवादताण्डव** अथवा **विवादकमलाकर** नांवाचा याचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. याशिवाय **साहित्यशास्त्रां**तील प्रसिद्ध **काव्यप्रकाश** नांवाच्या ग्रंथावर यानें टीका केली आहे. ही त्या ग्रंथावर ज्या अनेक टीका आहेत त्यांत अत्युत्तम आहे. आणखी **कमलाकराह्निक** नांवाचें अति विस्तृत आह्निक यानें केलें आहे. यांवांचूनही तत्कृत ग्रंथ कांहीं असतील, पण त्यांची विशेष माहिती नाहीं.

प्रकृत ग्रंथ **शूद्रधर्मतत्त्व** हा याच महापंडितानें केला आहे. यालाच **शूद्रकमलाकर** असें ह्मणतात. या ग्रंथकर्त्यानें स्वकृत ग्रंथास स्वतंत्र एक नांव ठेविलेलें असतें; पण स्वनामघटित दुसरेंही नांव दिलेलें आढळतें. उदाहरणार्थ, **निर्णयसिंधूस नि-**

१ हा प्रकृत ग्रंथकर्त्याचा कनिष्ठ बंधु होय.

**र्णयकमलाकर** असेंही ह्मटलें जाहे. या ग्रंथाचीं विषयसंदर्भानुसार चार प्रकरणें केलीं आहेत. तीं अशीं कीं, यांत प्रथम **श्रुति, स्मृति, पुराणें** आणि **मीमांसान्याय** यांच्या आधारें कोणकोणचीं कर्में शूद्रांस कसकशीं करण्याचा अधिकार आहे याचें विवेचन केलें आहे, ह्मणून त्याला **अधिकारसिद्धिप्रकरण** असें नांव दिलें आहे. नंतर शूद्रांच्या गर्भाधानादि सर्व संस्कारांचे प्रयोग व त्यांचे निर्णय सांगितले आहेत; ह्मणून त्याला **संस्कारादिप्रयोगप्रकरण** असें नांव दिलें आहे. पुढें शूद्रांचें आह्निक व पार्वणश्राद्ध वगैरे सांगितलें आहे, ह्मणून त्यास **आह्निकादिप्रकरण** असें नांव दिलें आहे. शेवटीं जातिनिर्णय व त्यांचें स्वरूप वगैरे सांगितलें आहे, ह्मणून त्यास **जातिनिर्णयप्रकरण** असें नांव दिलें आहे. यांतून पहिलें प्रकरण हें **निर्णयसिंधूंत** ठिकठिकाणीं जो निर्णय सांगितला आहे तोच सर्व एकत्र करून केलें आहे. बाकीचीं तीन प्रकरणें नवीं रचलेलीं आहेत, तथापि संस्कारादिकांचे प्रयोग व जातिनिर्णयावांचून बाकीचा सर्व भाग स्वकृत अन्य ग्रंथांतले वेंचे एकत्र करून रचला आहे असें ह्मटल्यास चालेल.

आतां हा ग्रंथ कधीं रचला यांविषयीं विचार केला असतां, **निर्णयसिंधु** संवत् १६६८ त रचला असें त्याच ग्रंथाच्या शेवटीं—

**वसुऋतुऋतुभूमिते गतेऽब्दे नरपतिविक्रमतोऽथ याति रौद्रे ।**
**तपसि शिवतिथौ समापितोऽयं रघुपतिपादसरोरुहेऽर्पितश्च ॥ १ ॥**

असा श्लोक आहे त्यावरून सिद्ध होतें; पण इतक्यावरून प्रकृत ग्रंथ कधीं केला याचा निर्णय होत नाहीं. यांत स्थलविशेषीं **निर्णयसिन्धूवर** हवाले दिले आहेत. यावरून त्याच्या नंतर हा रचला असें ह्मणावें तर निर्णयसिन्धूंतही स्थलविशेषीं या ग्रंथाचा हवाला दिला आहे तेव्हां याच्या पूर्वी तो, किंवा त्याच्या पूर्वी हा रचला असावा याच्या कालाचा निश्चय होत नाहीं. तथापि **निर्णयसिंधु, पूर्तकमलाकर** व **शान्तिकमलाकर** इत्यादिकांच्या नंतर हा रचला असावा असें अनेक कारणांवरून संभवतें.

या ग्रंथांत सुमारें १७५ प्राचीन ग्रंथांतलीं प्रमाणवाक्यें घेतलीं आहेत. त्यांची अनुक्रमणिका पुढें दिली आहे. या प्रमाणवाक्यांच्या स्थलांचा ठिकठिकाणीं निर्देश करण्याचा आमचा विचार होता; परंतु त्यांपैकीं बरेच ग्रंथ आह्मांस उपलब्ध नसल्यामुळें तो हेतु सफल झाला नाहीं. श्रुतिवाक्यांचा स्थलनिर्देश बहुतकरून केला आहे; पण स्मृतिवाक्यांविषयीं तसें करतां आलें नाहीं; कारण, वृद्ध, लघु, बृहत्, गद्य, आणि पद्य असे एकेका कर्त्याचे निरनिराळे स्मृतिग्रंथ आहेत, ते सर्व आह्मांस मिळाले नाहींत. फक्त काशींत छापलेलें विंशतिस्मृतीचें पुस्तक व कलकत्त्यास छापलेलें षड्विंशतिस्मृतींचें पुस्तक अशीं दोन पुस्तकें आह्मांस मिळालीं, त्यांवरून पाहतां बहुतेक वाक्यें त्या त्या स्मृतींत उपलब्ध होत नाहींत. मनु आणि याज्ञवल्क्य या दोन स्मृतींतलीं निर्दिष्ट वाक्यें मात्र बहुतकरून त्या त्या स्मृतींत आढळतात. एकंदरींत ज्या ज्या प्रमाणवाक्यांचीं स्थलें आह्मांस उपलब्ध झालीं त्यांचा निर्देश केला आहे.

या ग्रंथांत शास्त्रीय पारिभाषिक वगैरे अनेक दुर्बोध शब्द आले आहेत, त्यांचा अर्थ समजावा याकरितां टीपा दिल्या आहेत. स्थलविशेषीं उपयुक्त अवांतर माहितीही दिली आहे. यांत भाषेच्या सौंदर्याविषयीं विशेषसें लक्ष्य दिलें नाहीं. त्याबद्दल वाचक आह्मांवर दोष ठेवणार नाहींत असें वाटतें.

**तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना नैको ऋषिर्यस्य मतं प्रमाणम् ।**
**धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः ॥ १ ॥**



# अनुक्रमणिका.

**प्रकरण ४ थें.**





॥ श्रीः ॥

# शूद्रधर्मतत्त्वम् ।

## अधिकारसिद्धिप्रकरणम् ।

**विजयन्ते परानन्दकृष्णपादरजस्स्रजः ।**
**या धृता मूर्ध्नि जायन्ते महेन्द्रादिमहस्स्रजः ॥ १ ॥**

**प्रणम्य रामं पितरौ कमलाकरशर्मणा ॥ रामकृष्णतनूजेन शूद्रधर्मो निरूप्यते ॥ १ ॥**

श्रीरामचंद्राप्रत आणि मातापितरांप्रत नमस्कार करून, **रामकृष्ण**भट्टाचा पुत्र मी **कमलाकरभट्ट** शूद्रधर्म निरूपण करितों.

**तत्र शूद्रत्वं ऊढसवर्णाजत्वम् । विप्रत्वादिवत् । यद्यपि सर्गाद्यकालीने विश्वामित्रादौ च नैतत्तथापि तत्रादृष्टविशेषारब्धशरीरत्वमेव ब्राह्मणत्वं । अन्यत्र तु पूर्वोक्तम् । एवं शूद्रेपीति दिक् । तत्र पद्भ्यां शूद्रो अजायत [ ऋ० सं० अ० ८ अ० ४ व० १९ ] । शूद्रो मनुष्याणामश्वः पशूनाम् [ तै० सं० कां० ७ अ० १ अ० १ ] । इति बह्वृचतैत्तिरीयादिश्रुतिभिः ।**

शूद्रत्व ह्मणजे-विवाहित समानवर्ण शूद्रस्त्रीपुरुषांपासून उत्पन्न होणें. जसें-विवाहित समानवर्ण ब्राह्मणस्त्रीपुरुषांपासून उत्पन्न झालेल्या पुत्रास ब्राह्मणत्व प्राप्त होतें तसें. जरी सृष्टीच्या प्रथम कालांत झालेले मरीच्यादिक व नंतरचे **विश्वामित्रा**दिक यांविषयीं वर

---

१ **औशनस** धर्मशास्त्रांत याचें मूलवचन आहे. तें असें कीं,-"**शूद्रादेव तु शूद्रायां जातः शूद्र इति स्मृतः**" ॥ [औ० स्मृ० श्लो० ४८] अर्थ-शूद्रापासून सवर्णशूद्रीचेठायीं उत्पन्न झालेल्यास शूद्र असें ह्मणतात.

२ सृष्टीच्या आद्यकालीं जातिभेद व वर्णभेद मुळींच नव्हते. याविषयीं **श्रीमद्भागवतांत**-"**आदौ कृतयुगे वर्णो नृणां हंस इति स्मृतः । कृतकृत्याः प्रजा जात्या तस्मात् कृतयुगं विदुः**" ॥ १ ॥ प्रथम कृतयुगामध्यें मनुष्यांचा हंस नांवाचा एकच वर्ण होता. जन्मतः सर्व प्रजा कृतकृत्य होत्या, ह्मणून त्या युगास कृतयुग असें ह्मणत." असें सांगितलें आहे. नंतर त्रेतायुगांत-ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र असे चार वर्ण, व त्यांचीं निरनिराळीं कर्में इत्यादि स्थापित झालीं. अतएव त्या वेळच्या मरीचि इत्यादि ब्राह्मणांस वर सांगितलेला नियम लागू नाहीं.

३ **विश्वामित्र** ऋषि हा सोमवंशीय क्षत्रिय, कनोज देशाचा राजा जो **गाधि** त्याचा पुत्र होय. कोणएके दिवसीं हा मृगया करीत करीत **वसिष्ठा**च्या आश्रमांत गेला; त्या वेळीं वसिष्ठानें त्याला भोजनाचें आमंत्रण दिलें. विश्वामित्रानें तें मान्य केलें, आणि भोजनाची तयारी पाहून परम आश्चर्य पावला. कारण, बरोबरच्या हजारों सैन्यासह विश्वामित्रास सोन्याच्या ताटांत

सांगितलेलें लक्षण, व्यभिचार पावतें तरी; त्या कालीं गुणकर्मनिष्ठ वर्णत्व असल्याकारणानें प्रारब्धविशेषेंकरून जो ज्या वर्णाचें कर्म आचरण करी, त्यास तद्वर्णता प्राप्त होत असे. ( दैवयोगानें ब्राह्मण असून त्याला क्षत्रियकर्म करण्याची वासना झाल्यास क्षत्रियत्व, व क्षत्रिय ब्राह्मणकर्म करूं लागल्यास ब्राह्मणत्व प्राप्त होत असे. ) अन्यत्र तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें. शूद्राविषयींही अशीच व्यवस्था आहे. हें केवळ दिग्दर्शन मात्र येथें केलें आहे.

सांप्रत शूद्रांची उत्पत्ति सांगतों.–

त्यांत–"सर्वजगदुत्पत्ति करणाऱ्या प्रजापतीच्या पायांपासून शूद्र उत्पन्न झाला; अर्थात् शूद्रत्वजातिमान् पुरुष निपजला." असें **ऋग्वेदांत** वर्णन केलें आहे. व "मनुष्यांमध्यें शूद्र, आणि पशूंमध्यें अश्व ( घोडा ) हे ब्रह्मदेवाच्या पायांपासून उत्पन्न झाले आहेत." असें **तैत्तिरीयश्रुतीं**त वर्णिलें आहे. यावरून, आणि—

भोजन दिलें होतें. हें सर्व ऐश्वर्य **नंदिनी**–( स्वर्गातील कामधेनूची कन्या )च्या प्रभावानें वसिष्ठाला प्राप्त झालें, असें जाणून विश्वामित्रानें ती गाय मागितली. वसिष्ठानें न दिल्यावरून तो बळेंच नेऊं लागला. त्या वेळीं वसिष्ठाच्या तपोबळानें, आणि नंदिनीच्या प्रभावानें हजारों शबर उत्पन्न होऊन, त्यांनीं विश्वामित्राचा पराभव केला. ह्या अलौकिक कृत्यावरून त्यास पश्चात्ताप होऊन, ब्राह्मतेज श्रेष्ठ मानून, त्यानें तप करून ब्राह्मण्य संपादन केलें. ही कथा **महाभारतांत** वर्णन केली आहे. [ म० भा० प० १ अ० १७५ पहा. ] यावरून विश्वामित्र मूळचा क्षत्रिय असून कर्मानें ब्राह्मण झाला अतएव त्या वेळीं गुणकर्मनिष्ठ वर्णत्व होतें असें सिद्ध होतें.

१ ज्याप्रमाणें **विश्वामित्र** हा नीच वर्णांतला असून कर्मानें उत्तमवर्णता पावला; त्याचप्रमाणें **वैवस्वत मनू**चा सातवा पुत्र जो **नरिष्यंत** त्याच्या वंशांत १० वा पुरुष **अग्निवेश्य**नामक झाला. हा कर्मेंकरून आपण ब्राह्मण झाला इतकेंच नाहीं; तर त्याचें सर्व कुल ब्राह्मण झालें. [ भा० स्कं० ९ अ० २ श्लोक २२ पहा. ] वरील उदाहरणांवरून अधमवर्ण असून केवळ कर्मानेंच उत्तमवर्णता पावत असत असें सिद्ध होतें.

आतां उत्तमांस अधमता प्राप्त झाल्याविषयीं उदाहरणें देऊं; वैवस्वत मनूचा ४ था पुत्र जो **दिष्ट** त्याला **नाभाग**नामक पुत्र होता. तो वैश्यकर्म करीत असे ह्मणून, वैश्यत्व पावला. [ भा० स्कं० ९ अ० २ श्लोक २३ पहा. ] तसाच **पृषध्र**नामक वैवस्वत मनूचा पुत्र क्षत्रिय असून कर्मानें शूद्र झाला. [ भा० स्कं० ९ अ० २ श्लोक ९ पहा. ] **सत्यव्रत**राजा चांडालता पावला. [ भा० स्कं० ९ अ० ७ श्लोक ७ पहा. ] अशीं उदाहरणें बहुत आहेत. यावरून उत्तमवर्णाचे असूनही नीचकर्मानें अधमवर्ण होत असत असें सिद्ध होतें.

२ वरील **तैत्तिरीय** श्रुतिवाक्यावरून वाचकांचें समाधान होणार नाहीं, व पुढें येणाऱ्या–"**तस्माच्छूद्रो०**" या वाक्यांत सांगितलेल्या हेतूचेंही स्पष्टीकरण होणार नाहीं; याकरितां तें प्रकरण साद्यंत येथें घेतों:—

**"ब्राह्मणो मनुष्याणामजः पशूनाम् तस्मात्ते मुख्या मुखतो ह्यसृज्यंतोरसो बाहुभ्यां पंचदशं निरमिमीत । तमिन्द्रो देवता अन्वसृज्यत । त्रिष्टुप् छन्दो बृहत्साम राजन्यो मनुष्याणामविः पशूनाम् तस्मात्ते वीर्यावन्तो वीर्याद्ध्यसृज्यन्त । मध्यतः सप्तदशं**

**मुखबाहूरुपज्जातास्तस्य वर्णा यथाक्रमम् ॥ लोकानां तु विवृद्ध्यर्थं मुखबाहूरुपादतः ॥ १ ॥ ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत्** [ म० स्मृ० अ० १ श्लो० ३१ ] **इति मन्वादिस्मृतिभिश्च शूद्रस्य वर्णत्वेऽपि कर्मणां निषेधो वचनान्न्यायाच्चावगम्यते ।**

त्या परमेश्वराच्या–मुख, बाहु, मांड्या, आणि पाय या अवयवांपासून यथानुक्रमें ब्राह्मणादि ४ वर्ण उत्पन्न झाले. लोकांची वृद्धि व्हावी एतदर्थ तो (**प्रजापति**)–"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांस मुखादि अवयवांपासून उत्पन्न करिता झाला." **मन्वादि**-स्मृतींवरून ब्राह्मणादि वर्णांसारखा शूद्र हा एक वर्ण आहे असें सिद्ध असतांही, त्यास कर्में करण्याचा निषेध श्रुत्यादिवचनांहीं, आणि **मीमांसा**न्यायानें प्राप्त होतो.

---

**निरमिमीत । तं विश्वेदेवा देवता अन्वसृज्यन्त जगतीछन्दो वैरूपꣳसाम वैश्यो मनुष्याणां गावः पशूनाम् तस्मात्त आद्या अन्नधानाद्ध्यसृज्यन्त । तस्माद्भूयाꣳसोऽन्येभ्यो भूयिष्ठा हि देवता अन्वसृज्यन्त । पत्त एकविꣳशं निरमिमीत । तमनुष्टुप् छन्दः अन्वसृज्यत । वैराजꣳसाम शूद्रो मनुष्याणामश्वः पशूनाम् तस्मात्तौ भूतसंक्रामिणावश्वश्च शूद्रश्च पत्तो ह्यसृज्येताम्"** [ तै० सं० कां० ७ अ० १ अ० १ ]

अर्थ–मनुष्यामध्यें **ब्राह्मण** आणि पशूंमध्यें अज (बोकड) यांस देवानें मुखापासून उत्पन्न केलें ह्मणून ते मुख्य होत; कारण सर्व अवयवांत मुख्य अशा मुखापासून त्यांस उत्पन्न केलें आहे. उरस्थल आणि बाहू यांपासून पंधरावा स्तोम ( सामवेदांतलें स्तोत्र ) निर्माण केला. त्याच्या पश्चात् इंद्र देवता उत्पन्न केली. तदनंतर त्रिष्टुप् छन्द, बृहत्साम, मनुष्यांमध्यें **क्षत्रिय,** आणि पशूंमध्यें अवि ( मेंढा ), यांस आपल्या वीर्यापासून ( पराक्रमापासून ) उत्पन्न केलें; ह्मणून ते पराक्रमवान् आहेत. मध्यापासून सतरावा स्तोम निर्माण केला. त्याच्या पश्चात् विश्वेदेवांस उत्पन्न केलें. जगती छंद, वैरूपसाम, मनुष्यांमध्यें **वैश्य** आणि पशूंमध्यें गायी, यांस अन्नधानापासून ह्मणजे क्षेत्रापासून उत्पन्न केलें, ह्मणून ते आद्य ( अन्न देणारे ) होत. यांच्या पश्चात् दुसऱ्या पुष्कळ देवता उत्पन्न केल्या. पायांपासून एकविसावा स्तोम उत्पन्न केला. त्याच्या पश्चात् अनुष्टुप् छंद, वैराज साम, मनुष्यांमध्यें **शूद्र,** आणि पशूंमध्यें अश्व ( घोडा ), यांस उत्पन्न केलें. तस्मात् शूद्र आणि अश्व हे भूतसंक्रामी ( प्राणिमात्राची सेवा करणारे ) असे होत. अशी वर सांगितलेल्या ऋग्वेदश्रुतीप्रमाणेंच येथें ब्राह्मणादिक चारी वर्णांची उत्पत्ति सांगितली असून त्यांचीं कर्मेंहि सांगितलीं आहेत. **शुक्लयजुर्वेदा**च्या **शतपथ ब्राह्मणां**त ह्याचेंच प्रकारांतरानें वर्णन केलें आहे. तें:—

**देवेषु ब्रह्माभवद् ब्राह्मणो मनुष्येषु क्षत्रियेण** ( इन्द्रादिदेवक्षत्रियेण । द्विगङ्गभाष्य ) **क्षत्रियो** ( मनुष्यक्षत्रियः ) **वैश्येन** ( वस्वादिदेववैश्येन ) **वैश्यः** ( मनुष्यवैश्यः ) **शूद्रेण** ( देवशूद्रेण पूष्णा अधिष्ठितः ) । **शूद्रः** ( मनुष्यशूद्रः ) [ श० ब्रा० कां० १४ प्र० ३ अ० ४ ब्रा० २ कं० २० ]

याचा **द्विगंगाचार्य**कृत **भाष्यानु**सार अर्थ–"देवांमध्यें **ब्रह्मदेव** ब्राह्मण झाला. त्यापासून मनुष्य लोकांत हे ब्राह्मण झाले. याप्रमाणें **इंद्रा**दिक देवक्षत्रियांनीं अधिष्ठित असा मनुष्यक्षत्रिय, **वसु** इत्यादि देववैश्यांनीं अधिष्ठित असा मनुष्यवैश्य, आणि देवांचा शूद्र **पूषा** यानें अधिष्ठित असा मनुष्यशूद्र उत्पन्न झाला." असा आहे.

**तथा च शतपथश्रुतिः । पद्यु वा एतत्स्मशानं यच्छूद्र इति । ( पद्भ्यां युज्यंत इति पद्यु । जंगममित्यर्थः । ) तस्माच्छूद्रो यज्ञेऽनवक्लृप्तो न हि देवता अन्वसृज्यत [ तै० सं० कां० ७ अ० १ अ० १ ] इति तैत्तिरीयश्रुतिः ॥**

याविषयीं **शतपथ** नांवाच्या ब्राह्मणामध्यें असें ह्मटलें आहे कीं–"शूद्र हें ब्रह्मदेवाच्या पायापासून उत्पन्न झालेलें जंगम स्मशान होय; ह्मणजे जसें स्मशान कर्मानर्ह अथवा अपवित्र तद्वत् शूद्रही कर्म करण्यास अयोग्य जाणावा." "ज्या हेतूस्तव इतर वर्णांप्रमाणें शूद्राच्या पश्चात् प्रजापतीनें एखादी देवता उत्पन्न केली नाहीं, त्या हेतूस्तव तो यज्ञाधिकारी होत नाहीं." अशी **तैत्तिरीय** श्रुति आहे.

याप्रमाणें शूद्रास कर्माधिकाराचा निषेध करणाऱ्या श्रुति दाखविल्या. आतां न्याय दर्शवितोः–

**न्यायस्तु पूर्वमीमांसायामाद्याधिकरणसिद्धौ द्वैतीयीकः षाष्ठश्च । तथाहि आद्येऽधिकरणे स्वाध्यायोऽध्येतव्य इत्यध्ययनस्य कर्मोत्पन्नतव्यश्रुत्या स्वाध्यायार्थत्वावगतेरक्षरग्रहणार्थत्वेनादृष्टार्थत्वात्तावतैव विध्यर्थविश्रान्तेर्विचारानाक्षेपान्मीमांसाशास्त्रं पूर्वपक्षे नारभ्यते । विचारमकृत्वैव वेदमधीत्य स्नायादिति स्मृतेः समावर्तितव्यम् । ततश्च क्रतुभिरध्ययनविधिसिद्धविद्याभावेन स्वयमेव द्विजवच्छूद्रेऽपि विद्याक्षेपात्पुस्तकादिना विद्यां संपाद्य शूद्रस्याप्यधिकार उक्तः ।**

याविषयीं न्याय तर–**पूर्वमीमांसें**त प्रथमाध्यायांत पहिल्या अधिकरणाच्या सिद्धीचेठायीं, व दुसऱ्या, आणि ६ व्या अध्यायांत, सांगितला आहे. तो–पहिल्या अधिकरणांत–"स्वाध्यायें[2] अध्ययन करावा." असें अध्ययनास कर्मापासून उत्पन्न

१ येथें–'शूद्र यज्ञाधिकारी नाहीं. कारण, त्याच्या मागून कोणतीही देवता उत्पन्न केली नाहीं.' असें ह्मटलें आहे. याचा अभिप्राय असा आहे कीं–मागच्या टीपेंत चातुर्वर्ण्याच्या उत्पत्तीविषयीं जी श्रुति लिहिली आहे, तींत–ब्राह्मणास उत्पन्न करून त्याच्या पश्चात् **इंद्रा**ला उत्पन्न केलें, क्षत्रियाच्या पश्चात् **विश्वेदेवां**स उत्पन्न केलें, तसेंच वैश्यांच्या पश्चात् पुष्कळसे **देव** उत्पन्न केले. याप्रमाणें प्रत्येकीं ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य या तीनही वर्णांच्या पश्चात् देवता उत्पन्न केल्या; परंतु शूद्राच्या मागाहून कोणतीही एखादी देवता उत्पन्न केल्याचें वर्णन नाहीं. अर्थात् देवतासंबंधाचा अभाव असल्यामुळें शूद्र यज्ञाधिकारी होत नाहीं. ह्मणूनच वेदाध्ययनाचा अधिकारही त्यास नाहीं असा अभिप्राय आहे. याचप्रमाणें–"**अङ्गहीनाश्रोत्रियषण्ढशूद्रवर्ज्यम्**" [ कातीय श्रौतसूत्र अ० १ कंडिका १ सूत्र ५ ] या सूत्राच्या **कर्काचार्य**कृत **भाष्यांत** वर्णन केलें आहे. तसेंच त्याच्या पुढच्या सूत्रांतही आहे.

२ या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ पाहिला तर, सु=अध्ययनं स्वाध्यायः सु ह्म० फार आवृत्तींकरून जें अध्ययन तो स्वाध्याय असा; अथवा स्वार्थे=अध्ययनं स्वाध्यायः ह्म० आपल्याकरितां जें अध्ययन करणें तो स्वाध्याय असा होतो. एकंदरींत वारंवार आवृत्ती करून अथवा कोणत्याही प्रकारें–वेदाचा अभ्यास करणें–एवढाच स्वाध्याय शब्दाचा अर्थ घेणें इष्ट आहे.

झालेल्या 'तव्य' प्रत्ययाचें श्रवण आहे, अर्थात् तो प्रत्यय लागला आहे तेणेंकरून त्या अध्ययनास, स्वाध्यायार्थत्व अवगत होतें. ह्मणून, अक्षरग्रहणार्थत्वेंकरून, दृष्टार्थत्व आहे. या हेतूस्तव, तेवढ्यानेंच विधीच्या (अध्ययनविधीच्या) अर्थाची विश्रांति (पूर्तता) होते ह्मणून, अध्ययन केलेल्या वेदाच्या अर्थविचाराचा आक्षेप होत नाहीं. अर्थात् अर्थविचार करावा असें पूर्वोक्तविधीनें सिद्ध होत नाहीं. ह्मणून पूर्वपक्षीं अर्थविचार करणारें हें **मीमांसाशास्त्र** आरंभू नये. कारण, वेदाच्या अर्थाचा विचार केल्यावांचूनच-"वेदाचें अध्ययन मात्र करून, स्नान (समावर्तन) करावें." अशी **स्मृति** आहे, या हेतूस्तव समावर्तन करावें. नंतर, यज्ञ करण्यास शक्य असल्यानें अध्ययनविधीनें सिद्धविद्यांचा अभाव असल्यानें, अर्थात् विधिपूर्वक अध्ययन केल्यावांचून यज्ञाची सिद्धि झाली असल्यानें आपणच द्विजाचेपरी शूद्राविषयींहि वेदविद्येचा आक्षेप होऊन, त्यापासून, वेदाच्या पुस्तकादिकांवरून, विद्या संपादन करून यज्ञादि कर्में करण्याविषयीं शूद्रासही अधिकार वर्णिला आहे.

**षाष्ठे च शूद्राधिकरणपूर्वपक्षे । सिद्धान्ते त्वध्ययनस्यार्थधीहेतुत्वेन दृष्टार्थत्वात्साम्नामृगक्षराभिव्यक्तिद्वारा स्तोत्रार्थत्वमिव तव्यप्रत्ययावगतस्वाध्यायार्थत्वद्वाराऽर्थज्ञानार्थत्वाद्विचारं विना च तदयोगात्तदर्थं शास्त्रमारंभणीयम् । एतच्च अथातो धर्मजिज्ञासा [मी० द० अ० १ पा० १ सू० १] इत्यत्राध्ययनविधेर्दृष्टार्थत्वादित्यतः शब्दव्याख्यायां शबरभाष्ये सूचितम् ।**

तसेंच ६ व्या अध्यायांत शूद्राधिकरण पूर्वपक्षांतही असाच अधिकार सांगितला

---

परंतु येथें वर सांगितल्याप्रकारें ज्याचें अध्ययन करावयाचें, त्या वेदाचें ग्रहण केलें पाहिजे. कारण, तसें न केलें तर-"स्वाध्याय अध्ययन करावा." या वाक्याचें व्यर्थत्व होईल.

१ 'अध्येतव्यः' या शब्दांत तव्य प्रत्यय आहे, व तो कर्मापासून झाला आहे. ह्मणून तो येथें वेदाध्ययनरूप कर्माचा सूचक आहे असें समजावें.

२ यांतील स्वाध्याय शब्दाचा अर्थ वर सांगितला आहे. स्वाध्यायाकरितां जें तें स्वाध्यायार्थ, असें वाटतें? त्याचा भाव तें स्वाध्यायार्थत्व ह्म० अध्ययन करणें तें वेद येण्याकरितां, इतकाच या शब्दाचा अर्थ होतो.

३ येथें अक्षरांचें ग्रहण-स्वीकरण अर्थात् वेदाचीं अक्षरें पाठ येणें, असा अर्थ घेणें इष्ट आहे.

४ दृष्ट=अर्थ ह्म० प्रत्यक्ष दिसणारें फल, अथवा प्रयोजन, असा याचा अर्थ होतो. विधि जें जें कर्म करण्यास सांगतो त्याचें दृष्ट, अथवा अदृष्ट कांहीं फल असलें पाहिजे; त्यावांचून त्याची प्रवृत्ति होत नाहीं. त्याप्रमाणें येथें अध्ययनविधीचें वेद पाठ येणें हेंच दृष्ट फल मानलें आहे.

५ ह्या अध्यायांत मुख्यत्वेंकरून अधिकारन्याय सांगितला आहे. त्यांत पूर्वी साधारणतः स्त्रीपुरुषांचा अधिकार वगैरे सांगून, पुढें शूद्राचा अनधिकार सांगितला आहे. या अधिकरणांत प्रथम पूर्वपक्षांत शूद्रास अधिकार सांगितला आहे. तो पुढें लिहिल्याप्रमाणें-**"चातुर्वर्ण्यमविशेषात्"** [पु० मी० अ० ६ पा० ७ सू० २५] हें पूर्वपक्षसूत्र आहे. यावरील **शबराचार्य**कृत

आहे परंतु सिद्धांतीं तर, वेदाध्ययनास अर्थज्ञानहेतुत्वेंकरून दृष्टार्थत्व आहे. ह्मणजे अर्थ समजल्यानें तें दृष्टफल होतें. या हेतूस्तव, सामास ऋचेंतील अक्षरच्या अभिव्यक्तिद्वारानें ( मंत्रांतील अक्षरें प्रगट केल्यानें ) जसें स्तोत्रार्थत्व आहे; तद्वत 'अध्येतव्यः' या विधिवचनांतील 'तव्य' प्रत्ययानें स्वाध्यायार्थत्वद्वारा अध्ययनविधीस ज्ञानार्थत्व आहे, व अर्थाचा विचार केल्यावांचून त्याचें ज्ञान होणार नाहीं. व तो विचार **मीमांसा**शास्त्रावांचून अन्यशास्त्रावरून करतां येणार नाहीं. याकरितां, हें विचारशास्त्र

---

**भाष्या**नुसार याचा अर्थ पुढें लिहिल्याप्रमाणें–'अग्निहोत्रादि कर्मे हीं उदाहरणें होत. याविषयीं असा संदेह येतो कीं, तीं कर्मे काय ब्राह्मणादि ४ वर्णांस विहित होतात? अथवा शूद्रावांचून ३ च वर्णांस विहित होतात? असा संदेह येण्यास कारण कीं, वेद–**"ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत । अग्निहोत्रं जुहुयात्"** इत्यादि वचनांत 'यजेत । जुहुयात्' इत्यादि शब्दांहीं वर्णनियम न करितां ४ ही वर्णांचा अधिकार करून उच्चार करीत आहे. हें कशावरून? असें ह्मटल्यास **"अविशेषात्"** ह्म० वरील वचनांत वर्णविशेषांचें ग्रहण केलें नाहीं ह्मणून. तस्मात् शूद्र यागाधिकारापासून निवृत्त होत नाहीं. अर्थात् यज्ञविधायक **श्रुतीनें** अमक्याच वर्णानें यज्ञ करावा, असा विशेष ग्रहण केला नाहीं ह्मणून शूद्रासही यज्ञाधिकार आहे असें पूर्वपक्षीं सिद्ध होतें.

१ वर लिहिल्याप्रमाणें पूर्वपक्ष करून, त्याचा सिद्धांत पुढील सूत्रांत सांगितला आहे. तो–**"निर्देशाद्वा त्रयाणां स्यादग्न्याधेये ह्यसंबंधः क्रतुषु ब्राह्मणश्रुतिरित्यात्रेयः** [ पू० मी० अ० ६ पा० १ सू० २६ ] याचा **शबरभाष्यानु**सार अर्थ पुढें लिहिल्याप्रमाणें.– सूत्रांतला 'वा' शब्द पूर्वपक्षाची निवृत्ति करतो. आधानाचेठायीं "वसंतऋतूंत ब्राह्मणानें, ग्रीष्मऋतूंत क्षत्रियानें, व शरदृतूंत वैश्यानें अग्निहोत्र घ्यावें." या **श्रुतींत** शूद्रास अग्निहोत्र घेण्याविषयीं प्रमाणभूत श्रुतिवचन नाहीं. अतएव तो अग्निरहित. कारण, अग्निहोत्रादि कर्मे चालविण्याविषयीं अविद्यत्वास्तव त्यास सामर्थ्य नाहीं. तस्मात्–"स्वर्गेच्छूनें अग्निहोत्रहवन करावें." या **श्रुतीनें** प्रतिपादन केलेल्या हवनाचेठायीं शूद्रास, त्याचा अधिकार प्राप्त करून देणारी श्रुति नाहीं. यावरून यद्यपि वरील वचनांत वर्णविशेषाचा निर्देश केला नाहीं तथापि तें ब्राह्मणादिक ३ वर्णांसच अधिकृत करून प्रवृत्त होतें. व ते ब्राह्मणादिक तीं कर्मे करण्याविषयीं समर्थ आहेत. कारण, त्यांस आहवनीयादिक अग्नि आहेत. ते शूद्रास नाहींत. कारण, शूद्रास ते असण्याविषयीं विधि नाहीं. व ते अग्नि संस्कारशब्दानें अभिहित आहेत. अर्थात् ब्राह्मणादिकांस जे १६ संस्कार सांगितले आहेत, त्यांत अग्निसिद्ध करणें हा एक संस्कार आहे व तो शूद्रास नाहीं. तस्मात् शूद्र अग्निहोत्रादिकांचेठायीं अधिकृत नाहीं असें सिद्ध केलें आहे. यावर पुनः पूर्वपक्ष व उदाहरणादिक बहुत आहेत. तीं विस्तरभयास्तव येथें दिलीं नाहींत. परंतु, शेवटीं ३८ साव्या सूत्रभाष्यांत–**"असंभवः शूद्रस्य अग्निहोत्रादिषु"** अर्थ–अग्निहोत्रादिकांचेठायीं शूद्राचा असंभव आहे असा सिद्धांत केला आहे.

२ वेदवाक्यविचार अन्यशास्त्रानें होणार नाहीं. याविषयीं **माधवाचार्यांनीं जैमिनीयन्यायमालाविस्तरांत** पूर्वपक्षीं मीमांसाशास्त्राचें प्रयोजन नाहीं असें सिद्ध करून, सिद्धान्तीं असें

( मीमांसा ) आरंभिलें पाहिजे. हेंच **पूर्वमीमांसेंत**–"यानंतर या हेतूस्तव धर्मविचार करावा." या सूत्राच्या व्याख्यानांत–"अध्ययनविधीचें अर्थज्ञानानें दृष्टार्थत्व आहे या हेतूस्तव," असें 'अतः' या शब्दाच्या व्याख्यानांत **शबरस्वामि**कृत **भाष्यां**त सुचविलें आहे.

**तेन विचारं विना विध्यर्थासमाप्तेः वेदमधीत्य स्नायादिति स्मार्तस्नानोत्कर्षः । ततश्च अध्ययनविधेः उपनयीत तमध्यापयीत । उपनीय गुरुः शिष्यं महाव्याहृतिपूर्वकम् ॥ वेदमध्यापयेदेनं शौचाचारांश्च शिक्षयेत् [ या० स्मृ० अ० १ श्लोक० १५ ] इतिस्मृत्या उपनयनदृष्टार्थत्वाच्चोपनीतान्प्रत्येव प्रवृत्तत्वादुपनयनस्य च । आधाने सर्वशेषत्वात् [मी० द० अ० २ पा० ३ सू० ४] इति द्वितीयाध्यायन्यायेन वसन्ते ब्राह्मणमुपनयीत । ग्रीष्मे राजन्यम् । शरदि वैश्यमिति श्रुतिभिस्त्रैवर्णिकेष्वेव विधानेन शूद्रे तदभावात्क्रतुविधीनां चाध्ययनविधिसिद्धविद्यत्रैवर्णिकविषयत्वेनोपक्षीणानामन्यथानुपपत्त्यभावेन विधानाक्षेपकत्वाच्छूद्रस्य कर्मस्वनधिकार इति षाष्ठः सिद्धान्तोऽपि फलम् ।**

तेणेंकरून वेदार्थाच्या विचारावांचून,–"स्वाध्याय अध्ययन करावा." या अध्ययनविधीच्या अर्थाची केवळ तोंडपाठ आल्यानें समाप्ति होत नाहीं. या हेतूस्तव "वेदाध्ययन करून, स्नान करावें." या विधिवचनानें केवळ स्मार्त स्नानाचा उत्कर्ष मात्र दाखविला आहे; परंतु अर्थविचार नको असें दर्शविलें नाहीं. तदनंतर अध्यय-

म्हटलें आहे कीं,–"**अक्ताः शर्करा उपदधातीत्यत्र घृतेनैव न तैलादिनेत्येवंरूपोऽर्थः निगमनिरुक्तव्याकरणैर्नोपलभ्येत । विचारशास्त्रं तु तेजो वै घृतमिति वाक्यशेषादर्थं निर्णेष्यति**"–कोणत्या एका यज्ञांत–'माखलेले सकेरे जवळ ठेवावे.' असें वेदांत सांगितलें आहे; पण तेथें ते कशानें माखावे हें मुळींच सांगितलें नाहीं. व प्रकरणसंबंधानुसार तुपानेंच माखलेले असावेत, तेलादिकानें माखलेले नकोत–असा अर्थ पाहिजे; तो वर सांगितलेल्या **निरुक्तादिकां**नीं उपलब्ध होत नाहीं. परंतु **विचारशास्त्र–'तेजो वै घृतम्'** या वाक्यशेषानें तुपानेंच माखावे, तैलादिकानें नको. असा अर्थनिर्णय करील. अतएव वेदवाक्यविचार **मीमांसाशास्त्रा**वांचून होणार नाहीं, ह्मणून त्याचें आवश्यकत्व आहे.

१ वरील सूत्रांत 'अतः' शब्द आहे तो पूर्वकालाचा अपदेश करणारा असून, हेत्वर्थ आहे. जसें, "हा सुखकारक व सुभिक्ष आहे, या हेतूस्तव मी या देशांत राहतों." या वाक्यांत–सुखकारकत्व व सुभिक्षत्व हीं त्या देशांत रहाण्याविषयीं जसीं हेतुभूत आहेत, तसेंच सांग वेदाचें अध्ययन, हें धर्मजिज्ञासेविषयीं हेतुभूत आहे. जसें–अथ ह्मणजे सांगवेदाध्ययनानंतर, अतः ह्म० सांग वेदाध्ययन झालें आहे या हेतूस्तव, धर्मजिज्ञासा ह्म० धर्मविचार करावा. असा अर्थ होणें हें अतः शब्दाचें सामर्थ्य आहे. कारण धर्माकरितां वेदवाक्यविचार करण्याविषयीं,–ज्यानें वेदाध्ययन केलें नसेल तो समर्थ होणार नाहीं. या कारणास्तव, अध्ययनानंतर धर्म जाणण्याविषयीं इच्छा करावी. यावरून, वेदार्थविचारप्रतिपादक **मीमांसाशास्त्रा**चा आरंभ केला पाहिजे. कारण, वेदार्थविचार इतर शास्त्रांनीं होत नाहीं.

नविधीचें " ८ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें, व त्यास अध्यापन करावें". या श्रुतीनें व उपनयन करून गुरूनें शिष्यास महाव्याहृतिपूर्वक वेद पढवावा. आणि त्यास शौच आचार इत्यादिकांचें शिक्षण द्यावें." या **स्मृतीनें** उपयनदृष्टार्थत्व आहे, आणि उपनयन झालेल्याप्रतच अध्ययनविधीचें प्रवृत्तत्व आहे. व उपनयनाचें-"आधानाचेठायीं सर्व शेषत्वास्तव," या मीमांसेच्या द्वितीयाध्यायांतील न्यायानें-"वसंतऋतूंत ब्राह्मणाचें, ग्रीष्मऋतूंत क्षत्रियाचें, व शरदऋतूंत वैश्याचें उपनयन करावें." या **श्रुतींनीं** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या ३ वर्णांचेठायींच उपनयनाचें विधान केलें आहे. तेणेंकरून शूद्राचेठायीं पूर्व श्रुतींत उपनयनाचें विधान केलेलें नाहीं. या हेतूस्तव," व "स्वर्गेच्छूनें ज्योतिष्टोम यज्ञ करावा." इ० जे यज्ञाचे विधि आहेत, ते पूर्वोक्त अध्ययनविधिपूर्वक सिद्धविद्य ( विद्वान् झालेला ) अशा ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, या ३ वर्णविषयत्वेंकरून, शूद्राविषयीं उपक्षीण झाल्यानें व त्या यज्ञसंबन्धी विधींची प्रकारान्तरानें उपपत्ति नसल्यामुळें विद्याक्षेपकत्व होत नाहीं. या हेतूस्तव शूद्रास कर्माचेठायीं अधिकार नाहीं. हा ६ व्या **अध्यायां**तील सिद्धांतही फल आहे.

**तत्र यद्यपि श्रुत्यन्तरे । अष्टवर्षं ब्राह्मणं उपनयीत । तमध्यापयीत । इत्यध्यापने उपनीतग्रहणम् नाध्ययने । तथाप्यध्यापनस्य वृत्त्यर्थत्वेन याजयेदितिवद्विध्यनर्हत्वादाचार्यनिष्ठत्वेन माणवकसंस्कारत्वाभावाच्च । ब्राह्मण उपगच्छेत् सोऽधीयीत । इति विपरिणमतोऽर्थो ज्ञेय इति विवरणादयः । स्वाध्यायवत् चमसाध्वर्यून् वृणीत । इतिवच्चोपनयसंस्कार्यस्यापि बटोरनेनैव विनियोगादुपादेयत्वमिति पार्थसारथिराणकादयः । तत्र वसन्तादिवाक्यैरुपनयनप्राप्तेर्ब्राह्मणविशिष्टमुपनयनमनूद्याष्टवर्षकालो विधीयते । न च वाक्यभेदः उद्देश्यापर्यवसानेन विशिष्टोद्देशे तदभावादिति हेमाद्रिः । तत्त्वं तु विनिगमकाभावाच्छाखान्तरत्वादुभयत्रापि विशिष्टविधिरिति । अतएवोपादेयत्वेन विवक्षितं पुंस्त्वम् । अन्यथोपनयने संस्कार्यत्वाद्ग्रहैकत्ववत्पुंस्त्वाविवक्षया स्त्रीणामप्युपनयनप्राप्तिः केन वार्येत ॥**

त्यांत, यद्यपि अन्यश्रुतींत-"८ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनय करावें. व त्यास अध्या-

---

१ या शब्दाचा अर्थ **याज्ञवल्क्यानें**च सांगितला आहे. तो-"**स गुरुर्यः क्रियाः कृत्वा वेदमस्मै प्रयच्छति**" [ या० स्मृ० अ० १ श्लोक ३६ ] याची व्याख्या **विज्ञानेश्वरानें** असी केली आहे कीं,-"जो गर्भाधानापासून उपनयनापर्यंत सर्व संस्कार यथाविधि करून त्या ब्रह्मचाऱ्यास वेद पढवील, तोच गुरु होय. अशा प्रकारचें गुरुत्व पित्यावांचून इतरांस संभवत नाहीं." हा अर्थ येथें लिहिण्याचें कारण पुढें आचार्यशब्दव्याख्येंत येईल.

२ भूः १, भुवः २, स्वः ३, महः ४, जनः ५, तपः ६, सत्यम् ७ यांस महाव्याहृति ह्मणतात. ह्या पूर्वी ह्मणून वेदाध्ययनास प्रारंभ करावा. असें **विज्ञानेश्वरानें** वरील वचनाचें व्याख्यान केलें आहे. **गौतमानें** तर ओंकारपूर्वक पांचच व्याहृति ह्मणाव्या असें सांगितलें आहे. "**ओंपूर्वा व्याहृतयः पंच सत्यांताः**" [ गौ० स्मृ० अ० १ पहा. ]

पन करावें." यांत अध्यापनाविषयीं उपनीताचें ग्रहण केलें आहे, परंतु अध्ययनाविषयीं नाहीं. तथापि आध्यापन हें केवळ आवश्यक नसून उदरनिर्वाहार्थ आहे. तेणेंकरून, "यजमानाकरवीं यज्ञ करवावा." या वचनासारखें "वेद पढवावा" यास विध्यनर्हत्व आहे. अर्थात् जसें ब्राह्मणमात्रानें, वेदाध्ययन अवश्य केलेंच पाहिजे असें आहे, तसें शिष्याला पढविलेंच पाहिजे असें नाहीं. तर त्याच्या उदरनिर्वाहार्थ "किंवा अन्य कोणत्याही प्रयोजनासाठीं" पाहिजे असल्यास त्यानें शिष्यांस पढवावें. व ह्मणूनच अध्यापन हें विध्युक्त मानण्यास योग्य आहे असें नाहीं या हेतूस्तव. व त्यास आचार्यनिष्ठत्वेंकरून माणवकाच्या संस्कारत्वाचा अभाव आहे या हेतूस्तव; "आठ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें." या ठिकाणीं-"८ वर्षांच्या ब्राह्मणानें गुरूच्या समीप जावें." व "त्यास अध्यापन करावें." या ठिकाणीं-"त्यानें अध्ययन करावें. असें वाक्य बदलून त्याचा अर्थ जाणावा." असें **विवरणकर्ते** इत्यादिक ह्मणतात. व "स्वाध्याय अध्ययन करावा." याचप्रमाणें "चमसाध्वर्यूस वरावें." यासारखें "उपनयनेंकरून संस्कार करण्यास योग्य अशा ब्राह्मणवटूचें या वाक्यानें विनियोगास्तव, उपादेयत्व आहे." असें **पार्थसारथि** व **राणक** इत्यादि ह्मणतात. त्यांत-वसंत, ग्रीष्म, शरत् या वाक्यांनींच उपनयनाची प्राप्ति होत असतां, ब्राह्मणविशिष्ट उपनयनाचा अनुवाद करून, "८ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें." या वाक्यांत त्या संस्काराचा काल अनियमित नसावा ह्मणून अष्टवर्षात्मक कालाचें विधान केलें आहे. ह्यावरून,-"वसंत ऋतूंत ब्राह्मणाचें उपनयन करावें." हें व "८ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें." या दोनही वाक्यांचा भेद होतो असें ह्मणूं नका. कारण, "उद्देशाचें पर्यवसान न झाल्यानें, विशिष्टोद्देशाचेठायीं भेदाचा अभाव आहे ह्मणून येथें वाक्यभेद होत नाहीं," असें **हेमाद्रि** ह्मणतो. यांतील तत्त्व तर, विनिगमकाच्या अभावास्तव, व शाखांतरविषयत्वास्तव, दोहीं पक्षांत विशेषविधि आहे, हें होय. अतएव उपादेयत्वेंकरून उपनयनविधायक दोन्ही वाक्यांत "**ब्राह्मणम् राजन्यम्**" इ० शब्दांनीं पुरुषत्वाची विवक्षा केली आहे. अर्थात् उपनयनसंस्कार ब्राह्मणादिजातीय पुरुषांसच करावा, असें सिद्ध होतें. नाहींतर, उपनयनाचेठायीं संस्कार करण्याची योग्यता आहे. या हेतूस्तव, ग्रहांच्या एकत्वासारखें पुरुषत्वाची विवक्षा न केल्यानें, स्त्रियांसही उपनय प्राप्त होईल, तें कोणाच्यानें निवृत्त करवेल?

---

१ याचा अभिप्राय असा आहे कीं-"उपनयन करून वेद पढवावा." असें आहे परंतु "उपनयन झालेल्यानेंच वेद पढावा." असें वाक्य नाहीं.

२ याविषयीं **मनूनें**-"अध्ययन सांगणें १, अध्ययन करणें २, यज्ञ करणें ३, अन्याकडून करविणें ४, दान देणें ५, दुसऱ्याकडून घेणें ६, [ अ० १ श्लोक ८८ पहा. ] अशीं ६ कर्में सांगून, पुढें त्यांतून यजन, अध्ययन, दान, हीं तीन अवश्यक, व बाकीचीं ३ उदरनिर्वाहाचीं साधनें असें सांगितलें आहे. [ अ० ४ श्लोक ९ पहा. ] जर अन्य रीतीनें निर्वाह होत असेल, तर हीं केलींच पाहिजेत असें नाहीं [ भा० स्कं० ७ अ० ११ पहा. ]

३ पूर्वकालीं स्त्रियांचेंही उपनयन करीत असत. याविषयीं **हारीतानें** ह्मटलें आहे कीं,-

यत्तु तन्त्ररत्ने ॥ तस्या यावदुक्तमाशीर्ब्रह्मचर्यमित्यत्राष्टवर्षवाक्ये द्वितीयया संस्कार्यत्वालिङ्गाविवक्षया न्यायेन स्त्रिया उपनयनप्राप्तावपि निषेधादेवोपनयनाभाव इत्युक्तम्। तदध्वर्युं वृणीत इतिवत्स्वाध्यायस्योपादेयत्वाद्वसन्तादिवाक्येऽपि तत्त्वाचिन्त्यम्। अत एव पण्ढस्योपनयनं न शूद्रसधर्मत्वात् । अतएव मिताक्षरायां देवलः ॥ पण्ढको हीनलिङ्गः स्यात्संस्कारार्हश्च नैव सः॥ याज्ञवल्क्यः॥ पण्ढं तु ब्राह्मणं हत्वा शूद्रहत्याव्रतं चरेदित्याह । बौधायनसूत्रस्मृत्यर्थसारादयस्तु पण्ढस्य वचनादुपनयनमाहुः। एतच्चाग्रे वक्ष्यामः। अतएवोपादेयगतत्वादष्टवर्षत्वमेकत्वं च विवक्षितम् । नन्वेवं न्यायत एव शूद्रस्य कर्मानधिकारसिद्धेः तस्माच्छूद्रो यज्ञेऽनवक्लृप्तः इति निषेधो व्यर्थ इति चेत्। न्यायप्राप्तानुवाद इति भाट्टाः ॥

जे **तन्त्ररत्नांत**–"तिला ( स्त्रीला ) जेवढें आशीर्ब्रह्मचर्य उक्त आहे."–येथें–**'अष्टवर्ष'** या वाक्यांतील द्वितीया विभक्तीनें संस्कार्यत्व सांगितलें आहे. या हेतूस्तव पुरुष, स्त्री, अथवा नपुंसक, यांतील कोणत्याही लिंगाची विवक्षा न केल्यानें न्यायतः स्त्रियांस उपनयन प्राप्त झालें असतांहि निषेधास्तवच उपनयनाचा अभाव आहे." असें सांगितलें आहे. तें–" अध्वर्यूला वरावा." या वाक्यासारखें स्वाध्यायाच्या उपादेयत्वास्तव: न "**वसन्ते ब्रा०**" इ० वाक्यांतहि तत्त्व आहे या हेतूस्तव सुज्ञांनीं विचार्य आहे. याकरितांच नपुंसकास उपनयनसंस्कार नाहीं. कारण, त्याला शूद्रसमानधर्मत्व आहे. याच अभिप्रायानें **मिताक्षरेंत देवल** ह्मणतो, कीं–"नपुंसक व हीनलिंग (इंद्रिय नसलेला), ब्राह्मणाचा पुत्र असला तथापि तो उपनयनसंस्कारास योग्य नाहीं." परंतु तें कां नसावें? असा प्रश्न होतो. याविषयीं **याज्ञवल्क्यानें** "नपुंसक ब्राह्मणपुत्रास कोणी मारल्यास त्यानें दोषनाशार्थ ब्रह्महत्येचें प्रायश्चित्त न करितां शूद्रहत्येचें प्रायश्चित्त करावें. असें ह्मटलें आहे." यावरून, नपुंसकास ब्राह्मण्यच नाहीं तो शूद्रसमान आहे. ह्मणून नपुंसकास उपनयनसंस्कार नाहीं. **बौधायनसूत्र**

---

**"द्विविधाः स्त्रियो ब्रह्मवादिन्यः सद्योवध्वश्च । तत्र ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भैक्ष्यचर्येति । सद्योवधूनामुपनयनं कृत्वा विवाहः कार्यः"**– द्विजस्त्रिया दोन प्रकारच्या आहेत, ब्रह्मवादिनी, व सद्योवधू. त्यांत ब्रह्मवादिनीस उपनयन, अग्निहोत्र, वेदाध्ययन, व आपल्या घरीं भिक्षा मागणें हीं कर्में विहित आहेत. व सद्योवधूंचें उपनयन करून विवाह करावा हें विहित आहे. परंतु **निर्णयसिन्धु**कर्ता वरील वचन घेऊन ह्मणतो–हें अन्य युगांस लागू आहे. कारण; **"पुरा कल्पे तु नारीणां मौञ्जीबन्धनमिष्यते ॥ अध्यापनं च वेदानां सावित्रीवाचनं तथा"** [ य० स्मृ० ३५ ] पूर्वकल्पांत स्त्रियांस मौञ्जीबंधन इष्ट होतें ( करीत होते. ) तसेंच वेद पढविणें, पढणें, गायत्री ह्मण इत्यादि क्रिया करीत असत. ह्या **यमा**च्या वचनावरून स्त्रियांस उपनयनादिक पूर्वी होतीं परंतु सांप्रत करीत नाहींत [ नि० सिं० प० ३ पू० पुनरुपनयनप्रकरण पहा ] असें स्पष्ट सिद्ध होतें. एकंदरींत वरील प्रकार बरींच वर्षे रूढींत नाहीं याविषयीं संशय नाहीं.

व **स्मृत्यर्थसार** इत्यादि ग्रंथकर्ते तर–" उपनयनविधायक वचनास्तव, नपुंसकाचें उपनयन करावें." असें ह्मणतात. हें सविस्तर पुढें सांगूं. अतएव उपादेयगतत्वास्तव, "**अष्टवर्षं०**" या वचनांत "८ वर्षांचा" अशा पुल्लिंगनिर्देशानें ८ वर्षांचा पुरुष, व एकवचनप्रयोगानें एकत्व, हीं विवक्षित आहेत. यावर शंका–जर असा न्यायतः शूद्रास उपनयनाचा अधिकार नाहीं हें सिद्ध आहे तर, "**तस्माच्छूद्रो०**" (पृ० ४ पं० २ पहा) या श्रुतीनें केलेला निषेध व्यर्थ आहे? असें ह्मणशील तर ह्मणूं नको; कारण, तो–" न्यायतः प्राप्त झालेल्या कर्मानधिकाराचा अनुवाद आहे." असें **भट्ट** ह्मणतात.

**वेदान्तिनस्तु तव्यप्रत्ययेन स्वाध्यायस्य भाव्यत्वावगतेः प्रथमोपस्थितत्वात् हुंफडादौ तस्यावश्यकत्वादेकरूप्याच्चाक्षरग्रहणमेव भाव्यम्। न च क्रतुभिरर्थज्ञानाक्षेपात्पुस्तकादिना शूद्रस्याप्यधिकारापत्तिः। यथा भाट्टमतेऽध्ययनविधिसिद्धविद्याग्रहणेन क्रतूनां शूद्रे विद्यानाक्षेपकत्वम् तथार्थज्ञानमपि अध्ययनविधिद्वाराक्षरग्रहणोपायेन चरितार्थत्वान्न शूद्रस्य पुस्तकाद्युपायमाक्षिपतीति तुल्यः। प्राप्यतां वाक्षेपाच्छूद्रस्याधिकारः सतु पद्यु वा इति श्रुत्या निषिध्यते। अस्मान्निषेधादेवाध्ययनस्याक्षरग्रहणार्थत्वम्। अन्यथा शूद्रस्य प्राप्त्यभावान्निषेधो व्यर्थः स्यादित्याहुः। सर्वथा शूद्रस्य कर्मण्यधिकारः सिद्धः।**

**वेदांती** तर–, "**अध्येतव्यः**" यांतील तव्य प्रत्ययानें स्वाध्यायाचें भाव्यत्व अवगत होतें ह्मणून, प्रथमोपस्थितत्वास्तव "**हुम् फट्**" इ० शब्दाचेठायीं त्याच्या अवश्यकत्वास्तव, व एकरूपत्वास्तव वेदाचीं अक्षरें पाठ करणें, हेंच होतें. यावरून यज्ञांहीं अर्थज्ञानाच्या आक्षेपास्तव पुस्तकादिसाधनांनीं शूद्रासही अधिकाराची प्राप्ति होत नाहीं. जसें **भाट्ट**मतीं–अध्ययनविधीनें सिद्ध झालेल्या विद्येचें ग्रहण केलें आहे तशा विद्येचें ग्रहण केल्यानें यज्ञास शूद्राविषयीं विद्येचें आक्षेपकत्व नाहीं. तसेंच अर्थात् शूद्रास यज्ञाधिकार मानल्यास विद्येची अपेक्षा नाहीं. अर्थज्ञानही अध्ययनविधिद्वारानें अक्षरें पाठ करण्याच्या उपायानें अध्ययनाचें चरितार्थत्व आहे, अर्थात् तें सिद्ध होण्याचा संभव असल्यावरून, शूद्रास अध्ययनास पुस्तकादि उपायांचा आक्षेप करीत नाहीं असा पक्ष बरोबर आहे, अथवा आक्षेप होतो असें मानल्यास पाहिजे तर अधिकार प्राप्त होवो, परंतु तो तर, "**पद्यु वा०**" (पृ० ४ पं० १ पहा) या श्रुतीनें निषिद्ध होतो व या निषेधावरूनच अध्ययनास अक्षरग्रहणार्थत्व आहे. वेद तोंडपाठ येणें यासच अध्ययन ह्मणतात. नाहींतर शूद्रास मुळींच अध्ययनाच्या प्राप्तीचा अभाव असल्यानें पूर्वोक्त श्रुतीनें केलेला निषेध व्यर्थ होईल." असें ह्मणतात. अस्तु, यावरून सर्वथा शूद्रास कर्माविषयीं अधिकार सिद्ध झाला.

**ग्रहणविवादस्तु उपनयीतेति नीञ्धातोः॥ सम्माननोत्सञ्जनाचार्यकरणज्ञानभृति-**

१ याचें विधायक वचन पुढें ४ थ्या प्रकरणांत येईल.

२ या सूत्रांत उत्सञ्जन, ज्ञान, विगणन, व व्यय हे 'नीञ्' धातूचे वाच्यार्थ आहेत, व इतर ह्मणजे सम्मानन, आचार्यकरण, आणि भृति हे तीन अर्थ प्रयोगोपाधि ह्मणजे–महानिबंधकारांनीं

**विगणनव्ययेषु नियः [ पा० सू० पा० अ० १ पा० ३ सू० ३६ ] इति पाणिनिस्मृतेः। स चाचार्यकरणत्वे भाव्ये आत्मनेपदस्मृतेरुपनयनस्याङ्गत्वेनाफलत्वेऽपि। उपनीय तु यः शिष्यं वेदमध्यापयेद्द्विजः ॥ सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ॥ १ ॥ इति स्मृतेरध्यापनफलमेवाङ्गे उपचर्यते ॥ वर्म वा एतद्यज्ञाय क्रियते यत्प्रयाजा इज्यन्ते इतिवत्। तेनाध्यापनविधिप्रयुक्तत्वेऽप्यध्ययनस्य माणवकनिष्ठत्वेनान्तरङ्गत्वादर्थज्ञानार्थत्वमपि। क्रतूनां च तत्सिद्धविद्योपजीवित्वादुपायान्तरानाक्षेपाच्छूद्रस्यानधिकार इति प्राभाकराः। तदयुक्तम्। आचार्यकरणत्वस्य कर्त्रभिप्रायत्वे नीञ्धातोर्ञित्त्वात् स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले [ पा० सू० पा० अ० १ पा० ३ सू० ७२ ] इत्येतेनात्मनेपदसिद्धेः। संमाननेत्यादि विधानं व्यर्थं स्यात्। तेनाकर्त्रभिप्रायेऽप्यात्मनेपदविधानार्थमेतत्सूत्रम्। तदुक्तं महाभाष्ये अकर्त्रभिप्रायार्थोऽयमारंभ इति। ततश्च क्रियाफलत्वेऽप्यकर्त्रभिप्रायत्वान्नाचार्यकरणत्वं भाव्यमिति दिक्। विशेषस्तु विवरणे तन्त्ररत्ने च ज्ञेयः।**

ग्रहणविवाद तर 'उपन०' यांतील मूळ धातु नीञ् याला—"संमानन[१], उत्सञ्जन[२], आचार्यकरण[३], ज्ञान[४], भृति[५], विगणन[६], आणि व्यय[७] ह्या अर्थी आत्मनेपद होतें" अशी त्या अर्थी या धातूचा उपयोग केला आहे ह्मणून ते अर्थ घ्यावयाचे असें **भट्टोजीदीक्षितांचें** मत आहे. परंतु यांतून आचार्यकरणास परंपरेनें प्रयोगोपाधित्व आहे याविषयीं त्या शब्दावरील टिपेंत विचार करूं.

१ सम्यक् ह्मणजे उत्तम प्रकारेंकरून जें मानन तें संमानन; अर्थात् शास्त्रांतील सिद्धांत शिष्यास उत्तम प्रकारें समजावून देणें, असा फलितार्थ होतो.

२ 'उत्'—ह्मणजे ऊर्ध्व जें सञ्जन तें—उत्सञ्जन; अर्थात् वर फेंकणें यास उत्सञ्जन ह्मणतात.

३ 'आचार्यकरण' ह्मणजे आचार्यत्व करणें; अर्थात् माणवकास (मुंजास) यथाविधि आपल्याजवळ पोहोंचविणें यास उपनयन ह्मणतात. एतत्पूर्वक जें वेदादिकांचें अध्यापन त्यानें उपनयन करणाऱ्या पित्रादिकांचे ठायीं आचार्यत्व सिद्ध केलें जातें, असा आचार्यकरणशब्दाचा अभिप्राय आहे. वस्तुतः उपनयन ह्मणजे वेदाचा पूज्यताप्रयोजक एक संस्कार त्यास परगामित्व (माणवकनिष्ठत्व) आहे ह्मणून परस्मैपद प्राप्त जाहलें असतां—"**सम्माननो०**" या सूत्रानें 'तङ्' प्रत्ययाचें विधान केलें जातें; यावरून केवळ उपनयनानेंच आचार्यत्व सिद्ध होत नाहीं तर उपनयनपूर्वक वेदाध्यापनानें आचार्यत्व सिद्ध होतें. कारण—"**उपनीय दद्द्वेदानाचार्यः स उदाहृतः**" उपनयन करून वेद देणाऱ्यास आचार्य असें ह्मटलें आहे अशी **स्मृति** आहे. यावरून आचार्यकरणास प्रत्यक्ष प्रयोगोपाधित्व नसून परंपरेनें आहे असें जाणावें.

४ तत्त्वाचा निश्चय करणें.

५ 'भृति' ह्मणजे पगार मजुरी असा अर्थ आहे.—उदाहरणार्थ कामकऱ्यांस 'उपनयते' ह्मणजे त्यांच्या मजुरीचें द्रव्य देऊन त्यास आपल्याजवळ आणतो. येथें भृत्यर्थ आहे.

६ 'विगणन' ह्मणजे ऋणादिकांचें फेडणें. उदाहरणार्थ—'करं विनयते' कर भरतो असा अभिप्राय आहे.

७ 'व्यय' ह्मणजे खर्च—उदाहरणार्थ 'शतं विनयते' शेंकडों द्रव्य धर्मार्थ खर्च करितो, असा अभिप्राय आहे.

**पाणिनींची** स्मृति आहे, व आचार्यकरणत्व भाव्य असतां तें पद होतें अशी **स्मृति** आहे. ह्मणून उपनयास अंगत्वेंकरून अफलत्व असतांही "जो उपनयन करून शिष्यास **कल्पसूत्र, व उपनिषदें** इत्यादिकांसह वेद पढवील त्याला आचार्य ह्मणतात." अशी **मनुस्मृति** आहे ह्मणून अंगभूत उपनयनाचे ठायीं अध्यापनरूप फल उपचार पावतें. त्यास "वर्म" ह्मणतात, 'जें न जाणून केलें जातें, व प्रयाज हवन केले जातात' ह्याचेपरी उपचार पावतें, तेणेंकरून जरी अध्ययनास अध्यापनविधिप्रयुक्तत्व आहे तरी अध्ययन करणें हें माणवकनिष्ठ आहे तेणेंकरून अन्तरंगत्वास्तव अर्थज्ञानार्थत्वही प्राप्त होतें, व यज्ञाचें, अध्ययनविधिसिद्ध विद्योपजीवित्व आहे या हेतूस्तव, व अन्य उपायाच्या आक्षेपाच्या अभावास्तव शूद्रास अधिकार नाहीं." असें **प्राभाकर** ह्मणतात तें अयुक्त आहे. कारण, आचार्यकरणत्वास कर्त्रभिप्रायत्व असतां नीञ् धातूस त्याचा अंत्य ञकार इत्संज्ञक असल्याकारणानें यानें आत्मनेपद सिद्ध जाहलें असतां पुनः "**सम्माननो०**" ह्या सूत्रानें केलेलें विधान व्यर्थ होईल, यावरून कर्त्रभिप्राय नसतांही आत्मनेपदाचें विधान करण्याकरितां हें सूत्र आहे; तेंच **पातञ्जलमहाभाष्यांत** सांगितलें आहे–जसें "ह्या आरंभ ह्मणजे सम्मानन हें सूत्र करणें हें अकर्त्रभिप्रायार्थ आहे" त्यावरून क्रियाफलत्व असतांही आचार्यकरणत्व भाव्य नाहीं येथें हें केवळ दिग्दर्शन मात्र केलें आहे. एतत्संबंधीं विशेष विचार **विवरण** व **तंत्ररत्न** या ग्रंथांत पहावा. एवंच शूद्रांस श्रवणाधिकार आहे असें सिद्ध झालें.

**तत्र शूद्रस्य वेदश्रवणे तावन्नाधिकारः । कपिलाक्षीरपानेन ब्राह्मणीगमनेन च ॥ ॥ ७४ ॥ वेदाक्षरविचारेण शूद्रश्चाण्डालतां व्रजेत् [ प० स्मृ० अ० १ श्लो० ७५ ] इति पराशरोक्तेः । उत्तरमीमांसायां व्याससूत्रेऽपि ॥ श्रवणाध्ययनार्थप्रतिषेधात्**

---

१ यावरून साङ्गवेद पढविणारास आचार्य अशी संज्ञा आहे. **याज्ञवल्क्याचाही** असाच आशय आहे. याविषयीं [या० स्मृ० अ० १ श्लो० ३६] याची **व्याख्या** पहा.

२ वेदाध्ययनाचा अध्यापनविधि हा प्रयोजक आहे असा अभिप्राय आहे.

३ 'माणवक' हा शब्द बालाचा वाचक आहे, व सोळा वर्षांचें वय होईपर्यंत बाल असें ह्मणतात. **अमरसिंहानें "बालस्तु स्यान्माणवकः"** असें ह्मटलें आहे, व ब्राह्मणास उपनयनकालाची परम मर्यादा सोळा वर्षांपर्यंत सांगितली आहे. यावरून "माणवक" ह्मणजे मराठींत ज्यास मुंजा ह्मणतात तो, 'तन्निष्ठ' ह्मणजे त्याच्यावर अवलंबून राहणारें.

४ 'अध्ययनविधिसिद्धविद्योपजीवित्व' ह्मणजे यथाविधि वेदाध्ययन करून विद्वान् जाहलेल्या द्विजावर अवलंबून राहणें; अर्थात् यज्ञ हे पूर्वोक्त प्रकारच्या पुरुषाच्या हातून व्हावयाचे आहेत.

५ "इत्" ही एक **व्याकरणशास्त्रांतील** संज्ञा आहे. ही ज्या वर्णास होते त्याचा बहुतकरून लोप होत असतो.

६ **पतञ्जलि**नामक ऋषीनें **पाणिनीय** सूत्रांवर **भाष्य** केलें आहे. यासच **महाभाष्य** ह्मणतात, व **शारीरभाष्यालाही महाभाष्य** असें क्वचित् ह्मटलें आहे–उदाहरणार्थ '**शब्देंदुशेखरांत'–"पातंजले महाभाष्ये०"** यावरची व्याख्या पहा.

स्मृतेश्च [ बाद० अ० १ पा० सू० ३८ ] त्यत्र शूद्रस्य वेदश्रवणादिं निषिद्धम् । इदं शङ्कराचार्यैर्व्याख्यातम् । श्रवणप्रतिषेधो भवति । अथ हास्य वेदमुपशृण्वतस्त्रपुजतुभ्यां श्रोत्रपूरणम् [ गौ० स्मृ० प्र० २ अ० ११ ] इति । पद्यु वा एतच्छ्मशानं यच्छूद्र इति । भवति चोदाहरणे जिह्वाच्छेदो धारणे शरीरभेदः [ गौ० स्मृ० प्र० २ अ० ११ ] इति । तथा वेदार्थज्ञानमपि । न शूद्राय मतिं दद्यान्नोच्छिष्टं न हविः कुतम् । न चास्योपदिशेद्धर्मं न चास्य व्रतमादिशेदिति पाद्मोक्तेः (मतिर्वेदार्थोपदेशः ) न शूद्राय परिज्ञानं दद्याद्वेदमुखेन त्विति पराशरीयपुराणात् । वेदार्थज्ञाननिषेधान्मीमांसाद्यध्ययनमपि निषिद्धम् ॥

त्यांत शूद्रास वेदश्रवणाविषयीं अधिकार नाहीं. कारण, "कपिला[१] गायींच्या दुग्धप्राशनानें, ब्राह्मणस्त्रीगमनानें, वेदाक्षरांच्या विचारानें[२]–शूद्र चांडालतेस पावेल." अशी **पराशरो**क्ति आहे. **उत्तरमीमांसे**त **व्याससूत्रां**तही "वेद ऐकणें, अध्ययन करणें, अर्थ जाणणें व अनुष्ठान करणें यांचा निषेध करणाऱ्या **स्मृति** आहेत ह्मणून" येथें शूद्रास वेदश्रवणादिक निषेधिलें आहे. **शंकराचार्यांनीं** याची व्याख्या केली आहे. ती अशी कीं,–"शूद्रास वेदश्रवणाचा निषेध होतो." कारण–'वेदश्रवण करणाऱ्या शूद्राचे कान शिशाच्या व कथिलाच्या रसानें भरावेत.' असा **गौतमानें** निषेध केला आहे, व '**पद्यु वा०**'. (पृ० ३ पं० १२ पहा) 'या श्रुतीनें निषेध केला आहे, व वेदोच्चार केला असतां शूद्राची जीभ कापावी व त्यानें वेदाचें धारण ( तोंडपाठ ) केल्यास त्याचा शरीरभेद ( देहनाश ) करावा.' असेंही सांगितलें आहे. एवंच जसें वेदाचें श्रवण, व धारण निषिद्ध केलें आहे, तसेंच वेदार्थज्ञानही निषिद्ध आहे; कारण,–'शूद्रास वेदार्थाचा उपदेश, उच्छिष्ट अन्न, व पुरोडाश इत्यादि होमद्रव्य देऊं नये व त्यास धर्माचा अथवा व्रताचा प्रकार सांगूं नये.' अशी **पद्मपुराणो**क्ति आहे." आणखी शूद्रास वेदवाक्यद्वारा अर्थज्ञान देऊं नये" असा **पराशरपुराणां**त निषेध केला आहे. याप्रमाणें वेदार्थज्ञाननिषेधास्तव त्याच्या अर्थाचें प्रतिपादन करणाऱ्या अशा **मीमांसा**दि शास्त्रांचें अध्ययनही[३] निषिद्ध आहे.

तथा वेदमूलत्वात्स्मृतिपुराणाद्यध्ययनं निषिद्धम् । पुराणं पञ्चमो वेदः पुराणं वेदसंमितमिति स्मृतेः । तस्मादिदं वेदविद्भिरध्येतव्यं प्रयत्नतः ॥ शिष्येभ्यश्च प्रवक्तव्यं सद्वृत्तेष्वेव धर्मतः ॥ १ ॥ इति स्मृतिकौमुद्यामत्रिस्मृतेः । मनुरपि ॥ निषेकादिश्मशानान्तो मंत्रैर्यस्योदितो विधिः ॥ तस्य शास्त्रेऽधिकारोऽस्मिन् ज्ञेयो

१ "कपिला" हें एक प्रकारच्या विशिष्ट लक्षणावरून गाईचें नांव पडलें आहे.

२ मूळवचनांत–'वेदाक्षरांचा' असें ह्मटलें आहे, तथापि विचारशब्दानें श्रवणच घ्यावयाचें. येथें ब्राह्मणस्त्रीचा संग करणारा शूद्र चाण्डालत्व पावेल असें सांगितलें आहे, व या संगापासून होणाऱ्या पुत्रांस चाण्डाल ह्मटलें आहे तें पुढें जातिनिर्णयांत येईल.

३ येथें पुराणादिकांच्या अध्ययनाचा निषेध केला आहे. यावरून त्यांचें श्रवणहि निषिद्ध आहे असें समजूं नये. याविषयीं **भारत**वचन आहे तें पुढें येईल.

नान्यस्य कस्यचित् ॥ १ ॥ एवं स्मृत्यादिश्रवणमपि । नाध्येतव्यमिदं शास्त्रं वृषलस्य तु सन्निधौ ॥ योऽधीते चैव मोहात्मा स याति नरकान्बहूनिति कौर्मोक्तेः । वायुसंहितायामपि ॥ नावेदविद्यः कथनीयमेतत्पुराणरत्नं पुरशासनस्य ॥ नाभक्तशिष्याय च नास्तिकेभ्यो दत्तं हि यत्तन्नरकं ददाति ॥ १ ॥ भविष्यपुराणे ॥ यान्येतानि त्वयोक्तानि धर्मशास्त्राणि सुव्रत ॥ नेच्छामि श्रोतुं विप्रेंद्र गुह्यान्येतानि हि द्विज ॥ १ ॥ त्रयाणामेव वर्णानां प्रोक्तान्येतानि पण्डितैः ॥ श्रेयसे न तु शूद्राणामत्र मे वचनं शृणु ॥ २ ॥ ब्राह्मणादिषु वर्णेषु त्रिषु वेदाः प्रतिष्ठिताः ॥ मन्वादीनि च शास्त्राणि तथाङ्गानि च सर्वशः ॥ ३ ॥ अत्र श्रवणस्य वाचनस्य च शूद्रप्राधान्येन साक्षान्निषेधः । न तु विप्रद्वारा । तदुक्तं महाभारते ॥ श्रावयेच्चतुरो वर्णान् कृत्वा ब्राह्मणमग्रतः इति । नारदीयेऽपि ॥ ये च धर्मपरा राजन् देवद्विजपरायणाः ॥ तेषां मध्ये हरेरग्रे पठनीयं द्विजातिभिरिति ।

तसेंच वेदास मूलाधारभूत धरून **मन्वादिकांनीं स्मृति, पुराणें, उपपुराणें,** व **पुराणसंहिता** इत्यादिक रचलीं आहेत, ह्मणून त्यांचेंही अध्ययन निषिद्ध आहे. कारण, –"पुराणें हा पांचवा वेद आहे; अतएव हीं वेदतुल्य होत." अशी **स्मृति** आहे. तसेंच–"तस्मात् हें शास्त्र ( स्मृति ) प्रयत्नपूर्वक वेदवेत्त्यांनीं अर्थात् द्विजांनीं अध्ययन करावें. व सद्वर्तन करणाऱ्या शिष्यांसच द्यावें." अशी **स्मृतिकौमुदीं**त **अत्रिस्मृति** आहे. **मनुहि**–"गर्भाधानापासून स्मशानापर्यंत सर्व विधि वैदिक मंत्रांनीं करण्याचा ज्यास अधिकार आहे, त्याचा या शास्त्राचे–( मनुस्मृतीचे ) ठायीं अधिकार आहे अन्य कोणाचाही नाहीं, असें समजावें." असें ह्मणतो. यावरून पुराणें व मन्वादि स्मृति इत्यादिकांच्या पठणाविषयीं शूद्रास अधिकार नाहीं हें जसें सिद्ध होतें

१ येथें पुराणांस पांचवा वेद असें ह्मटलें आहे, तर–वेदांत जशीं निरनिराळीं सूक्तें, **मधुच्छंदा, पराशर** इत्यादि ऋषींनीं गाइलीं आहेत, तशींच पुराणेंहि पराशर, मैत्रेय, वसिष्ठ इत्यादिकांनीं रचून आपल्या शिष्यांस पढविलीं आहेत, व वेदाचा अर्थ त्यांत वर्णन केला आहे. वेद जसा स्वतःप्रमाण आहे; तशीं हीं **पुराणें**हि स्वतःप्रमाण आहेत. याविषयीं **जैमिनीय न्यायमालाविस्तरांत माधवाचार्यां**नीं बरेंच विवेचन केलें आहे.

२ या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ—शास्तीति शास्त्रम्; शिक्षण करतें तें शास्त्र असा आहे. संबंधावरून धर्मादिकांचें शिक्षण करितें जें तें असा अर्थ घेतां येईल. **माधवाचार्यांनीं "प्रवृत्तिर्वा निवृत्तिर्वा नित्येन कृतकेन वा ॥ पुंसां येनोपदिश्येत तच्छास्त्रमभिधीयते"** ॥ १ ॥ अर्थ–प्रवृत्ति ( यज्ञादि काम्य कर्में ) व निवृत्ति ( ईश्वरसेवनादि निष्काम कर्में ) नित्य अथवा नैमित्तिक रूपानें पुरुषास ज्यानें उपदेशिलीं जातात त्यास शास्त्र ह्मणावें, व मन्वादिस्मृतींत प्रवृत्तिनिवृत्तिलक्षण धर्मांचें प्रतिपादन केलें आहे ह्मणून हीं शास्त्रें होत.

३ या स्मृति मुख्यत्वेंकरून धर्मप्रतिपादक आहेत, व यांचा वैदिकमंत्रांशीं निकट संबंध असतो ह्मणून शूद्रांनीं त्यांचें श्रवण करूं नये असा अभिप्राय असावा.

तसेंच श्रवणहि शूद्रास निषिद्ध आहे. कारण-"हें शास्त्र [१] 'पुराण' शूद्राच्या सन्निध पढूं नये. जो मोहाविष्ट होऊन पढतो तो बहुत नरकांस जातो" अशी **कूर्मपुराणो**क्ति आहे. **वायुसंहितें**तही-"वेद न जाणणाऱ्यांस (शूद्रादिकांस,) हें पुराणरत्न कथन करूं नये, तसेंच वेदवेत्ता असून ज्यास भक्ति नाहीं अशा शिष्यास, व वेदनिंदकास हें देऊं नये; जर दिलें तर नरकप्रद होतें." असें सांगितलें आहे. **भविष्यपुराणां**त-"हे सुव्रता विप्रेंद्रा जीं हीं धर्मशास्त्रें सांगितलींस तीं मी श्रवण करण्यास इच्छीत नाहीं; कारण हीं अतिगुह्य आहेत, व तीं ब्राह्मणादि तीन वर्णांसच श्रेयस्कर होत, इतरांस नाहींत असें पंडितांनीं सांगितलें आहे. ब्राह्मणादि तीन वर्णांचे ठायीं वेद प्रतिष्ठित आहेत, अर्थात् त्यांसच वेदाधिकार आहे, तशींच मन्वादि **धर्मशास्त्रें** व व्याकरणादिक **अंगें**[२]हि त्यांसच विहित आहेत." असें सांगितलें आहे. येथें पुराणादिकांचें श्रवण, व वाचन निषेधिलें आहे, तें शूद्रास मुख्य करून इतरांनीं, व साक्षात् शूद्रानेंच करण्याविषयीं आहे असें समजावें, ब्राह्मणद्वारा निषिद्ध नाहीं. तेंच **महाभारतां**त सांगितलें आहे. जसें-ब्राह्मणांस पुढें करून चारही वर्णांनीं पुराणादि श्रवण करावें. **नारदीय** पुराणांतही-"जे जन धर्मतत्पर व देवब्राह्मणपूजक असतील, त्यांमध्यें विष्णुप्रतिमेच्या अग्रभागीं ब्राह्मणांनीं हें पुराण पठण करावें." असें सांगितलें आहे.

**भागवतेऽपि ॥ स्त्रीशूद्रद्विजबन्धूनां त्रयी न श्रुतिगोचरा ॥ कर्मश्रेयसि मूढानां श्रेय एवं भवेदिह ॥ १ ॥ इति भारतमाख्यानं कृपया मुनिना कृतम् इति । ( द्विजाच्छूद्रायां जातो द्विजबन्धुर्व्रात्यो वा । ) भविष्ये ॥ चतुर्णामपि वर्णानां यानि प्रोक्तानि श्रेयसे ॥ धर्मशास्त्राणि राजेन्द्र शृणु तानि नृपोत्तम ॥ १ ॥ विशेषतस्तु शूद्राणां पावनानि मनीषिभिः ॥ अष्टादशपुराणानि चरितं राघवस्य च ॥ २ ॥ वायवीये ॥ एतानि नृपशार्दूल धर्मशास्त्राणि पण्डितैः ॥ साधारणानि प्रोक्तानि वर्णानां श्रेयसे सदा ॥ १ ॥ चतुर्णामिह राजेन्द्र श्रोतुमर्हाणि सुव्रत ॥ स्कान्दे सूतसंहितायाम् ॥ अन्ये च ब्राह्मणा विष्णो राजानश्च तथैव च ॥ वैश्याश्च तारतम्येन ज्ञानाभ्यासेऽधिकारिणः ॥ १ ॥ द्विजस्त्रीणामपि श्रौतज्ञानाभ्यासेऽधिकारिता ॥ तथा शूद्रस्य शुश्रूषा पुराणेनैव वेदनम् ॥ २ ॥ वदन्ति केचिद्विद्वांसः स्त्रीणां शूद्रसमानताम् ॥**

**श्रीमद्भागवतां**तही-"स्त्रिया, शूद्र, द्विजबंधु[३] ( द्विजापासून शूद्रीचे ठायीं झालेला अथवा गर्भाधानादिसंस्कारहीन )यांस ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद श्रवण करण्याचा अधिकार नाहीं; कर्मरूप श्रेयःसाधनाविषयीं मूढ असलेल्या त्या शूद्रादिकांचें असें ( भारतश्रवणानें )

१ पूर्वीं सांगितल्याप्रमाणें उभयविध धर्मप्रतिपादकत्वास्तव पुराणेंही शास्त्रशब्दाभिधेय आहेत.

२ या शब्दानें शिक्षा, कल्पसूत्र, पाणिनीयसूत्रपाठ, निरुक्त, ज्योतिष, व छंदःशास्त्र या सहा वेदांगांचें ग्रहण होतें.

३ हा शब्द **कमलाकर**भट्टानें ज्यांचा वाचक केला आहे ते वर कौंसांत लिहिले आहेत, परंतु **भागवताचे** टीकाकार **श्रीधरस्वामी** या शब्दानें ब्राह्मणादि तीन वर्णांतील नीच असलेल्यांचें ग्रहण करितात. [ भा० स्कं० अ० ४ श्लो० २५ टीका पहा. ]

श्रेय होवो। यां हेतूनें त्यांच्यावर कृपा करून **व्यासानें महाभारता**ख्यान केलें." असें सांगितलें आहे. **भविष्यपुराणां**त–"हे राजेंद्रा! चारही वर्णांस कल्याणाचीं साधनें जीं धर्मशास्त्रें सांगितलीं आहेत तीं मजपासून श्रवण कर–ज्ञात्यांनीं जी विशेषतः शूद्रांस पवित्र करणारीं सांगितलीं तीं सांगतों–अष्टादश[2] पुराणें व रामाचें चरित्र[3] ( वाल्मीकिरामायण ) हीं धर्मशास्त्रें त्यांनीं श्रवण करावीं." असें सांगितलें आहे. **वायुपुराणां**त–"हीं (पुराणें) पण्डितांनीं सर्व वर्णांस साधारण्येंकरून कल्याणकारक अशीं सांगितलीं आहे, ह्मणून हे राजेंद्रा! हीं चारही वर्णांला ऐकण्यास योग्य आहेत." **स्कंदपुराणां**त **सूतसंहितें**त–"अन्य–ब्राह्मण, राजे व वैश्य हे तारतम्यानें ज्ञानाभ्यासाविषयीं अधिकारी आहेत. द्विजस्त्रियांसही वेदाचें अर्थज्ञान व अभ्यासाविषयीं अधिकार[4] आहे, तसेंच शूद्रांस द्विजसेवा व पुराणावरून ज्ञानसंपादन विहित आहे. कित्येक विद्वान् स्त्रियांस शूद्रसमानत्व आहे असें ह्मणतात." असें सांगितलें आहे.

**तथा ॥ सिद्धान्तश्रवणं प्राहुर्द्विजानां मुनिसत्तमाः ॥ शूद्राणां च विरक्तानां तथा स्त्रीणां महामुने ॥ १ ॥ सिद्धान्तश्रवणं प्रोक्तं पुराणश्रवणं बुधैः ॥ (सिद्धान्तः स्मृत्यर्थः) रामायणेऽपि ॥ पठन्द्विजो वागृषभत्वमीयात्स्यात्क्षत्रियो भूमिपतित्वमीयात् ॥ वणिग्जनः पुण्यफलत्वमीयाच्छृण्वंश्च शूद्रोऽपि महत्त्वमीयात् ॥ १ ॥ इदमपि विप्रादिद्वारैव ॥ तदुक्तं भविष्ये ॥ देवार्चां पुरतः कृत्वा ब्राह्मणांश्च नृपोत्तम ॥ श्रोतव्यमेव शूद्रेण नान्यैश्च द्विजातिभिः ॥ १ ॥ पुराणश्रवणविधानादेव तदन्तर्गतवैदिकमंत्रश्रवणेऽपि न दोषः। तदुक्तं वार्तिके ॥ तानेव वैदिकान्मन्त्रान् भारतादिनिवेशितान् ॥ विहाय मन्त्रनियमं लोकबुद्ध्या प्रयुञ्जत इति । यद्यप्यदृष्टहेतुत्वं न वैदिकत्वं विनास्ति । तेन स्तोत्रादेरपि वेदे क्वचित्सत्त्वं कल्प्यते । तथापि वचनाद्दोषाभावः ॥ अनित्यस्यापि प्रवाहानादितया कल्पसूत्रादिवन्नित्यविधिविषयत्वम् ॥ यानि शङ्खेन विद्यास्थानान्युक्त्वा एतानि ब्राह्मणोधिकुरुते स च वृत्तिं दर्शयतीतरेषामिति बहुवचनेन ज्ञानोपदेशो विप्रद्वारेणैवेति शूद्रस्याधिकार उक्तः सोपि श्रवणपर एव ॥ अत्र शूद्राणां विहितनिषिद्धाश्च धर्माः शूद्रसमानानामनुपनीतद्विजस्त्रीकुण्डगोलकसंकरजात्यादीनामपि ज्ञेयाः ॥ ते चाग्रे वक्ष्यन्ते ॥ तत्सिद्धं शूद्रस्य विप्रद्वारा पुराणश्रवणेन ज्ञानमिति ॥**

---

१ हें संबोधन **धर्मराजा**स दिलें आहे. **भविष्यपुराणां**त मुख्यत्वेंकरून **कृष्णा**चा व **धर्मा**चा संवाद आहे.

२ मात्स्य, मार्कण्डेय, भागवत, भविष्य, ब्राह्म, ब्रह्मवैवर्त, ब्रह्माण्ड, वैष्णव, वामन, वायव्य, वाराह, आग्नेय, नारद, पाद्म, लैङ्ग, कौर्म, स्कान्द, आणि गारुड. यांशिवाय देवीभागवत, नारदीय, पाराशरीय, इत्यादि उपपुराणें वगैरे आहेत.

३ **रामा**चें चरित्र प्रत्येक पुराणांत व महाभारतादिकांत थोडेंबहुत वर्णन केलें आहे, परंतु तें मुख्यत्वेंकरून वर्णन केलें नसून अंगभूत आहे, व **वाल्मीकी**नें तें मुख्यत्वेंकरून वर्णन केलें आहे ह्मणून 'राघवचरित' शब्दानें त्या **रामायणा**चेंच ग्रहण करावें. हें युक्त आहे.

४ याविषयीं पृ० ९ टीप ३ पहा.

तसेंच वैदिक अथवा शास्त्रीय सिद्धान्ताचें श्रवण ब्राह्मणादि तीन वर्णांस विहित आहे, व विरक्त शूद्रांस, आणि[1]स्त्रियांस स्मृत्यर्थ; व पुराणश्रवण विहित आहे. **वाल्मीकिरामायणां**तही "हें ब्राह्मण जर पठण करील तर वाचस्पतित्व पावेल, क्षत्रिय हें पठण करील तर भूमिपतित्व पावेल, वैश्य पुण्यफल पावेल, व शूद्रानें श्रवण केल्यास तो महत्व पावेल" असें सांगितलें आहे; हेंही ब्राह्मणद्वाराच शूद्रास विहित आहे; तेंच **भविष्यपुराणांत**.सांगितलें आहे–"देवपूजा व ब्राह्मणास पुढें करून अन्य ब्राह्मणादि तीन वर्णांनीं, व शूद्रानें पुराण श्रवण करावें" येथें पुराणश्रवणाचें विधान केलें आहे, तेणेंकरूनच पुराणांतर्गत वैदिक मंत्र श्रवण केले असतां दोष नाहीं. तेंच **वार्त्तिकांत** सांगितलें आहे–" जे वैदिक मंत्र शूद्रांस श्रवण करण्याविषयीं अयोग्य आहेत तेच **महाभारतादिकांत** असतील, व त्यांचा जर मंत्राचा नि[2]यम सोडून लौकिकबुद्धीनें प्रयोग केला असेल तर त्यांच्या श्रवणाचा दोष शूद्रास नाहीं." यद्यपि अदृष्टफलहेतुत्व-वैदिकत्वसवांचून नाहीं व तेणेंकरून कित्येक वेदभागांत स्तोत्रादिकही आहेत अशी कल्पना होते तथापि पूर्वोक्त वचनास्तव दोष नाहीं. अनित्य अशाहि पूर्वोक्त मंत्राच्या अवैदिकत्वास प्रवाहाच्या अनादित्वेंकरून कल्पसूत्रादिकांचे परि नित्यविधिविषयत्व आहे. जीं **शंखा**नें वि[3]द्यास्थानें सांगून "यांच्या अभ्यासाविषयीं ब्राह्मण अधिकारी आहे, व तो इतर वर्णांची वृत्ति दाखवितो" असें "इतरेषाम्" या बहुवचनानें ज्ञानोपदेश ब्राह्मणद्वारानेंच इतर वर्णांस होतो असें सांगितल्यावरून शूद्रास उपदेशाधिकार सांगितला आहे तोही श्रवणपरच आहे. येथें शूद्राचे विहितनिषिद्ध धर्म सांगितले आहेत तेच शूद्रसमान इतर जा[4]तीस, व अनुपनीत द्विज, स्त्रिया, कुण्ड, गोलक, संकरजातीय यांसही लागू आहेत असें जाणावें; ते पुढें ( तिसऱ्या प्रकरणांत ) सांगूं. तस्मात् शूद्रांस ब्राह्मणद्वारा पुराणश्रवणेंकरून ज्ञान संपादण्याचा अधिकार सिद्ध झाला.

**अथ शूद्रस्य मन्त्रविचारः ॥ तत्र अविद्यत्वाद्वेदमन्त्रे नाधिकारः ॥ व्यासोपि ॥ शूद्रो वर्णश्चतुर्थोपि वर्णत्वाद्धर्ममर्हति ॥ वेदमंत्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विनेति ॥ [ व्या० स्मृ० अ० १ श्लो० ६ ] नृसिंहतापिनीये ॥ सावित्रीं प्रणवं यजुर्लक्ष्मीं स्त्रीशूद्राय नेच्छति ॥ पराशरभाष्येप्येवम् ॥ रामतापिनीये ॥ सावित्रीं लक्ष्मीं यजुः प्रणवं यदि जानीयात्स्त्रीशूद्रः स मृतोधो गच्छति ॥ ( लक्ष्मीं श्रीबीजम् ) व्याहरणे**

---

१ सिद्धांत ह्मणजे शेवटचा ठराव असा अर्थ घेतां येईल. येथें मूळवचनांत अमक्याचा सिद्धांत असें स्पष्ट नाहीं परंतु कमलाकरभट्ट या शब्दानें येथें स्मृत्यर्थाचें ग्रहण करितात.

२ उदात्त, अनुदात्त, स्वरित इत्यादिकांचा यथास्थान उच्चार करणें, व शिरःकम्पादि वर्ज्य करणें इत्यादि वेदपाठाचे नियम आहेत ते शिक्षा, व प्रातिशाख्य इत्यादिकांत वर्णिले आहेत.

३ याज्ञवल्क्यानें अठरा पुराणें, न्यायशास्त्र, मीमांसाशास्त्र, धर्मशास्त्र, व्याकरणादि सहा वेदांगें आणि चार वेद हीं चवदा विद्या व धर्मस्थानें सांगितलीं आहेत.

४ याविषयीं जातिनिर्णयप्रकरणांत सविस्तर विचार होईल, व कुण्डगोलकादिकांचीं लक्षणें वगैरे तेथेंच सांगितलीं जातील.

जिह्वाच्छेदइति श्रुतेश्च ॥ गौडनिबन्धे तिथितत्त्वे स्कान्दे ॥ स्वाहाप्रणवसंयुक्तं शूद्रे मन्त्रं ददद्विजः ॥ शूद्रो निरयमाप्नोति ब्राह्मणः शूद्रतामियात् ॥ एवं पुराणविष्णुसहस्रनामचण्डीस्तोत्रादिपाठेप्यनधिकारः ॥ श्रवणमात्रेऽधिकारेण पाठाप्रसक्तेः ॥ तदुक्तं हरिवंशे ॥ सुगतिमियाच्छ्रवणाच्च शूद्रजातिरिति ॥ अतएव भारते विष्णुसहस्रनामसु ॥ वेदान्तगो ब्राह्मणः स्यात्क्षत्रियो विजयी भवेत् ॥ वैश्यो धनसमृद्धः स्याच्छूद्रः सुखमवाप्नुयात् ॥ [ म० भा० अ० प० वि० श्लो० १-३ ] इत्यत्र शूद्रः श्रवणेनैवेति शङ्कराचार्यैर्व्याख्यातम् ॥ किंबहुना शूद्रकर्तृकस्नानदानश्राद्धादौ विप्रस्यैव पौराणमन्त्रपाठः शूद्रस्य तु श्रवणमात्रम् ॥ श्रावयेच्चतुरो वर्णानित्यस्य निषादस्थपतिं याजयेदितिवच्छृणुयुरित्यर्थेन शूद्रं प्रति श्रवणजन्यज्ञानस्यैव कर्मभिर्ग्रहणात् पुराणपाठाभावेन तन्मन्त्रेषु पाठाप्रसङ्गाच्च ॥ वाराहेपि ॥ अयमेव विधिः प्रोक्तः शूद्राणां मन्त्रवर्जितः ॥ अमन्त्रस्य तु शूद्रस्य विप्रो मन्त्रेण गृह्यते ॥ अस्य श्राद्धप्रकरणपाठेपि इयं परिभाषा ॥ न च सा वाक्यरूपा प्रकरणेन नियन्तुं शक्या ॥ अतः शूद्रकर्तृकदानश्राद्धादौ अर्थप्रकाशनार्थं सर्वत्र विप्रेण मन्त्रपाठः कार्य इति शूलपाणिः ॥ वैदिकोपि विप्रेण पठनीयइत्याचार्यचूडामणिः ॥ माधवीयेप्येवम् ॥ श्राद्धे यस्यां शाखायां विप्रस्य मन्त्रपाठ उक्तः ॥ स शूद्रश्राद्धेपि स्यादेवेति स्मृतिकौमुद्याम् ॥ मदनपारिजातव्याख्या त्वयुक्ता विषयाभावात् ॥ अमन्त्रस्येति विशेषणात् स्त्रीणां तत्तुल्यानां चेति शूलपाणिः ॥ यत्तु तेनोक्तम् ॥ मन्त्रजन्यनियमादृष्टसिद्धिस्तु नमस्कारेणैवानुज्ञातोस्य नमस्कारो मन्त्रइति गौतमोक्तेरिति ॥ तच्चिन्त्यम् ॥

त्यांत अविद्यत्वास्तव वैदिक मंत्राधिकार नाहीं. याविषयीं व्यासही ह्मणतो कीं, यद्यपि शूद्र हा चवथा[1] वर्ण आहे, तथापि त्यास जसें वर्णत्व आहे, तसेंच धर्म असणें योग्य आहे. "परंतु तो धर्म, वेदमंत्र, स्वधा[2], स्वाहा[3], वषट्कार[4], इत्यादिकांवांचून असावा."

१ येथें 'चवथा वर्ण असें ह्मटलें आहे' याचें कारण इतकेंच कीं ज्यास वर्णत्व आहे त्यास नियमानें कांहीं तरी धर्म असलाच पाहिजे अशी त्याची आवश्यकता, दर्शविणें हेंच होय.

२ हा शब्द पितरांस उद्देशून जें अन्नादिक अर्पण करितात त्याचा त्याग करतेवेळीं योजितातः— जसें "पितृभ्यः स्वधा." आणखी पौराणी कथाहि अशी आहे कीं 'स्वधा' या नांवाची दक्षप्रजापतीची कन्या [ भा० स्कंध ४ अ० १ पहा ] होती व ती पितर नांवाच्या देवगणाची स्त्री झाली ह्मणून तिचें नांव घेऊन त्याग केलेलें कव्य (पितरांचें अन्न) पितर त्वरित स्वीकार करितात ह्मणून 'स्वधा' शब्दाचा प्रयोग करितात.

३ वरील शब्दासारखाच याचाही दैविक कर्मांत उपयोग करावा लागतो. देवांस ज्या आहुति द्यावयाच्या असतात त्यांस पूर्वी मंत्र उच्चार करून त्याच्या शेवटीं हा शब्द लावला पाहिजे. आणखी असें आहे की, 'स्वाहा' नांवाची दक्षप्रजापतीची कन्या तीच अग्नीची पत्नी होय [ अ० काण्ड २ व ७ श्लो० २१ पहा ]. तिचें नांव घेऊन आहुति दिली ह्मणजे तो मोठ्या प्रीतीनें घेतो, व देवांस त्वरित पोहंचवितो, असा उद्देश असावा.

४ हा वषट् शब्द बहुतकरून यज्ञामध्यें उपयुक्त असतो. वास्तविक पाहतां ह्या शब्दाचा अर्थ

**नृसिंहतापिनीयोपनिषदांत** असें सांगितलें आहे कीं, "गायत्री, ओंकार, यजु, श्रीबीज हीं स्त्रीशूद्रांस देऊं नयेत अर्थात् त्यांचा उपदेश करूं नये." **पराशरभाष्यांतही** असेंच सांगितलें आहे. तसेंच **रामतापिनीयोपनिषदांत** "गायत्री, श्रीबीज, यजु, प्रणव, यांस स्त्रिया, किंवा शूद्र, जर जाणतील तर ते मेल्यावर अधोगतीस जातील" असें सांगितलें आहे. कारण, "वेदमंत्रादिकांचा उच्चार केल्यास त्याची ( शूद्राची ) जीभ कापावी," अशी श्रुति आहे. **गौडनिबन्धांत व तिथितत्त्वांत स्कंदपुराणांत** "स्वाहा, प्रणव, यांहीं युक्त मंत्र, जर ब्राह्मण शूद्रास देईल तर शूद्रास नरकप्राप्ति होऊन ब्राह्मणास शूद्रत्व प्राप्त होईल," असें सांगितलें आहे. याप्रमाणें **पुराणें, विष्णुसहस्रनाम, सप्तशतीपाठ,** व इतर स्तोत्रें वगैरे, यांचा पाठ करण्याविषयींही शूद्रास अधिकार नाहीं. कारण, पुराणादिकांच्या श्रवणापुरताच अधिकार आहे, त्यावरून पाठाविषयीं अधिकार प्राप्त होत नाहीं. तेंच **हरिवंशांत** सांगितलें आहे-"ह्या हरिवंशाच्या श्रवणेंकरून शूद्र उत्तम गतीस जाईल." याकरितांच **महाभारतांत विष्णुसहस्रनामांत** "हें विष्णुसहस्रनाम ब्राह्मण पठण करील तर वेदाचा अंत पावेल, अर्थात् सांग अध्ययन होईल, क्षत्रिय विजयी होईल, वैश्य द्रव्यसंपन्न होईल, व शूद्र सुख पावेल," असें सांगितलें आहे. या वाक्यांत– "शूद्रास श्रवणानेंच सुख प्राप्त होईल." असें त्याचें भाष्यकर्त्या शंकराचार्यानें व्याख्यान केलें आहे. याविषयीं फार सांगून काय ? शूद्रकर्तृक स्नान, दान, श्राद्ध, इत्यादिकांत ब्राह्मणाला पौराण मंत्र पठण करण्याचा अधिकार आहे, शूद्राला श्रवण करण्यापुरताच आहे. कारण, "ब्राह्मणास पुढें करून चारही वर्णांकडून पुराण श्रवण करवावें" या वाक्याचा "निषाद, व स्थपति ( सुतार ) यांकरवीं यजन करवावें," या वाक्यांत असा अर्थ केल्यानें शूद्रास श्रवणापासून झालेल्या ज्ञानाचेंच कर्मांनीं ग्रहण केलें आहे, यास्तव मुळींच पुराणपाठाचा अभाव असल्यानें, तत्संबंधी ( पुराणसंबंधी ) मंत्राचा पाठ करण्याचा प्रसंग नाहीं. वराहपुराणांत "हाच विधि मंत्ररहित शूद्रांस सांगितला आहे. मंत्ररहित अशा शूद्राचें ब्राह्मण, मंत्रपाठ करून ग्रहण करितो," असें सांगितलें आहे. यद्यपि हें वचन श्राद्धप्रकरणांत आहे; तथापि हें परिभाषारूप आहे, ह्मणूनच हें सर्वत्र ग्रहण करण्यास योग्य आहे. ही परिभाषा वाक्यरूप आहे ह्मणून तिचें प्रकरणानें नियमन करण्यास योग्य नाहीं. अर्थात् ती श्राद्धप्रकरणापुरतीच असें ह्मणतां येत नाहीं. याकरितां

मुळींच नाहीं; परंतु त्याच्या उच्चारापासून कांहीं फलविशेष आहे, व याच अभिप्रायानें पूर्वमीमांसाकर्त्यांनीं असल्या शब्दांस जपोपयोगी असें म्हटलें आहे.

१ येथें हाच विधि असें ह्मटलें आहे यावरून पूर्वीच्या वाक्यांत समंत्रक विधि ब्राह्मणादिकांस विहित असलेला सांगितला असावा असें वाटतें.

२ ह्या वचनाचा अभिप्राय असा आहे कीं, मंत्राचा पाठाधिकार नसलेल्या शूद्रास ब्राह्मणानें पठण केलेल्या मंत्रांचें त्यानें श्रवण केलें ह्मणजे त्यास पाठ केल्याचें फल मिळतें; अर्थात् कर्म सांग होतें.

"शूद्रकर्तृक दान, श्राद्ध, इत्यादिकांत अर्थाच्या स्पष्टीकरणार्थ, सर्वत्र विप्रानें मंत्रपाठ करावा" असें शूलपाणीनें ह्मटलें आहे व "वैदिक मंत्रहि ब्राह्मणानेंच पठण करावा" असें **आचार्यचूडामणि** ह्मणतो. माधवीयांतहि याचप्रमाणें आहे, श्राद्धांत ज्या शाखेंत ब्राह्मणास ज्या मंत्राचा पाठ सांगितला आहे; तो शूद्रश्राद्धांतही होईलच," असें स्मृतिकौमुदींत सांगितलें आहे. मदनपारिजाताची व्याख्या तर, अयुक्त आहे; कारण तशी व्याख्या करण्यास विषयाचा अभाव आहे. "अमंत्रस्य," असें विशेषण आहे, यास्तव स्त्रियांस व त्याशीं समान असलेले शूद्र यांचें ग्रहण करावें, असें शूलपाणि ह्मणतो. जें त्यानें (शूलपाणीनें) सांगितलें आहे, कीं "मंत्रापासून होणाऱ्या नियमांची अदृष्टसिद्धि[1] तर; नमस्कारानेंच होती; **कारण,** याला (शूद्राला) नमस्कारमंत्र अनुज्ञात आहे. अशी गौतमाची उक्ति आहे, ह्मणून अदृष्टफलसिद्धि होते." तें विचारार्ह आहे.

**दृष्टद्वारैव हि तत्प्राप्तिर्न स्वातंत्र्येण न च मन्त्रनिषेधे नियमादृष्टप्राप्तिः नमस्कारेणैव तत्सिद्धिश्च न हि सः न मन्त्रः अन्यथा नखावपूतेऽप्यवघातजन्यादृष्टार्थं सोपि क्रियेत ॥ कल्पतरुस्तु पौराणकर्मणां स्त्रीशूद्रान्प्रति विशिष्यविधानात्तेषां च मन्त्रविशिष्टानामुत्पत्त्या तथैव नियोगात्पौराणमन्त्रपाठो भवत्येवेत्याह तन्न नमस्कारेण बाधाद्वाराहविरोधाच्च वैदिकमन्त्रस्थाने नमः शब्दइत्यन्ये ॥ तत्त्वं त्वमन्त्रकेष्वेव सः तेन पितॄणां नामगोत्रत इत्यादौ यत्र द्विजानामपि नाममन्त्र उक्तस्तत्र शूद्रस्य सर्वमन्त्रनिषेधे प्राप्ते प्रतिप्रसवमात्रार्थं गौतमीयम् ॥ न तु तिलावपनादावपि ॥ अन्ये तु ॥ आवाहनादि कर्तव्यं यथा शूद्रेण तच्छृणु ॥ देवानां देवनाम्ना तु पितॄणां नामगोत्रतइति हेमाद्रौ भविष्योक्तेः सर्वत्र दैवे देवेभ्यो नमः पित्र्ये पितृभ्यो नम इति नाममन्त्रमाहुः ॥ केवलस्य नाम्नः प्रयोगानर्हत्वात् तेन नमइत्येतावानेन मन्त्रइति आचार्यचूडामणिमदनपारिजातोक्तिः परास्ता । नमस्कारः पञ्चमहायज्ञमात्रपुरःसरः इति हरदत्तादयः तन्न श्राद्धादौ नमोविधानस्य मूलान्तरकल्पनावृत्त्या सर्वार्थत्वात् ॥ अतएव विज्ञानेश्वरेण कृच्छ्रादौ नमोमन्त्रजपउक्तः अस्मत्पितृचरणास्तु नमस्कारेण मन्त्रेण पञ्चयज्ञान्न हापयेदिति याज्ञवल्क्योक्तौ यज्ञशब्देन शूद्रकर्ममात्रोद्देशेन नमस्कारविधानं यज्ञानामुद्देश्यानां पञ्चत्वेन विशेषणे ग्रहैकत्वविवक्षावद्वाक्यभेदापत्तेः तेन शूद्रकर्तृकतुलादानादिपूर्तेषु शूद्रस्य नमस्कारो मन्त्रइत्याहुः पौराणस्तु विप्रस्येत्यविरोधः एतेन नमस्कारस्य पञ्चयज्ञेष्वेव विधानात् शूद्रस्य न विवाहहोमादीति मदनपारिजातोक्तिः परास्ता अतएव योनमसास्वध्वरइति श्रुतेर्नमस्कारेण वै खल्वपि**

१ अदृष्टसिद्धि ह्म० मंत्रपाठानें सांग होणाऱ्या यज्ञादि कर्मांचें फल अदृष्ट आहे. उदाहरणार्थ "ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत" ज्योतिष्टोमयज्ञ स्वर्गेच्छूनें करावा. ह्या विधिवचनाप्रमाणें तो यज्ञ करणाऱ्यास स्वर्गलोकप्राप्तिरूप जें फल मिळतें, तें प्रत्यक्ष दिसत नाहीं व इतर व्यावहारिक कर्मांचीं फलें प्रत्यक्ष असतात तसें हें नाहीं ह्मणून त्या कर्मांस अदृष्टफल असें ह्मणतात. वरील शब्दांत 'फल' शब्द गाळून केवळ अदृष्टसिद्धि असेंच ह्मटलें आहे त्याचा अर्थ अदृष्टफलाची सिद्धि असा आहे.

**न वै देवानमस्कारमति यज्ञो वै नमइति हि ब्राह्मणं भवति [ अ० गृ० सू० अ० १ खं० १ ] इत्याश्वलायनोक्तिश्च ॥ नमस्कारस्यापि सर्वकर्माङ्गत्वं तच्च तथा द्विजानां तत्र तत्र वैदिकमन्त्रोक्त्या बाधितं यच्चैत्ययज्ञादौ प्रवर्तते ॥**

दृष्टद्वाराच त्याची प्राप्ति आहे, स्वतंत्रतेनें नाहीं. आणि मंत्रनिषेधाविषयीं नियम व अदृष्टप्राप्ति नाहीं, आणि नमस्कारानेंच त्याची सिद्धि आहे ह्मणून तो ( नमस्कार ) नाहीं व मंत्रही नाहीं. नाहींपेक्षां नखांनीं तांदूळ झाले असतांहि अवघाता ( कांडणा )पासून होणाऱ्या अदृष्टफलाकरतां अवघातही करील. अर्थात् पूर्वीं नखांनीं तांदूळ झाले असतांही पुनः कांडण केलें जाईल. **कल्पतरु** तर, "पुराणोक्त कर्माचें स्त्रीशूद्रांस विशेषेंकरून विधान आहे, व पौराणमंत्रसहित त्या कर्माच्या उत्पत्तीनें तसाच नियोग ( आज्ञावचन ) आहे, तस्मात् स्त्रीशूद्रांस पुराणोक्त मंत्राचा पाठ करण्यास अधिकार आहेच असें ह्मणतो," तें योग्य नाहीं; कारण, **गौतमानें** नमः मंत्राचें विशेषेंकरून विधान केल्यानें," सामान्यतः प्राप्त असलेल्या पौराणमंत्राचा बाध होतो, व **वराहपुराण**वचनाशीं विरोध होतो. या हेतूस्तव "वैदिक मंत्रस्थानीं नमः शब्द योजावा," असें अन्य ग्रंथकर्ते ह्मणतात. आतां यांतील तत्व तर, जेथें मंत्र मुळींच नाहीं तेथें नमः मंत्राचा उपयोग करावा. तेणेंकरून पितरांस नाम, व गोत्रोच्चारपूर्वक उपचार द्यावे." इत्यादि वाक्यांत जेथें द्विजांसहि केवळ नाममंत्र सांगितला आहे, तेथें शूद्रास सर्वच मंत्राचा निषेध प्राप्त झाला असतां नमः मंत्राचा प्रतिप्रसव करण्याकरितां **गौतमाचें** वचन आहे असें जाणावें. प्रकृत अर्थात् जेथें द्विजादिक मंत्र सांगितला आहे तेथें शूद्रानें पुराण मंत्र व जेथें ह्यांस पौराण असेल तेथें शूद्रांस नाममंत्र विहित आहे असें सिद्ध होतें. तिलावपनादिकांतहि नाहीं. अन्य ग्रंथकर्ते तर, "शूद्रानें आवाहनादि कसें करावें तें श्रवण कर. देवांस, त्यांच्या नांवानें व पितरांस त्यांच्या नामगोत्रांनीं" अशी **भविष्यपुराणोक्ति** आहे, तस्मात् सर्वत्र देवसंबंधी कर्मांत, "देवेभ्यो नमः" व पितृसंबंधी कर्मांत "पितृभ्यो नमः" असा नाममंत्र ह्मणावा, असें ह्मणतात. कारण केवळ नांवाचा प्रयोग अयोग्य होतो. या मतानें "केवळ

१ विवाह झाल्यानंतर स्थालीपाक ह्मणून करीत असतात त्यांत भाताचे तांदूळ करून ते त्याच अग्नीवर शिजवून त्यांचें हवन करावें लागतें. याविषयीं "व्रीहीनवहन्ति" असें सूत्रकारानें विधान केलें आहे. वास्तविक पाहतां या वचनाचें येथें कांहींच प्रयोजन नाहीं, कारण पुढें चरूचें हवन सांगितलें आहे, व भाताचे तांदूळ केल्यावांचून त्यांचा चरु करतां येणार नाहीं हें साहजिक आहे अतएव पूर्वोक्त वचन निष्कारण आहे अशी शंका येते. यावर समाधान—वरील वचन व्यर्थ नाहीं; कारण चरु करण्याकरितां तांदूळ करणें इष्ट आहे, व ते करण्यास हें वचन नको; परंतु नखानें अथवा अन्य कोणत्याहि प्रकारें तांदूळ होतात व भात कांडल्यानें हि होतात; प्रकृतस्थळीं या दोहोंचीहि प्राप्ति होऊन कदाचित् नखानें सोलून तांदूळ करतील आणि कांहीं अदृष्टफलविशेषास्तव भात कांडून तांदूळ करणें हें इष्ट आहे, अतएव नखांनीं न करतां कांडूनच करावेत असा या वाक्यानें नियम केला आहे ह्मणूनच यास नियमविधि ह्मणतात. येथें नखविदलन करून अदृष्टफल विशेषास्तव अवघात करणें इष्ट नाहीं असें सुचविलें आहे.

'नमः' एवढाच मन्त्र " ह्मणावा असें ह्मणणारे आचार्यचूडामणि, व मदनपारिजात यांचें वचन खंडित झालें. "नमस्कार हा पंचमहायज्ञमात्रपुरःसर अर्थात् तेवढ्यापुरता," असें **हरदत्ताचार्यादिक** ह्मणतात तें योग्य नाहीं. कारण श्राद्धादिकांत 'नमः' या मंत्राच्या विधानाचें मूल अन्य आहे या कल्पनेच्या आवृत्तीनें सर्व अर्थ सिद्ध होतात, याकरितां, **विज्ञानेश्वरानें** कृच्छ्रादिकांत नमः मंत्राचा जप सांगितला आहे. आमचे (ग्रंथकर्त्यांचे) पितृचरण (वडील) रामकृष्णभट्ट तर, नमस्कारमंत्रानें पंचमहायज्ञ करावे, ते चुकवूं नयेत या **याज्ञवल्क्योक्तींत** यज्ञशब्दानें शूद्राच्या कर्ममात्राचा उद्देश केल्यानें नमः याचें विधान उद्देश्य (ज्यांचा उद्देश करावयाचा ते) यज्ञांच्या पंचस्वरूप विशेषणांत ग्रहांच्या एकत्वाच्या विवक्षेसारखें वाक्यभेदाची प्राप्ति होणार आहे. त्यावरून " शूद्रकर्तृक तुलादानादि पूर्तकर्मांत शूद्रास नमस्कार मंत्र आहे," असें ह्मणतात. पौराण मंत्र तर ब्राह्मणानें पठण करावा अशानें विरोधपरिहार होतो. या वाक्यानें "नमस्काराचें पंचमहायज्ञांतच विधान आहे तस्मात् शूद्रास विवाहहोमादिक नाहीं," अशी **मदनपारिजाताची** उक्ति खंडित झाली अतएव **"जो नमस्कारानें यज्ञ होतो तो उत्तम"** अशी श्रुति आहे, ह्मणून, नमस्कारानेंच सर्व निश्चयानें होतें. देव नमस्कारानेंच यज्ञ पूर्ण होतो, असें मानितात, व "नमस्कारमंत्र हाच यज्ञ होय" असें **ऐतरेय ब्राह्मण** आहे अशी **आश्वलायनोक्ति** आहे ह्मणून, जसें इतर मंत्रांस कर्मांगत्व आहे ह्मणजे कर्मांगभूत आहेत तसें नमस्कारासहि आहे. तें जसें द्विजांस, ठिकठिकाणीं वैदिक मंत्रपाठविधानानें बाधित जें चैत्य यज्ञादिकांत प्रवृत्त होतें.

**तथा शूद्रेपि कर्मोक्तौ मन्त्रानुक्तौ च प्रवर्ततएव । अतएव शूद्रस्य कातीयसूत्रोक्ता अष्टौ संस्कारा विवाहश्चोक्तो हरिहरेण ॥ अतएवानुमतोस्य नमस्कारो मन्त्रः इति गौतमीयः शूद्रेपि प्रतिप्रसवः तस्य चानुष्ठेयाप्रकाशनेपि वचनात्त्वयथार्थमेंद्री स्यादिति न्यायेनाङ्गत्वम् ॥ एतेन देवताभ्यः पितृभ्यश्चेत्ययं वा नमस्कारो मन्त्रइति कृत्वा विज्ञानेश्वरमदनपारिजाताद्युक्तिर्मानाभावात्परास्ता ॥ अत्र केचित् ॥ विप्रो मन्त्रेण गृह्यते इत्यत्र वैदिको मन्त्रो विप्रस्य पौराणस्तु शूद्रैः पठनीयः न वेदेष्वधिकारोहि कश्चिच्छूद्रस्य विद्यते ॥ पुराणेष्वधिकारो मे दर्शितो ब्राह्मणैरिहेति शूलपाणौ पाद्मोक्तेः श्रीदत्तोप्येवम् निश्चितत्वे स्मार्तस्तु वैदिकेतरमन्त्रपाठे शूद्रस्याप्यधिकारः ॥ वेदमन्त्रवर्ज्यंशूद्रस्येत्याचारचिन्तामणौ ॥ छन्दोगाह्निके वचनाद्वेदेति विशेषणात् श्रोतव्यमेव शूद्रेण नाध्येतव्यं कदाचनेति निषेधो मन्त्रेतरपुराणपरः ॥ पञ्चयज्ञस्नानश्राद्धेषु तु पौराणोपि न नमस्कारेण मन्त्रेणेति पञ्चयज्ञेषु ब्रह्मक्षत्रविशां त्वेवं मन्त्रवत्स्नानमिष्यते ॥ तूष्णीमेव हि शूद्रस्य सनमस्कारकं मतमिति योगियाज्ञवल्क्येन ॥ स्नाने ॥ अयमेव विधिः प्रोक्तः शूद्राणां मन्त्रवर्जितइति श्राद्धे च वाराहे विशिष्योक्तेरित्याह [१]अनुमतोस्य नमस्कारो मन्त्रः ( गौ० स्मृ० प्र० २ अ० १० ) इति गौतमोप्येतत्परो वैदिकमन्त्रपरश्चेत्याह तन्न ॥ नाध्येतव्यमिदं शास्त्रं वृषलस्य तु सन्नि-**

१ 'अनुज्ञानोस्य' अयमपि पाठः ।

**धाविति कौर्मे पुराणनिषेधेन वेदस्य दूरापास्तत्वात् ॥ अध्येतव्यं ब्राह्मणेन वैश्येन क्षत्रियेण च ॥ श्रोतव्यमेव शूद्रेण नाध्येतव्यं कदाचन ॥ १ ॥ श्रौतं स्मार्तं च वै धर्मं प्रोक्तमस्मिन्नृपोत्तम ॥ तस्माच्छूद्रैर्विना विप्रं न श्रोतव्यं कदाचनइति शूलपाणौ पुराणाधिकारे भविष्योक्तेश्च अतएव विप्रो मंत्रेण गृह्यते इति सर्वार्थं न श्राद्धमात्र-परमिति शूलपाणिः एतेन नाध्येतव्यमिति निषेधो मन्त्रेतरपुराणपरइति श्रीदत्तादि-मैथिलमतमपास्तम् विना विप्रमित्युक्तेर्विप्रद्वारैव श्रवणमुक्तम् ॥ धर्मशब्दः ( ऋ० सं० अ० ८ अ० ४ व० १९ ) तानि धर्माणीतिवत्क्लीबः । विशेषस्तु निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥**

तसें शूद्राविषयीं त्याम कर्माधिकार असून ज्या कर्मास जे विहित, ते मंत्र सांगितले नाहींत, त्या ठिकाणीं प्रवृत्त होतेंच. अतएव "शूद्रास **कातीयसूत्रोक्त** आठ संस्कार व विवाह करावे" असें **हरिहरानें** सांगितलें आहे. याकरितांच "अनुमतोस्य" हा **गौतम**वाक्याचा शूद्राविषयीं प्रतिप्रसव आहे. त्यास अनुष्ठेयाचें ( अनुष्ठान करण्यास योग्य असलेल्याचें) अप्राकट्य असतांहि विधिवचनास्तव "अयथार्थ ऐंद्री इष्टि होईल" या न्यायानें, अंगत्व सिद्ध होतें यावरून, " देवताभ्यः पितृभ्यश्च " हा अथवा नमस्कारमंत्र विहित आहे अशी **विज्ञानेश्वर, मदनपारिजाता**दिकांची उक्ति प्रमाणाभावास्तव खंडित आहे. येथें **कित्येक** ह्मणतात कीं–"विप्रो मंत्रेण०" येथें वैदिक मंत्र ब्राह्मणांस व पौराण मंत्र शूद्रांस पाठ करण्यास योग्य आहे. कारण, "शूद्रांस वेदाविषयीं कांहीं अधिकार नाहीं परंतु पुराणाविषयीं त्यांस अधिकार आहे, असें मला ब्राह्मणांनींच दाखविलें आहे, ' **अशी शूलपाणींत पद्मपुराणोक्ति** आहे. ह्मणून पूर्वोक्त रीतीनें मंत्रपाठ करावा. **श्रीदत्त**हि असेंच ह्मणतो. **तिथितत्त्वांत स्मार्त** तर, "वैदिकभिन्न मंत्रपाठाविषयीं शूद्रांसहि अधिकार आहे " असें ह्मणतो. " वेदमंत्र वर्ज्य शूद्रास सर्वत्र अधिकार आहे" असें **आचारचिंतामणींत छंदोगाह्निकांत** वचन आहे व त्यांत मंत्रशब्दास वेद हें विशेषण आहे. तस्मात् "शूद्रानें ऐकावेंच, अध्ययन कदापि करूं नये " हा निषेध मंत्रभिन्नपुराणविषयक आहे. पंचमहायज्ञ, स्नान, व श्राद्धादिकांचे ठायीं तर, पौराण मंत्रहि ह्मणूं नयेत. कारण, " नमस्कारमंत्रानें पंचयज्ञ नेहमीं करावे " हें व ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्यांस असें ( पूर्वी सांगितल्याप्रमाणें ) समंत्रक स्नान इष्ट होतें व शूद्रांस तूष्णीं अथवा नमस्कारमंत्रसहित स्नान विहित आहे असें **योगी याज्ञवल्क्यानें** स्नानाचे ठायीं व " हाच विधि मंत्ररहित शूद्रांस उक्त आहे " असें श्राद्धाविषयीं **वराहपुराणां**तील विशेषविधायक वचन आहे ह्मणून, पूर्वोक्त योग्य आहे असें ह्मणतो. **अनुमतोस्य०** हें **गौतम**वचनहि एतत्पर व वैदिक मंत्रपरहि आहे" असें ह्मणतो तें योग्य नाहीं. कारण

१ येथें ब्राह्मणांनीं दाखविलें असें ह्मटलें आहे. याचा अभिप्राय असा आहे की वेदश्रवणाविषयीं कांहींच अधिकार नाहीं परंतु "ब्राह्मणांस पुढें करून चारहि वर्णास पुराण श्रवण करवावें" [ पृ. १६ पहा ] या वाक्यावरून पुराणश्रवण करण्यास मला ( शूद्रास ) अधिकार आहे असें सुचविलें आहे.

"हें शास्त्र शूद्रसंनिध अध्ययन करूं नये" ह्या कूर्मपुराणस्थ वचनानें पुराणाचा निषेध केला आहे. मग वेदांविषयीं अनुज्ञा असणें तर दुरापास्त आहे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं हें अध्ययन करावें व शूद्रानें केवळ ऐकावें, अध्ययन कधींच करूं नये, यांत श्रौत व स्मार्त धर्म सांगितला आहे; तस्मात् ब्राह्मणावांचून शूद्रांनीं श्रवणही करूं नये असें **शूलपाणींत** पुराणाधिकारप्रकरणांत **भविष्यपुराणोक्ति** आहे. अतएव "**विप्रोमंत्रेण०** हें वचन सर्वत्र ग्राह्य आहे. केवळ श्राद्धपरच नाहीं" असें **शूलपाणी** ह्मणतो. यानें "**नाध्येतव्यमिदं०** हा निषेध मंत्रव्यतिरिक्त पुराणपर आहे" यानें (या वचनानें) **श्रीदत्तादिमैथिलांचें** मत दूर टाकलें आहे. पूर्वोक्त **भविष्यपुराण**वचनांत "**विनाविप्रं०**" असें ह्मटलें आहे. ह्मणून शूद्रास ब्राह्मणद्वाराच पुराण श्रवण करण्यास सांगितलें आहे. तसेंच त्याच वचनाच्या पूर्वार्धांत, **धर्मं** असें ह्मटलें आहे, तो शब्द आर्षत्वास्तव "तानि धर्माणि" यासारखा नपुंसक आहे. एतत्संबंधी विशेष विचार निर्णयसिंधूंत पहावा.

**किञ्च यथा द्विजानामध्ययनविधौ अधीतैर्मंत्रैरर्थस्मृतिं कुर्यादित्यर्थेन कर्मसु मन्त्रपाठस्यैवाङ्गत्वं न तु स्मृतेः मन्त्राणामक्रियात्वेन स्वतः कर्माग्रहणात् यथा शूद्राणां श्रावयेदिति श्रवणविधौ श्रुतैर्विधिभिः प्रवृत्तिं कुर्यात् श्रुतैर्मंत्रैरर्थस्मृतिम् कुर्यादित्यर्थेन शूद्रस्य तुलादिमहादानादिकर्मसु मन्त्रश्रवणस्यैवाङ्गत्वं न पाठस्य । नन्वेवं श्रवणविधौ श्रावयेच्चतुरो वर्णान्नित्युक्तेर्द्विजानामपि तुलादौ मन्त्रश्रवणमेव स्यान्न पाठइति चेत् अत्र ब्रूमः । अध्येतव्यं ब्राह्मणेन वैश्येन क्षत्रियेण चेति भविष्योक्तेः । निषेकादिः स्मशानान्तइत्यादिवचनादध्ययनस्यैव कर्माङ्गत्वम् ॥ विदुषा ब्राह्मणेनेदमध्येतव्यं प्रयत्नतः [ म० स्मृ० अ० श्लो० १०३ ] इति मनूक्तेः । अन्यथा वेदाथर्वपुराणानि सेतिहासानि शक्तितः ॥ जपयज्ञप्रसिध्यर्थं विद्यां चाध्यात्मिकीं जपेत् । गाथानाराशंसीरितिहासपुराणानि यद्ब्राह्मणानीतिहासान्पुराणानि कल्पान् इत्यादिब्रह्मयज्ञविच्छेदापत्तेः ॥ पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्रांगमिश्रिताः ॥ वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ( या० स्मृ० अ० १ श्लो० ३ ) इति याज्ञवल्कीये ॥ ज्ञानार्थत्वाच्च श्रवणं तु फलविशेषार्थं । य इदं शृणुयान्नित्यं यश्चापि परिकीर्तयेत् ॥ नाशुभं प्राप्नुयात्किञ्चित्सोमुत्रेह च मानवः ॥ इत्यादौ चंडीपाठादौ च फलश्रुतेः याज्ञवल्क्योपि । य इदं श्रावयेद्विद्वान् द्विजान्पर्वसु पर्वसु । अश्वमेधफलं तस्य तद्भवाननुम-**

१ येथें शूद्रसन्निध अध्ययनाचा निषेध केला आहे, तो केवळ शूद्राच्याच सन्निधीस उद्देशून आहे. ब्राह्मणांचा उद्देश करून पठण करीत असतां शूद्रानें श्रवण केल्यास दोष नाहीं.

२ यावरून पूर्वी "प्रकरणानें नियमित करण्यास योग्य आहे" असें मतान्तर सांगितलें होतें तें खण्डित झालें.

३ वरील भविष्यपुराणवचनांत "धर्मं" असा, धर्मशब्द पुंलिंगी असतां नपुंसक पाठ घेतला आहे, तो पुराणग्रंथ हे ऋषिप्रणीत असल्यामुळें, जसें वेदांत "तानि धर्माणि" येथें धर्मशब्द नपुंसक घेतला आहे तसाच हाहि समजावा.

न्यतामिति ॥ तेन द्विजानां यथा वेदाध्ययनं ज्ञानकरणद्वारा कर्मार्थत्वात्पारायणाद्यर्थमक्षरग्रहणार्थत्वाच्च दृष्टार्थं नहि सिद्धान्तेऽक्षरग्रहणस्य भाव्यत्वं त्यज्यते पारायणार्थत्वेन दृष्टार्थत्वात् तन्मात्रार्थत्वं तु नेष्यते एतन्न्यायरत्नमालायां स्पष्टमुक्तं ॥ न केवलार्थविज्ञानसिद्धिरस्य प्रयोजनं दृष्टार्थं दृश्यते यद्यत्र सर्वं फलमिष्यते इति तथा पुराणाद्यध्ययनश्रवणयोर्द्वयोर्विधानेप्यध्ययनं ज्ञानद्वारा कर्मार्थत्वाद्दृष्टार्थं श्रवणं त्वदृष्टार्थमेव शूद्राणां तु विपरीतं श्रवणं ज्ञानद्वारा कर्मार्थत्वाद्दृष्टार्थं फलार्थत्वाददृष्टार्थं च अध्ययनं तु नास्त्येव श्रोतव्यमेव शूद्रेण नाध्येतव्यं कदाचनेति वचनात् यद्यपि वार्तिके राणके च ॥ धर्मे चार्थे च कामे च मोक्षे च भरतर्षभेति भारतोक्तेर्धर्मादेश्चकारैरधर्मादेश्च ज्ञानमुपादानपरित्यागांगभूतं फलं तेन दृष्टार्थमेव श्रवणमित्युक्तं तदपि शूद्रमात्रपरं ज्ञेयं । द्विजानां तु पाठ एव ज्ञानार्थः । यद्वास्तु द्विजानां श्रवणं दृष्टार्थं पाठश्रावणयोरन्यतरस्यापि ज्ञानार्थत्वे नियामकाभावात् मंत्रपाठस्तु भविष्यवचनादेवेति ज्ञेयं अन्यथा श्रावयेदित्यस्य शूद्रमात्रपरत्वे शूद्रस्य तदनादरश्रवणादित्युत्तरमीमांसान्यायेन मोक्षे तस्यानधिकारात् मोक्षग्रहणं विरुध्येत । नन्वाद्यपक्षे श्रवणविधौ शूद्रे ज्ञानार्थत्वेन दृष्टार्थत्वान्नियमविधिः, द्विजे च फलार्थत्वादपूर्वविधिरिति वैरूप्यं स्यात् मैवं ॥ अध्ययनविधिवत् यच्छक्यत इत्युपबन्धेन सर्वग्रहात् सर्वत्रापूर्वविधिस्तत्त्वं फलतो नियमादिव्यपदेश इति वार्तिकोक्तरीत्या परिहाराच्च सर्वश्चाध्ययनविधिन्यायस्तत्स्थानापन्ने श्रवणविधौ सञ्चारणीयः । एतच्च एवं भारतादिवाक्यान्यपि योज्यानीत्यादिना वार्तिकेपि सूचितम् । तदिदं मदुक्तं सुधीभिर्दूरं विभावनीयम् । तस्माच्छूद्रस्य पूर्तादिकर्मसु पौराणमन्त्राणामेव विप्रस्य पाठो न वैदिकानामिति सिद्धम् ॥

आणखी जसें, द्विजांस अध्ययनविधीचे ठायीं "अध्ययन केलेल्या मंत्राच्या अर्थाचें स्मरण करावें" या अर्थाच्या वचनानें प्रत्येक कर्मांत मंत्रपाठासच कर्मांगत्व[1] आहे, अर्थस्मृतीला नाहीं; कारण, मंत्रांस अक्रियात्व आहे. तेणेंकरून, स्वतः कर्माचें ग्रहण होत नाहीं, जसें शूद्रांस, "श्रावयेत्" या श्रवणविधींत ऐकिलेल्या विधीनीं कर्मप्रवृत्ति करावी, "व ऐकलेल्या मंत्रांनीं अर्थस्मरण करावें" या वाक्यानें, शूद्रास तुलादि[2] महादानादिकर्मांत मंत्रश्रवणाचेंच[3] अंगत्व आहे, पाठाचेंच नाहीं. यावर शंका—श्रवणविधींत, "श्रावयेच्चतुरो०" असें ह्मटलें आहे, तस्मात् द्विजांसहि तुलादानादिकांत मंत्रश्रवणच

१ येथें द्विजांस "अर्थाचें स्मरण करावें" असें जरी सांगितलें आहे, तरी त्याचा अर्थ असा घेतला पाहिजे कीं, ज्या मंत्राचा पाठ करणार त्याचा अर्थ त्या वेळीं ध्यानांत असावा. परंतु पाठ करणें आवश्यक आहे. केवळ अर्थस्मरणानें निर्वाह होत नाहीं.

२ हें दान लोकांत प्रसिद्ध आहे, तुला, म्हणजे कोणत्याहि द्रव्यानें आपली तुलना करणें हा होय. या तुलेंत सुवर्णतुला उत्तम सांगितली आहे. त्याच्या खालीं रौप्य, ताम्र, इत्यादि आहेत. याचा विधि "दानचंद्रिका व दानकमलाकर" यांत सविस्तर आहे.

३ जसें द्विजांस अर्थस्मरण केलें तथापि मंत्रपाठ आवश्यक आहे, तसेंच शूद्रांस पौराणमंत्रश्रवणच आवश्यक आहे, पाठ आवश्यक नाहीं.

विहित होईल, पठण योग्य होणार नाहीं, असें ह्मणसील तर, त्यावर समाधानें येथें सांगतों. "अध्येतव्यं०" अशी **भविष्यपुराणोक्ति** आहे; या हेतूस्तव, "गर्भाधानादि स्मशानान्तविधि, वैदिकमंत्रांनीं ज्यास विहित आहे, त्यानें हें अध्ययन करावें" इत्यादि वचनांवरून, अध्ययनासच कर्मांगत्व आहे, व "विद्वान् ब्राह्मणानें हें शास्त्र ( मनुस्मृति ) मोठ्या प्रयत्नानें शिकावें" असी **मनूक्ति** आहे. अन्यथा "वेद, आथर्वणमंत्र, पुराणें इतिहास इत्यादि व आध्यात्मिकी[1] विद्या, यथाशक्ति ब्रह्मयज्ञसिध्यर्थ, प्रतिदिवशीं जपावीं." व गाथाग्रंथ "नाराशंसी, इतिहास, पुराणें, ब्राह्मणें" इत्यादि न ह्मटल्यास, ब्रह्मयज्ञाचा विच्छेद प्राप्त होईल. "पुराणें, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र, व्याकरणादि वेदांगें व चार वेद हीं १४ चवदा अनेकप्रकारच्या विद्यांचीं व धर्मांचीं स्थानें होत," असें याज्ञवल्क्यस्मृतींत, ज्ञानार्थत्व आहे, ह्मणून यांचा पाठच आवश्यक आहे, व त्यांचें श्रवण तर, कांहीं विशेषफलप्राप्त्यर्थ[2] आहे. "जो हें नित्य श्रवण व पठण करील, त्यास इहपरलोकीं कांहीं अशुभ प्राप्त होणार नाहीं" इत्यादि वचनांत, व **चंडीपाठादिकांचें** विशेष फल सांगितलेलें श्रवण आहे. व **याज्ञवल्क्य**हि ह्मणतो कीं, "जो हें ( याज्ञवल्क्यस्मृति ) द्विजांस, पर्वपर्वाचे ठायीं ऐकवील, त्यास अश्वमेधफल प्राप्त होईल." त्यावरून, द्विजांस जसें वेदाध्ययन, ज्ञानसाधनद्वारा, कर्मार्थत्वास्तव व पारायणादिकाकरितां अक्षरग्रहणार्थत्वास्तव, तें ( अक्षरग्रहण ) दृष्टार्थ आहे; सिद्धांतीं, अक्षरग्रहणाचें भाव्यत्व त्याग केलें जात नाहीं. कारण पारायणार्थत्वेंकरून त्यास दृष्टार्थत्व आहे, तन्मात्रार्थत्व तर, इष्ट नाहीं, हें **न्यायरत्नमालेंत** स्पष्ट सांगितलें आहे. "केवळ, अर्थविज्ञानसिद्धि हें याचें प्रयोजन दृष्टार्थ दिसत नाहीं, जर येथें सर्व फल इष्ट असेल" तर. तसेंच पुराणादिकांचें अध्ययन व श्रवण या दोहोंचें यद्यपि विधान आहे, तथापि अध्ययन ज्ञानद्वारा कर्मार्थत्वास्तव, दृष्टार्थ आहे, व श्रवण तर अदृष्टार्थच आहे. शूद्रांस तर याच्या उलट ह्मणजे, पुराणादिश्रवण ज्ञानद्वारा कर्मार्थत्वास्तव दृष्टार्थ आहे, व तज्जन्यफलार्थत्वास्तव, अदृष्टार्थ आहे, अध्ययन तर मुळींच नाहीं; कारण "शूद्रानें ऐकावेंच, अध्ययन कदापि करूं नये" असें वचन आहे. जरीं **वार्तिकांत, व राणकांत,** "धर्म, अर्थ, काम, व मोक्ष, यांच्याठायीं अधिकार आहे, असी **भारतोक्ति** आहे. यावरून धर्मादिकांचें, व त्यांत, चकार आहेत त्यांनीं अधर्मादिकांचेंहि ग्रहण होतें. तस्मात् ज्ञान हें धर्माचा स्वीकार, व अधर्माचा परित्याग इत्याद्यंगभूत ज्ञान, हेंच त्याचें फल होय. त्यावरून, श्रवण हें दृष्टार्थच आहे असें सांगितलें आहे, परंतु, तेंहि शूद्रांपुरतेंच आहे, असें जाणावें. द्विजांस तर, मंत्रादिकांचा पाठच ज्ञानार्थ आहे. अथवा, द्विजांस मंत्रश्रवण हें दृष्टार्थ असो, कारण, पठण व श्रवण, या दोहोंतून अमुक एकच ज्ञानार्थ आहे असा त्यांचा नियम करणाऱ्या वचनाचा अभाव आहे. मंत्राचा

१ उत्तरमीमांसा, उपनिषदें इत्यादि आत्मविचारविषयक ग्रंथांस आध्यात्मिकी विद्या असें ह्मणतात.

२. हीं विद्येचीं स्थानें असल्याकारणानें यांच्या श्रवणानें ज्ञानरूप विशेषफलाची प्राप्ति होईल असा आशय.

पाठ तर, पूर्वोक्त **भविष्यपुराणस्थ** वचनारूनच योग्य आहे असें जाणावें. नाहींपेक्षां, **"श्रावयेत्"** या वाक्याचें शूद्रमात्रपरत्व घेतल्यास, **"शूद्रस्य तदनादरः श्रवणात्"** या **उत्तरमीमांसेंतील** न्यायानें, मोक्षाविषयीं शूद्रांस अधिकार नाहीं, ह्मणून, **"धर्मे च अर्थे च०"** या **भारतस्थ** वचनांत, मोक्षशब्दाचें ग्रहण केलें आहे, तें विरुद्ध होईल. यावर शंका—प्रथमपक्षीं ह्मणजे शूद्रांस श्रवणच दृष्टार्थ व द्विजांस पाठच ज्ञानार्थत्वेंकरून दृष्टार्थ.[१] या पक्षीं श्रवणविधींत, शूद्राविषयीं ज्ञानार्थत्वेंकरून दृष्टार्थत्वास्तव 'श्रावयेत्' हा नियमविधि होईल, व द्विजांविषयीं फलार्थत्वास्तव अपूर्वविधि होईल. असें झाल्यास, वैरूप्य होईल, असें ह्मणशील तर, ह्मणूं नको; कां कीं अध्ययनविधीसारखें जें "करतां येईल तितकेंच करावें या" उपबंधानें, सर्वांचें ग्रहण होईल. यास्तव सर्वत्र अपूर्वविधि, हेंच यांतील तत्व आहे. "फलतः नियमादिकांचा व्यपदेश होतो." असें **वार्तिकांत** सांगितलेल्या रीतीनें पूर्वोक्त वैरूप्याचा परिहार होतो. यावरून सर्वेहि अध्ययनविधिन्याय, शूद्रांविषयीं त्यांस अध्ययनस्थानीं विहित जें श्रवण त्याच्या विधीचेठायीं योजावा. हें, **"भारतादि** वाक्यें व अन्यहि वाक्यें, अशींच योजावीं" इत्यादि वाक्यांनीं **वार्तिकांतहि** सुचविलें आहे. तें हें मीं सांगितलेलें सुज्ञांनीं दूरवर विचार करून स्वीकारावें. तस्मात् शूद्राच्या, पूर्तादि कर्मांमध्यें ब्राह्मणानें पौराणमंत्रांचाच पाठ करावा, व त्यांणीं श्रवण करावें. वैदिकमंत्राचा पाठ करूं नये, व शूद्रानें तो श्रवणें[३] करूं नये, हें सिद्ध झालें.

## ॥ अथ शूद्रस्य कर्माधिकारः ॥

**तत्र कामश्रुतयो यथाध्ययनविधिसिद्धविद्यद्विजपरा इति न शूद्रस्य विद्याक्षेपेण श्रौतकर्माधिकारः तथा स्मार्तपौराणाः ॥ ग्रहयज्ञमहादानपूर्तश्राद्धादिविधयः फलकामित्वाच्छ्रवणविधिसिद्धविद्यत्वाच्च चतुर्वर्णपरा इति शूद्रस्यापि तेष्वधिकारः न म्लेच्छादीनां विद्याक्षेपाभावात् ॥ नन्वेवं तत्रोक्तमहारुद्रलक्षहोमादिष्वप्यधिकारः शूद्रस्य स्यादितिचेन्न तत्र वैदिकमन्त्राणामङ्गत्वेन शूद्रस्य सर्वाङ्गोपसंहाराभावेनान्धादीनामिवानधिकारात् सर्वाङ्गोपसंहारेणहि प्रधानविधिप्रवृत्तिरिति षष्ठे वर्णितम् कथं तर्हि शूद्रस्य वैदिकमन्त्रयुक्ते गृह्योक्तहोमाङ्गकुशकण्डिकापेक्षे च तुलादावधिकारः ॥ उच्यते न्यायतो निषिद्धोप्यधिकारः कर्मविशेषेषु तत्तद्वचनैः प्रतिप्रसूयते निषादस्थपतेरिव रौद्रेष्टौ न च शूद्रस्य गृह्योक्ताङ्गज्ञानाभावे त्र्यंशभावनाज्ञानाभावादनधिकारः वेदानधीत्य वेदौ वा वेदं वापि यथाक्रममिति स्मृतेरेकवेदाध्ययनपक्षे वेदान्तरीयहौत्रौद्गात्रादिकस्यैव श्रवणोपदेशादिना तद्धि संभवादार्त्विज्यत्वाद्वा नियमानपेक्षणात् नियमस्तु प्रधानमात्रे उक्तं चैतत्सविस्तरं दानकमलाकरेऽस्माभिः ॥ अत्रापि च व-**

१ याविषयीं पृ. २६ पहा.

२ "ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत" इत्यादि वाक्यें हीं, अपूर्वविधिबोधक होत.

३ शूद्रानें वेदश्रवण केल्यास त्याच्या कानांत कथिलाचा रस ओतावा इत्यादि सांगितलें आहे याविषयीं पृ० २६ पहा.

**क्ष्यते ॥ यत्र तु न वैदिकमन्त्राङ्गं तत्र तु वचनाभावेप्यधिकारः श्रवणविधिसिद्धज्ञानत्वात्कामित्वाच्च यथा विनायकशान्त्यादौ यत्र वा मन्त्रांतरं विकल्पः यथा ग्रहयज्ञे स्मृतिसङ्ग्रहे ॥ नाममन्त्रेण शूद्रस्य कुर्याद्धोमादिकं बुधइति । तत्र वैकल्पिकमन्त्रान्तरेणापि सर्वाङ्गोपसंहारात् सोयं कुत्रास्ति कुत्र नास्तीति विविच्यते ॥**

यानंतर शूद्रास कर्माधिकार सांगतों.

त्याविषयीं "ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत" इत्यादि कामश्रुति[१] जशा, अध्ययनविधीनें, सिद्धविद्य झालेल्या द्विजपर आहेत. शूद्रास अध्ययनविधीनें सिद्धविद्यत्वाचा अभाव असल्यामुळें त्यास वैदिककर्माचा अधिकार नाहीं. तशींच स्मृत्युक्त व पुराणोक्त ग्रहयज्ञतुलादि महादानें, वापी, कूप इत्यादि पूर्तकर्मे, व श्राद्धादिकांचे विधि शूद्रास फलकामित्व असल्यावरून, व श्रवणविधीनें सिद्धविद्यत्वास्तव विहित आहेत. अर्थात् ग्रहयज्ञादिविधिप्रयुक्त कर्मे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चारही वर्णांस सारखीं लागू आहेत ह्मणून ते ग्रहयज्ञादिक विधि चार वर्णपर आहेत, ह्मणून शूद्रास तीं करण्याविषयीं अधिकार आहे, यावरून, म्लेछादिकांसहि अधिकार असेल, अशी कल्पना करूं नये. कारण, त्यांस अध्ययन अथवा श्रवण, यांपैकीं किंवा अन्यरीतीनें विद्येचा मुळींच आक्षेप नाहीं. यास्तव त्यांस अधिकार नाहीं. यावर शंका—जर स्मृति व पुराणोक्त ग्रहयज्ञादिविधीविषयीं, शूद्रास अधिकार आहे. तर **रुद्रयामलादि**[२] तंत्रांत सांगितलेले महारुद्र, लक्षहोम, इत्यादिकांचे ठायींहि शूद्रास अधिकार होईल असें ह्मणसील तर, होत नाहीं. कारण, महारुद्र व लक्षहोमांत वैदिकमंत्रांचें अंगत्व आहे, तेणेंकरून शूद्रास, सर्वांगाच्या उपसंहाराच्या अभावेंकरून, अंधादिकांचेपरी अनधिकार आहे. व याविषयीं सर्वांगाच्या उपसंहारेंकरून, मुख्य[३]विधीची प्रवृत्ति होते, असें **पूर्वमीमांसेच्या** सहाव्या अध्यायांत

१ स्वर्गलोकाची इच्छा करणाऱ्यानें ज्योतिष्टोम यज्ञ करावा असें सांगितलें आहे. याचप्रमाणें अमुकाला अमुक लोकाची अथवा अन्य कोणत्या प्रकारची इच्छा असल्यास त्याणें अमुक यज्ञ करावा. इच्छा न करणाऱ्यास तो न केल्यास दोष नाहीं असें आहे म्हणून त्यांस कामश्रुति असें म्हटलें आहे.

२ कर्मकांडांत वैदिक, तांत्रिक, व उभयमिश्र असे तीन मार्ग आहेत त्यांत रुद्रयामलादि तंत्रप्रतिपादकांस तांत्रिक ह्मणतात. तीं तंत्रें चौसष्ट आहेत. त्यांत रुद्रयामल हें फार मोठें आहे, व त्यांत अनेक देवतांचे मंत्र व त्यांचीं पुरश्चरणें वगैरे सांगितलीं आहेत.

३ ह्या पूर्वमीमांसेच्या सहाव्या अध्यायांतील न्यायाचा अभिप्राय असा आहे कीं, जेथें सर्व अंगसहित कोणत्याही कर्माचा निर्षेध होतो तेथें दुसऱ्या प्रधानविधीची प्रवृत्ति होते, प्रकृतस्थलीं महारुद्रलक्षहोमादि तंत्रोक्त कर्मात शूद्रास अधिकार नसण्याविषयीं याची योजना केली आहे. जसें तंत्रोक्त कर्मात वैदिक मंत्र हे अंगभूत आहेत, व शूद्रांस वेदाधिकार नाहीं अतएव तीं त्यांस विहित नाहींत. परंतु वैदिक मंत्र वर्ज्य करून तेथें पौराणमंत्राची योजना केल्यास तीं कर्मे शूद्रास करतां येतील. यावरून केवळ वैदिक मंत्ररूप अंगाचाच उपसंहार होतो, सर्व कर्मच शूद्रास विहित नाहीं असें होत नाहीं व तसें जाहलें असतें तरच पूर्वोक्तन्यायानें शूद्राचा या कर्माविषयीं अधिकार सिद्ध झाला असता.

वर्णन केलें आहे. यावर पूर्वपक्षी ह्मणतो, जर असें आहे तर, शूद्रास वैदिकमंत्रयुक्त व गृह्यसूत्रांत, सांगितलेल्या होमाच्या अंगभूत दर्भकंडिका इत्यादिकांची अपेक्षा करणाऱ्या तुलादानादिकांविषयीं अधिकार कसा होईल ? कारण तुमच्या ह्मणण्याप्रमाणें, वैदिकमंत्रांगत्व नसून तदंगत्व आहे, व सर्वांगोपसंहारन्यायासहि बाधा येईल. त्यावर सिद्धांती ह्मणतात, एक वेळ न्यायतः, शूद्रास वैदिकमंत्राधिकार निषिद्ध आहे, तथापि कित्येक कर्मांमध्यें त्या त्या कर्माच्या विधायक वचनांहीं अधिकाराचा पुनः प्रतिप्रसव केला जातो. जसा निषाद व स्थपति यांचा रौद्रेष्टींत विशेष वचनांनीं, पूर्वी निषेध असतांहि अधिकाराचा प्रतिप्रसव[1] होतो, तद्वत् येथेंहि होईल. शूद्रास **गृह्यसूत्रोक्त,** अंगज्ञानाचा अभाव आहे. ह्मणून, त्यंशभावनाज्ञानाच्या अभावास्तव, अधिकार नाहीं. "चार, तीन, दोन व एक वेदांचा यथानुक्रमें अभ्यास करून, समावर्त्तन करावें." अशी **स्मृति** आहे. यास्तव एकच वेदाध्ययनपक्षीं अन्य वेदांतील, हौत्र व उद्गात्र मंत्राच्या श्रवणोपदेशादिकेंकरून त्याचा संभव आहे. यास्तव, अथवा आर्त्विज्यत्वास्तव, नियमाची अपेक्षा नाहीं. तो नियम तर प्रधानापुर्ताच आहे. हें आह्मीं **दानकमलाकरांत** सविस्तर सांगितलें आहे. व येथेंहि सांगतों. ज्या स्थलीं वैदिकमंत्रांग असेल, तेथें वचन नसतांहि श्रवणविधीनें सिद्धज्ञानत्वास्तव व फलकामित्वास्तव शूद्रास अधिकार आहे. जसें, **विनायकशांत्यादिकांत** आहे, तद्वत्. व जेथें अन्यमंत्र सांगितल्यामुळें वैदिकमंत्रांगाचा विकल्प आहे. जसा उदाहरणार्थ ग्रहयज्ञादिकांत **स्मृतिसंग्रहांत**–"शूद्राचें ग्रहयज्ञसंबंधि होमादि कर्म ज्ञाल्यानें नाममंत्रांहीं करावें" असें सांगितलें आहे. तेथें वैकल्पिक अन्यमंत्रानेंही सर्वांगाचा उपसंहार आहे. तो हा उपसंहार, कोठें आहे व कोठें नाहीं त्याचें विवेचन करितों.

**तत्रादौ विहितानि अगस्त्यसंहितायाम् शुचिव्रततमाः शूद्रा धार्मिका द्विजसेवकाः ॥ स्त्रियः पतिव्रताश्चान्ये प्रतिलोमानुलोमजाः ॥ लोकाश्चाण्डालपर्यन्तं सर्वेऽप्यत्राधिकारिणः ( अत्र राममंत्रे ) तथा श्रुतिर्ब्रह्माह षड्वर्णं स्मृतिवर्णद्वयात्मकम् ॥ षड्वर्णं ब्राह्मणादीनां त्रयाणां यद्विवर्णकम् ॥ तदन्येषां दैशिकेन वक्तव्यं तारकं परम् ॥ तत्रैव मन्त्रोयमुपदेष्टव्यो ब्राह्मणाद्यनुरूपतः ॥**

त्यांत प्रथम शूद्रांस विहित कर्मे कोणतीं तीं सांगतों. याविषयीं **अगस्त्यसंहितेंत** शुद्धव्रताचरण करणारे, धार्मिक व द्विजसेवा करणारे शूद्र, आणि अशाच प्रतिव्रता स्त्रिया, व अन्य प्रतिलोम[2] व अनुलोम[3]जातीय चांडालपर्यंत सर्व लोक, या राममंत्र[4]जपाविषयीं

१ भिल्ल व सुतार यांचा प्रथम आक्षेप करून त्यांस अग्निसिद्धकर्माचा अधिकार नाहीं असें सिद्ध करून पुढें रौद्रेष्टीचें विधान करण्याच्या प्रसंगीं पूर्वी निषेध केलेल्याविषयीं पुनः विधीचा प्रतिप्रसव केला आहे, याविषयीं पूर्वमीमांसा पहा.

२ उत्तम वर्णाच्या स्त्रीचे ठायीं अधमवर्ण पुरुषापासून झालेल्या संततीस प्रतिलोमज असें म्हणतात. याविषयीं पुढें जातिप्रकरणांत सविस्तर विचार केला जाईल.

३ पुरुष उत्तमवर्णाचा असून नीचवर्ण स्त्रीचेठायीं झालेल्या संततीस अनुलोमज म्हणतात. याविषयींहि पुढें विचार केला जाईल. ४ हा मंत्र तेरा अक्षरांचा (श्रीराम जयराम जयजयराम)

अधिकारी आहेत, तसेंच श्रुतीनें षड्वर्ण (ॐ नमः शिवाय) व स्मृतीनें, दोन वर्णांचें (राम अथवा शिव) ब्रह्म सांगितलें आहे. त्यांतून पहिलें षड्वर्ण ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांस, व दुसरें शूद्रादिकांस विहित आहे. यास्तव उपदेशकानें, शूद्रादिकांस त्या तारक ब्रह्माचा उपदेश करावा. आणि तेथेंच हा मंत्र ब्राह्मणादिवर्णानुरूप उपदेश करावा.

**ब्रह्मोत्तरखण्डे शिवपञ्चाक्षरं प्रक्रम्य मंत्रराजाधिराजोयं सर्ववेदान्तशेखरः ॥ सर्वज्ञाननिधानं च सोयं चैव षडक्षरः ॥ १८ ॥ कैवल्यमार्गदीपोयमविद्यासिंधुवाडवः ॥ महापातकदावाग्निः सोयं मन्त्रः षडक्षरः ॥ १९ ॥ प्रणवेन विना मन्त्रः सोयं पञ्चाक्षरो मतः ॥ स्त्रीभिः शूद्रैश्च सङ्कीर्णैर्धार्यते मुक्तिकाङ्क्षिभिः ॥ २० ॥ नास्य दीक्षा न होमश्च न संस्कारो न तर्पणम् ॥ न कालनियमश्चात्र जप्यः सर्वैरयं मनुः ॥ २१ ॥ एतद्दीक्षा तत्रैव परकृतिरूपेणोक्ता ॥ पुण्यतीर्थजले स्नानं राजानं समुपोषितम् ॥ प्राङ्मुखं चोपविश्याग्रे नत्वा शिवपदांबुजम् । तन्मस्तके करं न्यस्य दद्यौ मन्त्रं शिवात्मकम् ॥ ५८ ॥ [ स्कं० ब्र० खं० अ० १ ] इति स्मृतिकौमुद्यां वाराहे ॥ ब्राह्मणक्षत्रियविशां पञ्चरात्रं विधीयते ॥ शूद्रादीनां च तच्छ्रोत्रे पदवीमुपयास्यति अतएवाग्रे उक्तम्—अथ शूद्रस्य वक्ष्यामि गदतः शृणु माधवि ॥ दंपती मम भक्तौ च मम कर्मपरायणौ ॥ नमस्कारप्रियो नित्यं मम चिन्ताव्यवस्थितः ॥ शुद्धकर्माणि वै देवि यो नित्यं तु समाचरेत ॥ त्यक्त्वा ऋषिसहस्राणि शूद्रमेव तु याम्यहम् ॥**

**ब्रह्मोत्तरखंडांत** शिवपञ्चाक्षरमंत्रास आरंभ करून सांगितलें आहे कीं, "हा मंत्र ब्रह्महत्यादि महापातकांचा नाश करणारा वणवा आहे, ॐकारयुक्त म्हटल्यास सहा अक्षरांचा (ॐ नमः शिवाय) व ॐकारावांचून पञ्चाक्षर (नमः शिवाय) होतो. मोक्षाची इच्छा करणारे स्त्रिया, शूद्र, व संकरयोनि इत्यादिकांनीं हा शिवपञ्चाक्षरमंत्र

असा संप्रदायाप्रमाणें उपदेश्य, व दोन दोन अक्षरांचा आहे.

१ ज्यास सहा अक्षरें आहेत ते अर्थात् शिवषडक्षरमंत्र याचा उद्धार वगैरे रुद्रयामलांत शिवपटलांत सांगितला आहे.

२ न कालो नोपदेशश्च सर्वः शुचिरयं मनुः इत्यपि पाठांतरम् ॥ ३ अन्यैस्तु न तच्छ्रोत्रेति पाठो लिखितः ॥

३ सुराप्राशन, सुवर्णाची चोरी, ब्राह्मणास मारणें, व गुरुपत्नीशीं संग करणें हीं चार व असलीं पातकें करणाऱ्यांशीं संसर्ग करणें हें एक, मिळून हीं पांच महापातकें होत. येथें ह्या पातकरूप तृणाचा नाश करण्याविषयीं शिवषडक्षरमंत्र हा केवळ वणव्यासारखा आहे. असें सांगितलें आहे हें वाक्य त्या मंत्राचे स्तावक अथवा प्राशस्त्यबोधक आहे. म्हणून अर्थवादरूप आहे असें वाटतें. नाहींतर वरील पापांचा नाश होण्याकरितां हें सुलभ प्रायश्चित्त सोडून मोठमोठीं अशक्य प्रायश्चित्तें धर्मशास्त्रकर्त्यांनीं कां सांगितलीं असतीं?

जपावा, याला दीक्षा होऊन संस्कार व तर्पण व कालनियम इत्यादि नाहींत. हा सर्वांनीं जपण्यास योग्य आहे." ह्या मंत्राची दीक्षा अन्यकृतिरूपानें तेथेंच ( ब्रह्मोत्तरखंडांत ) सांगितली आहे ती—"पुण्यकारक तीर्थोदकांत स्नान करून उपोषित असून भक्तियुक्त अशा राजास आपल्या अग्रभागीं पूर्वाभिमुख बसवून शिवाच्या चरणकमलास नमस्कार करवून राजाच्या मस्तकावर हस्त ठेवून तो ऋषिश्रेष्ठ शिवात्मक मंत्र, राजास देता झाला." **स्मृतिकौमुदींत, वराहपुराणांत** "ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांस पांच रात्रींपर्यंत विधान केलें जातें, शूद्रादिकांस त्यांच्या कानांस ऐकूं येईपर्यंत विहित आहे." अतएव पुढें सांगितलें आहे कीं—"यानंतर हे माधवि शूद्राचे धर्म मी सांगत असतां श्रवण कर. शूद्रजातीय स्त्रीपुरुषांनीं माझी ( विष्णूची ) भक्ति करावी. व मला प्रिय असलेलीं कर्में करण्याविषयीं तत्पर असावें. शूद्रानें नेहमीं माझें चिंतन करावें, व नमस्कारमंत्रप्रिय असावें; हे देवि, पूर्वोक्त प्रकारें जो शूद्र नेहमीं शुद्धकर्माचरण करील त्याजवळ हजारों ऋषींचा त्याग करून मी जाईन; अर्थात् त्यावर कृपा करीन" असें सांगितलें आहे.

**तथा तत्रैव चातुर्वर्ण्यस्य वक्ष्यामि दीक्षामद्य यशस्विनीत्युपक्रम्य द्विजानां दीक्षामुक्त्वा ॥ शूद्रस्यापि च वक्ष्यामि मद्भक्तस्य वराङ्गने इत्यादिना शूद्रदीक्षोक्ता । वामनपुराणे ततश्चकार भगवांश्चातुर्वर्ण्यं हरार्चने । इत्युक्त्वा वसिष्ठपुत्रस्य शक्तेस्तच्छिष्यादीनां वा शिवदीक्षामुक्त्वा ऊर्णोदरस्य शूद्रस्य दीक्षामुक्त्वोक्तम् । एवं स भगवान्ब्रह्मा पूजनाय शिवस्य तु । कृत्वा तु चातुराश्रम्यं स्वयं च भवनं गतः इति । भविष्येपि ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं कुलीनं शूद्रमेव च । पुरुषं वा स्त्रियं वापि दीक्षयेत्सूर्यमण्डले । एवं यत्र विशेषवचनं तत्र शूद्रस्याधिकारः ॥ स्मृतिकौमुद्यां तु शूद्रादीनां च तच्छ्रोत्रपदवीमुपयास्यतीति पाठं वाराहे उक्त्वा पञ्चरात्रोक्तवैष्णवशैवसौरशाक्तवैनायकेषु मन्त्रेष्वधिकार उक्तः ॥**

## ॥ इति मन्त्रदीक्षा ॥

तसेंच त्या **वराहपुराणांत** " हे यशस्विनि, सांप्रत चारहि वर्णांची दीक्षा सागतों"

---

१ " दीक्षा " म्हणजे एखाद्या कर्माचा नियमपूर्वक स्वीकार. ही दीक्षा अनेक प्रकारची आहे; परंतु प्रकृत स्थलीं तंत्रमार्गोक्त मंत्रदीक्षा घ्यावयाची आहे. शिव, विष्णु, शक्ति इत्यादि देवतांचे जे निरनिराळे मंत्र आहेत त्यांचा जप करणें, तर पूर्वी दीक्षा घेतली पाहिजे. एतदंगभूत पूर्णाभिषेक वगैरे करावीं लागतात याविषयीं विशेष विचार कुलार्णव, दीपिका व तंत्रसार इत्यादि ग्रंथांत सांगितला आहे. कित्येकांच्या मतें दीक्षा कलियुगांत वर्ज आहे, व तत्स्थानीं उपदेश विहित आहे. कारण, "युगे युगे तु दीक्षासीदुपदेश" अन्ययुगांत दीक्षा होती, परंतु कलियुगांत तिच्या ऐवजीं उपदेश आहे. "उपदेश" म्हणजे अंगभूत पूर्णाभिषेकादि न करितां केवल मंत्रमात्र ग्रहण करणें—हें वचन धर्मसिंधुकर्त्यानेंहि घेतलें आहे. [ धर्मसिंधु. प० १ ग्रहणनिर्णय पहा. ]

२ कोणताही मंत्रजप करीत असून तदुक्त फलप्राप्ति जाहली नाहीं तर, त्या मन्त्रास तारण इत्यादि संस्कार करावे असें तांत्रिकांचें मत आहे. हे संस्कार गौतमीय तंत्रांत सांगितले आहेत.

असा उपक्रम करून ब्राह्मणादि तीन वर्णांची दीक्षा सांगून "हे वरांगने, माझी ( विष्णूची ) भक्ति करणाऱ्या शूद्राचीहि दीक्षा सांगतों." इत्यादि वचनांनीं शूद्रदीक्षाप्रचार सांगितला आहे. **वामनपुराणांत** "नंतर तो भगवान् ( ब्रह्मदेव ) शिवाची पूजा करण्याकरितां चारहि वर्णांस उत्पन्न करिता जाहला." असें सांगून वसिष्ठऋषीचा पुत्र शक्ति व त्याच्या शिष्यादिकांची शिवदीक्षा वगैरे सांगून **पूर्णोदर** नामक शूद्राची दीक्षा सांगून पुढें ह्मटलें आहे कीं, "या प्रकारें तो भगवान् ब्रह्मदेव शिवाच्या पूजेकरितां चार वर्ण व आश्रम करून आपण गृहास गेला." **भविष्यपुराणांत**हि "सूर्यग्रहणकालीं[1] ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व कुलीन शूद्र यांतील पुरुषास अथवा स्त्रियेला मंत्रदीक्षा द्यावी." असें सांगितलें आहे. याप्रमाणें जेथें विशेषवचन असेल तेथें शूद्राचा अधिकार आहे. **स्मृतिकौमुदींत** तर, [ पृष्ठ १५ पंक्ति १५ ] येथें सांगितलेलें **वराहपुराणस्थ** वचन घेऊन **पञ्चरात्रागमोक्त** वैष्णव, शैव, सौर, शाक्त, व वैनायक मंत्राविषयीं शूद्राचा अधिकार सांगितला आहे:—**इति मंत्रदीक्षाधिकारनिर्णयः.**

## ॥ अथ शूद्रस्य देवस्थापनम् ॥

**कल्पतरौ देवीपुराणे वर्णाश्रमविभेदेन देवाः स्थाप्यास्तु नान्यथा ॥ ब्रह्मा तु ब्राह्मणैः स्थाप्यो गायत्रीसहितः प्रभुः ॥ चतुर्वर्णैस्तथा विष्णुः प्रतिष्ठाप्यः सुखार्थिभिः ॥ भैरवोपि चतुर्वर्णैरंत्यजानां तथा मतः ॥ मातरः सर्वलोकैस्तु स्थाप्याः पूज्याः सुरोत्तमः ॥ लिङ्गं गृही यतिर्वापि संस्थाप्य तु यजेत्सदा । त्रिस्थलीसेतौ पितामहचरणास्तु देवप्रतिष्ठायां शूद्रादीनां नाधिकारः। स्त्रीणामनुपनीतानां शूद्राणां च नरेश्वर ॥ स्थापने[2] नाधिकारोऽस्ति विष्णोर्वा शंकरस्य च ॥ यः शूद्रसंस्कृतं लिङ्गं विष्णुं वापि नमेन्नरः ॥ इह चात्यन्तदुःखानि पश्यत्यामुष्मिके किमु ॥ शूद्रो वानुपनीतो वा स्त्रियो वा पतितोपि वा ॥ केशवं वा शिवं वापि स्पृष्ट्वा नरकमश्नुते इति बृहन्नारदीये ॥ स्कान्दाद्युक्तेरित्याहुः चतुर्वर्णैरिति पूर्ववचनाद्विष्ण्वादिप्रतिष्ठायां शूद्रस्य विकल्प इति तु युक्तम् ॥**

यानंतर देवस्थापनाधिकार सांगतों.—

याविषयीं **कल्पतरूंत देवीपुराणांत** सांगितलें आहे कीं, "ब्राह्मणादि चार वर्ण व ब्रह्मचर्यादि चार आश्रम यांच्या भेदानें ज्यांस जे विहित असतील ते देव स्थापावे, अन्यथा स्थापूं नयेत. ते असे कीं—ब्राह्मणांनीं गायत्रीसहित ब्रह्मदेव व सुखाची इच्छा करणाऱ्या चारहि वर्णांनीं विष्णु, चार वर्ण व अंत्यज[3] यांनीं भैरव, व सर्व लोकांनीं देवी,

१ मंत्रदीक्षा घेण्यास व पुरश्चरण करण्यास ग्रहणपर्वकाल फार योग्य सांगितला आहे परंतु चंद्रग्रहणांत दीक्षा घेतल्यास दारिद्र्यादि दोष सांगितले आहेत, व सूर्यग्रहणाची विशेष फलश्रुति सांगितली आहे. ग्रसादि मुक्तिपर्यंत जप्य मंत्राचा जप केल्यास पुरश्चरण होतें इत्यादि प्रकार पुरश्चरणचंद्रिकेंत सविस्तर सांगितला आहे. २ स्पर्शने इत्यपि पाठांतरम् [क०].

३ परीट, चांभार ( जिनगरहि यांतीलच आहे ), नटवा, बुरूड, कोळी, मेद, व भिल्ल या सातांस अंत्यज असें म्हणतात.

ह्या देवता स्थापन कराव्या, व आपल्यास विहित असेल त्याप्रमाणें त्यांचें पूजन करावें. हा वर्णभेदाचा प्रकार सांगितला आहे. गृहस्थानें, व संन्याशानेंहि शिव लिंगाची[१] स्थापना करून त्याचें नेहमीं पूजन करावें." असें सांगितलें आहे.

**त्रिस्थलीसेतु** नामक ग्रंथांत आमचे ( कमलाकरभट्टाचे ) पितामहचरण ( आजे नारायणभट्ट ) ह्मणतात कीं, "देवप्रतिष्ठेविषयीं शूद्रादिकांस अधिकार नाहीं, कारण- 'स्त्रिया, उपनयन[२] न झालेले द्विजपुत्र, व शूद्र यांस विष्णु, अथवा शंकर यांच्या स्थापनेविषयीं अधिकार नाहीं, व जो शूद्रस्थापितशिवलिंगास, अथवा विष्णुमूर्तीस नमस्कार करील तो इहलोकींच अत्यंत दुःखें पाहतो; मग परलोकीं पाहील हें सांगावयास नको. शूद्र, व मुंज न झालेला द्विज, स्त्रिया आणि धर्मश्रेष्ठ हे विष्णूला, अथवा शिवाला स्पर्श करतील तर ते नरकाचा उपभोग घेतील.' अशीं **बृहन्नारदीय,** व **स्कन्दपुराण** यांचीं वचनें आहेत, ह्मणून शूद्रादिकांस देवप्रतिष्ठेविषयीं अधिकार नाहीं." वस्तुतः वरील **देवीपुराणवचनांत "चतुर्वर्णैः०"** असें ह्मटलें आहे, त्यावरून विष्णु इत्यादिकांच्या प्रतिष्ठेचे ठायीं शूद्रांस वैकल्पिक अधिकार आहे; असें ह्मणणें युक्त आहे.

**अतएव स्पर्शने नाधिकारोस्तीत्यन्यत्र पाठः ।**

अतएव ग्रंथांतरीं वरील बृहन्नारदीयवचनाचा, **"स्थापने०"** याठिकाणीं **"स्पर्शने०"** असा पाठ[३] घेतला आहे —इति शूद्रस्य देवप्रतिष्ठापनाधिकारनिर्णयः.

**अथ शूद्रस्य देवपूजा ॥ शिवसर्वस्वे भविष्ये ॥ यस्तु पूजयते लिङ्गे देवादिं मां जगत्पतिम् ॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रो वा मत्परायणः ॥ १ ॥ तस्य प्रीतः प्रदास्यामि शुभाँल्लोकाननुत्तमान् ॥ गौडतिथितत्वे स्कान्दे ॥ शूद्रः कर्माणि यो नित्यं स्वीयानि कुरुते प्रिये ॥ तस्याहमर्चां गृह्णामि चन्द्रखण्डविभूषिते ॥ १ ॥ लैङ्गे ॥ अथ रुद्रो महादेवो मण्डलस्थ उवाच ह ॥ पूज्योहं ब्राह्मणानां च क्षत्रियाणां विशेषतः ॥१॥**

---

१ येथें "लिंगाची स्थापना संन्याशानें करावी" असें सांगितलें आहे, याविषयीं कांहींसा संशय येतो; कारण, संन्याशास कोणत्याहि कर्माचा अधिकार नाहीं, व अग्निसिद्ध कर्में तर सर्वथा वर्ज्य आहेत, आणि देवप्रतिष्ठा तर अग्निसिद्ध आहे.

२ येथें मुळांत **"अनुपनीतानां"** असें मोघम म्हटलें आहे; यावरून ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तिघांचें ग्रहण केलें पाहिजे, कारण, उपनयन त्यांसच विहित आहे, व तद्रहित स्त्रिया, व शूद्रांचें ग्रहण केलें आहे. व "अनुपनीतानां" एवढें ह्मणून ब्राह्मणादिकांचें ग्रहण केलें नाहीं; तेव्हां क्रमाप्रमाणें तसें घेणें आवश्यक आहे.

३ येथें मानलेलें पाठांतर फार आवश्यक आहे; कारण **चतुर्वर्णैस्तथा विष्णुः०** या देवीपुराणवचनाचा **"स्थापने नाधिकारोऽस्ति"** या बृहन्नारदीय, व स्कन्दपुराणवचनाशीं विरोध येईल; आणि सामान्य वचन, व विशेष वचन न्यायानें विरोध परिहार करतां येणार नाहीं, कारण "विष्णुप्रतिष्ठापनेविषयीं चारहि वर्णांस अधिकार आहे" असें देवीपुराणांत सांगितलें असून, बृहन्नारदीयवचनांत स्त्रियादिकांचा अधिकार निषिद्ध केला आहे. असतु याविषयीं विशेष विचार वाचकच करतील.

वैश्यानां चैव शूद्राणां शुश्रूष्यः पूजकस्य च ॥ स्त्रीणां चैवाधिकारोस्ति पूजादिषु न संशयः ॥ २ ॥ नृसिंहपुराणे ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः स्त्रियः शूद्रान्त्यजातयः ॥ संपूज्य तं सुरश्रेष्ठं नरसिंहवपुर्धरम् ॥ १ ॥ मुच्यन्ते चाशुभैर्भावैर्जन्मकोटिसमुद्भवैः ॥ अपिपालधृते तत्रैव पुराणे ॥ अयाचितप्रदाता स्यात्कृषिं वृत्त्यर्थमाश्रयेत् ॥ पुराणं शृणुयाद्विप्रान्नरसिंहस्य पूजनम् ॥ १ ॥ सूतसंहितायाम् ॥ पञ्चाक्षरेण पूजामुक्त्वाह ॥ ब्रह्मचारी गृहस्थो वा वानप्रस्थश्च सुव्रतः ॥ एवं दिने दिने देवं पूजयेदंबिकापतिम् ॥ १ ॥ नमोन्तेन शिवेनैव स्त्रीणां पूजा विधीयते ॥ विरक्तानां च शूद्राणामेवंपूजा प्रकीर्तिता ॥ २ ॥ पञ्चाक्षरस्य श्रुतौ नमआदित्वेपि स्त्रीशूद्रयोर्नमोन्तत्वम् ॥ अन्येत्वन्ते भिन्नं नमःशब्दमाहुः ॥ अन्येषामपि सर्वेषां नराणां मुनिपुंगवाः ॥ पूजा देवालयं दृष्ट्वा प्रणामस्तस्य कीर्तितः ॥ १ ॥ एवं पूजा कृता येन सफलं तस्य जीवितम् ॥

यानंतर शूद्रास देवपूजाधिकार सांगतो. याविषयीं **शिवसर्वस्वस्थ भविष्यपुराणांत** सांगितलें आहे कीं; "जो ब्राह्मण, क्षत्रिय, अथवा वैश्य मलाच अनन्य भावानें भजणारा असा होऊन देवांचा आदिपुरुष, व जगताचा पति असा जो मी याचे लिंगाचे ठायीं पूजन करील, त्यास मी प्रसन्न होत्साता शुभकारक अत्युत्तम लोक देईन." **गौडतिथितत्वांत स्कन्दपुराणांत** "हे प्रिये, जो शूद्र नित्य स्वकीय कर्म करीत असून माझी ( शिवाची ) पूजा करितो, त्यानें केलेली ती पूजा मी स्वीकार करितों." असें सांगितलें आहे. आणखी **लिंगपुराणांत** "यानंतर ऋषिमंडलांत बसलेला महादेव बोलता जाहला; कीं मी ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य "यांस विशेषतः पूज्य आहें, व शूद्रांस सेवन करण्यास योग्य आहें, आणि पूजादिकांविषयीं स्त्रियांसहि अधिकार आहे, याविषयीं संशय नाहीं" असें सांगितलें आहे. **नृसिंहपुराणांत** ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, स्त्रिया, शूद्र व अंत्यज इत्यादि हे सर्व देवांत श्रेष्ठ अशा नरसिंहरूप धारण करणाऱ्या त्या देवास पूजन केल्यानें कोट्यावधि जन्मार्जित अशुभ भावापासून मुक्त होतात, असें सांगितलें आहे. **अपिपाल**नामक ग्रंथकर्त्यानें घेतलेल्या त्याच नृसिंहपुराण वचनांत "शूद्रानें अयाचित द्यावें, व उदरनिर्वाहार्थ शेती करावी, ब्राह्मणापासून पुराण श्रवण

१ येथें " प्रिये " हें संबोधन शिवानें पार्वतीस दिलें आहे " जो शूद्र नित्य स्वकर्म करीत असून माझी पूजा करितो ती पूजा मी स्वीकारितों. " असें ह्मटलें आहे. यावरून स्वधर्मनिष्ठ शूद्रानें केलेली पूजा देवास प्रिय आहे, व ह्मणूनच शूद्रांस तिजविषयीं अधिकार आहे; आणि तो स्वधर्मानें वागणारे व न वागणारे यांच्या तारतम्यानें आहे असें वाटतें.

२ येथें " अयाचित " देण्यास सांगितलें आहे, कारण शूद्राजवळ ब्राह्मणानें याचना करूं नये परंतु न मागतां त्यानें कांहीं दिलें तर घ्यावें, व तेंहि उत्तम शूद्राकडचेंच घ्यावें, असा निर्बंध आहे. व ब्राह्मणांस यथाशक्ति कांहीं दिल्याशिवाय शूद्रास गत्यंतर नाहीं, याकरितां " अयाचित " द्यावें अशी व्यवस्था केली आहे. याविषयीं ह्याच ग्रंथांत ठिकठिकाणीं बराच विचार केला आहे.

करावें, व नरसिंहाचें पूजन करावें" असें सांगितलें आहे. **सूतसंहितेंत** पंचाक्षरें मंत्रानें पूजा सांगून पुढें,—"ब्रह्मचारी, गृहस्थ, अथवा वानप्रस्थ यांनीं उत्तम व्रतस्थ असून पूर्वी सांगितल्याप्रमाणें महादेवाची प्रतिदिवशीं पूजा करावी. नमःशब्द अन्तीं लावून ह्मणजे "शिवायनमः" या मंत्रानें स्त्रियांनीं शिवपूजा करावी असें आह्मी विधान करितों; व वैराग्यशील शूद्रासहि याचप्रमाणें पूजा विहित आहे." येथें शिवपञ्चाक्षरमंत्रप्रतिपादकश्रुतींत मंत्रास् नमःशब्दादित्व आहे ह्मणजे,—"नमःशिवाय"असा मंत्र आहे, तथापि वरील वचनानें स्त्रिया, व शूद्र यांस "शिवायनमः" असा मंत्र विहित आहे. अन्य कित्येक **ग्रंथकर्ते** "शिवाय" असें ह्मणून निराळा "नमः" शब्द उच्चारावा." असें ह्मणतात. "हे ऋषिश्रेष्ठहो, अन्य सर्व मनुष्यांस देवाचें मंदिर पाहून त्यास भक्तिपूर्वक नमस्कार करणें एवढीच पूजा विहित आहे. ज्यानें पूर्वोक्तप्रकारें पूजा केली असेल त्याचें वांचणें सफल होय" असें सांगितलें आहे.

**यत्तुमनुः ॥ जपस्तपस्तीर्थसेवा प्रव्रज्या मन्त्रसाधनम् ॥ देवताराधनं चैव स्त्रीशूद्रपतनानि षडिति ॥ तद्विहितभिन्नपरं स्पर्शयुक्तपूजापरं वा ॥ एतच्च पुराणप्रसिद्धजीर्णलिङ्गपूजाविषयम् ॥ यानि तु त्रिस्थलीसेतौ नारदीये ॥ यः शूद्रेणार्चितं लिङ्गं विष्णुं वा प्रणमेन्नरः ॥ न तस्य निष्कृतिर्दृष्टा प्रायश्चित्तायुतैरपि ॥ १ ॥ नमेद्यः शूद्रसंस्पृष्टं शङ्करं हरिमेव वा ॥ स सर्वयातनाभोगी यावदाचन्द्रतारकम् ॥ २ ॥ पाखण्डपूजितं लिङ्गं नत्वा पाखण्डतां व्रजेत् ॥ आभीरपूजितं लिङ्गं नत्वा नरकमश्नुते ॥३॥ योषिद्भिः पूजितं लिङ्गं विष्णुं वापि नमेत्तु यः ॥ स कोटिकुलसंयुक्त आकल्पं रौरवं वसेत् ॥ इत्यादीनि तानि नूतनस्थापितलिङ्गविषयाणि ॥ यदा प्रतिष्ठितं लिङ्गं मंत्रविद्भिर्यथाविधि ॥ तदाप्रभृति शूद्रश्च योषिद्वापि न संस्पृशेदिति तत्रैवोक्तेः ॥**

जें मनु ह्मणतो कीं:—"जप, तप, तीर्थसेवा, संन्यास, मंत्रसाधन, देवताराधन हीं ६ कर्मे स्त्रीशूद्रांस पतित होण्यास कारणीभूत आहेत," तें ज्या शिवपूजादिकांविषयीं विशेष विधान केलें आहे, त्यावांचून अन्य ह्मणजे, संन्यासादिक करण्याविषयीं, अथवा लिंगाची स्पर्शयुक्त पूजा करण्याविषयीं निषेधक आहे. ही स्पर्शयुक्त पूजा पुराणप्रसिद्ध जीर्णलिंगाची मात्र निषिद्ध आहे. आधुनिक लिंगाविषयीं निषेध नाहीं. जीं **त्रिस्थलीसेतुंत नारदपुराण**वचनें "जो मनुष्य शूद्रानें पूजिलेल्या लिंगास, किंवा विष्णुप्रतिमेस नमस्कार करील, त्यास हजारों प्रायश्चित्तें केलीं तरी दोषमुक्तता होईलशी वाटत नाहीं. जो शूद्रानें स्पर्श केलेल्या शिवलिंगास, व विष्णुप्रतिमेस नमस्कार करील, तो यावच्चंद्रसूर्यपर्यंत सर्व यातना भोगील. पाखंड्यानें पूजिलेल्या लिंगास नमस्कार केल्यास, पाखंडी होईल. गवळ्यांनीं पूजिलेल्या लिंगास नमस्कार केल्यास नरकास जाईल. स्त्रियांनीं पूजन केलेल्या लिंगास, व विष्णुप्रतिमेस जो नमस्कार करील, तो कोट्यावधि पुरुषांसह कल्पपर्यंत रौरव नरकास जाईल." इत्यादि आहेत, तीं नवीन स्थापित लिंगाविषयीं नमस्कार पूजादिकांचीं निषेधक आहेत. कारण, "ज्या वेळीं मंत्रवेत्त्या ब्राह्मणांनीं यथाविधि लिंगस्थापना केली असेल त्या दिवसापासून, स्त्री शूद्रांनीं स्पर्श करूं नये."

असें तेथेंच सांगितलें आहे. यावरून पूर्वोक्त वचनें नूतन स्थापित लिंगाविषयीं आहेत, असें सिद्ध होतें.

**अन्ये तु जगदुः ॥ लिङ्गनमस्कर्तुर्दोषोस्तु शूद्रस्य पूजायां फलमस्त्येव ॥ नूतनलिङ्गार्चाशालग्रामादौ तु स्पर्शरहिता पूजा शूद्राद्यैः कार्या ॥ शूद्रो वाऽनुपनीतो वा स्त्रियो वा पतितोपि वा ॥ केशवं वा शिवं वापि स्पृष्ट्वा नरकमश्नुते ॥ १ ॥ ब्राह्मण्यपि हरं विष्णुं न स्पृशेच्छ्रेय इच्छती ॥ या तु पूजयते लिङ्गं विष्णुं वा शिवमेव वा ॥ २ ॥ सनाथा मृतनाथा वा तस्या नास्तीह निष्कृतिः ॥ स्त्रीणामनुपनीतानां शूद्राणां च जनेश्वर ॥ ३ ॥ स्पर्शने नाधिकारोस्ति विष्णोर्वा शंकरस्य चेति स्कान्दोक्तेः ॥ चत्वारो ब्राह्मणैः पूज्यास्त्रयो राजन्यजातिभिः ॥ वैश्यैर्द्वावेव संपूज्यौ तथैकः शूद्रजातिभिरिति स्कान्दोक्तेः ॥ वाराहे तु शालग्रामे स्पर्शनिषेधो न प्रतिमादावित्युक्तम् ॥ शालग्रामं न स्पृशेत्तु हीनवर्णो वसुन्धरे ॥ स्त्रीशूद्रकरसंस्पर्शो वज्रस्पर्शाधिको मतः ॥ १ ॥ मोहाद्यः संस्पृशेच्छूद्रो योषिद्वापि कदाच न ॥ स पतेन्नरके घोरे यावदाभूतसंप्लवम् ॥ १ ॥ यदि भक्तिर्भवेत्तस्यां स्त्रीणां वापि वसुन्धरे ॥ दूरादेवास्पृशन्पूजां कारयेत्सुसमाहितः ॥ सर्ववर्णैस्तु संपूज्याः प्रतिमाः सर्वदेवताः ॥ लिङ्गान्यपि तु पूज्यानि मणिभिः कल्पितानि चेति ॥ विष्णुपुराणेऽपि ॥ ब्राह्मणः क्षत्रियो वैश्यः शूद्रश्च पृथिवीपते ॥ स्वधर्मतत्परो विष्णुमाराधयति नान्यथा ॥ १ ॥ यत्तु प्रयोगपारिजाते विष्णुधर्मोत्तरे ॥ शालग्रामशिलां वापि चक्राङ्कितशिलां तथा ॥ ब्राह्मणः पूजयेन्नित्यं क्षत्रियादिर्न पूजयेदिति तत्स्पर्शसहितपूजापरम् ॥ अदीक्षितपरमित्यन्ये ॥ विशेषस्तु मत्कृते पूर्तकमलाकरे निर्णयसिन्धौ च ज्ञेयः ॥**

अन्य कित्येक **ग्रंथकर्ते** तर, असें ह्मणतात कीं; "लिंगास नमस्कार करणाराला पूर्वोक्त वचनावरून दोष असो, परंतु शूद्रास केलेल्या पूजेचें फल मिळेलच." नवीन लिंगाची अर्चा, व शालग्रामादिकांची पूजा शूद्रादिकांनीं त्यास स्पर्श केल्यावांचून करावी. कारण, "शूद्र आणि मुंज न झालेला द्विज, स्त्रिया किंवा धर्मभ्रष्ट हे किंवा अन्य कोणीहि शिवविष्णूंस स्पर्श केल्यास नरक भोगतात. जरी ब्राह्मणी असली तरी तिला स्वकल्याणाची इच्छा असल्यास तिनें शिवविष्णूंस स्पर्श करूं नये. जी त्यांची स्पर्श करून पूजा करिते, ती सुवासिनी असेल तर विधवा होते. व विधवा असेल तर, ज्यास प्रायश्चित्त नाहीं असा दोष पावते. स्त्रिया व अनुपनीत द्विज, व शूद्र यांस शिवविष्णूंस स्पर्श करण्याचा अधिकार नाहीं. अशी **स्कंदपुराणोक्ति** आहे. "ब्राह्मणांनीं ४, क्षत्रियांनीं ३, वैश्यांनीं २, व शूद्रानें १, शालग्राम पुजावे" असें **स्कंदपुराणांत** सांगितलें आहे. **वराहपुराणांत** तर, "शालग्रामाला शिवण्याविषयीं मात्र निषेध आहे, प्रतिमादिकांविषयीं निषेध नाहीं." असें सांगितलें आहे. जसें-"हे पृथ्वी, शालग्रामाला हीनवर्ण पुरुषानें स्पर्श करूं नये; स्त्रीशूद्रांच्या हाताचा स्पर्श वज्रस्पर्शापेक्षांहि अधिक मानला आहे. जो शूद्र, व जी स्त्री मोहानें, कदाचित् शालग्रामास स्पर्श करील, तो व ती प्रलयपर्यंत नरकांत राहतील. स्त्रीची शालग्रामशिलेवरच जर भक्ति असेल तर, तिनें स्पर्श न करितां दूर बसून पूजा

**१ प्रपतेन्नरके इति पाठान्तरम्.**

करावी. व शूद्रांनींहि असेंच करावें. विष्णूच्या प्रतिमा व रत्नादिकांचीं शिवलिंगें सर्व वर्णांनीं पुजावीं." असें सांगितलें आहे. **विष्णुपुराणांत** ही "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र यांनीं ते स्वधर्मतत्पर असतील तर, शिवविष्णूंची पूजा करावी. नाहीं तर करूं नये" असें सांगितलें आहे. जें **प्रयोगपारिजातांत, विष्णुधर्मोत्तरांती**ल वचन आहे कीं, "शालग्राम अथवा, चक्रांकिताची ब्राह्मणांनीं पूजा करावी. क्षत्रियादिकांनीं करूं नये," तें स्पर्शयुक्त पूजानिषेधक आहे. "ज्याला दीक्षा नाहीं त्यास पूजानिषेधक आहे." असें, अन्य कित्येक ह्मणतात. एतत्संबंधी विशेष निर्णय **पूर्तकमलाकर,** व **निर्णयसिंधु** यांत पहावा.

**एवं पार्थिवलिङ्गपूजनेप्यधिकारः ॥ मृद्भस्मगोशकृत्पिष्टताम्रकांस्यमयं तु वा ॥ कृत्वा लिङ्गं संकृत्पूज्य[1] वसेत्कल्पायुतं दिवीति तिथितत्त्वे भविष्योक्तेः वैदिकमन्त्राभावाच्च ॥ तदुक्तम् ॥ तत्रैव स्कान्दे ॥ मृदाहरणसंघट्ट प्रतिष्ठाह्वानमेव च ॥ स्थापनं पूजनं चैव विसर्जनमतः परम् ॥ १ ॥ हरो महेश्वरश्चैव शूलपाणिः पिनाकधृक् ॥ पशुपतिः शिवश्चैव महादेव इति क्रमः ॥ २ ॥ भविष्ये ॥ शर्वाय क्षितिमूर्तये नमः ॥ भवाय जलमूर्तये नमः ॥ रुद्राय अग्निमूर्तये नमः ॥ उग्राय वायुमूर्तये नमः ॥ भीमाय आकाशमूर्तये नमः ॥ पशुपतये यजमानमूर्तये नमः ॥ महादेवाय सोममूर्तये नमः ॥ ईशानाय सूर्यमूर्तये नमः ॥ मूर्तयोष्टौ भवस्यैताः पूज्याः पूर्वादितः क्रमात् ॥ आग्नेय्यान्तं प्रपूज्यास्तु वेद्यां[2] लिङ्गे शिवं यजेत् ॥ १ ॥ अत्र न प्राचीमग्रतः शंभोरिति रुद्रयामले निषेधान्नान्तरालं प्राची किंतु प्रसिद्धैव ॥ एवं नवरात्रे देवीपूजादौ ॥ एवं च विंध्यवासिन्यां नवरात्रोपवासतः इत्युपक्रम्य वैश्यैः शूद्रैर्भक्तियुक्तैर्म्लेच्छैरन्यैश्च मानवैरिति हेमाद्रौ भविष्योक्तेः ॥ एवं नानाम्लेच्छगणैः पूज्यते सर्वदस्युभिः ॥ विनामन्त्रैस्तामसी स्यात्किरातानां तु संमतेति रूपनारायणीये भविष्योक्तेश्च.**

असाच, पार्थिवलिंगपूजेविषयींहि शूद्रास अधिकार आहे. "मृत्तिका, भस्म, गोमय, पीठ, तांबें व कांस्य यांचें लिंग करून, त्याची १ वेळ पूजा केल्यास, तो हजारों कल्पपर्यंत स्वर्गीं सुख भोगील." असें **तिथितत्त्वांत भविष्यपुराण**वचन आहे, या वचनांत स्वर्गवासरूप फल सांगितलें आहे. व शूद्रास त्याची इच्छा आहे. व हें कर्म वैदिकमंत्रांवांचून होतें, अतएव त्यास पार्थिवलिंगपूजेचा अधिकार आहे. तें त्याच **तिथितत्त्वांत स्कंदपुराणांत.**–"लिंगाकरितां माती आणणें, व ती कुटणें, तिचें लिंग करून प्रतिष्ठा करणें, त्याचें आवाहन, स्थापन, पूजन व विसर्जन, यांस हर, महेश्वर, शूलपाणि, पिनाकधृक्, पशुपति, शिव व महादेव हे नाममंत्र अनुक्रमें योजावे" असें सांगितलें आहे. **भविष्यपुराणांत "शर्वाय क्षितिमूर्तये नमः, भवाय जलमूर्तये नमः, रुद्राय अग्निमूर्तये नमः, उग्राय वायुमूर्तये नमः, भीमाय आकाशमूर्तये नमः, पशुपतये यजमानमूर्तये नमः, महादेवाय सोममूर्तये नमः, ईशानाय सूर्यमूर्तये नमः** या मंत्रांनीं, पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर व कोणदिशांस, पूर्वेपासून आग्नेयीपर्यंत ८ मूर्तींचें स्थापन, व पूजन करून मध्यें वेदीवर लिंग स्थापून

**१ लिङ्गं तु संपूज्य० इति पाठान्तरम्.** २ यज्ञांत पात्रें वगैरे ठेवण्याकरितां चौकोनी अथवा अन्य प्रकारची मातीची जी ओटी करितात तिला वेदि ह्मणतात.

त्याची पूजा करावी." असें सांगितलें आहे. येथें "शिवपूजेस प्रथम पूर्वेपासून आरंभ न करितां लिंगाच्या पुढील मध्यभागास पूर्व मानून पूजा करावी." असें **रुद्रयामलांत** सांगितलें आहे. ह्मणून मध्यभागास पूर्व मानूं नये. तर, प्रसिद्ध असलेल्या पूर्वेपासूनच आरंभ करावा. असाच नवरात्रांत देवीपूजनाविषयींहि निर्णय घ्यावा. याविषयीं, "आणखी असेंच विंध्याद्रिवासिनी देवीच्या नवरात्रांत उपवास करून,-येथून आरंभ करून,-वैश्य, व भक्तियुक्त शूद्र, म्लेंछ, व अन्य मनुष्य यांनीं देवीची पूजा करावी. व अशीच अनेक प्रकारचे म्लेंछगण, व दस्यु, ( भिल्लादि चोर ) व किरात, यांणीं अमंत्रक तामसी पूजा करावी." असें **रूपनारायणी**यांत **भविष्यपुराण**वचन आहे.

**तथा व्रतोपवासादावपि शूद्रस्याधिकारः ॥ श्रवणविधिसिद्धविद्यत्वाद्वैदिकमंत्राभावाच्च ॥ प्राच्यास्तु वैश्यशूद्रयोर्द्विरात्राधिकोपवासनिषेधः ॥ वैश्याः शूद्राश्च ये मोहादुपवासं प्रकुर्वते ॥ त्रिरात्रं पञ्चरात्रं वा तेषां व्युष्टिर्न विद्यते ॥ १ ॥ इति हेमाद्रौ भविष्योक्तेरित्याहुः ॥ तत्वं तु प्रक्रमान्महातपोविषयोयं निषेधइति ॥ नवरात्रे तु भवत्येव नवरात्रोपवासतः ॥ इत्युक्त्वा-ब्राह्मणैः क्षत्रियैर्वैश्यैः शूद्रैरन्यैश्च मानवैः ॥ स्त्रीभिश्च कुरुशार्दूल तद्विधानमिदं शृणु ॥ १ ॥ इति भविष्ये शूद्रस्याप्युक्तेः ॥ एवं प्रायश्चित्तं शूद्रे जपहोमरहितं देयम् ॥ तस्माच्छूद्रं समासाद्य सदा धर्मपथे स्थितम् ॥ प्रायश्चित्तं प्रदातव्यं जपहोमविवर्जितमिति मिताक्षरायामङ्गिरसोक्तेः ॥ अत्र जपहोमवर्ज्यप्रायश्चित्तदानतीर्थयात्रादौ न शूद्रसंबन्धविधेरुपसंहारः हविरुभयत्वतद्विशिष्टोद्देशे वाक्यभेदे द्विजानां तदभावापत्तेश्च ॥ किंतु शूद्रसम्बन्धिप्रायश्चित्तोद्देशेन जपहोमवर्जत्वविधिलाघवात् ॥**

जसा देवपूजेविषयीं शूद्रास अधिकार आहे, तसाच व्रतें, व उपवास इत्यादिकांविषयींहि आहे. कारण, शूद्रास, मंत्रश्रवणविधीनेंच सिद्धविद्यत्व आहे, व वैदिकमंत्रांचा उपवासादिकांत अभाव आहे. पूर्वदेशांतील **पंडित** "वैश्य, व शूद्रांस २ रात्रींहून अधिक रात्री उपवास करण्याचा निषेध आहे, कारण "जे वैश्य व शूद्र अज्ञानानें, ३ किंवा ५ व याहून अधिक रात्री उपवास करितात त्यांस शुद्धिच नाहीं." अशी **हेमाद्रींत भविष्यपुराणोक्ति** आहे, यावरून निषेध आहे." असें ह्मणतात;-यांतील तत्व तर, पूर्वीच्या उपक्रमावरून, पूर्वोक्तवचन, मोठ्या तपाविषयीं निषेधक आहे. सामान्य व्रताविषयीं नाहीं असें वाटतें. "नवरात्रांत तर ९ रात्र उपवास करावा, हें मुख्य आहे, याकरितां शूद्रांनीं ९ रात्र उपवास करावाच." असें सांगून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, व अन्य मनुष्यांनीं, व स्त्रियांनीं उपवास करावा. त्याचें विधान हें मी सांगतों, तें श्रवणकर." असें **भविष्यपुराणांत** शूद्रांसहि उपोषण सांगितलें आहे. यावरून शूद्रांनीं सामान्य व्रतें, व तदंग उपोषणें करावीं. बहुकालपर्यंत तप मात्र आचरूं नये असें सिद्ध होतें. याप्रमाणें जसा उपवासादिकांविषयीं अधिकार आहे, तसेंच शूद्रास जप, व होमरहित प्रायश्चित्त, द्यावें, कारण "नेहमीं धर्मानें वागणाऱ्या शूद्रास, प्रायश्चित्त देण्याचा प्रसंग आल्यास जप, व होमावांचून द्यावें" असें **मिताक्षरेंत अंगिराऋषीचें** वचन आहे. येथें जप, व होमरहित प्रायश्चित्त, दान, तीर्थ यात्रादिकांचे ठायीं शूद्रसंबंध-

विधीचा उपसंहार होत नाहीं. जसें हवि ( होमद्रव्या ) चें उभयत्व ( २ देवतांत १ द्रव्य ) असतें तद्वत् विशेष उद्देशाविषयीं वाक्यभेद आहे, यावरून द्विजांस प्रायश्चित्त दान तीर्थादि विधींच्या अभावाची प्राप्ति होईल; अर्थात् विधि नाहींसा होईल तर शूद्रसंबंधीं प्रायश्चित्ताच्या उद्देशानें तदंगभूत जप होमाचें वर्ज्यत्व केल्यानें विधीचें लाघव होतें.

**अत्र केचित्प्रधानभूतयोर्जपहोमयोर्निषेधो न त्वंगभूतयोः ॥ अतएव महार्णवे लौकिकाग्नौ स्त्रीशूद्रयोः प्रायश्चित्ताङ्गव्याहृतिहोमो विप्रद्वारोक्त इत्याहुः तन्न । आरम्भे सर्वकृच्छ्राणां समाप्तौ च विशेषतः ॥ आज्येनैव च शालाग्नौ जुहुयाद्व्याहृतीः पृथक् ॥ १ ॥ श्राद्धं कुर्याद् व्रतान्ते तु गोहिरण्यादिदक्षिणम् ॥ स्त्रीणां होमो न कर्तव्यः पञ्चगव्यं तथैव चेति जाबालिना गृह्याग्निनियमात् ॥ नचाग्नेः प्रतिनिधिरस्तीत्युक्तं नवमे ॥ न वा लौकिकाग्नेर्वचनमस्ति तेनाविशेषादुभयोर्निषेधः अतो महादानेष्वप्यधिकारः ॥ तथा च हिरण्यगर्भदाने मात्स्ये ॥ शूद्रस्यैकादशसंस्कराः स्त्रीणां च षट् ॥ नमोमन्त्रश्चेति मदनरत्नादिसर्वग्रन्थाः ॥**

येथें कित्येक " प्रधानभूत जप, व होम यांचा निषेध होतो, अंगभूत असलेल्यांचा होत नाहीं, यावरून प्रायश्चित्तांत अंगभूत असलेल्या जपहोमाचा निषेध होत नाहीं. अतएव **मदनमहार्णवांत** लौकिकाग्नीचे ठायीं स्त्रीशूद्रसंबंधी प्रायश्चित्तांग व्याहृतिहोम सांगितला आहे " असें ह्मणतात तें योग्य नाहीं, कारण, " सर्व प्रायश्चित्तांच्या आरंभीं, व विशेषतः शेवटीं शालाग्नीचे ठायीं आज्य द्रव्यानें पृथक् पृथक् व्याहृतिहोम करावा. आणि व्रताच्या शेवटीं गाई, व सुवर्ण इत्यादि दक्षिणा ज्यांत आहे असें श्राद्ध करावें; स्त्रीकर्तृक प्रायश्चित्तांत व्याहृतिहोम, व पंचगव्य करूं नयेत. " असा **जाबालीनें** प्रायश्चित्तांगहोम गृह्याग्नींत करावा असा नियम केला आहे. यावरून व्याहृतिहोम लौकिकाग्नींत होत नाहीं. कदाचित् गृह्याग्नीस दुसरा प्रतिनिधि करावा असें ह्मटलें तर इतरांला प्रतिनिधि

१ या शब्दानें विवाहांत जो अग्नि सिद्ध केलेला असतो त्याचें ग्रहण होतें. याच अग्नीला गृह्याग्नि, अथवा स्मार्ताग्नि असें ह्मणतात. हा ज्याला वेदाध्ययन करण्याचा अधिकार आहे त्यासच विहित आहे; शूद्रादिकांस त्याचा अधिकार नाहीं.

२ येथें "गाई व सुवर्ण ज्यांत दक्षिणा आहे असें श्राद्ध" करण्यास सांगितलें आहे त्यावरून प्रायश्चित्तांग श्राद्ध करावयाचें तें द्रव्यद्वारा करावें असें सिद्ध होतें. ज्याला विष्णुश्राद्ध ह्मणतात तें हेंच असावें. प्रकृत स्थलीं जरी व्रतांतीं श्राद्ध करावें असें सांगितलें आहे, तरी आदि, व अन्तीं अशीं दोन करण्याविषयीं अन्यत्र प्रामाण्य असून शिष्टाचारही तसाच आहे.

३ येथें स्त्रीकर्तृकप्रायश्चित्तांतच होम, व पंचगव्याचा निषेध केला आहे, परंतु येथें स्त्रियांचें ग्रहण केवळ उपलक्षणार्थ आहे यावरून शूद्राचेंही ग्रहण होतें, व स्त्रीशूद्रांचें धर्मसाम्य आहे, आणि पूर्वोक्त अंगिरसवचनांत शूद्रकर्तृकप्रायश्चित्तांत जप व होम वर्ज्य केले आहेत.

४ 'प्रतिनिधि' ह्मणजे एकाच्या ऐवजीं पुढें केलेला दुसरा; प्रकृतस्थलीं गृह्याग्नीच्या ऐवजीं लौकिकाग्नि प्रतिनिधिभूत करावा, याकरितां याचें ग्रहण केलें आहे. इतरांस प्रतिनिधि होतो परंतु अग्नीस प्रतिनिधि होत नाहीं याविषयीं त्रिकाण्डमण्डनानें सांगितलें आहे कीं,–" **न स्यात्प्रति-**

आहे, परंतु "अग्नीला प्रतिनिधि नाहीं" असें **पूर्वमीमांसेच्या** नवव्या अध्यायांत सांगितलें आहे. आणि लौकिकाग्नीचें ग्रहण करण्याविषयीं वचनप्रामाण्यहि नाहीं; ह्मणून अविशेषास्तव दोन्हीहि अग्नींचा निषेध होतो. ज्या हेतूस्तव जपहोमरहित प्रायश्चित्त घेण्याचा शूद्रांस अधिकार आहे, त्या हेतूस्तव तुलादिमहादानांविषयींहि अधिकार आहे. असेंच **मत्स्यपुराणांत हिरण्यगर्भदान प्रकरणांत** सांगितलें आहे. "शूद्रांस ११ व स्त्रियांस ६ संस्कार, व नमः हा मंत्र विहित आहे" असें मदनरत्नादि सर्व ग्रंथकर्ते ह्मणतात.

**महादानेषु मात्स्येपि ॥ स्त्रीणां कुण्डानि विप्रेन्द्र योन्याकाराणि कारयेत् ॥ शारदातिलकेपि ॥ वैश्यानामर्धचन्द्राभं शूद्राणां च त्रिकोणकमिति शूद्राणां कुण्डोक्तेः ॥ स्त्रीशूद्रयोः सधर्मत्वाच्च ॥ अतएव मात्स्ये हिरण्यगर्भे ॥ नरो वा यदि वा नारी सर्वब्रह्मात्मसम्भवम् ॥ यः करोति महापुण्यं शृणु तस्यापि तत्फलमित्युक्तम् ॥ कामधेनुदानेऽप्याग्नेये ॥ ब्रह्मविट्क्षत्रशूद्राणां कर्तव्या यत्नतो नृपेति ॥ भविष्योत्तरे हलपङ्क्तिदानेपि ॥ प्रयत्नेन महीपाल दानमेतन्नृपोत्तम ॥ दातव्यं भक्तियुक्तेन स्त्रिया वा पुरुषेण वा ॥ ब्रह्माण्डे सप्तद्वीपदाने सप्तद्वीपाह्वयं दानमेवं कृत्वा तु मानवः ॥ नारी वा पुरुषो वापि वैरिंचिं लोकमाप्नुयात् ॥ १ ॥ धान्यपर्वतेपि ॥ दिव्यं विमानमारुह्य नारी वा पुरुषोपि वा ॥ तत्रैव कार्पासाचलेपि ॥ इत्युच्चार्य नरो दद्यान्नारी वा विधिपूर्वकम् ॥ तिलपर्वतेपि ॥ पुण्यक्षयादिहागत्य राजा भवति धार्मिकः ॥ नारी वा तस्य पत्नी च सुभगा रूपसंयुता ॥ १ ॥ तथा मान्धात्रा युवनाश्वेन कार्तवीर्येण चैव हि ॥ दानमेतत्पुरा दत्तं तत्पत्नीभिस्तथैव च ॥ न च वचनात्तावन्मात्रेधिकारः अनुवादेन फलार्थत्वात् ॥ यद्यपि नरेंद्रे विप्रेंद्रेत्यादिसामान्यस्य विद्वद्विषयत्वात् द्विजपरत्वमेवार्हम् ॥ तथापि क्वचिच्चतुर्वर्णग्रहणात्क्वचिच्छूद्रस्य क्वचिच्च स्त्रियाः परामर्शः ॥ स्त्रीशूद्रयोः समानधर्मत्वाच्छ्रवणविधिसिद्धविद्यत्वात्कामित्वाच्च शूद्रस्याप्यधिकारः ॥ तदुक्तम् अधिकारी भवेच्छूद्रः पूर्तधर्मे न वैदिक इति ॥ मोक्षधर्मेपि ॥ मन्त्रवर्जं न दुष्यन्ति कुर्वाणाः पौष्टिकीं क्रियामिति ॥**

महादानाविषयीं **मत्स्यपुराणांत** असें सांगितलें आहे कीं हे ब्राह्मणश्रेष्ठा, स्त्रीकर्तृकमहादानादिकर्मांत * * आकाराचीं (त्रिकोण) कुण्डें करावीं" **शारदातिलकांतहि**

---

**निधिर्मंत्रस्वामिदेवाग्निकर्मसु ॥ सदेशकालयोर्नास्ति नारणेरग्निरेवसा ॥ १ ॥"** आणखी पूर्वमीमांसेच्या नवव्या अध्यायांत सविस्तर सांगितलें आहे; परंतु विस्तारभयास्तव तें येथें दिलें नाहीं.

१ ह्या वाक्यांत एखाद्या महादानाविषयींचा उल्लेख नाहीं. तथापि महादानसंबंधी हवनादि करण्यास अग्निकुंडें कशीं करावीं तें सांगितलें आहे. यावरून स्त्रियांस तीं दानादिकर्में करण्याचा अधिकार आहे असें अर्थात् सिद्ध होतें. व मुळांत स्त्रियांचें ग्रहण केलें आहे. त्यावरून समानधर्मत्वास्तव शूद्रांचेंहि ग्रहण होतें, व हा एक साधारण नियम वाचकांनीं अवश्य लक्षांत ठेविला पाहिजे कीं, ज्या ज्या आर्षवचनांत केवळ शूद्र, अथवा स्त्रियांचें ग्रहण करून एखादें कर्म वगैरे सांगिलें असतें तेथें तें वचन स्त्रिया, व शूद्र ह्या दोघांस समानच असतें; कारण दोघेहि समानधर्मा आहेत ह्मणून त्यांचें पृथक् ग्रहण करीत नाहींत.

" अर्धचंद्राकार वैश्याचें, व त्रिकोणाकार, शूद्राचें कुंड असावें " असें येथें शूद्रास कुंड करण्याविषयीं सांगितलें आहे, व पूर्वोक्त मत्स्यपुराणवचनांत स्त्रियांस त्रिकोणाकृति कुंड सांगितलें आहे, परंतु स्त्रिया, व शूद्र समानधर्मे आहेत या हेतूस्तव शूद्रासहि त्रिकोणच विहित आहे; अतएव मत्स्यपुराणांत हिरण्यगर्भदान प्रकरणांत " पुरुष अथवा स्त्री स्वयमेव सर्व ब्रह्मात्मक अशा हिरण्यगर्भ पुरुषाचें दान भक्तिपूर्वक करील त्याचें पुण्य मी सांगतों तें ऐक "[१]असें सांगितलें आहे. कामधेनुदानाविषयीं **आग्नेयपुराणांत** सांगितलें आहे तें असें कीं, " ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र[२] यांनीं अवश्यमेव ही कामधेनु ब्राह्मणास द्यावी. " **भविष्योत्तरपुराणांत** हलपंक्ति ( नांगराची ओळ ) दानाविषयींहि " हे राजश्रेष्ठा, भक्तियुक्त असलेल्या स्त्रियेनें, अथवा पुरुषानें हें दान मोठ्या प्रयत्नानें द्यावें " असें सांगितलें आहे. **ब्रह्मांडपुराणांत** सप्तद्वीपदानाविषयीं असें सांगितलें आहे कीं, " हें सप्तद्वीप नांवाचें दान पूर्वी सांगितल्याप्रमाणें जो मनुष्य करील तो स्त्री, किंवा पुरुष असला तरी सत्यलोकाला पावेल. " आणखी तेथेंच धान्यपर्वतदानाविषयीं असें सांगितलें आहें कीं, "जो मनुष्य हें धान्यपर्वतदान करील तो स्त्री, अथवा पुरुष कोणी असला तरी दिव्य विमानांत बसून उत्तम लोकास जाईल." आणि त्याच **ब्रह्माण्डपुराणांत** कार्पासाचल ( कापसाचा पर्वत ) दानाविषयीं असें सांगिलें आहे कीं, "स्त्रीनें, अथवा पुरुषानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें मंत्राचा उच्चार करून विधिपूर्वक हें दान द्यावें." तिलपर्वतदानाविषयींहि "हें दान देणार स्वर्गलोकांत परम सौख्याचा उपभोग करितो. कदाचित् पुण्यक्षय होऊन इहलोकीं आला तर परमधार्मिक असा राजा होतो. दान देणारी स्त्री असेल तर ती इहलोकीं उत्तम रूपवती, व सौभाग्ययुक्त अशी राजपत्नी होते." असें सांगून आणखी—"मान्धाता, युवनौश्व[३], व कार्तवीर्य यांनीं, व त्यांच्या स्त्रियांनीं पूर्वी हें तिलपर्वतदान दिलें होतें." असें सांगितलें आहे. यावरून ज्या ज्या दानाविषयीं विधिवचन असेल तेवढ्यापुरताच शूद्रास अधिकार आहे; असें ह्मणूं नये. कारण, अनुवाद केल्यानें फलार्थत्व आहे. यद्यपि "हे नरेंद्र" इत्यादि शब्दांवरून ज्या वाक्यांत वर्णविशेषाचा नियम

१ येथेंहि शूद्रशब्दानें स्त्रियांचें ग्रहण होतें.

२ ह्या वाक्यांत वर्णविशेषाचें ग्रहण न करितां सर्व साधारण स्त्रीपुरुषांचें ग्रहण केलें आहे; यावरून चारीहि वर्णांस हें दान विहित आहे असें सिद्ध होतें. यावर कोणी अशी शंका करील कीं, स्त्रीपुरुषमात्रग्रहणानें अंत्यजादिकांसहि ह्या दानाविषयीं अधिकार कां नसावा? यावर असें उत्तर आहे कीं ज्यांना सिद्धविद्यत्व असेल त्यांसच कर्माधिकार आहे; जरी शूद्रांस द्विजांसारिखा विद्याधिकार नाहीं तरी श्रवणविधिसिद्धविद्यत्व आहे, व अंत्यजादिकांस त्याचा अभाव आहे. याविषयीं पूर्वी पृ० १७ येथें विचार केला आहे तो पहा.

३ येथें मूळांत **"मान्धात्रा युवनाश्वेन"** असें दोघांचें ग्रहण केलें आहे, परंतु पुस्तकान्तरीं **"यौवनाश्वेन"** असें आढळतें, व युवनाश्व हा मान्धात्याचा पिता होय; याकरितां हेंहि पाठान्तर योग्य आहे.

केला नाहीं. त्या सामान्य वचनास विद्वद्विषयत्वास्तव[1] ब्राह्मणादिवर्णत्रयपरत्वच असणें योग्य आहे; तथापि क्वचित्स्थलीं चारहि वर्णांचें ग्रहण केलें आहे, व कोठें शूद्रांचा, व कोठें स्त्रियांचा, व क्वचित् उभयतांचा अर्थतः स्वीकार केला आहे, व स्त्रीशूद्रांचें समानधर्मत्व आहे, व त्यांस श्रवणविधिसिद्धविद्यत्व असून फलकामित्व आहे, म्हणून शूद्रासहि पूर्वोक्त दानादिकांविषयीं अधिकार आहे. तेंच ग्रंथान्तरीं सांगितलें आहे. जसें "शूद्र पूर्तधर्मा[2]विषयीं अधिकारी होईल, परंतु वैदिक धर्माविषयीं होणार नाहीं." **महाभारतांत मोक्षधर्मां**तहि "स्त्रिया, व शूद्र वैदिकमंत्ररहित पौष्टिक[3]कर्म केल्यास दोषी होत नाहींत." असें सांगितलें आहे.

**पञ्चगव्ये तु स्त्रीणां विकल्पः ॥ स्त्रीशूद्रस्य विशुद्ध्यर्थं प्राजापत्यं समादिशेत् ॥ पञ्चगव्यं तु कुर्वीत स्नात्वा पीत्वा शुचिर्भवेदिति पराशरोक्तेः ॥ शूद्रे तु न निषेधः ॥ यत्त्वत्रिः ॥ पञ्चगव्यं पिबेच्छूद्रो ब्राह्मणस्तु सुरां पिबेत् ॥ उभौ तौ तुल्यकर्माणौ पुमाख्ये नरके वसेत् ॥ १ ॥ इति तत्प्रायश्चित्तंविना ज्ञेयम् ॥ विशेषः प्रायश्चित्तरत्ने ज्ञेयः ॥ एवं पूर्तेपि जलाशयोत्सर्गप्रासादप्रतिष्ठामहादानादिष्वपि शूद्रस्याधिकारः ॥ अधिकारी भवेच्छूद्रः पूर्ते धर्मे न वैदिके ॥ इति व्यासजातूकर्ण्योक्तेः ॥ पूर्तमाह हेमाद्रौ मदनरत्ने च जातूकर्ण्यः ॥ वापीकूपतडागादि देवतायतनानि च ॥ अन्नप्रदानमारामः पूर्तमित्यभिधीयते ॥ १ ॥ तत्रैव नारदः ॥ ग्रहोपरागे यद्दानं सूर्यसंक्रमणेषु च ॥ द्वादश्यादौ च यद्दानं तदेतत्पूर्तमुच्यते ॥ १ ॥ शङ्खः ॥ रोगिणां परिचर्या च पूर्तमित्यभिधीयते । तत्रैव स्मृत्यन्तरे ॥ ग्रहोपरागे यद्दानं सूर्यसंक्रमणेषु च ॥ बहिर्वेद्यां च यद्दानं तत्पौर्तिकमुदाहृतम् ॥ १ ॥ तेन कर्मविपाकोक्तदानादावप्यधिकारः ॥ मनुः ॥ दानधर्मं निषेवेत नित्यमैष्टिकपौर्तिकम् ॥ श्रौतस्मार्ताग्निकर्माङ्गं दानमिष्टं तु पौर्तिकम् ॥ १ ॥ व्यासोपि ॥ वर्णानामाश्रमाणां च चातुर्वर्ण्ये युधिष्ठिर ॥ दानधर्मं[5] प्रवक्ष्यामि यथा व्यासेन भाषितम् ॥ १ ॥ विशेषस्तु मत्कृते दानकमलाकरे ज्ञेयः ॥**

पंचगव्याविषयीं तर स्त्रियांस वैकल्पिक अधिकार आहे; कारण, "स्त्री, व शूद्र यांस देहशुद्ध्यर्थ प्राजापत्यप्रायश्चित्त सांगावें. पंचगव्य तर करावेंच. स्नान, व पंचगव्यप्राशन केल्यानें त्यांची शुद्धि होईल." अशी **पराशराची** उक्ति आहे. शूद्राविषयीं तर पंचग-

१ यथाविधि ज्यांनीं वेदाचें अध्ययन केलें असेल त्यांस विद्वान् म्हणतात; "तद्विषयकत्व" म्हणजे त्यांस लागू असणें, अर्थात् पूर्वीं सांगितलेलीं हिरण्यगर्भादि दानें विद्वानांनींच देण्यास योग्य आहेत असा अभिप्राय.

२ विहिरी, तलाव, धर्मशाला इत्यादि धर्मार्थ करणें याला पूर्त म्हणतात. याविषयीं विशेष विचार मूळांतच येईल.

३ **पूर्तधर्मे न वैदिक इति पाठान्तरम्.**

४ ज्यानें पुष्टता येते तें पौष्टिक. अनेक प्रकारचीं जीं दानें इत्यादि सांगितलीं आहेत त्या प्रत्येकांचीं कांहीं फलें असतात, व कर्म करणाऱ्यास ज्याची अपेक्षा असते तदनुसार आचरण केल्यास फलप्राप्तिरूप पुष्टता येते म्हणून अशा कर्मांस पौष्टिक म्हणतात. ५ **दानं धर्मं० इत्यपि पाठः.**

त्याचा निषेध मुळींच नाहीं. जें **अत्रि** ह्मणतो कीं, "जर शूद्र पंचगव्य, व ब्राह्मण सुरा, प्राशन करितील तर, ते दोघेहि एकसारखेच दोषी होतात. अर्थात् ब्राह्मणास सुरा प्राशन केल्यानें जें पातक लागतें, तेंच शूद्रास पंचगव्यप्राशनानें लागतें; आणि ते दोघेहि पुंमान्[1] नांवाच्या नरकांत बहुकाल वास करितात" तें प्रायश्चित्तावांचून पंचगव्यप्राशन केल्यास निषेधक होय, असें समजावें. एतत्संबंधी विशेष निर्णय **प्रायश्चित्तरत्न**नामक ग्रंथावरून जाणावा. याप्रमाणें पूर्तकर्माविषयीं ह्मणजे—विहिरी, तलाव इत्यादिकांचा उत्सर्ग[2], देवप्रतिष्ठा, तुलादि महादानें इत्यादिकांचे ठायींहि शूद्रास अधिकार आहे. कारण, "शूद्र पूर्तधर्माचे ठायीं अधिकारी होईल परंतु वैदिकधर्माविषयीं होणार नाहीं" अशी **व्यास,** व **जातूकर्ण्य** यांची उक्ति आहे, पूर्तकर्म कोणतें तें **हेमाद्रींत,** व **मदनरत्नांत** जातूकर्ण्य सांगतो. जसें—"तळया, विहिरी, तलाव, देवालयें इत्यादि बांधणें; व अन्नदान, आराम (बाग) इत्यादि करणें यास पूर्तकर्म असें ह्मणतात." तेथेंच (**हेमा० मद०**) **नारद** ह्मणतो कीं, "चंद्रसूर्यग्रहणप्रसंगीं, व सूर्यसंक्रांतिदिवसीं, व द्वादशीइत्यादिकांचे ठायीं जें दान दिलें जातें त्याला पूर्त असें ह्मणतात." **शङ्ख** ह्मणतो कीं, "रोग्यांची सेवा करणें वगैरे यासहि पूर्त ह्मणतात." तेथेंच (**हेम० मद०**) अन्य स्मृतींत "चंद्रसूर्यग्रहण, व संक्रांति या पर्वकाळीं, व वेदीच्या बाहेर जें दान देतात त्यांस पौर्तिक असें ह्मणतात." यावरून कर्मविपाक नांवाच्या ग्रंथांत सांगितलेल्या दानादिकांविषयींहि अधिकार आहे. **मनु** ह्मणतो कीं, "नित्य ऐष्टिक ह्म०-ग्रहयज्ञादि, व पौर्तिक ह्म०तलाव विहिरी इत्यादि करणें, अशा दानधर्माचें आचरण करावें." श्रौत, व स्मार्त अग्नि ज्यांत अंगभूत असतात, त्यांस **इष्ट,** व पूर्वोक्तदानादिकांस पूर्त असें ह्मणावें. "**व्यास**ही ह्मणतो कीं, हे युधिष्ठिरा, चारही वर्णांत त्या त्या वर्णाचा, व आश्रमांचा दानधर्म तुला सांगतों, हें माझें वचन प्रमाण होय." एतत्संबंधी विशेष विचार मत्कृत **दानकमलाकरा**वरून जाणावा.

**अत्र यत्र महादानजलाशयोत्सर्गादौ वैदिकमन्त्रयुक्ते वचनाद्ग्रथकारस्येव दानादावधिकारः शूद्रस्योक्तः तत्र द्वयी गतिः ॥ वैदिकमन्त्ररहितं विप्रैः कार्यमित्येकः पक्षः ॥ मन्त्रवर्जं न दुष्यन्ति कुर्वाणाः पौष्टिकीं क्रियामिति मोक्षधर्मेषु व्यासोक्तेः ॥ मनुरपि ॥ धर्मेप्सवस्तु धर्मज्ञाः सतां धर्ममनुव्रताः ॥ मन्त्रवर्जं न दुष्यन्ति प्रशंसां प्राप्नुवन्ति च ॥ १ ॥ यत्तु मेधातिथिनोक्तं ॥ यानि मन्त्ररहितानि व्रतोपवासादीनि तान्यनुतिष्ठन्तः**

---

१ यमलोकांत जे अनेक नरक सांगितले आहेत त्यांतील एकाचें हें नांव आहे.

२ "उत्सर्ग" ह्मणजे कोणत्याहि एकाद्या लोकोपयोगी स्थावर वस्तूवरील आपला अधिकार सोडणें;-उदाहरणार्थ सार्वजनिक रस्त्यावर, अथवा अन्यत्र विहीर, धर्मशाळा इत्यादि बांधून सर्व लोकांनीं त्याचा उपभोग घ्यावा एतदर्थ त्याचा शास्त्ररीत्या उत्सर्ग करणें ह्मणजे,-"त्यांवर आपला हक नाहीं, व त्यांचा उपभोग सर्वांनीं घ्यावा." असा संकल्प करून त्यांवरील सत्वाचा त्याग करणें. या प्रकारचा उत्सर्ग न केला असल्यास "त्या विहीर इत्यादिकांचा उपभोग इतरांनीं करूं नये." असें धर्मशास्त्रकर्त्यांचें मत आहे, कारण कीं, त्यांपासून परस्वोपभोगरूप दोष प्राप्त होतो.

**शूद्रा न दुष्यन्ति ॥ न पुनः समन्त्राण्यपि मन्त्रवर्जमनुतिष्ठन्तो न दुष्यन्तीति समन्त्रकविधौ शूद्रान्प्रत्यप्रवृत्तत्वेन मन्त्रवर्जानुष्ठाने शब्दानुष्ठानं स्यादिति ॥ तन्न ॥ स्थपतीष्टिवच्छृङ्गग्राहिकयाविधाने मन्त्रवर्जताविधानात् ॥ अन्यथा मंत्रहीने व्रतोपवासादावनधिकारप्रसक्त्या विधिवैयर्थ्यात् ॥ तस्मात्सन्निधानार्थकमेवैतत् ॥**

येथें ज्या तुलादि महादानें, व विहिरी इत्यादिकांचा उत्सर्ग इत्यादि वैदिकमंत्रेंयुक्त कर्मांचे ठायीं अधिकारविधायक वचनास्तव जसा रथकारास (सुतारास) अग्निहोत्र घेण्याविषयीं अधिकार सांगितला आहे, तद्वत् शूद्रास अधिकार सांगितला आहे, तेथें दोन प्रकारची गति आहे. ती अशी कीं,–वैदिकमंत्ररहित सर्व कर्म ब्राह्मणाकडून करवावें हा एक पक्ष होय; कारण, "वैदिकमंत्ररहित पौष्टिककर्म शूद्रांनीं केल्यास ते दोषी होत नाहींत." अशी **महाभारतान्त**र्गत शान्तिपर्वांत **मोक्षधर्म**प्रकरणीं **व्यासा**ची उक्ति आहे व **मनु**हि ह्मणतो कीं, "धर्माचरणाची इच्छा करणारे, व स्वतः धर्मज्ञ असून साधूंनीं आचरितधर्मास अनुसरणारे शूद्र, मंत्ररहित पौष्टिककर्म करतील तर दोषी होत नाहींत; तर उलट प्रशंसेप्रत पावतात." या वचनाची व्याख्या करणारा **मेधातिथि** "जीं व्रतोपवासादिकर्में मुळींच मंत्ररहित आहेत त्यांप्रत आचरण करणारे शूद्र दोषी होत नाहींत, परंतु मुळींच समंत्रक असलेलीं तुलादानादि कर्में आचरण केल्यास शूद्र दोषी होत नाहींत असें नाहीं. कारण मूलवचनांत **"मंत्रवर्जं न दुष्यन्ति"** असें ह्मटलें आहे अतएव समंत्रक विधि तो शूद्रांप्रत प्रवृत्त नसल्याकारणानें त्याचा अधिकार नाहीं." असें ह्मणतो; परंतु तें योग्य नाहीं. कारण, स्थपतीच्या इष्टीसारखे शृंगग्राहिकेनें विधान केलें असतां मंत्रवर्ज्यत्वाचें विधान होतें; नाहींपेक्षां मंत्रहीन अशा व्रतोपवासादिकांविषयीं शूद्रांस अनधिकार प्राप्त होऊन तत्संबंधीं विधीला व्यर्थत्व येईल; तस्मात् हें वचन संनिधानार्थच आहे.

---

१ येथें असें ह्मणण्याचें कारण इतकेंच कीं, पूर्वोक्त कर्में वैदिकमंत्रसहितच ब्राह्मणादिकांस विहित आहेत, याकरितां त्यांचा शूद्रांविषयीं कांहीं व्यवस्था करून उपयोग करावयाचा आहे.

२ महाराष्ट्र भाषेंत लांकूडकाम करणारा–सुतार असें ज्यास ह्मणतात तोच रथकार जाणावा. ह्याला अग्निहोत्र घेण्याविषयीं अधिकार सांगितला आहे; त्याविषयीं **कातीयश्रौतसूत्रांत** बरेंच विवेचन केलें आहे; आणखीं **महाभारतांत** उद्योगपर्वांत वृत्रासुरवधाख्यानांत विश्वरूपाच्या वधाविषयीं इंद्रास एका सुतारानें साहाय्य केलें त्यामुळें इंद्रानें त्यास हा अधिकार दिला आहे," अशी कथा आहे. तिचाहि येथें कांहींसा संबंध असावा असें वाटतें.

३ सुतार हा वेदाधिकारी नसतांही त्यास अग्निहोत्र घेण्याचा अधिकार सांगितला आहे. परंतु इतर वैदिक कर्मांतून कोणत्याही कर्माचा अधिकार नाहीं. याविषयीं विशेष **कातीयश्रौतसूत्र**; व **पूर्वमीमांसेंत** पाहावा.

४ शिल्पकाम करणारा अर्थात् सुतार याला स्थपति ह्मणतात.

५ **"शृङ्गग्राहिका"** ह्मणजे शिंग धरणें–अर्थात् एकाद्या पशूचें शिंग धरल्यानें जसें सर्व शरीराचें ग्रहण केलेंसें होतें; तद्वत् एकाच्या ग्रहणानें इतर सर्वांचेंही ग्रहण होतें असा अभिप्राय.

६ **"सन्निधानार्थं"** ह्मणजे मुळीं वैदिकमंत्रयुक्त असलेल्या महादानादि कर्मांत शूद्रानें

अन्ये त्वाहुः विप्रैर्वैदिकमन्त्रेणैव होमादि कार्यं ॥ वक्ष्यमाणपराशरोक्तेः ॥ माधवीयेप्येवमेव ॥ पौराणमंत्रेष्वाचार्यकर्तृकेषु पाठ एव ॥ याजमानेषु पाठएवेति कल्पतरुस्मार्तगौडादयः। युक्तंतु श्रवणविधिवशात्तेषां श्रवणमात्रं ॥ उक्तयुक्तेः श्रवणजन्यज्ञानस्यैवांगत्वात् ॥ वैदिके तु याजमाने नमस्कारमात्रम् ॥ अनुमतोऽस्य नमस्कारो मंत्र इति गौतमोक्तेः। गौडा मैथिलाश्चैवम् ॥ एवमुभयतोमुखीदाने नमोमंत्रेण होमः। यज्ञो वै नम इति श्रुतेश्च ॥ अस्येति पष्ठीश्रुत्या यजमानस्य याज्येतिवत् तत्संबंधित्वात् पौराणो विप्रस्य ॥ अमंत्रस्य तु शूद्रस्य विप्रो मंत्रेण गृह्यत इति पूर्वोक्तवाराहोक्तेः ॥ यत्त समंत्रकहोमस्य पुत्रप्रतिग्रहांगत्वाद्याहृत्यादिमंत्रपाठे च स्त्रीशूद्रयोरनधिकारात्तयोर्दत्तकः पुत्रो न भवत्येवेति शुद्धिविवेके रुद्रधरेणोक्तम् ॥ तन्न ॥ भर्त्रनुज्ञया स्त्रिया अपि प्रतिग्रहोक्तेः ॥ तदाह वसिष्ठः ॥ न स्त्री पुत्रं दद्यात्प्रतिगृह्णीयाद्वान्यत्रानुज्ञानाद्भर्तुरिति ॥ इदं तज्जीवने तदूर्ध्वं तु स्वातंत्र्यान्नानुज्ञापेक्षा ॥ यद्यपि मेधातिथिना भार्यात्ववददृष्टरूपं दत्तकत्वं होमसाध्यमुक्तं ॥ स्त्रियाश्च होमासंभवस्तस्थापि व्रतादिवद्विप्रद्वारा होमादि कारयेदिति हरिनाथादयः ॥ गौडनिबन्धतत्वेप्येवम् ॥ एवं शूद्रस्याद्भुतरोगशांतिकर्मविपाकतुलादावपि । स्त्रीशूद्राश्च सधर्माण इति स्मृतेः ॥ अतएव शूद्रकर्तृकहोमो विप्रद्वारैव पराशरेणोक्तः ॥ दक्षिणार्थं तु यो विप्रः शूद्रस्य जुहुयाद्धविः ॥ ब्राह्मणस्तुभवेच्छूद्रः शूद्रस्तु ब्राह्मणो भवेदिति ॥ अत्र माधवाचार्यः ॥ यो विप्रः शूद्रदक्षिणामादाय तदीयं हविः शान्तिपुष्ट्यादिसिद्धये वैदिकैर्मंत्रैर्जुहोति तत्र विप्रस्यैव दोषः शूद्रस्तु होमफलं लभेतैवेति व्याचचक्षे ॥ एतच्चास्माभिर्निर्णयसिन्धौ सविस्तरमुक्तम् ॥ तेन सर्वत्र शूद्राणां वैदिकमन्त्रहोमे द्वौ पक्षौ ॥ विप्रद्वारा समन्त्रको अमन्त्रको नाम्ना चेति ॥

अन्य कित्येक तर असें ह्मणतात कीं, "ब्राह्मणांनीं वैदिकमंत्रानेंच होमादि करावें, कारण पुढें येणारी **पराशरोक्ति** याला आधारभूत आहे." **पराशरमाधवीयांतहि** असेंच सांगितलें आहे. जेथें कर्म आचार्यानें करण्याचें असून त्यांत पुराणोक्तमंत्र विहित असतील, तेथेंहि त्या मंत्रांचा पाठच केला पाहिजे; व "यजन करवीत असतां मंत्राचा पाठच केला पाहिजे." असें **कल्पतरु स्मार्तगौड,** इत्यादि ह्मणतात. यांत युक्ततर, शूद्रांला श्रवणविधि आहे, ह्मणून त्यांस पौराणमंत्राचें श्रवणमात्र विहित आहे. कारण पूर्वोक्त युक्तीवरून श्रवणजन्यज्ञानाचेंच अंगत्व आहे. जेथें वैदिकमंत्रांनीं कर्म सांगितलें असेल तेथें यजमानाविषयीं केवळ नमः मंत्र मात्र विहित आहे, कारण "याला प्रमाण, शूद्राला नमस्कार मंत्रच अनुमत आहे." अशी **गौतमोक्ति** आहे. **गौड** व **मैथिलहि** असेंच ह्मणतात. याचप्रकारें उभयतोमुखीदानाचेठायीं नमोमंत्रानेंच होम करावा. कारण, **"यज्ञोवै नमः"** अशी श्रुति आहे. **अस्य** ह्या षष्ठीश्रवणानें यजमानाचा याचेठायीं जसा संबंध असावा तद्वत् संबंधित्वास्तव पौराणमंत्रपाठही ब्राह्मणानें करावा, कारण "मंत्ररहित अशा शूद्राचें ब्राह्मण मंत्रानें ग्रहण करितो" अशी पूर्वोक्त **वराहपुराणाची**

---

सन्निध असून ब्राह्मणाकडून वैदिकमंत्ररहित तीं कर्में करवावीं एतदर्थ हें वाक्य आहे असा अभिप्राय.

उक्ति आहे. याकरितां ब्राह्मणांनीं केलेल्या मंत्रपाठानें त्याचें ( शूद्राचें ग्रहण होतें, अर्थात् त्यांला मंत्रपाठाचें फल मिळतें. जें "समंत्रकहोम पुत्रस्वीकाराचा अंगभूत आहे, व व्याहृत्यादिमंत्रपाठाचेठायीं स्त्रीशूद्रांस अधिकार नाहीं; या हेतूस्तव स्त्रीशूद्रांस दत्तकपुत्र होतच नाहीं" असें **शुद्धिविवेकांत रुद्रधरानें** सांगितलें आहे, तें योग्य नाहीं; कारण भर्त्याच्या अनुज्ञेनें स्त्रियेलाहि पुत्र घेण्यास अधिकार सांगितला आहे, व तेंच **वसिष्ठानें** सांगितलें आहे. जसें "स्त्रीनें भर्त्याच्या आज्ञेवांचून पुत्र दुसऱ्यास देऊं नये, व घेऊं नये." हें वचन पति जिवन्त असतां मात्र लागू आहे; पति मेल्यावर तर स्वतंत्रतेनें दत्तकपुत्र घेण्यास, व देण्यास स्त्रियांस अधिकार आहे. भर्त्याच्या आज्ञेची अपेक्षा नाहीं. यद्यपि **मेधातिथीनें** "जसें भार्यात्व अदृष्टरूप आहे. तद्वत् दत्तकत्वहि अदृष्टरूप होमसाध्य आहे." असें सांगितलें आहे; व स्त्रीलाही होमाचा असंभव आहे; तथापि "व्रतादिकांचेपरी ब्राह्मणद्वारा होमादि करावें." असें **हरिनाथा**दिक ह्मणतात. **गौडनिबंधतत्वांत** असेंच सांगितलें आहे. याचप्रमाणें अद्भुतशांति, रोगशांति, कर्मविपाकसंबंधीं कृत्यें, व तुलादिमहादानें इत्यादिकांचे ठायींही शूद्रास अधिकार आहे. "स्त्रिया व शूद्र समानधर्म आहेत" या स्मृतीवरून जसा स्त्रियांस ब्राह्मणद्वारा होमादि करून पूर्वोक्तकर्में करण्याचा अधिकार आहे, तसाच शूद्रासही तत्समानधर्मत्वामुळें अधिकार आहे असें सिद्ध होतें. अतएव "शूद्रकर्तृकहोम ब्राह्मणद्वारा करावा." असें **पराशरा**नें सांगितलें आहे. जसें–"जो ब्राह्मण दक्षिणा मिळण्याकरितां शूद्राचें होमद्रव्य घेऊन हवन करितो, तो शूद्र

१ दत्तकत्व होमसाध्य आहे, व व्याहृतिहोम स्त्रीशूद्रांस करण्याचा अधिकार नाहीं; यामुळें दत्तक घेण्यासच अधिकार नाहीं असा अभिप्राय.

२ यद्यपि इतर सर्व विधि झाले तथापि विवाहसंबंधीं होम झाल्यावांचून स्त्रीत्व ( भार्यापण ) सिद्ध होत नाहीं. तसेंच दत्तकत्वहि अंगभूत व्याहृतिहोम झाल्यावांचून सिद्ध होत नाहीं असा अभिप्राय आहे.

३ एकादें व्रत स्त्रियांनीं घेतलें असेल तर, त्याचें उद्यापन वगैरे जें करावयाचें त्यांत संकल्प मात्र स्वतः करून अन्य होमादि सर्व कर्म आचार्यद्वारा करवावें, असें आहे. तद्वत् पुत्रप्रतिग्रहांग व्याहृतिहोमहि ब्राह्मणद्वारा करवावा, असा अभिप्राय आहे.

४ अरण्यांतील पशु घरांत शिरल्यास, व घरांत वारूळ उत्पन्न जाहल्यास, जातें, अथवा विरट इत्यादिक विनाकारण फुटल्यास यांस अद्भुत ह्मणतात. हीं व अन्य कित्येक अद्भुतें **शांति**ग्रंथांत सांगितलीं आहेत. तीं त्या त्या ग्रंथांत पहावीं. हीं अद्भुतें जाहल्यास दोषपरिहारार्थ शांति करावी लागते; तिलाच अद्भुतशांति असें ह्मणतात.

५ येथें **"ब्राह्मण शूद्र होतो"** असें ह्मटलें आहे, यावरून दक्षिणा घेऊन शूद्राचे घरीं वैदिकमंत्रानें हवन करूं नये, व तसें केल्यास तो दोषी होतो इतकेंच घेतलें पाहिजे; नाहीं पेक्षां तसें हवन करणारा ब्राह्मण शूद्र होतो असें समजूं नये. या प्रकारचीं वाक्यें स्मृत्यादिकांत बहुत उपलब्ध होतात, परंतु त्यांचा अर्थ तें कर्म आचरण केल्यास दोषी होतो इतकाच घेण्याचा संप्रदाय

होतो, व शूद्र ब्राह्मण होतो." येथें ह्या स्मृतीचे व्याख्याकार **माधवाचार्य** ह्मणतात कीं, "जो ब्राह्मण शूद्रापासून दक्षिणा घेऊन त्याचें हवि शांति पुष्टि इत्यादि सिध्यर्थ वैदिकमंत्रांनीं हवन करितो; तेथें ब्राह्मणासच दोष आहे, शूद्रांस तर केलेल्या होमाचें फळ अवश्यमेव मिळेलच." हें आह्मीं **निर्णयसिंधूंत** सविस्तर सांगितलें आहे. ह्यावरून सर्वत्र शूद्रांच्या वैदिकमंत्रहोमाचे ठायीं दोन पक्ष आहेत–ब्राह्मणद्वारा समंत्रक करावा. हा एक, व अमंत्रक अथवा नाममंत्रयुक्त हा दुसारा; या दोहोंतून पाहिजे तो पक्ष स्वीकारावा.

## ॥ अथ शूद्रस्य संस्काराः ॥

**यमः ॥ शूद्रोप्येवंविधः कार्यो विना मंत्रेण संस्कृतः ॥ न केनचित्समसृजच्छंदसा तं प्रजापतिः ॥ १ ॥ छंदसा मन्त्रेण ॥ व्यासोपि ॥ गर्भाधानं पुंसवनं सीमन्तो जातकर्म च ॥ नामक्रिया निष्क्रमोऽन्नप्राशनं वपनक्रिया ॥ १ ॥ कर्णवेधो व्रतादेशो वेदारंभक्रियाविधिः ॥ केशांतस्नानमुद्वाहो विवाहाग्निपरिग्रहः ॥ २ ॥ त्रेताग्निसंग्रहश्चैव संस्काराः षोडश स्मृताः इत्युक्त्वाह ॥ नवैता कर्णवेधान्ता मंत्रवर्जं क्रियाः स्त्रियः ॥ विवाहो मंत्रतस्तस्याः शूद्रस्यामंत्रतो दश ॥ १ ॥ यत्तु स्मृतिकौमुद्यां मदनपालेनोक्तम् ॥ ब्राह्मणक्षत्रियवैश्यानां गर्भाधानसीमंतजातकर्मनामकरणाऽन्नप्राशनचूडोपनयनव्रतचर्याध्ययनसमावर्तनविवाहयज्ञदानानि समानानीति ॥ सुमन्तूक्तौ द्विजानामेवोक्तेः ॥ विवाहमात्रं संस्कारं शूद्रोपि लभतां सदेति ब्राह्माच्च ॥ न शूद्रस्य जातकर्मादि ॥ एवं चौलाभावः ॥ चूडाकर्म द्विजातीनां सर्वेषामेव धर्मत इति मनूक्तेरिति ॥ तच्चिन्त्यम् ॥ सौमन्तवचनस्योपनयनादिसाम्यार्थत्वात् ॥ अन्यथा दानेप्यनधिकारापत्तेः ॥ मानवीये च धर्मत इत्युक्तेः शूद्रे होमादिनिषेधात् ॥ तदाह मनुः ॥ बैजिकैर्गार्भिकैर्होमैश्चूडामौंजीनिबन्धनैः ॥ बैजिकं गार्भिकं चैनो द्विजानामपमृज्यत इति ॥ अतएव मदनरत्ने हिरण्यगर्भदाने ॥ गर्भाधानं पुंसवनं सीमंतोन्नयनं तथा ॥ कुर्युर्हिरण्यगर्भस्य ततस्ते द्विजपुङ्गवाः ॥१॥ इत्युक्त्वा ॥ जातकर्मादिकाः कुर्यात्क्रियाः षोडश चापराः ॥ इत्यत्र मात्स्ये ॥ स्त्रिया जातकर्मनामकरणनिष्क्रमणान्नप्राशनचूडाविवाहाः षट्संस्काराः ॥ शूद्राणां तु षडेते पंचमहायज्ञाश्चेत्येकादशेत्युक्तम् ॥ रूपनारायणहरिहरभाष्ययोरप्येवम् ॥ शूद्रस्योपनयनवर्जा गर्भाधानादिविवाहान्ताः नव संस्कारा इति जयपालः ॥ शार्ङ्गधरस्तु ॥ द्विजानां षोडशैव स्युः शूद्राणां द्वादशैव हि ॥ पंचैव मिश्रजातीनां संस्काराः कुलधर्मतः ॥ १ ॥ वेदव्रतोपनयनमहानाम्नी महाव्रतम् ॥ विना द्वादश शूद्राणां संस्कारा नाममंत्रतः**

---

आहे–उदाहरणार्थ **"मासेन शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात्"** दूध विकणारा ब्राह्मण एक महिन्यानें शूद्र होतो. येथें ब्राह्मणानें दूध विकूं नये, व विकल्यास दोष आहे. इतकाच अर्थ घेणें इष्ट आहे. उलट ब्राह्मण शूद्र होतो. असा मुळींच इष्ट नाहीं. याविषयीं **भाट्टदिनकर** अध्याय १ पाद १ पहा. प्रकृतस्थलींही असाच अर्थ घ्यावा. व **माधवाचार्यांनीं**ही याप्रमाणें केला आहे.

१ येथेंही "शूद्र ब्राह्मण होतो" याचा अर्थ वरच्या टिपेंत सांगितल्याप्रमाणें घ्यावा. ह्मणजे– शूद्रास दोष नाहीं असें समजावें.

इत्याह ॥ अपरार्कस्तु ॥ गर्भाधानमृतौ पुंस इत्यत्राह ॥ एतच्चातुर्वर्ण्यपरं न द्विजातिमन्त्रपरम् ॥ तथा सत्युपनयनं विधाय वाच्यं स्यादिति ॥ तेन तन्मते गर्भाधानपुंसवनसीमंतजातकर्मनामकरणनिष्क्रमणान्नप्राशनचौलाख्याः अष्टौ भवन्ति ॥ कल्पतरौ ब्राह्मे तु ॥ विवाहमात्रं संस्कारं शूद्रोपि लभतां सदेत्युक्तम् ॥ अत्र सदसच्छूद्रगोचरत्वेन देशभेदाद्वा व्यवस्थेति तत्वम् ॥ यत्तु मनुः ॥ न शूद्रे पातकं किंचिन्न च संस्कारमर्हतीति ॥ तदर्थमाह मेधातिथिः ॥ यत्सामान्यतो निषिद्धं स्तेयानृतादि न तदतिक्रमेऽस्य तथा पापं यथा द्विजानाम् ॥ उपनयनरूपं संस्कारं च नार्हतीति ॥ ते च तूष्णीं कार्याः पूर्वोक्तयमाद्युक्तेरिति दिक् ॥

यानंतर शूद्राचे संस्कार सांगतो.

यांविषयीं **यम** ह्मणतो कीं, "याप्रकारचा स्वधर्मानें वागणारा शूद्र; मंत्रावांचून संस्कारयुक्त करावा. कारण, ब्रह्मदेवानें सृष्टिसमयीं ब्राह्मणादि तीन वर्ण वेदमंत्रांहींकरून उत्पन्न केले; परंतु ह्या शूद्रास कोणत्याही वेदमंत्रेंकरून उत्पन्न केलें नाहीं." **व्यासही** ह्मणतो कीं, "गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, कर्णवेध, महानाम्न्यादिव्रतें, उपनयन, वेदारंभक्रियाविधि, समावर्तन, विवाह, स्मार्ताग्निस्वीकार, आणि अग्निहोत्र घेणें हे सोळा संस्कार होत." असें सांगून पुढें ह्मणतो कीं, "यांतून गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, व कर्णवेध हे नऊ संस्कार स्त्रियांस वैदिकमंत्रावांचून करावे, व दहावा संस्कार विवाह हा मात्र समंत्रक करावा. आणि शूद्राचे, हे दहाही संस्कार अमंत्रक करावे." जें **स्मृतिकौमुदींत मदनपालानें** सांगितलें आहे कीं, "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांस गर्भाधान, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चौल, उपनयन, व्रतचर्या, वेदाध्ययन, समावर्तन, विवाह, यज्ञ, व दानें हीं तिहीं वर्णांस समान आहेत." **सुमन्तु**-वचनांत हे संस्कार द्विजांसच सांगितले आहेत, ह्मणून 'केवळ विवाह मात्र संस्कार शूद्रासहि नेहमीं मिळावा,' ह्या **ब्रह्मपुराण**वचनावरून शूद्रास जातकर्मादि संस्कार करूं नयेत. असाच चौलाचाही अभाव आहे, कारण, "सर्व द्विजातींसच धर्मतः चौलकर्म विहित आहे." अशी **मनूची** उक्ति आहे." ह्मणून तें **मदनपालाचें** मत चिन्तनीय आहे. कारण, **सुमन्तूच्या** वचनास उपनयनादि साम्यार्थत्व आहे, नाहीं तर **सुमन्तूनें** घेतलेल्या गर्भाधानादि सर्वांचा निषेध मानिल्यास दानाविषयींहि शूद्रास अनधिकार प्राप्त होईल, व पूर्वोक्त मनुवचनांत "**धर्मतः**" असें ह्मटलें आहे, ह्मणून शूद्राविषयीं

१ यांविषयीं पृष्ठ २ टीप २ री व पृष्ठ ४ टीप १ ली यांत बरेंच विवेचन केलें आहे.

२ ह्या वाक्यांत मुख्यत्वेंकरून उपनयनादिसंस्कार जसे ब्राह्मणांस विहित आहेत, तसेच क्षत्रियांस व वैश्यांस विहित आहेत. अर्थात् पूर्वोक्तसंस्कारांविषयीं तीनही वर्णांचें साम्य आहे; इतकेंच सांगितलें आहे. अतएव हें साम्यार्थ आहे असें वाटतें.

३ वरच्या टिपेंत सांगितल्याप्रमाणें **सुमन्तु**वचनाची व्यवस्था तशी न मानिल्यास इतर संस्कारांप्रमाणें त्या, व अन्य वचनानें विहित असलेल्या दानाविषयींही अनधिकार प्राप्त होईल असा अभिप्राय.

चौलादिसंस्कारांगभूत होमादिकांचा निषेध आहे; परंतु त्या संस्काराचा निषेध नाहीं. तेंच **मनु** ह्मणतो कीं, "बीजसंबंधीं व गर्भसंबंधीं चौल, व मौंजी, यांतील होमांहीं बैजिक, व गार्भिक पाप द्विजाचें नाश पावतें; अतएव **मदनरत्नांत** हिरण्यगर्भदानवर्णन-प्रसंगीं "गर्भाधान, पुंसवन, तसेंच सीमन्तोन्नयन हे संस्कार; ते ब्राह्मणश्रेष्ठ त्या हिरण्य-गर्भाचे करते जाहले," असें सांगून "जातकर्मादि सोळा संस्कार करावेत." असें **मत्स्य-पुराणांत** सांगितलें आहे; ह्मणून "स्त्रीचे जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, व विवाह हे सहा संस्कार, व शूद्राचे तर, हे पूर्वोक्त सहा, आणि पंचमहायज्ञ मिळून अकरा करावेत." असें सांगितलें आहे. **रूपनारायणीय, व हरिहरभाष्यांत**ही असेंच सांगितलें आहे. "शूद्रास उपनयनावांचून गर्भाधानापासून विवाहपर्यंत नऊ संस्कार करावेत." असें **जयपाल** ह्मणतो. **शार्ङ्गधर** तर "द्विजांस सोळा, शूद्रांस बारा, व मिश्रजातींस पांचच संस्कार, कुलपरंपरागत धर्मानुसार करावेत; सोळा संस्कारांतून वेदव्रत, उपनयन, महानाम्नी, व महाव्रत हे चार वर्ज्य करून राहिलेले बारा संस्कार शूद्रास नाममंत्रानें करावेत." असें ह्मणतो. **अपरार्क** तर "**गर्भाधानमृतौ०**" "हें वाक्य चारही वर्णपर आहे. केवळ द्विजातिमात्रपर नाहीं. तसें जाहल्यास उपनयन करून वाच्य होईल." यावरून अपरार्काच्या मतें गर्भाधान, पुंसवन, सीमन्तोन्नयन, जातकर्म, नामकरण, निष्क्रमण, अन्नप्राशन आणि चौल हे आठ संस्कार सर्वांस सारखे होतात असें सिद्ध होतें. **कल्पतरूं**त **ब्रह्मपुराणां**त "विवाहमात्र[1] संस्कार निरंतर शूद्रासही प्राप्त होवो." असें सांगितलें आहे. येथें सच्छूद्र, व असच्छूद्र एतद्विषयत्वें-करून अथवा देशभेदावरून व्यवस्था जाणावी, हें यांतील तत्व आहे. जें **मनु** ह्मणतो कीं, "शूद्राचे ठायीं किंचितही पातक नाहीं, व तो संस्कारास योग्य होत नाहीं." याचा अर्थ **मेधातिथीनें** सांगितला आहे तो असा कीं, "जें चोरी, अनृतभाषण इत्यादि सामान्यतः सर्वांस निषिद्ध आहे[3], त्याचें कदाचित् शूद्रानें अतिक्रमण केल्यास जसें द्विजांस

१ येथें "**विवाहमात्रम्**" असें ह्मटलें आहे. यावरून शूद्रास विवाहावांचून इतर संस्कार विहित नाहींत, असें सिद्ध होतें. कारण, "मात्र" हा शब्द निश्चयार्थक आहे.

२ येथें शूद्रास संस्कार किती असावेत? याविषयीं निरनिराळ्या ग्रंथकर्त्यांचा मतभेद होतो. पहा कीं **मदनपालाच्या** मतें शूद्रास केवल विवाहरूप एकच संस्कार होतो. **मत्स्यपुराणाव-रून** अकरा संस्कार करावेत असें सिद्ध होतें. **जयपाला**च्या मतें उपनयन वर्ज्य नऊ संस्कार, व **शार्ङ्गधरा**च्या मतें बारा, **अपरार्का**च्या मतें आठ, **कल्पतरू**च्या मतें केवळ विवाह मात्र संस्कार शूद्रास करावा असें आहे. ह्या सर्वांचीं मतें सयुक्तिक व सप्रमाण असल्याकारणानें सर्वही बलवत्तर आहेत. यामुळें सर्वांची एकत्र प्रवृत्ति असल्यावरून त्यांची सदसच्छूद्रत्वेंकरून, अथवा देशभेदानें व्यवस्था करावी; हेंच सयुक्तिक दिसतें.

३ मनुष्यमात्राचा साधारण धर्म नारदानें धर्मराजाला सांगितला आहे. तो असा कीं, "**सत्यं दया तपः शौचं तितिक्षेक्षा शमो दमः॥ अहिंसा ब्रह्मचर्यं च त्यागः स्वाध्याय आर्जवम् ॥१॥ सन्तोषः समदृक्सेवा ग्राम्येहोपरमः शनैः॥ नृणां वि-**

अतिक्रमणनिमित्तक पाप आहे, तसें त्यास नाहीं, व उपनयनरूप संस्कारास तो योग्य नाहीं." यावरून उपनयनाचाच निषेध होतो. शूद्रास जे संस्कार करावयाचे ते तूष्णीं (अमंत्रक) करावे; कारण, पूर्वोक्त यमादिकांची उक्ति तसीच आहे ह्मणून, हें येथें केवल दिग्दर्शन मात्र केलें आहे.

शूद्रस्य चौले च न पञ्चचूडतादिपक्षः ॥ तस्य गोत्रचिह्नत्वाच्छूद्रे च तदभावात् ॥ यद्यपि तस्मादाहुः सर्वाः प्रजाः काश्यप्य इति शतपथश्रुतेर्गोत्रनाशे तु काश्यपं इति हेमाद्रौ व्याघ्रपादोक्तेश्च काश्यपं गोत्रमस्ति ॥ अतएव पिण्डादि निर्वपेद्वीर नामतो गोत्रतस्तथेति हेमाद्रौ शूद्रश्राद्धे भविष्यवचनम् ॥ तथापि श्राद्धे एव तत् ॥ नतु प्रवरप्राप्तौ प्रमाणमस्ति ॥ ऋष्यपत्यत्वाभावाच्च ॥ अतएव मनुना द्विजानां धर्मत इत्युक्तम् ॥ अर्थप्राप्तं शूद्रस्य केशवपनं तु न वार्यत इति मेधातिथिः ॥ तत्र चौले विकल्पेन शूद्राणां सर्वमुंडनं शिखाधारणं वा ॥ शूद्रस्य अनियताः केशवेशाः [ व. स्मृ. अ. २ ] इति वसिष्ठोक्तेः ॥ अतएव हारीतः ॥ स्त्रीशूद्रौ तु शिखां छित्त्वा क्रोधाद्वैराग्यतोऽपि वा ॥ प्राजापत्यं प्रकुर्यातां निष्कृतिर्नान्यथा भवेदिति ॥ तच्छूद्रे प्रायश्चित्तमाह ॥ अतएव गौडस्त्रीणां विधवानां शिखा दृश्यते ॥ यत्तु पाद्मे ॥ न शिखी नोपवीती स्यान्नोच्चरेत्संस्कृतां गिरम् ॥ मध्यपत्रे न भुंजीत ब्रह्मवृक्षस्य भामिनि इति ॥ तन्मुण्डित्वपरिग्रहपक्षे इति दिक् ॥ विशेषस्तु मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥

शूद्राच्या चौलांत पांच, तीन इत्यादि शिखा ( शेंड्या ) राखण्याचा पक्ष नियमित नाहीं.

---

**पर्ययेहेक्षा मौनमात्मविमर्शनम् ॥२॥ अन्नाद्यादेः संविभागो भूतेभ्यश्च यथार्हतः ॥ तेष्वात्मदेवताबुद्धिः सुतरां नृषु पाण्डव ॥ ३ ॥ श्रवणं कीर्तनं चास्य स्मरणं महतां गतेः ॥ सेवेज्याऽवनतिर्दास्यं सख्यमात्मसमर्पणम् ॥४॥ नृणामयं परो धर्मः सर्वेषां समुदाहृतः ॥ त्रिंशल्लक्षणवान्राजन् सर्वात्मा येन तुष्यति" ॥५॥** अर्थ,—सत्यभाषण १ सर्व प्राणिमात्रांवर दया २ एकादश्यादि उपवासरूप तप ३ शुद्धता ४ दुसऱ्याच्या अन्यायाचें सहन ५ युक्तायुक्तविचार ६ मनाचा निग्रह ७ बाह्यइंद्रियांचा निग्रह ८ अहिंसा ९ ब्रह्मचर्य १० दान ११ आपल्यास विहित असेल त्याप्रमाणें कांहीं जपजाप्य १२ आर्जव १३ संतोष १४ सर्वत्र समदृष्टि ठेवणाऱ्या साधूंची सेवा १५ स्वर्गादिफलांची इच्छा धरून कर्म न करणें १६ मनुष्य व्यर्थ कर्म करितात त्यांचें अवलोकन १७ व्यर्थभाषणाचा त्याग १८ देहादि जडाहून निराळा असणाऱ्या आत्म्याचा शोध करणें १९ सर्व प्राणिमात्रांस आपल्याजवळ असलेल्या अन्नादिकांचा यथायोग्य विभाग देणें २० प्राणिमात्रांवर, व विशेषतः मनुष्यांवर आत्मबुद्धि, व देवताबुद्धि ठेवणें २१ हरिगुणांचें श्रवण २२ कीर्तन २३ स्मरण २४ हरीची सेवा २५ पूजा २६ नमस्कार २७ त्याचें दास्य २८ सख्य २९ आत्मनिवेदन ३० या प्रकारच्या तीस लक्षणांनीं युक्त असा हा धर्म सर्वांस आवश्यक आहे. यावरून सिद्ध होतें कीं, वर सांगितलें त्याच्या विरुद्ध वागणें हा अधर्म होय. तो सर्व मनुष्यमात्रांस निषिद्ध आहे.

१ ब्राह्मणांस चौल करतेवेळीं शिखा राखण्याचे पक्ष निरनिराळे आहेत यांविषयीं, **अपरार्कांत**, व **मदनरत्नांत लौगाक्षीनें** सांगितलें आहे कीं, **"दक्षिणतः कमुजा वासिष्ठाना-**

कारण, त्या शिखा गोत्रचिन्हभूत आहेत, व शूद्रास गोत्राचा अभाव आहे; यद्यपि 'तस्मात् सर्वे प्रजा काश्यपी ( कश्यपगोत्रोत्पन्न ) आहेत, असें प्राचीन ऋषि ह्मणतात," ह्या **शतपथब्राह्मण**वचनावरून, व "गोत्राचा नाश अर्थात् विस्मरण जाहलें असेल तर काश्यपगोत्र घ्यावें." अशी **हेमाद्रीं**त **व्याघ्रपादा**ची उक्ति आहे; ह्मणून शूद्रास काश्यपगोत्र आहे. अतएव "हे वीरा, शूद्रानें नामगोत्रोच्चारपूर्वक पिंडदानादि करावें." असें **हेमाद्रीं**त **शूद्रश्राद्धप्रकरणांत भविष्यपुराण**वचन आहे. यावरून शूद्रास गोत्र आहे असें सिद्ध होतें. तथापि तें केवल श्राद्धाचे ठायींच उपयोगी आहे. प्रवरप्राप्तीविषयीं तर प्रमाण नाहीं. कारण, शूद्र हे गोत्रप्रवर्तक ऋषींचे मुलगे नव्हत. याकरितांच **मनूनें "द्विजानां धर्मतः"** असें ह्मटलें आहे; "अर्थतः प्राप्त झालेलें केशवपन ( जायवळ काढणें ) तर निवृत्त करीत नाहीं," असें **मेधातिथि** ह्मणतो. त्यांतून चौलामध्यें शूद्रास सर्वकेशमुंडन, अथवा शेंड्या राखणें हें विकल्पेंकरून आहे. कारण, "शूद्रास केशवेश ( शिखा ) अनियमित आहेत." अशी **वसिष्ठा**ची उक्ति आहे. अतएव **हारीत** ह्मणतो कीं, "स्त्री, व शूद्र रागानें अथवा वैराग्यानें शिखाछेदन करतील तर; दोषपरिहारार्थ त्यानें प्राजापत्य प्रायश्चित्त करावें, अन्यथा त्याची दोषनिवृत्ति होणार नाहीं." असें शूद्रास शिखाछेदननिमित्तक प्रायश्चित्त सांगितलें आहे, व याकरितांच गौडस्त्रिया विधवा असल्या तथापि त्यांस शिखा[2] असल्याचें आढळतें. जें **पद्मपुराणां**त "शूद्रानें शिखा, व उपवीत धारण करूं नयें, व संस्कृतवाणी उच्चारूं नये, आणि पळसाच्या मधल्या पानावर भोजन करूं नयें." असा शिखाधारणाविषयीं निषेध सांगितला

---

**मुभयतोऽत्रिकश्यपानाम् ॥ मुण्डाभृगवः वाजिमेके मंगलार्थं शिखिनोऽन्ये यथाकुलधर्मं वा."** वसिष्ठगोत्रोत्पन्नांस उजव्या बाजूस, अत्रि, व कश्यपगोत्रोत्पन्नांस उजव्या, व डाव्या बाजूस शिखा राखणें विहित आहे. भृगुकुलोत्पन्नांस सर्वमुंडन, आंगिरसांस पांच शिखा, व मंगलार्थ इतर सर्वांस आपल्या कुलधर्मानुसार शिखा राखणें विहित आहे. यावरून सिद्ध होतें कीं, पक्षचूडतादिकपक्षांस गोत्रसंबंधाची अपेक्षा आहे, व शूद्रास त्याचा अभाव आहे एतदर्थ वर सांगितलेल्यांतून कोणचाही पक्ष न घेतां इच्छेनुसार पाहिजे तशी शेंडी राखावी.

१ विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप, हे सात व अगस्त्य हे आठ ऋषी गोत्रांचे प्रवर्तक होत.

२ पति मेल्यानंतर स्त्रियांनीं केशवपन अवश्य केलें पाहिजे; याविषयीं विशेष विचार याच ग्रंथाच्या तिसऱ्या प्रकरणांत येईल. ही चाल आपल्या महाराष्ट्र वगैरे देशांत ब्राह्मणलोकांत तर आहेच; परंतु इतर ह्मणजे सोनार, सुतार इत्यादिकांतही आहे. उत्तरहिंदुस्थानांत कित्येक ब्राह्मणजातीच्या पोटभेदांत वपन करण्याची चाल आढळत नाहीं. व येथें मुळांत स्त्रियांस शिखा छेदण्याचा जो निषेध केला आहे; तो तिनें पति जिवंत असतां रागानें अथवा, वैराग्यानें शिखाछेदन केल्यास तिला लागू आहे; परंतु पति मेल्यानंतर केशवपन केल्यास तेथें ह्या निषेधाची प्रवृत्ति होत नाहीं. व तसें न केल्यास ती अशुची होते. असें बहुत दिवसांपासून चालत आलेल्या शिष्टाचारावरून सिद्ध होतें.

आहे; तो मुंडित्वपरिग्रह पक्षाचेठायीं आहे. हें येथें केवल दिग्दर्शनमात्र केलें आहे. एत-त्संबंधी विशेष मत्कृत **निर्णयसिंधूं**त पहावा.

**तथा शूद्राणां पञ्चमहायज्ञाश्च भवन्ति ॥ भार्यारतः शुचिर्भृत्यभर्ता श्राद्धक्रियारतः ॥ नमस्कारेण मन्त्रेण पञ्चयज्ञान्न हापयेदिति याज्ञवल्क्योक्तेः ॥ एतच्च मिताक्षरायां स्पष्टम् ॥ भारते राजधर्मेषु ॥ तस्माच्छूद्रः पाकयज्ञैर्यजेत व्रतवान्स्वयम् ॥ दक्षिणा पाकयज्ञानां हिरण्यं तु विधीयते ॥ १ ॥ ते च वाजसनेयिशाखया कार्याः ॥ शूद्रा वाजसनेयिन इति गौडनिबन्धे दक्षोक्तेः ॥ हरिहरभाष्ये विवाहप्रकरणेऽप्येवमुक्तम् ॥ अन्यत्प्रयोगे व्यक्तीभविष्यतीति सङ्क्षेपः ॥ इति श्रीजगद्गुरुनारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्रसंस्काराः ॥**

तसेच शूद्रानें पंचमहायज्ञही करावेत, कारण, "स्त्रियेचेठायीं रत असून नेहमीं शुद्ध असणारा, आणि आपल्या सेवकांचें पोषण करणारा, व श्राद्धकर्मतत्पर अशा शूद्रानें 'नमः' मंत्रानें पंचमहायज्ञ करावे; व ते कधींही चुकवूं नयेत." अशी **याज्ञवल्क्या**ची उक्ति आहे, व शूद्रानें पंचमहायज्ञ करावे, हें **मिताक्षरें**त स्पष्ट आहे. तसेंच **महाभारतां**त **शान्तिपर्वा**न्तर्गत **राजधर्मां**त "तस्मात् शूद्रानें स्वतः व्रतस्थ असून पाकयज्ञांनीं यजन करावें. पाकयज्ञांची दक्षिणा तर सुवर्ण द्यावें." असें सांगितलें आहे. ते पाकयज्ञ वाजसनेयिशाखेनें करावे. कारण, "शूद्र हे वाजसनेयी आहेत." अशी **गौडनिबंधां**त **दक्षा**ची उक्ति आहे. **हरिहरभाष्यां**त विवाहप्रकरणामध्यें असेंच सांगितलें आहे. अवशिष्ट राहिलेलें, पंचमहायज्ञप्रयोग सांगतेवेळीं स्पष्ट करूं. ॥ इति श्रीजगद्गुरुनारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्वे शूद्रस्य संस्काराः ॥

## ॥ अथ शूद्रश्राद्धनिर्णयः ॥

**तत्र श्राद्धक्रियारतइति प्रागुक्तेर्नित्यनैमित्तिककाम्येषु सिद्धोऽधिकारः ॥ एवं स्त्रीणाम् ॥ स्वभर्तृप्रभृति त्रिभ्यः स्वपितृभ्यस्तथैव च ॥ विधवा कारयेच्छ्राद्धं यथाकालमतंद्रितेति स्मृतिरत्नावल्यां वृद्धमनूक्तेः ॥ तच्च श्राद्धं स्त्रीशूद्राणां मन्त्रवर्जं तूष्णीं भवति ॥ स्त्रीणाममन्त्रकं श्राद्धं तथा शूद्रासुतस्य च ॥ प्राग्द्विजाश्च व्रतादेशात्ते च कुर्युस्तथैव तदिति हेमाद्रौ मरीचिवचनात् ॥ अयमेव विधिः प्रोक्तः शूद्राणां मन्त्रवर्जितः ॥ अमन्त्रस्य तु शूद्रस्य विप्रो मन्त्रेण गृह्यते इति ब्राह्मोक्तेश्च ॥ अस्य श्राद्धप्रकरणत्वेऽपि परिभाषात्वा-**

---

१ ह्या नांवाची यजुर्वेदाची एक शाखा आहे. ह्या वाजसनेयिसंहितेस **शुक्लयजुर्वेदसंहिता** असें ह्मणतात, येथें 'शूद्र वाजसनेयी' असें ह्मटलें आहे हें अमळसें चमत्कारिक, व विचारणीय आहे; तथापि त्याविषयीं येथें विशेष विचार न लिहितां तें काम वाचकांवर सोंपवितों. परंतु यावरून शूद्र वाजसनेयिशाखी आहेत असें मात्र समजूं नये. कारण, त्यांस अविद्यत्व असल्याकारणानें ब्राह्मणादिकांचेपरि शाखासंबंध मुळींच असण्याचा संभव नाहीं. येथें शूद्र वाजसनेयी असें ह्मणण्याचें इतकेंच कारण कीं त्यांचे पंचमहायज्ञ वाजसनेयी जसे करतात तद्वत् करावे; इतकेंच सांगण्याकरितां आहे.

**शूद्रस्य स्नानदानादौ सर्वत्र विप्रेण मन्त्रपाठः कार्यः ॥ सोऽपि पौराणस्यैव ॥ एवं स्त्रिया अपीति शूलपाणिः ॥ प्रागिद्वजाश्चेत्यचूडोऽत्रिवर्षपरम् ॥ अनुपेतोऽपि कुर्वीत मन्त्रवत्पैतृमेधिकम् ॥ यद्यसौ कृतचूडः स्याद्यदि स्याच्च त्रिवत्सरः ॥ इति सुमंतूक्तेः ॥**

यानंतर शूद्राचा श्राद्धनिर्णय सांगतो.—

पूर्वी **याज्ञवल्क्य**वचनांत "श्राद्धकर्मरत" असें ह्मटलें आहे त्यावरून नित्य, नैमित्तिक, व काम्य श्राद्धकर्माचे ठायीं शूद्रास अधिकार सिद्ध झाला, व असाच स्त्रियांसही झाला. कारण, "आपला पति इत्यादि तीन, व आपला बाप, आजा, आणि पणजा यांच्या उद्देशानें यथाकालीं आलस्य न करितां विधवास्त्रीनें श्राद्ध करावें." अशी **स्मृतिरत्नावलीं**त **वृद्धमनू**ची उक्ति आहे. याप्रकारें ज्या श्राद्धाविषयीं स्त्रीशूद्रांस अधिकार आहे; तें त्यांचें मंत्ररहित तूष्णीं होतें. कारण, "स्त्रिया, शूद्र, व अनुपनीत द्विज यांनीं अमंत्रक श्राद्ध करावें." असें **हेमाद्रीं**त **मरीची**चें वचन आहे, व "ह्याच विधि मंत्ररहित शूद्रास उक्त आहे. मंत्राधिकाररहित असलेल्या शूद्राचें श्राद्ध, आपण पठण केलेल्या मंत्रानें ब्राह्मण संपादन करितो." अशी **ब्राह्मपुराणो**क्ति आहे. येथें हें पूर्वोक्त ब्राह्मवचन श्राद्धप्रकरणांत घेतलें आहे; याकरितां त्याची अन्यत्र प्रवृत्ति होऊं नये परंतु तें परिभाषारूप आहे, या हेतूस्तव शूद्राच्या स्नानदानादि सर्व कर्मांत ब्राह्मणानें मंत्रपाठ करावा. व तोही पौराणमंत्राचाच. "स्त्रीकर्तृक कर्मांतही असेंच करावें." असें **शूलपाणि** ह्मणतो. तसेंच पूर्वोक्त मरीचिवचनांत "उपनयनाच्या पूर्वी द्विजांनीं." असें ह्मटलें आहे; तें चौल, अथवा तीन वर्षें पुरीं होण्यापूर्वी द्विजांनीं अमंत्रक करावें एतदर्थ आहे, असें समजावें. कारण, "अनुपनीत द्विजानेंही पितृसंबंधी श्राद्धादिकर्म समंत्रक करावें, परंतु जर तो चौल झालेला, अथवा तीन वर्षांचा असेल तर." अशी **सुमंतू**ची उक्ति आहे.

**स्मृत्यर्थसारे अनुपनीताः स्त्रीशूद्राश्च श्राद्धमृत्विजा कारयेयुः स्वयं वाऽमंत्रकं कुर्युः ॥ द्विजस्त्रियस्तु स्वयं संकल्पमात्रं कृत्वा वैदिकमंत्रयुक्तं सर्वं ब्राह्मणद्वारा कारयेयुरिति प्रयोगपारिजातः ॥ अतएव स्त्रीणामित्यकृतविवाहस्त्रीपरमिति हेमाद्रिराह ॥ अनुपनीतस्तु वैदिकमंत्रयुक्तं सर्वं स्वयमेव कुर्यात् ॥ विशेषस्तु निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥ शूद्रस्य तु सदाऽमश्राद्धमेव ॥ सदा चैव तु शूद्राणामामश्राद्धं विधीयते इति सुमंतूक्तेः ॥ पृथ्वीचंद्रो-**

---

१ जीं कर्में न केलीं असतां प्रत्यवाय येतो त्यांस नित्यकर्में असें ह्मणतात. उदाहरणार्थ संध्यावंदनादि.

२ "नैमित्तिक" ह्मणजे कांहीं एक निमित्तास उद्देशून केलेलीं कर्में.—उदाहरणार्थ ग्रहणसंक्रान्त्यादिकांस उद्देशून केलेलीं दानें वगैरे.

३ ऐहिक अथवा पारलौकिक सुखादिप्राप्त्यर्थ केलेल्या कर्मास "काम्यकर्में" असें ह्मणतात.—उदाहरणार्थ संकष्ट्यादिक व्रतें, व तुलादि दानें वगैरे.

४ "तूष्णीं" (उगीच) ह्मणजे मंत्र वगैरे न ह्मणतां केवळ ती क्रियामात्र करणें; अर्थात् स्त्रीशूद्रकर्तृक श्राद्धांत मंत्र न ह्मणतां क्रियामात्र करावी; असें सिद्ध होतें.

दये मात्स्येपि ॥ एवं शूद्रोपि सामान्यं वृद्धिश्राद्धं च सर्वदा ॥ नमस्कारेण मंत्रेण कुर्यादामान्नवत्सदा. ॥ १ ॥ तत्रैव वृद्धपराशरः ॥ आमान्नेन तु शूद्रस्य तूष्णीं तु द्विजपूजनम् ॥ आमश्राद्धं तु निर्वाप्य सजातीनाशयेदथ ॥ १ ॥ स एव ॥ आमं शूद्रस्य पक्वान्नं पक्वमुच्छिष्टमुच्यते ॥ तेन शूद्रगृहे पक्वहोमो नेति केचित् ॥ हेमाद्रौ भविष्ये ॥ धर्मेप्सवस्तु धर्मज्ञा यदि शूद्राः प्रकुर्वते ॥ अग्नौकरणमंत्रश्च नमस्कारो विधीयते ॥ अग्नये कव्यवाहनाय नमः ॥ सोमाय पितृमते नमइत्ययं मंत्रः ॥

**स्मृत्यर्थसारांत** "अनुपनीत, व स्त्रिया आणि शूद्र ह्यांनीं ऋत्विजाकरवीं श्राद्ध करवावें; अथवा स्वयमेव अमंत्रक करावें." असें सांगितलें आहे. "द्विजस्त्रियांनीं तर संकल्प मात्र आपण करून वैदिकमंत्रयुक्त सर्व श्राद्ध ब्राह्मणद्वारा करावें." असें **प्रयोगपारिजातकर्ता** ह्मणतो. अतएव "**स्त्रीणाममंत्रकं** हें वाक्य ज्या स्त्रीचा विवाह झाला नाहीं तिला लागू आहे." असें **हेमाद्रि** ह्मणतो. अनुपनीतानें तर वैदिकमंत्रयुक्त सर्व श्राद्ध स्वयमेव करावें. एतत्संबंधी विशेष शास्त्रार्थ **निर्णयसिंधूं**त पहावा. शूद्रास तर नेहमीं आमश्राद्धच विहित आहे. कारण, "नेहमीं शूद्रास आमश्राद्धच विहित होय." अशी **सुमंतू**ची उक्ति आहे. **पृथ्वीचंद्रोदयांत मत्स्यपुराणांत** "असें शूद्रानेंही नमः मंत्रानें सामान्य श्राद्ध, व वृद्धिश्राद्ध आमान्नानेंच करावें." असें सांगितलें आहे. त्याच **पृथ्वीचंद्रोदयांत वृद्धपराशर** ह्मणतो कीं, "शूद्रानें तूष्णीं ब्राह्मणाचें पूजन करून आमान्नानें श्राद्ध करावें, आणि आपल्या जातिवर्गास भोजन द्यावें." असें सांगून नंतर तोच ह्मणतो कीं, "शूद्राकडचें आमान्न शिजविलेल्या अन्नासारखें, व शिजविलेलें उच्छिष्टासारखें होतें." ह्मणूनच "शूद्राच्या घरीं शिजलेल्या अन्नानें ( चरूनें ) होम करूं नये." असें **कित्येक** ह्मणतात. **हेमाद्रींत भविष्यपुराणांत** "धर्माची इच्छा करणारे, व स्वतः धर्मज्ञ असे शूद्र, जर श्राद्ध करतील तर त्यांतील अग्नौकरणाचेठायीं नमः मंत्राचें पठण त्यास विहित आहे." जसें–"**अग्नयेकव्यवाहनाय नमः । सोमाय पितृमते नमः**" असा मंत्र ह्मणावा.

आवाहनादि कर्तव्यं यथा शूद्रेण तच्छृणु ॥ देवानां देवनाम्ना तु पितॄणां नामगोत्रतः ॥ पिण्डादि निर्वपेद्धीर नामतो गोत्रतस्तथा ॥ शूद्राणां काश्यपं गोत्रमिति हेमाद्रिः॥ एवं तर्पणादिषु ज्ञेयम् ॥ ये तु ऋष्यपत्यत्वाभावाच्छूद्रे गोत्रमेव नास्तीत्याहुस्ते मूर्खा एव ॥ तत्रैव भविष्ये ॥ शूद्रस्तु गृहपाकेन तत्पिण्डान्निर्वपेत्तथा ॥ सक्तु मूलं फलं तस्य

---

१ येथें "पूर्वोक्त **हेमाद्रीनें** घेतलेलें **मरीचि**वचन विवाह न झालेल्या स्त्रीस लागू आहे." असें ह्मटलें आहे, त्याचें कारण असें कीं, विवाहित स्त्रीला आचार्यद्वारा समंत्रक करण्याचा अधिकार आहे, व जातीचा ब्राह्मण असला तथापि त्यास उपनयनापूर्वीं जसा वेदाधिकार नाहीं; तसाच उपनयनस्थानीय असलेला विवाह झाल्यावांचून स्त्रियांस वैदिककर्मसंबंधी अधिकार नाहीं असें समजावें.

२ येथें "उपनयन न झालेल्यानें वैदिक मंत्रयुक्त सर्व श्राद्ध करावें." असें सांगितलें आहे. तें केवळ प्रतिवार्षिक श्राद्ध व अन्त्य कर्म करण्यापुरतेंच आहे असें समजावें. कारण, पुत्र असतां हें अन्यास करण्याला अधिकार नाहीं.

पायसं वा भवेत्स्मृतम् ॥ १ ॥ तेन पक्कमुच्छिष्टमुच्यते इत्येतद्विहितभिन्नपरम् ॥ श्राद्ध-परं वा ॥ शूद्रकर्तृकवैश्वदेवपरमिति स्मार्तगौडाः ॥ अन्यथा सर्वत्र पक्कनिषेधादेव श्राद्धे-ष्यामसिद्धेः शूद्रस्यामविधिर्व्यर्थः स्यात् ॥ तेन श्राद्धे सर्वत्रामप्राप्तौ पिण्डे पायसादेः प्रतिप्रसवः ॥ देवताभ्यः पितृभ्यश्चेत्ययं वा नमस्कारमन्त्र इति विज्ञानेश्वरमदनपाला-दयः ॥ हेमाद्रिस्तु शूद्रोप्यमन्त्रवत्कुर्यादनेन विधिना बुध इति मात्स्ये मन्त्रनिषेधान्ना-ममन्त्रेणेत्याह ॥ यच्च पृथ्वीचन्द्रोदये स्कान्दे ॥ राजकार्यनियुक्तस्य बन्धनिग्रहवर्तिनः ॥ व्यसनेषु च सर्वेषु श्राद्धं विप्रेण कारयेदिति ॥ तच्छूद्रेऽपि तुल्यम् ॥ किन्तु श्राद्धे शू-द्रस्य न ब्राह्मणः प्रतिनिधिः ॥ ब्राह्मणो हीनवर्णस्य न कुर्यादौर्ध्वदेहिकम् ॥ शूद्रोपि वा ब्राह्मणस्य विना पारसवात्कचित् इति तत्रैव पारस्करोक्तेः ॥ (पारसवः ऊढ-शूद्रापुत्रः ) ॥

"शूद्रानें देव, व पितर यांचें आवाहनादि कसें करावें तें ऐक. देवांचें आवाहन दे-वांच्या नामानें ( पुरूरवार्द्रवसंज्ञक इत्यादि ) करावें. आणि पितरांचें, नाम, व गोत्र उच्चार करून करावें. हे वीरा, पिंडादिदानही नामगोत्रोच्चारपूर्वक करावें." "शूद्राचें काश्यप[2] गोत्र." असें **हेमाद्रि** ह्मणतो. तर्पणादिकाविषयींही याचप्रमाणें जाणावें. जे कित्येक **ग्रंथ-कर्ते** "शूद्र हे गोत्रप्रवर्तक ऋषींचे पुत्र नव्हत, अतएव त्यांस गोत्रच नाहीं." असें ह्मणतात, ते मूर्खच होत. कारण, शूद्रास काश्यपगोत्र लागू आहे. तेथेंच **हेमाद्रींत भ-विष्य**वचन आहे. तें असें कीं, "शूद्रानें तर, घरांत शिजविलेल्या अन्नानें श्राद्धसंबंधीं पिंडदानादिक करावें. तें अन्न सातु, मूल, फल, अथवा पायस हेंच असावें." यावरून पूर्वीं सांगितलेल्या **मरीचि**वचनासहि विरोध येतो. तस्मात् हें वचन विहितभिन्नपर, अर्थात् सातु, मूल, फल, पायस यांचा निषेध करणारें नाहीं. अथवा तें वचन श्राद्धा-पुरतेंच आहे असें समजावें. "शूद्रकर्तृक वैश्वदेवपर," असें **स्मार्तगौड** ह्मणतात. नाहीं-पेक्षां सर्वत्र पक्कान्नाचा ( शिजविलेल्या अन्नाचा ) निषेध केला आहे; या हेतूस्तव आमा-न्नानें श्राद्ध करावें, असें सिद्ध असतां "शूद्रानें आमश्राद्ध करावें." हा विधि व्यर्थ होईल, व तेणेंकरून श्राद्धांत सर्वत्र आमान्नाची प्राप्ति झाली असतां, पिंडसुद्धां आमान्नानेंच द्यावे. असें होईल ह्मणून, "**सक्तु मूलम्०**" या वाक्यानें पिंडाविषयीं पायसादिकांचा प्रतिप्रसव होतो. **देवताभ्यः पितृभ्यश्च** हा अथवा नमस्कारमंत्र घ्यावा असें **विज्ञानेश्वर** व **मदनपालादिकां**चें मत आहे. **हेमाद्री** तर "**शूद्रोप्यमंत्रवत्०** ह्या **मत्स्यपु-राण**वचनांत मंत्राचा निषेध केला आहे. यास्तव नाममंत्रानेंच श्राद्ध करावें." असें ह्मणतो. जें **पृथ्वीचंद्रोदयां**त **स्कंदपुराण**वचन आहे कीं, राजाचें कार्य करणारा

---

१ हें संबोधन कृष्णानें धर्मराजास दिलें आहे. सर्व **भविष्यपुराणांत** मुख्यत्वें कृष्णयुधिष्ठिर-संवाद आहे.

२ यद्यपि शूद्रांस गोत्रादि नाहीं असें पूर्वीं ह्मटलें आहे व "सर्व प्रजा काश्यपी आहेत." या श्रुतीवरून शूद्रांस काश्यपगोत्री ह्मणतां येईल; तथापि गोत्रसंबंधास विशेष मानून जे जे कर्माधि-कार ब्राह्मणादिकांस विहित आहेत ते शूद्रांस नाहींत.

(सरकारी कामदार), बंदिशाळेंत असणारा, अथवा बलात्कारानें अडकवून ठेविलेला, अथवा सर्वप्रकारच्या संकटांत असणारा, यांनीं ब्राह्मणाकरवीं श्राद्धें करवावीं." ह्मणून, तें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र, यांस समानच आहे. परंतु श्राद्धांत शूद्रांला ब्राह्मण प्रतिनिधि होत नाहीं. कारण, ब्राह्मणानें खालच्या वर्णाचें और्ध्वदेहिक करूं नये. शूद्रानें ब्राह्मणाचेंही करूं नये. केवल पारसवानें मात्र करावें. अशी **पारस्करा**ची उक्ति आहे.

विष्णुपुराणे ॥ दानं च दद्याच्छूद्रोपि पाकयज्ञैर्यजेत वा ॥ पित्र्यादिकं च यत्सर्वं शूद्रः कुर्वीत तेन वै ॥ १ ॥ (तेन पाकेन) ॥ इदं कलीतरपरमिति स्मार्तगौडाः ॥ यत्तु भारते राजधर्मेषु ॥ यवनाः किराता गान्धाराश्चीनाः शबरबर्बराः ॥ शकास्तुषाराः कङ्काश्च पल्हवाश्चान्ध्रमद्रकाः इत्युक्त्वा ब्रह्मक्षत्रप्रसूताश्च वैश्याः शूद्राश्च मानवाः ॥ कथं धर्मान् चरिष्यन्ति सर्वे विषयवासिनः ॥ १ ॥ इति चोक्त्वा वेदधर्मक्रियाश्चैव तेषां धर्मो विधीयते ॥ पितृयज्ञास्तथा कूपाः प्रपाश्च शयनानि वा ॥ २ ॥ दानानि च यथाकालं द्विजेभ्यो विसृजेत्सदा ॥ तथा ॥ दक्षिणा सर्वयज्ञानां दातव्या भूतिमिच्छता ॥ पाकयज्ञा महार्हाश्च कर्तव्याः सर्वदस्युभिरिति म्लेच्छादीनां श्राद्धविधानं तदपि सजातीयभोजनद्रव्यदानादिपरम् ॥ विष्णूशनसौ ॥ न पक्कं भोजयेद्विद्वान् सच्छूद्रोपि कदाचन ॥ भोजयन् प्रत्यवायी स्यान्न च तस्य फलं लभेत् ॥ १ ॥ तत्रापि द्विजानां पाकनियमः ॥ यथा लघुहारीतः ॥ एकोद्दिष्टं तु कर्तव्यं पाकेनैव सदा स्वयमिति ॥ यथा वा स्मृतिदर्पणे गालवः ॥ मृताहं च सपिण्डं च गयाश्राद्धं महालयम् ॥ आपन्नोपि न कुर्वीत श्राद्धमामेन कर्हिचिदिति ॥ लौगाक्षिः ॥ अन्नेनैवाब्दिकं कुर्याद्धेम्ना वाऽऽमेन न क्वचिदिति ॥ तत्रापि शूद्रस्याममेव ॥ सदा चैव तु शूद्राणामामश्राद्धं विधीयते इति सुमन्तूक्तेः ॥ शूद्रस्य दशपिण्डाद्यामेनैवेति हलायुधः ॥ तन्न पूर्ववचनैः पायसादेरपि विधानात् ॥ तच्च शूद्रकर्तृकमामश्राद्धमपराह्ण एव ॥ नतु द्विजवत्पूर्वाह्णे ॥ मध्याह्नात्परतो यस्तु कुतुपः समुदाहृतः ॥ आमश्राद्धं तु तत्रैव पितॄणां दत्तमक्षयमिति सुमन्तूक्तेरित्यपरार्के हेमाद्रौ चोक्तम् ॥ पुत्रजन्मनि हिरण्यश्राद्धमेव ॥ तदाह हेमाद्रौ संवर्तः ॥ पुत्रजन्मनि कुर्वीत श्राद्धं हेम्नैव बुद्धिमान् ॥ न पक्केन न चामेन कल्याणान्यभिकामयन् ॥ १ ॥ आमहेमश्राद्धादौ विशेषस्तु मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥

**विष्णुपुराणां**त "शूद्रानें दान द्यावें. पाकयज्ञांनीं (स्थालीपाकांत सांगितल्याप्रमाणें) यजन करावें. पितृसंबंधिक जें सर्व कर्म तें पाकयज्ञरीतीनें करावें." असें सांगितलें आहे. हें "कलीवांचून इतर युगांविषयीं आहे." असें **स्मार्तगौड** ह्मणतात. जें **भारतामध्यें** राजधर्मांत "यवनें (मुसलमान वगैरे) भिल्ल, गांधार, चीन, शवर, बर्बर, शक, तुषार, कंक, पल्हव, आंध्र, मद्रक" असें सांगून "ब्राह्मण आणि क्षत्रियांपासून झालेले, वैश्य, व

१ हा शब्द लोकप्रसिद्ध आहे. एकाबद्दल त्याच्या जागीं दुसरा असून त्याचें काम आपण करणारा यास प्रतिनिधि ह्मणतात. हा प्रायः कर्ममार्गांत समान वर्णाचा असला पाहिजे.

२ ही एक संकरजाती आहे याविषयीं पुढें जातिनिर्णयांत वर्णन केलें आहे.

३ यांचे भेदवगैरे पुढें जातिनिर्णयांत सविस्तर वर्णिले जातील.

शूद्र इत्यादि जातीचीं निरनिराळ्या देशांत राहणारीं मनुष्यें धर्माचें कसें आचरण करतील?" असें सांगून "वैदिकधर्म, आणि क्रिया हाच त्यांचा धर्म असें विधान करितों, आणखी पितृयज्ञ (श्राद्धादिक), तसेंच विहिरी, पाणपोयी, शय्यादान, वगैरे इतर दानें यथाकालीं सर्वदा त्यांनीं ब्राह्मणाला द्यावीं. तसेंच कल्याणाची इच्छा करणारानें यज्ञ करून तत्संबंधी दक्षिणाही द्यावी. आणखी उत्तम प्रकारचे पाकयज्ञ करावे. हा धर्म सर्व दस्यूंनीं[1] आचरण करण्यास योग्य अशा प्रकारचा आहे." असें सांगितलें आहे. येथें म्लेंछादिकांस जें श्राद्धाचें विधान केलें आहे तेंही त्यांनीं आपल्या जातीच्या लोकांस, भोजन अथवा भोजनाबद्दल द्रव्य देण्याविषयीं त्यांस अधिकार आहे. **विष्णु**, आणि **उशना** ( शुक्र ) ह्मणतात कीं "सच्छूद्रानेंहि ( हें पुढे सांगूं ) शिजविल्या अन्नानें श्राद्धामध्यें भोजन कदापि घालूं नये. जर भोजन घालील तर तो दोषी होईल, व त्या कर्माचें फल त्यास मिळणार नाहीं." यावरून जेथें द्विजांस पाकांचा नियमच आहे; जसें **लघुहारीत** ह्मणतो कीं, "एकोद्दिष्ट श्राद्ध तर निरंतर आपण पाकानेंच करावें." आणखी जसें **स्मृतिदर्पणां**त **गालव** ह्मणतो "मेलेल्या दिवसाचें ( मृतदिवशीं करावयाचें तें ) प्रतिवार्षिक, सपिंडी, गयाश्राद्ध, महालय, इतकीं श्राद्धें मोठ्या संकटांत पडलेला असतांहि आमान्नानें करूं नयेत." **लौगाक्षि** ह्मणतो, कीं, "प्रत्याब्दिक ( प्रतिवर्षीं करावयाचें तें ) अन्नानेंच करावें. द्रव्यद्वारा अथवा आमान्नानें कदापि करूं नये." असें **लघुहारीत**, **गालव** आणि **लौगाक्षि** हे द्विजांनीं एकोद्दिष्टादि श्राद्धें पक्वान्नानेंच करावीं. असें ह्मणतात. तेथेंही तींच श्राद्धें शूद्रानें आमान्नानेंच करावीं. कारण, **"सदा चैवतु०"**[2] या **सुमंतु**वचनानें, शूद्रास आमश्राद्धाचेंच विधान केलें आहे. "शूद्राचे दशपिंडादिकर्हि आमान्नानेंच व्हावेत." असें **भट्टहलायुध** ह्मणतो, परंतु तें योग्य नाहीं. कारण, पूर्ववचनांनीं पायसादिकांचेंही विधान केलें आहे. तें शूद्रकर्तृक आमश्राद्ध अपराह्णकालींच[3] होतें. द्विजासारखें पूर्वाह्णीं होत नाहीं. "मध्यान्हाहून पुढील जो काल त्यास कुतुपकाल[4] असें ह्मणतात. त्याच कालामध्यें पितरांस आमश्राद्ध दिलें असतां, तें अक्षय होतें." असें **सुमंतू**चें वचन आहे; ह्मणून **अपरार्क** आणि **हेमाद्रि** यांमध्यें पूर्वाह्णीं आमश्राद्ध करूं नये, असें सांगितलें आहे. पुत्रजन्मकालीं हिरण्यश्राद्धच[5] करावें. तेंच **हेमाद्री**मध्यें **संवर्त** सांगतो; जसें—"बुद्धिमंतानें पुत्रजन्मकालीं हिरण्यानेंच श्राद्ध करावें. कल्याणेच्छूनें

१ हा शब्द साधारण चोरांचा वाचक आहे. शबर म्लेंछादिकांस दस्यु असें ह्मणण्याचें कारण हेंच कीं, बहुतकरून ते चोरीवर निर्वाह करीत असतात.

२ जेथें द्विजांस शिजविलेल्या अन्नाचें विधान केलें असेल; तेथें शूद्रांस आमान्नच विहित आहे असें समजावें. **"सदा चैव तु शूद्राणामामश्राद्धं विधीयते."** असें वचन आहे.

३ ज्या दिवसांत जितकें दिनमान असेल त्याचे समान ५ विभाग करावे; त्यापैकीं चवथ्या भागास अपराह्ण ह्मणावें. हा श्राद्धास योग्य काल होय.

४ दिवसाच्या १५।१६ या दोन घटिकांस कुतुपकाल असें ह्मणतात असें धर्मशास्त्रवेत्त्याचें मत आहे.

५ केवळ द्रव्यद्वारा करणें त्यास हिरण्यश्राद्ध ह्मणावें.

पक्व अथवा आम अन्नानें करूं नये." आमश्राद्ध, व हिरण्यश्राद्ध इत्यादिकांचा विशेष शास्त्रार्थ मीं केलेल्या **निर्णयसिंधू**वरून जाणावा.

**क्रियानिबन्धे व्यासः ॥ हिरण्यमामश्राद्धीयं लब्धं यत्क्षत्रियादितः ॥ यथेष्टं विनियोज्यं स्याद्भुञ्जीयाद्ब्राह्मणान्स्वयम् ॥ १ ॥ विप्राल्लब्धं भुञ्जीयात्क्षत्रियादिलब्धे तु यथेष्टं विनियोगः ॥ तेनापि श्राद्धं वैश्वदेवादि न कार्यम् ॥ देवोद्देशेन त्यक्तस्य देवतान्तराय त्यागायोगादिति देवयाज्ञिकः ॥ शूद्रलब्धे तूक्तं । तथैव षट्त्रिंशन्मते ॥ आमं शूद्रस्य यत्किञ्चिच्छ्राद्धिकं प्रतिगृह्यते ॥ तत्सर्वं भोजनायाऽलं नित्यनैमित्तिके न तु ॥ १ ॥ गौडशुद्धितत्त्वे अङ्गिराः ॥ शूद्रवेश्मनि विप्रेण क्षीरं वा यदि वा दधि ॥ निवृत्तेन न भोक्तव्यं शूद्रान्नं तदपि स्मृतम् ॥ १ ॥ शूद्राद्विप्रगृहेष्वन्नं प्रविष्टं तु सदा शुचि ॥ पराशरः ॥ तावद्भवति शूद्रान्नं यावन्न स्पृशति द्विजः ॥ द्विजातिकरसंस्पृष्टं सर्वं तन्न[१] विरुध्यते ॥१॥ विष्णुपुराणे ॥ संप्रोक्षयित्वा गृह्णीयाच्छूद्रान्नं गृहमागतम् ॥ अङ्गिराः ॥ पात्रान्तरगतं ग्राह्यं दुग्धं स्वगृहमागतम् ॥**

याप्रमाणें शूद्रानें आमान्नश्राद्ध करावें ह्मणून सिद्ध केलें; आतां, तत्संबधी आमान्नाची व्यवस्था ब्राह्मणानें कशी करावी तें सांगतो.

**क्रियानिबंधांत व्यास** ह्मणतो की, "श्राद्धसंबधीं जे आमान्न, अथवा द्रव्य क्षत्रियादिकांपासून प्राप्त झालें असेल, त्याचा यथेष्ट विनियोग करावा." तो असा की, ब्राह्मणांस भोजन द्यावें अथवा आपण भोजन करावें." ब्राह्मणापासून प्राप्त झालें असेल तर स्वतः भोजन करावें; आणि क्षत्रियादिकांपासून मिळालें असेल तर, त्याचा इच्छेप्रमाणें विनियोग करावा, अशी वरील वचनाची व्यवस्था आहे. तथापि ह्या वचनावरून श्राद्ध मात्र करावें असें सिद्ध होतें; परंतु वैश्वदेवादि करूं नये. कारण, "एका देवाच्या उद्देशानें त्याग केलेल्या द्रव्याचा अन्य देवतेच्या उद्देशानें त्याग करितां येत नाहीं." असें **देवयाज्ञिका**चें मत आहे. शूद्रापासून आमान्न प्राप्त झालें असतां, त्याची कशी व्यवस्था कारवी? याविषयीं त्याच **क्रियानिबंधां**त **षट्त्रिंशन्मतां**त सांगितलें आहे. जसें ब्राह्मण शूद्रश्राद्धसंबंधी जें कांहीं आमान्न ग्रहण करील, तें सर्वेही भोजनास योग्य आहे. अर्थात् तेणेंकरून भोजन करावें; परंतु नित्य अथवा नैमित्तिक, करूं नये." तसेंच **गौडशुद्धितत्त्वां**त **अंगिरा** ह्मणतो कीं, "ब्राह्मण निवृत्तिमार्गपर (प्रतिग्रह न घेणारा) असेल तर, त्यानें शूद्राच्या घरांत दूध अथवा दहीं भक्षण करूं नये. कारण, तेंही शूद्रान्नच ह्मटलें आहे. शूद्रापासून ब्राह्मणाच्या घरांत आलेलें अन्न (आमान्न) निरंतर शुद्ध आहे." **पराशर** ह्मणतो कीं, "तावत्कालपर्यंत शूद्रान्न होतें, जोंपर्यंत ब्राह्मण त्याला स्पर्श करीत नाहीं. ब्राह्मणाचा हस्तस्पर्श झाला असतां तें सर्वेही शुद्ध होतें." **विष्णुपुराणां**त "शूद्रानें आमान्न आपल्या घरांत आणून दिलें असतां तें प्रोक्षण करुन घ्यावें," असें सांगितलें आहे. **अंगिरा** ह्मणतो कीं, "ज्या पात्रांतून शूद्रानें दूध आणिलें असेल, त्यांतून तें ब्राह्मणानें आपल्या पात्रांत घ्यावें, ह्मणजे शुद्ध होतें."

---

**१ याति पवित्रताम् इत्यपि पाठान्तरम्.**

**तथा अनुपनीतस्त्रीशूद्रादेरुत्तरीयेण सव्याऽपसव्ये ज्ञेये ॥ तच्चोत्तरीयं वस्त्रोत्तरीयाभावे द्व्यङ्गुलं त्र्यङ्गुलं चतुरङ्गुलं वा परिमण्डलम् ॥ षण्णवत्यङ्गुलं दीर्घमिति जातूकर्ण्योक्तं ज्ञेयम् ॥ तदभावे उपरिवासोमात्रम् ॥ अपसव्यं क्रमाद्वस्त्रं कृत्वा कश्चित्सगोत्रजः ॥ इति ब्राह्मोक्तेरिति मैथिलवाचस्पतिः ॥ स्मृतिकौमुद्यां बौधायनः ॥ शूद्राणामित्युपक्रम्य उपवीतं वस्त्रविन्यासादिति ॥**

तसेंच अनुपनीत द्विज, स्त्रिया, व शूद्र यांचें सव्य आणि अपसव्य उत्तरीय वस्त्रानें होतें. जर तें उत्तरीय वस्त्र नसेल तर २।३ अथवा चार बोटें रुंदी, आणि ९६ बोटें लांबीची रेशमी फीत जिचीं शेवटें जोडलेलीं असतील अशी, **जातूकर्ण्य**ऋषीनें सांगितलेल्या प्रकारची विहित आहे असें जाणावें. त्याच्या अभावीं तर अंगावर घेण्याचें वस्त्र मात्र असावें. कारण, "कोणी एक गोत्रज पुरुष पैतृक कर्म करीत असतां, त्याणें उपवस्त्र अपसव्य करून कर्म चालवावें." अशी **ब्रह्मपुराणो**क्ति आहे, ह्मणून **मैथिलवाचस्पति** लिहितो. **स्मृतिकौमुदींत बौधायन "शूद्राणां"** येथून उपक्रम करून ह्मणतो कीं, "उत्तरीय वस्त्र उपवीतासारिखें केल्यानें उपवीत होतें."

**शङ्खः ॥ चतुर्भिर्दर्भपिञ्जूलैर्ब्राह्मणस्य पवित्रकम् ॥ एकैकं न्यूनमुद्दिष्टं वर्णे वर्णे यथाक्रमम् ॥ १ ॥ मण्डले तु शूद्रस्याऽभ्युक्षणं मतमित्यादि निर्णयसिन्धौ ज्ञेयम् ॥ शूद्रस्य तिलकविधिरुक्तः पराशरपुराणे ॥ ऊर्ध्वपुण्ड्रं त्रिपुण्ड्रं च वर्तुलं चतुरस्रकम् ॥ अर्धचन्द्रादिकं लिङ्गं वेदनिष्ठो न धारयेत् ॥ १ ॥ वेदनिष्ठ इत्युक्तेः शूद्राऽनुज्ञा ॥ मदनपारिजाते ब्राह्मे ॥ ऊर्ध्वपुण्ड्रं द्विजः कुर्यात्क्षत्रियस्तु त्रिपुण्ड्रकम् ॥ अर्धचन्द्रं तु वैश्यश्च वर्तुलं शूद्रजातिषु ॥ १ ॥ विष्णवाश्वलायनौ ॥ शङ्खचक्राद्यङ्कनं च गीतनृत्यादिकं तथा ॥ एकजातेरयं धर्मो न जातु स्याद्द्विजन्मनः ॥ १ ॥ पुरुषार्थप्रबोधशिवसर्वस्वादौ तु स्त्रीशूद्रयोर्विभूतिधारणमप्युक्तम् ॥ इति रामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मप्रकाशे शूद्रश्राद्धनिर्णयः ॥**

( यानंतर पवित्रधारणाचा विचार सांगतो. )

याविषयीं **शंख** ह्मणतो की, "चार दर्भांच्या काड्यांनीं ब्राह्मणाचें पवित्रक होतें. यांत वर्णक्रमानें एकेक कमी केल्यानें इतर वर्णांचें पवित्रक होतें. अर्थात् क्षत्रियाचें तीन दर्भांनीं, वैश्याचें दोन दर्भांनीं, आणि शूद्राचें एक दर्भानें अशीं होतात."

( यानंतर मंडलविचार सांगतो. )

शूद्रांनीं मंडल करण्याबद्दल प्रोक्षण करावें. विशेष शास्त्रार्थ **निर्णयसिंधू**वरून जाणावा.

शूद्रांस तिलकविधि सांगतो.

याविषयीं **पराशरपुराणां**त सांगितलें आहे कीं, "ऊर्ध्वपुंड्र ( उभा नाम ), त्रिपुंड्र[3] ( आडवा दुबोटी नाम ), वर्तुल ( वाटोळें ), चतुरस्र ( चौकोनी ), अर्धचंद्र इत्यादिक

---

१ हें वस्त्रखंड बहुतकरून पैतृक कर्मांत अवश्य घेण्याचा संप्रदाय आहे.

२ पांघरण्याच्या धोत्रास उत्तरीयवस्त्र ह्मणतात. व त्यानें निर्वाह होतो.

३ दुबोटी गंध लावितात त्याच्या तीन रेषा होतात ह्मणून त्यास हें नांव आहे.

गंधाचीं चिन्हें वेदनिष्ठ पुरुषानें धारण करूं नयेत." या वाक्यांत "वेदनिष्ठ" असें ह्मटलें आहे. यावरून पूर्वीं सांगितलेल्या प्रकारांनीं गंध लावण्याविषयीं शूद्रास आज्ञा दिल्यासारखें आहे. **मदनपारिजात** ग्रंथांत **ब्रह्मपुराण**वचन असें आहे कीं, "ब्राह्मणानें उभा नाम लावावा. क्षत्रियानें आडवा दुबोटी लावावा, वैश्यानें अर्धचंद्राकार लावावा, व शूद्रानें वाटोळा तिलक लावावा." (या वचनानें वरील वचनाची वर्णपरत्वें व्यवस्था केली आहे.)

(आतां तप्तमुद्रादि धारण सांगतो.)

याविषयीं **विष्णु** आणि **आश्वलायन** ह्मणतात. "शंख चक्र इत्यादिकांनीं अंकन करणें ह्मणजे मुद्रा धारण करणें, गायन, व नृत्य करणें हा एकजातीचा (शूद्राचा) धर्म आहे. द्विजातींचा (ब्राह्मण क्षत्रिय वैश्यांचा) कदापि होणार नाहीं." **पुरुषार्थप्रबोध** व **शिवसर्वस्व** इत्यादि ग्रंथामध्यें "स्त्रीशूद्रांनींहि भस्म धारण करावें." असें सांगितलें आहे.
इति कमलाकरभट्टविरचिते शूद्रधर्मप्रकाशे शूद्रश्राद्धनिर्णयः समाप्तः ॥

## ॥ अथ शूद्राणां विहितनिषिद्धधर्माः ॥

**लघुपराशरः ॥ विक्रीणन् मद्यमांसादि त्वभक्ष्यस्य च भक्षणम् ॥ कुर्वन्नगम्यागमनं शूद्रः पतति तत्क्षणात् ॥ १ ॥ कपिलाक्षीरपानेन ब्राह्मणीगमनेन च ॥ वेदाक्षरविचारेण शूद्रश्चांडालतां व्रजेत् ॥ २ ॥ यत्तु स एव ॥ लवणं मधु मद्यं च दधि तक्रं घृतं पयः ॥ न दुष्येच्छूद्रजातीनां कुर्यात्सर्वेषु विक्रयमिति ॥ [ प० स्मृ० अ० १ ] तदापदि ज्ञेयमिति स्मृतिकौमुदी ॥ असच्छूद्रपरमुक्तम् ॥ एवमसच्छूद्राणां मद्यमांसभक्षणेऽपि न**

१ ब्राह्मणास नुसतें वाटोळें गंध ( टिकला ) लावण्याविषयीं निषेध बहुत आहेत. ते **आचारार्क** व **कमलाकराह्निक** इत्यादिकांत पाहावे.

२ "तप्तमुद्रा धारण शूद्रानें करावें; ब्राह्मणांनीं करूं नये." असा येथें निषेध केला आहे; व सांप्रत माध्वसंप्रदायी सर्व लोक डागून घेतात, व त्याविषयीं **"अतप्ततनूर्न॰"** इत्यादि श्रुतिप्रामाण्य देतात व या श्रुतीचा ते जसा अर्थ करितात, तसा मानल्यास तो प्रकार सप्रमाण होईल; परंतु वास्तविक पाहतां तसा अर्थ मुळींच होत नाहीं असें वाटतें. तें कसेंही असो, पण एकंदरींत हा विषय मोठा वादग्रस्त आहे, यांत संशय नाहीं. तो ज्यांना पाहण्याची इच्छा असेल त्यांणीं **रामार्चनचंद्रिका** व **शिवार्चनचंद्रिका** हे ग्रंथ पहावे. ह्मणजे विधिनिषेधांची गर्दी दृष्टोत्पत्तीस येईल. त्यांपैकीं कांहीं मासला पाहणें असल्यास **निर्णयसिंधुप॰ २** आषाढ शुद्ध ११ चा निर्णय पहा.

३ येथें "स्त्रियांनीं भस्म धारण करावें." असें जें सांगितलें आहे तें, विधवास्त्रीविषयक असावें असें वाटतें. कारण, महाराष्ट्र, गुर्जर वगैरे देशांत सुवासिनींनीं भस्म लावल्याचें पाहण्यांत येत नाहीं. केवळ लिंगाइतांत मात्र हा प्रचार आहे. तसेंच शूद्रलोक मुख्यत्वें भस्म धारण करतात असें नाहीं. द्रविड केरळ वगैरे देशांत ब्राह्मण जातीच्या देखील सुवासिनी स्त्रिया, व शूद्र भस्म धारण करितात. हें प्रत्यक्ष पाहिलें आहे. सुवासिनी स्त्रियांस अत्यावश्यक असलेलें मंगलसूत्र तर सर्व मलवार देशांत दृष्टि पडणें कठीण !

दोषः निषिद्धमांसं विना ॥ अतः सुरापशूद्रसंसर्गे न दोषः ॥ पतितसंसर्गे हि सः न चायं तथा ॥ द्विजानां तु निषेधात्पातित्यमिति ॥ तत्संसर्गे शूद्रस्य दोष.एवं शूद्रस्य वर्जने त्वभ्युदयः ॥ तदाह मनुः ॥ न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने ॥ प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफलेति ॥ सच्छूद्रैर्वर्ज्यमेव ॥ यत्तु कालिकापुराणे ॥ विक्रयं सर्ववस्तूनां कुर्वन् शूद्रो न दोषभाक् ॥ मधु चर्म सुरां लाक्षां भुक्त्वा मांसं च पञ्चममिति ॥ अत्र अनापदि मध्वादिनिषेधः इति कल्पतरुः ॥ पराशरपुराणेऽपि पिण्याकमासवस्तैलं गव्यं तक्रादिकं तथा ॥ शूद्रादेव तु सङ्ग्राह्यं न द्विजेभ्यः कदा च न ॥ स्कान्दे प्रभासखण्डे ॥ १ ॥ न दर्भानुद्धरेच्छूद्रो न पिबेत्कापिलं पयः ॥ मध्यपत्रे न भुञ्जीत ब्रह्मवृक्षस्य भामिनि ॥ १ ॥ नोच्चरेत्प्रणवं मन्त्रं पुरोडाशं न भक्षयेत् ॥ न शिखी नोपवीती स्यान्नोच्चरेत्संस्कृतां गिरम् ॥ २ ॥ न पठेद्वेदवचनं त्रिपवं न हि सेवयेत् ॥ नमस्कारेण मन्त्रेण क्रियासिद्धिर्भवेद्ध्रुवम् ॥ ३ ॥ निषिद्धाचरणं कुर्वन् पितृभिः सह मज्जति ॥

यानंतर शूद्राचे विहित निषिद्ध धर्म सांगतो.

**लघुपराशर** ह्मणतो कीं, " मद्य ( दारु ), व मांस यांचा विक्रय करीत असल्यास; व जें खाण्याला योग्य नव्हे तें खात असल्यास; ज्या स्त्रियेचा संभोग करण्यास योग्य नाहीं, अशीचा संभोग करीत असल्यास शूद्र तत्काल पतित होतो. कपिला गायीचें दूध पिण्यानें, व ब्राह्मणस्त्रीच्या संभोगानें, आणि वेदाक्षरांच्या अर्थविचारानें शूद्र चांडाल होतो. " जें त्याच **पराशरा**नें सांगितलें आहे. कीं, " मीठ, मध, मद्य, दहीं, ताक, तूप, दूध यांचा विक्रय केला असतां शूद्रजातीला दोष नाहीं. त्यानें वरील पदार्थ इतर सर्व वर्णांस विकत द्यावे." परंतु तेंही आपत्कालीं करावें, असें **स्मृतिकौमुदीं**त सांगितलें आहे. अथवा तें असच्छूद्रपर असें समजावें. याप्रमाणें असच्छूद्राला दारु, मांस इत्यादि विकलें असतां जसा दोष नाहीं; तसाच भक्षण केलें असतांही दोष नाहीं, परंतु निषिद्ध[1] मांसावांचून, निषिद्ध मांसाविषयीं दोष आहे. ह्मणूनच मद्य पिणाऱ्या शूद्राशीं संसर्ग ( घरांत चाकरीस वगैरे ठेवून त्याकडून सेवा करून घेणें ) केला असतांही दोष नाहीं. कारण, तो दोष पतितसंसर्ग केल्यानें प्राप्त होतो. आणि दारु वगैरे पिणारा शूद्र तसा पतित होत नाहीं; परंतु ब्राह्मणास मद्यप्राशनाचा निषेध आहे, ह्मणून तो मद्यप्राशनानें पतित होतो. अशांचा शूद्रानें संसर्ग केला असतां त्यास दोष आहेच. कदाचित् शूद्र मद्यमांसादि सेवन न करील तर, त्याचा उदय ( महत्वप्राप्ति ) होईल. तेंच **मनु** ह्मणतो, जसें–"मांसभक्षण, मद्यप्राशन, स्त्रीसंभोग, हीं शूद्रास दोषकारक नाहींत. कारण, या तिन्ही कर्मांविषयीं प्राणिमात्रांची प्रवृत्ति[2] साहजिकच आहे. तथापि हीं वर्ज्य

१ "निषिद्ध मांस" गांवडुकर, बैल, गाय, घोडा, गाढव इत्यादिकांचीं मांसें अति निषिद्ध आहेत. यांच्या भक्षणानें शूद्रही पतित होतो.

२ स्त्रीसंभोग मद्य आणि मांस हीं तीन सर्व मनुष्यांस दुसऱ्याच्या प्रेरणेवांचून प्रिय असतात. हा विषय ( भा० स्कं० ११ अ० ३ श्लोक ) यांत सविस्तर वर्णिला आहे.

केलीं असतां महत्फल प्राप्त होतें." सच्छूद्रांनीं पूर्वी सांगितलेलीं मद्यप्राशनादि वर्ज करावीं. जें **कालिकापुराणांत** "सर्व वस्तूंचा विक्रय करीत असतां शूद्र दोषी होत नाहींत, परंतु मध, कातडें, दारु, लाख, आणि मांस या पांच वस्तूंचा मात्र शूद्रांनीं विक्रय करूं नये," असें सांगितलें आहे. या वाक्यांत मध इत्यादि पांच वस्तूंच्या विक्रयाचा जो निषेध आहे तो आपत्काल नसतां आहे; अर्थात् आपत्तींत यांचा विक्रय केल्यास दोष नाहीं, असें **कल्पतरु** ह्मणतो. **पराशरपुराणांत**हि "पेंड, आसव, तेल, गायीचें दूध, ताक, इत्यादिक शूद्रापासूनच विकत घ्यावें, द्विजांपासून कदापि घेऊं नये." असें सांगितलें आहे. तसेंच **स्कंदपुराणां**त **प्रभासखंडां**त "शूद्रानें दर्भ कापूं नयेत, कपिला गायीचें दूध पिऊं नये. पळसाच्या मधल्या पानावर जेवूं नये. ओंकाराचा, व इतर वैदिक मंत्रांचा उच्चार करूं नये. पुरोडाश[२] खाऊं नये. ब्राह्मणांसारखी शेंडी राखूं नये. उपवीत धारण करूं नये. संस्कृत वाणी उच्चारूं नये. वेदवाक्य पठन करूं नये. त्रिकाल स्नान करूं नये. पूर्वी सांगितल्याप्रमाणें मंत्र न ह्मटले तरी नमस्कार मंत्रानेंच त्याच्या कर्माची सिद्धि खचीत होईल. तो निषिद्ध आचरण करूं लागल्यास पितरांसहवर्तमान नरकांत बुडेल." असें सांगितलें आहे.

**अन्यान्यपि निषिद्धानि मात्स्ये कलिधर्मेषु ॥ ततः प्रभृत्ययं लोकः सर्वो व्यापत्स्यते भृशमित्युपक्रम्य ॥ ब्राह्मणाः शूद्रयोनिस्थाः शूद्रा वै मन्त्रयोनयः ॥ उपस्थास्यन्ति तान्विप्रा वेदार्थमभिलिप्सवः ॥ १ ॥ लैङ्गेऽपि ॥ शूद्राणां मन्त्रयोनिश्च सम्बंधो ब्राह्मणैः सह ॥ भवतीह कलौ तस्मिन् शयनासनभोजनैः ॥ १ ॥ राजानः शूद्रभूयिष्ठा ब्राह्मणान्बाधयन्ति ते ॥ शूद्राश्च ब्राह्मणाचाराः शूद्राचाराश्च ब्राह्मणाः ॥ २ ॥ अक्षत्रियाश्च राजानो विप्राः शूद्रोपजीविनः ॥ शूद्राभिवादिनः सर्वे ब्राह्मणैरभिवन्दिताः ॥ ३ ॥ आसनस्था द्विजान् दृष्ट्वा न चलंत्यल्पचेतसः ॥ ताडयन्ति द्विजेन्द्रांश्च शूद्रा वै स्वल्पबुद्धयः ॥ ४ ॥ आस्ये निधाय वै हस्तं कर्णे शूद्रस्य वै द्विजाः ॥ नीचस्य च तदा वाक्यं वदन्ति विनयेन तु ॥ ५ ॥ अधीयन्ते तथा वेदान् शूद्रा धर्मार्थकोविदाः ॥ यजन्ते चाश्वमेधेन राजानः शूद्रयोनयः ॥ ६ ॥ तस्मादायुर्बलं रूपं कलिं प्राप्य प्रहीयते ॥ तदा त्वल्पेन कालेन सिद्धिं गच्छन्ति मानवाः ॥ ७ ॥ धन्या धर्मं चरिष्यन्ति युगान्ते समुपस्थिते ॥ त्रेतायां वार्षिको धर्म इत्युक्त्वा—तदन्हा प्राप्यते कलौ इत्युक्तम् ॥**

अन्यहि निषिद्ध कर्मे **मत्स्यपुराणीं कलिधर्मां**त सांगितलीं आहेत. तीं, "त्याकालापासून (कलियुग लागल्यापासून) हा लोक सर्वेहि अत्यंत पीडित होईल. असा उपक्रम करून—" ब्राह्मण शूद्रांसारखे अध्ययनरहित अज्ञानीं स्थित होतील. शूद्र हे ब्राह्मणासारखे ज्ञानसंपन्न होतील. वेदाचा अर्थ जाणण्याकरिता ब्राह्मण शूद्रांजवळ जातील." असें सांगितलें आहे. **लिंगपुराणांत**हि—"या कलियुगांत बहुतकरून शूद्र मंत्रज्ञानी होतील; व यांचा एकत्र निजणें, बरोबर भोजन करणें, एक ठिकाणीं बसणें, यांहींकरून ब्राह्मणांशीं संबंध होतील. राजे प्रायः शूद्रच होतील. मग ते ब्राह्मणांला बाधा करतील. शूद्र ब्राह्म-

---

१ एक प्रकारची दारू, हिचें लक्षण पुढें येईल.　२ हा पुरोडाश यज्ञांत प्रसिद्ध आहे.

र्णांचा आचार घेतील. ब्राह्मण शूद्रांचा आचार घेतील. राजे क्षत्रिय नसतील. ब्राह्मण शूद्रानें दिलेल्यावर निर्वाह करतील. सर्व ब्राह्मण शूद्रांला नमस्कार करतील. ब्राह्मणांनीं ज्यांस नमस्कार केला आहे असे ते शूद्र, विचार अल्प असल्यामुळें आपल्याजवळ ब्राह्मण आलेले पाहूनहि त्यांना उत्थापन देणार नाहींत. ते अल्पबुद्धि शूद्र, ब्राह्मणांस मारतील. आपल्यापेक्षां नीच अशा शूद्रांच्या कानांत कांहीं सांगावयाचें असलें तर, ब्राह्मण आपल्या तोंडाआड हात ठेऊन मोठ्या नम्रतेनें सांगतील. तसेंच शूद्र वेदाचें अध्ययन करतील, व धर्म, अर्थ जाणणारे होतील. शूद्रांपासून झालेले राजे अश्वमेध करतील. या अकर्मापासून मनुष्यांचें आयुष्य, बल, रूप, कलियुगांत दिवसेंदिवस कमी होत जाईल त्या कालीं ( कलियुगांत ) तर मनुष्य अल्प कालानें केलेल्या कर्माच्या सिद्धीला पावतील. असें जरी आहे तथापि, जे पुण्यवान् असतील ते कलियुगाचा अंतकाल प्राप्त झाला असतां स्वधर्माचरण करतील. त्रेतायुगांत एक वर्षपर्यंत आचरण केलेल्या धर्माचें फल कलियुगांत एका दिवसांत प्राप्त होतें" असें सांगितलें आहे.

**कौर्मेऽप्येते श्लोकाः पाठान्तरयुताः ॥ कौर्मे ॥ शुक्लदन्ता जिनाख्याश्च* मुण्डाः काषायवाससः ॥ शूद्रा धर्मं चरिष्यन्ति युगान्ते समुपस्थिते ॥ १ ॥ ताडयन्ति द्विजेन्द्रांश्च शूद्रा राजोपजीविनः ॥ उच्चासनस्थान् शूद्रांश्च द्विजमध्ये परन्तप ॥ २ ॥ पुष्पैश्च भूषणैश्चैव तथान्यैर्मण्डनैर्द्विजाः ॥ शूद्रानभ्यर्चयन्त्यल्पश्रुतभाग्यबलान्विताः ॥ ३ ॥ न प्रेक्षन्तोर्चनस्यापि शूद्रा द्विजवरान्नृप ॥ सेवावसरमालोक्य द्वारि तिष्ठन्ति च द्विजाः ॥ ४ ॥ वाहनस्थान् समावृत्य शूद्रान् शूद्रोपजीविनः ॥ सेवन्ते ब्राह्मणास्तांस्तु स्तुवन्ति स्तुतिभिः कलौ ॥ ५ ॥ अध्यापयन्ति वै वेदान् शूद्रान् शूद्रोपजीविनः ॥ पठन्ति वैदिकान्मन्त्रान्नास्तिक्यं घोरमाश्रिताः ॥ ६ ॥ अत्र तस्मादेवं न कुर्यादिति निषिध्यते ॥**

**कूर्मपुराणां**तही हेच श्लोक पाठांतरानें घेतले आहेत. जसें—"कलियुगांत शुक्लदंत, जिन हें ज्यांचें नांव आहे असे मस्तकमुंडन करणारे, भगव्या छाट्या अंगावर घेणारे असे ढोंगी शूद्र धर्माचरण करतील. शूद्र जातीचे राजे आपल्या आश्रयानें उपजीविका करणाऱ्या ब्राह्मणांस मार देतील. हे शत्रुतापना, अल्प अशा शास्त्रज्ञान, भाग्य, बल, यांहींकरून युक्त असे ब्राह्मण आपल्या जातीच्या मोठ्या समुदायांत उंच आसनावर शूद्रांस बसवून फुलें, अलंकार, व वस्त्रादिकांनीं त्यांचें पूजन करतील. हे राजा, ते शूद्र मोठमोठ्या ब्राह्मणांनीं पूजा केली तथापि त्यांकडेस ढुंकून सुद्धां पाहणार नाहींत. मग ते ब्राह्मण चाकरीची वेळ पाहून त्यांच्या द्वारावर उभे राहतील. रथ, गाडी, घोडे, इत्यादिकांवर बसणाऱ्या शूद्र राजांची त्यांचे कामदार झालेले ब्राह्मण, त्यांच्या सभोंवतीं राहून सेवा करतील ( छत्र चामरादिक धरतील ). ब्राह्मण, भाटासारखे त्या शूद्रांची स्तुति करतील. शूद्रांस वेद पढवितील. त्यांच्याच आश्रयानें पोट भरतील. भयंकर नास्तिकपणा ज्यांनीं स्वीकार केला आहे असे ते ब्राह्मण त्यांच्या जवळ वेदपाठ करतील," असें सांगितलें

*** अर्जिनेन आख्या प्रसिद्धिर्येषां इत्यपि व्याख्येयम्.**

आहे. येथें जसें जसें करतील ह्मणून सांगितलें आहे, तें सर्वहि निंदापूर्वक आहे; तस्मात् तें करूं नये असा निषेध होतो.

स्कान्दकौर्मयोः कलिधर्मेषु ॥ यत्रोमाया नरो वक्ता संवादो नारदस्य तु ॥ तत्र बौद्धं च जैनं च शाक्तं शैवं च वैष्णवम् ॥ १ ॥ योगज्ञानमतं भ्रान्तं विरुद्धं वेदशास्त्रतः ॥ वर्तिष्यन्ते कलौ ब्रह्मन् तन्मतेन द्विजातयः ॥ २ ॥ स्त्रियः शुश्रूषणं पत्युर्विप्राणां शूद्रजातयः ॥ पित्रोः पुत्राः परित्यज्य जपहोमादि साधनम् ॥ कुर्वन्ते काम्यकर्माणि दृष्टार्थानि पतन्त्यधः ॥ ३ ॥ लौकिकैर्नामभिर्गीतैर्देवताराधनं तु यत् ॥ ४ ॥ शूद्रादीनामयं धर्मो न द्विजानां कदाचन ॥ शूद्राणां कृतकैर्गीतैर्देवताग्रे कलौ युगे ॥ ५ ॥ नृत्यं कुर्वन्ति विप्राद्या अवज्ञाय श्रुतीरितम् ॥ गायन्ति विधवा गीतं श्रोतॄणामपि पापदाः ॥७॥

**स्कंदपुराण** आणि **कूर्मपुराण** यांतील कलिधर्मांत "जेथें उमापति (शंकर) धर्मवक्ता असून नारदाचा संवाद आहे, तेथें बौद्धशास्त्र, व जैनशास्त्र, इत्यादि नास्तिक मतांचें निरूपण झालें आहे, जेथें शाक्त, शैव, वैष्णव, योगशास्त्र इत्यादिकांचीं मतें केवळ भ्रांत झालीं आहेत, असें वेदशास्त्रादिकांस विरुद्ध पाखंड स्वीकारून तदनुसार मोठमोठे ब्राह्मण वर्तन करतील. स्त्रिया नवऱ्याची सेवा सोडतील. शूद्र ब्राह्मणादिकांची सेवा सोडतील. पुत्र पित्याची सेवा सोडून जप होम इत्यादिकेंकरून सिद्ध होणारीं दृष्टार्थ अशीं काम्य कर्में आचरतील. व तीं सांग न झाल्यामुळें अधोगतीस जातील. लौकिक नांवांनीं देवाचें भजन करणें, व लौकिक गीतें (अभंगादि) गाऊन देवाराधन करणें हा शूद्रादिकांचा धर्म, तो ब्राह्मणांस कदापि आचरण्यास योग्य नसतां ते आचरण करतील. शूद्रांनीं केलेलीं गीतें देवांच्या अग्रभागीं गातील. वेदाज्ञा नसतांही ब्राह्मण नृत्यादि[1] करतील. विधवा गायन करतील. जें गायन श्रवण केलें असतां मोठा दोष प्राप्त होईल" असें सांगितलें आहे.

विष्णुपुराणे ॥ अपहाय निजं कर्म कृष्ण कृष्णेति वादिनः ॥ ते हरेर्द्वेषिणः पापा धर्मार्थं जन्म यद्धरेः ॥ १ ॥ तत्रैव । द्विजशुश्रूषयैवैष पाकयज्ञाधिकारवान् ॥ निजाञ्जति वै लोकान् शूद्रो धन्यतरस्ततः ॥ २ ॥ दानं च दद्याच्छूद्रोपि पाकयज्ञैर्यजेत च ॥ पित्र्यादिकं च वै सर्वं शूद्रः कुर्वीत वै नरः ॥ ३ ॥ पाकयज्ञाः पंचमहायज्ञाः । पाकशब्दस्य तं पाकेन मनसेत्यादौ प्राशस्त्यार्थत्वात् ॥ यद्वा योस्मत्पाकतर इतिवदल्पार्थः ॥ मदनपारिजाते बृहस्पतिः ॥ शौचं ब्राह्मणशुश्रूषा सत्यमक्रोध एव च ॥ शूद्रकर्म तथा मन्त्रो नमस्कारोस्य चोदितः ॥ १ ॥ भारते आनुशासनिके पर्वणि ॥ दृष्ट्वा पितामहः शूद्रमभिभूतं तु तामसैः ॥ द्विजशुश्रूषणं धर्मं शूद्राणां तु प्रयुक्तवान् ॥ २ ॥ नश्यन्ति तामसा भावाः शूद्रस्य द्विजभक्तितः ॥ द्विजशुश्रूषया शूद्रः परं श्रेयोधिगच्छति ॥ अहिंसकः शुभाचारो देवताद्विजपूजकः ॥ शूद्रो धर्मफलैरिष्टैः स्वधर्मेणैव युज्यते ॥ ३ ॥ तथा ॥ स्वाहाकारनमस्कारौ मन्त्रौ शूद्रो विधीयताम् ॥ ताभ्यां शूद्रः पाकयज्ञैर्यजेत ब्रह्मवान्स्वयम्[2] ॥ १ ॥ (ब्रह्म मन्त्रः) ॥

---

१ पोट भरण्याकरितां ब्राह्मणानें नृत्य करूं नये, परंतु ईश्वरप्रीत्यर्थ केल्यास दोष नाहीं, असें समजलें पाहिजे. नाहीं पेक्षां "विलज्ज उद्गायति नृत्यति क्वचित्" इत्यादिस्थलीं विरोध येईल.

२ व्रतवान्स्वयमिति पाठोऽन्यत्र दृश्यते.

**विष्णुपुराणां**त कलिधर्मवर्णनप्रसंगीं "जे स्वकीय कर्मांचा त्याग करून कृष्ण कृष्ण असें ह्मणणारे ते, हरीचे द्वेष्टे[1] होत. कारण, देवांचे अवतार वर्णाश्रमधर्म स्थापन करण्याकरितां आहेत. त्या धर्मांचा त्याग करतात ह्मणून, हे धर्मद्वेष्टे होत." असें सांगितलें आहे. आणखी त्याच **विष्णुपुराणां**त "हा शूद्र द्विजसेवेनेंच पाकयज्ञ[2] करण्यास अधिकारी आहे, व त्याच सेवेनें या लोकीं धन्य होऊन, अन्यत्र ( परलोकीं ) स्वकर्मार्जित लोकांला प्राप्त होतो. शूद्रानें दान द्यावें, द्विजसेवेवांचून पाकयज्ञांनीं यजन करूं नये. पितृचें श्राद्धादि सर्व कर्म करावें." असें सांगितलें आहे. **मदनपारिजात** नामक ग्रंथांत **बृहस्पति**–" शुद्धता, ब्राह्मणसेवा, सत्य बोलणें, शांति, हीं शूद्रांचीं, कर्मे होत. तसाच याला इतर मंत्रांबद्दल नमस्कार ( मंत्र ) सांगितला आहे" असें ह्मणतो. **महाभारतां**त **अनुशासन** पर्वांत "ब्रह्मदेव शूद्राला तमोगुणांनीं व्याप्त झालेला, अर्थात् तामसी; असा पाहून, त्याला ब्राह्मणसेवारूप धर्म आचरण्यास सांगता झाला. कारण, शूद्राचे तामस[3] स्वभाव, ब्राह्मणसेवेनें नाश पावतात. आणि, तो शूद्र त्यांच्या सेवेनें कल्याणास पात्र होतो. शूद्रानें, स्वभावेंकरून अहिंसक असावें. तसेंच, द्विजांची पूजा करावी, उत्तम आचार करावा, असें केल्यास, तो स्वकीय धर्माच्या उत्तम फलांनीं युक्त होतो. तसेंच यानें "स्वाहा" आणि "नमः" हे मंत्र ह्मणावेत. या मंत्रांनीं, मंत्रवान् अशा शूद्रानें, स्वतः पाकयज्ञांनीं यजन करावें." असें सांगितलें आहे.

**संचयांश्च न कुर्वीत जातु शूद्रः कथंचन ॥ पापीयान् हि धनं लब्ध्वा बाधेताऽपि गरीयसः ॥ २ ॥ राज्ञा वा समनुज्ञातः कामं कुर्वीत धर्मतः ॥ आपस्तम्बः ॥ शुश्रूषा शूद्रस्येतरेषां वर्णानां पूर्वस्मिन्पूर्वस्मिन्निःश्रेयसं भूयः ॥ बौधायनः । शूद्राणामार्याधिष्ठितानां मासि मासि वपनमर्थवदाचमनकल्प उपवीतं वस्त्रविन्यासादिति ॥ ( अर्यो वैश्यः ) अर्यः स्वामिवैश्ययोः [ अ० ३ पा० १ सू० १०३ ] इति पाणिनिः ॥ मनुरपि॥ शूद्राणां मासिकं कार्यं वपनं न्यायवर्तिनाम् ॥ वैश्यवच्छौचकल्पश्च द्विजोच्छिष्टं च भोजनम् ॥ १ ॥ शौचमाचमनं सूतसूतकं चैव वैश्यवत् ॥ उच्छिष्टं भाण्डस्थः शेषः न तु भुक्तिपात्रस्थम् ॥ न शूद्राय मतिं दद्यान्नोच्छिष्टं न हविःष्कृतमिति पूर्वोक्तेः ॥ त्रिराचमनं ॥ पञ्चदशरात्रमशौचमित्यर्थः ॥**

---

१ वर्णाश्रमधर्मास सोडून जे नेहमीं चिपळ्या वाजवून राम राम, किंवा ज्ञानदेव तुकाराम करित बसतात त्यांनीं वरील वाक्य वाचावें, अशी त्यांस आमची सूचना आहे.

२ येथें "पाकयज्ञ" शब्दानें देवयज्ञादि पंच महायज्ञांचें ग्रहण करावें; कारण, पाकशब्द "**तं पाकेन**०" इत्यादि ठिकाणीं प्राशस्त्यार्थक मानला आहे, अतएव येथेंही तसाच घ्यावा; किंवा अल्पार्थीं घेऊन पाकयज्ञ ह्मणजे लहानसे यज्ञ असा अर्थ करावा.

३ मोठ्यांची सेवा करण्यांत मोठा लाभ होतो. तो असा कीं, प्रथम त्यांचा सहवास होतो, व त्या निमित्तानें त्यांजकडून सन्मार्गाच्या गोष्टी ऐकण्यास मिळतात, त्यांपासून ज्ञान प्राप्त होतें, अर्थात् तामस भाव हे अज्ञानापासून झाले आहेत. त्या अज्ञानाचा नाश होतो. व तामस भाव नाश पावतात, असा अभिप्राय आहे.

शूद्रानें कधींहि द्रव्यसंचय करूं नये. कारण, तो द्रव्यवान् झाल्यानें, व स्वभावतः ता-मस असल्यामुळें, ब्राह्मणादिकांस बाधा करील; असें असतांहि जर, राजाज्ञा झाली असेल तर, त्यानें स्वधर्मेंकरून द्रव्यसंग्रह करावा, असें सांगितलें आहे. **आपस्तंब** नामक स्मृतिकर्ता–"शूद्रांला इतर वर्णांची (ब्रा० दिकांची) सेवा करणें हा मुख्य धर्म होय. त्यांत पूर्व पूर्व वर्णांची, अर्थात् वैश्यांपेक्षां क्षत्रियांची; क्षत्रियांहून ब्राह्मणांची सेवा के-ल्यास, त्यांचें विशेष[1] कल्याण होईल." असें ह्मणतो. **बौधायन** नामक स्मृतिकर्ता ह्म-णतो कीं, "वैश्यांनीं अधिष्ठित (पोसलेले) अशा शूद्रांचें प्रतिमहिन्यास वपन (हजामत) तसाच आचमनकल्प[2] ह्मणजे–द्विजांस सांगितल्याप्रमाणें न करितां केवळ उदक प्राशन मात्र करणें, आणि, उपवीतावद्दल पृ० ५८ येथें सांगितलेल्या प्रकारचें वस्त्र[3] धारण करणें हें धर्मशास्त्रास अनुसरून आहे." असें असावें. **मनु** ही, "यथान्याय वागणाऱ्या शूद्रांनीं प्रतिमासीं वपन करावें. आणि वैश्यांसारखी त्यांची शुद्धता व्हावी. त्यांनीं द्विजांचें उच्छिष्ट[4] (भांड्यांतील शेष अन्न) भोजन करावें. तसेंच शौच, आचमन, व आशौच हीं सर्व वैश्यासारखीं आचरावीं; अर्थात् वैश्यांसारखें तीन वेळ आचमन करावें, आणि जननाशौच, व मृताशौच १५ रात्री धरावें." असें ह्मणतो.

**यत्तु याज्ञवल्क्यः ॥ शुद्ध्येरन् स्त्री च शूद्रश्च सकृत्स्पृष्टाभिरंतत इति ॥ तदसच्छूद्र-परमिति मदनपालः ॥ (अन्ततः स्पृष्टाभिः तालुगाभिः) ओष्ठमार्जनघ्राणस्पर्शादिकं तु स्त्रीशूद्रयोर्न भवति इति ॥ त्रिःप्राश्यापो द्विरुन्मृज्य खान्यद्भिः समुपस्पृशेदिति याज्ञव-ल्क्येन त्रिःप्राशने एव तदुक्तेरिति केचित् ॥ अन्ये तूपलक्षणत्वात्स्त्रीशूद्रयोरपि भवति ॥ अतएव स्त्री च शूद्रश्चेति शूद्रे विशेषमात्रमुक्तमित्याहुः ॥ अन्ये तु यथाश्रुतमाहुः ॥ गौतमः ॥ शूद्रश्चतुर्थो वर्ण एकजातिस्तस्य सत्यमक्रोधः शौचमाचमनार्थे पादप्रक्षालन-मेवैके । श्राद्धकर्म भृत्यभरणं स्वदारवृत्तिरनुज्ञातोस्य नमस्कारो मन्त्रः ॥ पाकयज्ञैः स्वयं यजेतेत्येके इति ॥ पाकयज्ञैरष्टकादिभिः स्वयं यजेत नर्त्विगादिभिरिति तद्भाष्ये ॥ स्वय-मिति पत्न्यादिव्यावृत्त्यर्थमिति लक्ष्मीधरः ॥ एकेत्युक्तेर्विप्रद्वारापि प्रतिष्ठादावुक्तत्वात् ॥ शक्तः स्वयमशक्तस्तु विप्रद्वारा ॥ सच्छूद्रः स्वयमसच्छूद्रो विप्रद्वारेति जयपालः ॥**

जें **याज्ञवल्क्य**–"स्त्री, व शूद्र हे टाळवेला पोंहचेल असें, एकवेळ आमचन केल्यानें

---

१ ब्राह्मण हे शुद्ध सात्विक असल्याकारणानें त्यांच्या सेवेपासून शूद्राचे स्वकीयतामसभावना-शरूप विशेष कल्याण होईल. असा अभिप्राय आहे.

२ "आचमनकल्प" यांतील कल्पशब्द समतावाचक आहे; यावरून ब्राह्मणादिकांस सांगित-लेल्या आचमनासारखेंच, पण त्यापेक्षां कांहीं कमी प्रकारचें आचमन शूद्रानें करावें असें जाणावें.

३ यावरून शूद्रानें जानव्याच्या ऐवजीं चौकोनी शुभ्र वस्त्र दोन शेवटें जोडून जानव्यासारखें घालावें; असें सिद्ध होतें.

४ येथें उच्छिष्टशब्दानें ब्राह्मणभोजन होऊन स्वयंपाकाच्या भांड्यांतील शेष राहिलेल्या अन्नाचें ग्रहण केलें आहे. यावरून जेवलेल्या पात्रांवरील अवशिष्टें अन्नाचें ग्रहण होत नाहीं; कारण, शू-द्राला दान देऊं नये, उच्छिष्ट देऊं नये, तसेंच यज्ञशेष देऊं नये, असें पूर्वीं सांगितलेंच आहे.

शुद्ध होतात." असें ह्मणतो; तें, "असच्छूद्रपर असावें" असें **मदनपालाचें** मत आहे. जें ब्राह्मणांस ओष्ठमार्जन, नासिकास्पर्श इत्यादि प्रकारचें आचमन सांगितलें आहे. तें तर स्त्रीशूद्रादिकांस वर्ज्य आहे. कारण, "स्त्रीशूद्रांनीं ३ वेळ उदक प्राशन करून २ वेळ उन्मार्जन करून, इंद्रियांस उदकयुक्त हस्तानें स्पर्श करावा." असें त्याच **याज्ञवल्क्यानें** तीनवेळां उदक प्राशन केल्यानेंच आचमन होतें, असें सागितलें आहे. ह्मणून शूद्रानें तीनवेळ उदक प्राशन करावें, असें **कित्येक** धर्मशास्त्रकारांचें मत आहे. **अन्य ग्रंथकार** तर, "वरील **याज्ञवल्क्याचें** वचन, उपलक्षणभूत आहे; ह्मणून, स्त्रीशूद्रांलाहि ओष्ठमार्जनादि करण्यास अधिकार सिद्ध होतो, व याकरितांच पूर्व वचनांत, "स्त्री आणि शूद्र असा शूद्रांविषयीं विशेष मात्र पृथक् निर्देश करून सांगितला आहे" असें ह्मणतात. अन्य कित्येक **ग्रंथकर्ते** तर, जसें ऐकलें तसें ह्मणतात. **गौतम** नामक स्मृतिकर्ता ह्मणतो कीं,

१ ह्या केचिन्मताप्रमाणें स्त्रीशूद्रांनीं पुढें सांगितलेल्या प्रकारचें आचमन करूं नये असें होतें, परंतु तो प्रकार अवैदिक असल्याकारणानें स्त्रीशूद्रांनीं आचरण्यास कांहीं प्रत्यवाय नसावा असें वाटतें.

आचमनाचे श्रौत, तांत्रिक इत्यादि प्रकार बहुत आहेत, त्यांतून जो शूद्रांसहि आचरण करतां येईल तो सांगतों:—**केशवाय नमः, नारायणाय नमः, माधवाय नमः** या तीन नांवांनीं ज्यावर फेंस नसेल असें थंड पाणी, उजवा हात गायीच्या कानाच्या आकाराचा करून त्यावर घेऊन तीन वेळ प्राशन करावें. **गोविंदाय नमः**, यानें उजवा हात धुवावा. **विष्णवे नमः** व **मधुसूदनाय नमः** या दोहोंनीं, अनुक्रमें खालचा, व वरचा ओंठ धुवावा. **त्रिविक्रमाय नमः** यानें ओंठावर उदकाचें प्रोक्षण करावें. **वामनाय नमः** यानें उदक अभिमंत्रण करावें. **श्रीधराय नमः** यानें डावा हात धुवावा. **हृषीकेशाय नमः** यानें उजवा पाय धुवावा ( पाणि लावावें ). **पद्मनाभाय नमः** यानें डावा पाय धुवावा. **दामोदराय नमः** यानें मस्तकावर प्रोक्षण करावें. **संकर्षणाय नमः** यानें वरील ओंठ प्रोक्षावा. **वासुदेवाय नमः** यानें उजव्या नाकपुडीला, व **प्रद्युम्नाय नमः** यानें डाव्या नाकपुडीला स्पर्श करावा. **अनिरुद्धाय नमः** यानें उजव्या नेत्रास, व **पुरुषोत्तमाय नमः** यानें डाव्या नेत्रास स्पर्श करावा. **अधोक्षजाय नमः** यानें उजव्या कानास, व **नृसिंहाय नमः** यानें डाव्या कानास स्पर्श करावा. **अच्युताय नमः** यानें नाभीला स्पर्श करावा. **जनार्दनाय नमः** यानें हृदयास, व **उपेंद्राय नमः** यानें मस्तकास स्पर्श करावा. **हरये नमः** यानें उजव्या दंडास, आणि **श्रीकृष्णाय नमः** यानें डाव्या दंडास स्पर्श करावा. ह्मणजे आचमन होतें. **कित्येक ग्रंथकार** "पहिल्या तीन नांवांनीं आचमन करून पुढील दोहोंनीं हात धुवावे, आणि दोहोंनीं दोन गालांस मार्जन करावें, आणि दोहोंनीं ओष्ठमार्जन, आणि एकेकानें हस्त व पाय यांचें मार्जन करावें. बाकी सर्व वरीलप्रमाणें." असें ह्मणतात. कदाचित् एवढें विस्तृत आचमन करण्यास शक्ति नसेल तर; तीन वेळ उदक प्राशन करून हात धुऊन उजव्या कानाला स्पर्श करावा. सांप्रत हाच प्रकार बहुतकरून घेतात, पण पूर्वोक्त सर्व नांवें ह्मणतात याचें कारण कांहीं समजत नाहीं.

"शूद्र हा चवथा वर्ण होय. हा एकजाति[1] आहे, याला सत्यभाषण, क्रोधत्याग, शुद्धता हीं विहित आहेत. 'यानें आचमनाबद्दल पाय धुवावे;' असें कित्येक आचार्यांचें मत आहे. श्राद्धकर्म, सेवकांचें पोषण, स्वकीय स्त्रीचेठायीं रत असणें, हे त्याचे धर्म होत. याला 'नमः' हा मंत्र सांगितला आहे. कितीएक आचार्यांचे मतें यांनीं, पाकयज्ञांनीं स्वयमेव यजन करावें." "शूद्रानें स्वतः यजन करावें, ऋत्विजादिकांकडून करवूं नये." अशी त्या स्मृतीच्या **भाष्यकर्त्यानें** वरील वचनाची व्याख्या केली आहे. "या वचनांतला **'स्वयं'** शब्द, पत्नी इत्यादिकांच्या निवृत्तीकरितां आहे" असें **लक्ष्मीधर** ह्मणतो. तसेंच, वरील वचनांत **"एके"** (कित्येक) असें ह्मटलें आहे, याचा हेतु इतकाच कीं, ब्राह्मणद्वारा देवप्रतिष्ठा इत्यादिक कर्मांविषयीं शूद्रांस अधिकार सांगितला आहे; ह्मणून येथेंही सशक्त असल्यास स्वयमेव करावें, व अशक्त असल्यास ब्राह्मणाकडून करावें, असें सिद्ध होतें. "सच्छूद्रानें स्वयमेव करावें. व असच्छूद्रानें विप्रद्वारा करावें." असें **जयपाल** ह्मणतो.

**हेमाद्रौ भारते ॥ श्राद्धकर्म नयश्चैव सत्यमक्रोध एव च ॥ स्वेषु दारेषु सन्तोषः शौचं नित्यानसूयता ॥ १ ॥ आत्मज्ञानं तितिक्षा च धर्मः साधारणो नृप ॥ चातुर्वर्ण्यस्येति शेषः ॥ शूद्राणां पुराणश्रवणेनात्मज्ञानम् ॥ श्रोतव्यं इति नियमस्तु द्विजपर इति व्रतहेमाद्रिः ॥ भगवद्गीतासु ॥ मामुपाश्रित्य कौन्तेय येऽपि स्युः पापयोनयः ॥ स्त्रियो वैश्याश्च शूद्राश्च[3] तेपि यान्ति परां गतिम् ॥ १ ॥ हेमाद्रौ विष्णुः ॥ क्षमा शौचं दमो दानमिन्द्रियं सत्यसंयमौ ॥ अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरणं दया ॥ १ ॥ आर्जवं लोभशून्यत्वं देवब्राह्मणपूजनम् ॥ अनभ्यसूया च तथा धर्मः सामान्य उच्यते ॥ २ ॥**

**हेमाद्रींत महाभारतांत**—"श्राद्धकर्म[2], नीति, सत्य, समाधानता, स्वस्त्रीरति, संतोष, शुद्धता, निरंतर गुणावर दोष न ठेवणें, आत्मज्ञान, सहनशक्ति, इतकीं असणें हा चारी वर्णांचा साधारण धर्म होय. शूद्रांस पुराणश्रवणानें आत्मज्ञान प्राप्त व्हावें. "पुराणश्रवण करावेंच, हा नियम विप्रादिकांविषयीं आहे." असें **व्रतहेमाद्रि**कर्ता ह्मणतो. **भगवद्गीतेंत**—"हे अर्जुना, मला आश्रय करून राहणारे, जे स्त्रिया, वैश्य, व शूद्र, ते मोठे पापयोनि असले तथापि उत्तम गतीस पावतात." असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत विष्णु** ह्मणतो कीं, "क्षमा, शौच, दम, दान, इंद्रियनिग्रह, सत्य, अहिंसा, गुरुसेवा, तीर्थयात्रा, दया, आर्जव, लोभत्याग, देवब्राह्मणपूजा, अनसूया, हा चारही वर्णांचा सामान्य धर्म आहे."

**तद्वृत्तिमाहतुर्मनुपराशरौ ॥ शुश्रूषैव तु शूद्रस्य धर्मो निःश्रेयसः परः ॥ शुचिरुत्कृष्टशुश्रूषुर्मृदुवागनहंकृतः ॥ १ ॥ ब्राह्मणोपाश्रयो नित्यमुत्कृष्टां जातिमश्नुते ॥ शूद्रस्तु**

---

१ शूद्रांस एकच जन्म आहे, उपनयनरूप दुसरें जन्म नाहीं, ह्मणून त्यास एकजाति ह्मटलें आहे.

२ पूर्वीं या शब्दानें पंचमहायज्ञांचें ग्रहण करावें, असें सांगितलें होतें परंतु येथें प्रकरणवशात् अष्टकादि श्राद्धांचें ग्रहण करावें हें सयुक्त आहे.

**३ वैश्यास्तथा शूद्रा इति टीकाकृदभिमतः पाठः.**

**वृत्तिमाकांक्षन् क्षत्रमाराधयेद्यदि ॥ धनिनं वाप्युपाराध्य वैश्यं शूद्रो जिजीविषेत् ॥ २ ॥ स्वर्गार्थमुभयार्थं वा ब्राह्मणानेव राधयेत् ॥ विप्रसेवैव शूद्रस्य विशिष्टं कर्म कीर्त्यते ॥ ३ ॥ यदतोन्यद्धि कुरुते तद्भवत्यस्य निष्फलम् ॥ विप्रसेवां विना कृतमपि स्नानदानाद्यकृतमित्यर्थः ॥**

शूद्रानें उदरनिर्वाह कशावर करावा तें **मनु**, व **पराशर** सांगतात. तें असें—" शूद्रास सेवा हाच कल्याणकारक धर्म होय. तो स्वतः शुद्ध असून उत्तम सेवा करणारा, मृदुभाषी, अहंकाररहित, ब्राह्मणाचा आश्रयी, असा शूद्र उत्तम जातीप्रत पावतो. जर शूद्र आपलें पोट भरावें ह्मणून इच्छील तर, त्यानें क्षत्रियांची चाकरी करावी, अथवा द्रव्यवान् वैश्याची चाकरी करून उदरनिर्वाह करावा. परंतु स्वर्गार्थ अथवा उदरनिर्वाहार्थ ब्राह्मणांचीच सेवा करावी. कारण, ब्राह्मणसेवा हेंच शूद्राचें मुख्यकर्म आहे. याहून अन्य जें कांहीं कर्म करील तें त्याचें निष्फल होतें;" अर्थात् ब्राह्मणसेवेबांचून, स्नानदानादि करून न केल्यासारखें होतें. असा अभिप्राय आहे.

**सेव्यं प्रत्याह ॥ प्रकल्प्या तस्य तैर्वृत्तिः स्वकुटुंबाद्यथार्हतः ॥ शक्तिं चापेक्ष्य दाक्ष्यं च भृत्यानां परिसङ्गहे ॥ १ ॥ तैर्द्विजैः पुत्रवदसौ पालनीय इति मेधातिथिः ॥ उच्छिष्टमन्नं दातव्यं जीर्णानि वसनानि च ॥ पुलकाश्चैव धान्यानां जीर्णाश्चैव परिच्छदाः ॥ १ ॥ ( पुलका धान्यकणाः । उच्छिष्टं भुक्तशिष्टं ) भाण्डस्थमिति मेधातिथिः ॥ गौतमः ॥ तेभ्यो वृत्तिं विलिप्संत । जीर्णान्युपानच्छत्रवासःकूर्चादीन्युच्छिष्टाशनं शिल्पं वृत्तिश्च । यद्यर्थमाश्रयेद्भर्त्तव्यस्तेन क्षीणोपि शूद्रेण चोत्तरस्तदर्थोस्य निचयः स्यादिति ॥ क्षीणो वृत्तिहीनस्तेनार्येण भर्त्तव्यस्तेन शूद्रेण चोत्तर अर्यो भर्त्तव्य इत्यर्थः ॥ उच्छिष्टदानं दासपरम् ॥ अन्ये तु ॥ उच्छिष्टमन्नं दातव्यं शूद्रायाऽगृहमेधिने ॥ गृहस्थाय तु दातव्यमन्नमेव दिने दिन इति व्याघ्रोक्तेरुच्छिष्टनिषेधो गृहस्थपर इत्याहुः ॥ मदनरत्नेऽप्येवम् ॥**

याप्रमाणें शूद्रानें सेवा करावी असें सांगितलें. आतां तो ज्यांची सेवा करील; त्यांनीं त्याचें रक्षण कसें करावें तें सांगतो,-"ज्याची तो सेवा करील त्यानें आपल्या कुटुंबांतून, यथायोग्य आपली शक्ति, व त्याची हुशारी पाहून, त्याला निर्वाहाकरितां द्रव्यादि द्यावें." यावरून " त्या द्विजांनींहि पुत्रासारखें याचें पालन करावें," हें सिद्ध होतें असें **मेधातिथि** ह्मणतो. "शूद्रास उच्छिष्ट अन्न जुनीं वस्त्रें, धान्यकण, तसेंच जुने परिच्छद ( इतर सामान ) इत्यादि द्यावें." असें ( मनु, व पराशर ) ह्मणतात. "उच्छिष्ट ह्मणजे स्वयंपाकाच्या भांड्यात उरलेलें अन्न" असें **मेधातिथि** ह्मणतो. **गौतम** "शूद्रानें ब्राह्मणांपासून आपल्या निर्वाहाची इच्छा करावी, त्यांपासून जुनीं वस्त्रें, उपानत् ( पायतण, जोडा ), छत्र, कूर्च, अशीं घ्यावीं, त्यांचें उच्छिष्ट भक्षावें, कलाकौशल्य करावें, आणि त्यावरच निर्वाह करावा. जर वैश्याचा आश्रय केला असेल तर; त्यानें शूद्राचें पालन

१ येथें उच्छिष्ट शब्द असून तो पात्रांत शेष राहिलेल्या अन्नाचा वाचक आहे. मेधातिथि तो भांड्यांतील शेष राहिलेल्या अन्नाचा वाचक असें ह्मणतो; आणि असलें अन्न इतर सेवकांस द्यावें; परंतु परंपरेच्या सेवकांस ( बंधांस ) पात्रशेषही देण्याला प्रत्यवाय नाहीं.

करावें. कदाचित् तो वैश्य दरिद्री झाला असून हा ( शूद्र ) जर द्रव्यवान् असेल तर, यानें त्याचें पोषण करावें" असें ह्मणतो. येथें उच्छिष्ट ( पात्रशेष ) देण्यास सांगितलें आहे, तें दासपर आहे असें समजावें. अन्य **ग्रंथकर्ते** तर, "जो शूद्र गृहस्थाश्रमी नसेल त्यास उच्छिष्टान्न द्यावें. गृहस्थास तर उच्छिष्ट नसलेलें अन्न, अथवा धान्य प्रतिदिवसीं द्यावें" असी **व्याघ्रपादा**ची उक्ति आहे. यावरून "उच्छिष्टनिषेध गृहस्थपर आहे." असें ह्मणतात. **मदनरत्नां**तहि असेंच सागितलें आहे.

**तथा तपः शूद्रस्य द्विजसेवनम् ॥ याज्ञवल्क्यः ॥ शूद्रस्य द्विजशुश्रूषा तया जीवन्वणिक् भवेत् ॥ शिल्पैर्वा विविधैर्जीवेद्द्विजातिहितमाचरन् ॥ १ ॥ नृसिंहपुराणे ॥ अयाचितप्रदाता स्यात्कृषिं वृत्त्यर्थमाश्रयेत् ॥ पुराणं शृणुयान्नित्यं नरसिंहस्य पूजनम् ॥ १ ॥ उशनाः ॥ शूद्रस्य द्विजशुश्रूषा सर्वशिल्पानि चाप्यथ ॥ विक्रयः सर्वपण्यानां शूद्रधर्म उदाहृतः ॥ १ ॥ देवलः ॥ शूद्रधर्मस्त्रिवर्णशुश्रूषा कलत्रादिपोषणं कर्षणपशुपालनभारोद्वहनपण्यव्यवहारचित्रकर्मनृत्यगीतवेणुमृदङ्गवादनानीति ॥ मनुः ॥ अशक्नुवंस्तु शुश्रूषां शूद्रः कर्तुं द्विजन्मनाम् ॥ पुत्रदारात्यये प्राप्ते जीवेत्कारुककर्मभिः ॥ १ ॥ यैः कर्मभिः प्रचरितैः शुश्रूष्यन्ते द्विजातयः ॥ तानि कारुककर्माणि शिल्पानि विविधानि च ॥ २ ॥ कुर्यादिति शेषः ॥ नृसिंहपुराणे ॥ दूराच्छूद्रेणोपचर्यो ब्राह्मणोऽग्निरिव ज्वलन् ॥ एवं धर्माचरणे लोकमाह पैठीनसिः ॥ गान्धर्वं शूद्रस्य स्थानमित्यर्थः ॥ इति श्रीरामकृष्णभट्टसुतकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्राणां विहितनिषिद्धानि ॥**

शूद्रास द्विजसेवा हेंच मुख्य तप. याविषयीं **याज्ञवल्क्य** ह्मणतो कीं, "शूद्रास द्विजसेवाच मुख्य आहे. तिनेंच निर्वाह करील तर योग्य होय. कदाचित् तें न होईल तर, व्यापार करून पोट भरावें, किंवा नानातऱ्हेचीं कारागिरीचीं कामें करावीं. परंतु कोणत्याहि प्रकारें द्विजांचें हित करावें." **नृसिंहपुराणां**त "शूद्रानें अयाचित द्यावें. उदरनिर्वाहार्थ कृषि करावी. नेहेमीं पुराण ऐकावें. नृसिंहाचें पूजन करावें," असें सांगितलें आहे. **उशना**–"द्विजसेवा, सर्व प्रकारचीं शिल्पें, तसाच योग्यवस्तूंचा विक्रय, हा शूद्रांचा धर्म ऋषिवर्णित आहे" असें ह्मणतो. **देवल**–"विप्र, क्षत्रिय, वैश्य, यांची सेवा कुटुंबपोषण, शेती, गुरांचें रक्षण, ओझीं वाहणें, व्यापार, चित्रें काढणें, नृत्य[1], गायन वेणु व मृदंगादिवाद्यें वाजविणें, हा शूद्रधर्म होय" असें ह्मणतो. **मनु**–" शूद्र द्विजसेवा करण्यास अशक्त झाला असून त्याच्यानें कुटुंबपोषण होत नसल्यास त्यानें कारुककर्मांनीं[2] अर्थात् कारागिरीनें निर्वाह करावा. परंतु ज्या कर्मांनीं द्विजसेवा होईल अशाच प्रकारचीं नानातऱ्हेचीं कारागिरीचीं वगैरे कामें करावीं." असें सांगतो. **नृसिंहपुराणां**त "शूद्रानें

१ येथें नृत्य इत्यादि शूद्राचा धर्म असें सांगितलें आहे, तें साधारणतः आहे. वस्तुतः हीं कर्मे संकरजातीयांचीं आहेत, सच्छूद्राचीं नव्हेत. तथापि येथें शूद्र शब्दाचा साधारण अर्थ घेऊन त्यांचीं कर्में सांगितलीं आहेत यांतील विशेष विचार जातिविवेक प्रकरणांत पहावा.

२ ज्या कर्मांनीं मुख्यत्वेंकरून ब्राह्मणांची सेवा होईल अशा प्रकारचीं त्यास विहित असलेलीं कोणतींही कर्में करावीं असा अभिप्राय आहे.

तेजस्वी ब्राह्मणाची अग्नीसारखी दुरूनच सेवा करावी" असें सांगितलें आहे. असें स्वधर्माचरण केलें असतां शूद्रास कोणचा लोक मिळेल तें **पैठीनसि** सांगतो, जसें—"गंधर्वलोक हें शूद्राचें स्थान होय." **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य विहितनिषिद्धनिरूपणं नाम प्रथमं प्रकरणं समाप्तिमगमत्.**

एथपर्यंत शूद्रांला कोणकोणतीं कर्में आचरण करण्यास अधिकार आहे, व तीं त्यांनीं कसकसीं आचरावीं तें निरनिराळ्या प्राचीन, व अर्वाचीन ग्रंथकारांच्या साधक बाधक मतांचा अनुवाद करून न्याय, युक्ति, व त्याचें बलाबलत्व इत्यादि नीट पाहून सिद्ध केलें आहे. यांतील कित्येक विषय सांप्रत खालच्या प्रतीच्या सर्व लोकांस ( शूद्रादिकांस ) वरिष्ठांचा ( ब्राह्मणांचा ) धर्म आचरण्याची जी विलक्षण हौस उत्पन्न झाली आहे त्यामुळें वाईट वाटण्यासारखे आहेत, व त्यामुळें या ग्रंथकारास ते कदाचित् दोषही देतील यांत संशय नाहीं; परंतु असें मानणें हें त्यांचें शुद्ध अज्ञान होय. कारण, मुळीं वैदिक, अथवा पौराण धर्म आचरण करावा असें ज्या धर्मशास्त्रावरून आपणास समजतें, त्याच शास्त्रांत जर ब्राह्मणांनींच वैदिक, व शूद्रांनीं पौराणच धर्म आचरावा असें स्पष्टपणें सांगितलें असेल, व त्याचें एखाद्या ग्रंथकर्त्यानें निःपक्षपातानें उपपादन केलें असेल तर, त्या संबंधानें ग्रंथकर्त्यावर पक्षपातदोष ठेवून आपल्यास निषिद्ध असलेल्या धर्माचें आचरण करावें आणि आह्मी खऱ्या धर्माचा शोध लावणारे ह्मणून लोकांत मोठी शेखी मिरवावी, यांत विशेष काय ? हें त्यांचें त्यांसच माहित असेल. आह्मांस तर हा शुद्ध हेकटपणा आहे असें वाटतें.



## ॥ अथ शूद्रस्य संस्कारप्रयोगाः ॥

तत्रादौ सर्वकर्माङ्गत्वात्पुण्याहवाचनमाचारानुसारेणोच्यते ॥ व्यासः ॥ सम्पूज्य गंध-माल्याद्यैर्ब्राह्मणान्स्वस्ति वाचयेत् ॥ काम्यकर्मणि माङ्गल्ये सङ्ग्रामाद्भुतदर्शने ॥ १ ॥ यमः ॥ सोङ्कारं ब्राह्मणे कुर्यान्निरोङ्कारं महीपतौ ॥ उपांशु च तथा वैश्ये स्वस्ति शूद्रे प्रकीर्तयेत् ॥ १ ॥ कर्ताऽऽचम्य सुमुखश्चैकदन्तश्चेत्यादि पठित्वा श्रुत्वा देशकालौ सङ्कीर्त्य अमुककर्म करिष्ये । तदङ्गतया गणेशपूजनं पुण्याहवाचनं च करिष्ये । इति सङ्कल्प्य गणेशं पूजयेत् ॥ यथा ॥ हे हेरंब त्वमेह्येहि अम्बिकात्र्यम्बकात्मज ॥ सिद्धिबुद्धियुत त्र्यक्ष सर्वलोकपितः पितः ॥ १ ॥ नागास्य नागहार त्वं गणनाथ चतुर्भुज ॥ भूषितः स्वायुधैर्दिव्यैः पाशाङ्कुशपरश्वधैः ॥ २ ॥ आवाहयामि पूजार्थं रक्षार्थं च मम क्रतोः ॥ इहागत्य गृहाण त्वं पूजां रक्ष च मे क्रतुम् ॥ ३ ॥ इत्यावाह्य षोडशोपचारैः सम्पूज्य पात्रे सफलमर्घ्यमादाय । रक्ष रक्ष गणाध्यक्ष त्र्यक्ष त्रैलोक्यरक्षक । भक्तानामभयंकर्ता त्राता भव भवार्णवात् ॥ १ ॥ द्वैमातुर कृपासिन्धो देव षाण्मातुराग्रज ॥ वरदस्त्वं वरं देहि वाञ्छितार्थप्रदो भव ॥ २ ॥ अनेन फलदानेन फलदो भव मे प्रभो ॥ इत्यर्घ्यं दत्वा । वक्रतुण्ड महाकायेति प्रार्थयेत् ॥ यद्वा ॥ विघ्नेश्वराय वरदाय सुरप्रियाय लम्बोदराय सकलाय जगद्धिताय ॥ नागाननाय सितसर्पविभूषिताय गौरीसुताय गणनाथ नमो नमस्ते ॥ १ ॥ भक्तार्तिनाशनपराय गणेश्वराय सर्वेश्वराय शुभदाय सुरेश्वराय ॥ विद्याधराय विकटाय च वामनाय भक्तप्रसन्नवरदाय नमो नमस्ते ॥ २ ॥ नमस्ते ब्रह्म-रूपाय विष्णुरूपाय ते नमः ॥ नमस्ते रुद्ररूपाय करिरूपाय ते नमः ॥ ३ ॥ इति प्रार्थना ॥ ततः स्वाग्रे धान्यराशिद्वये कलशौ संस्थाप्य । तत्र गन्धदूर्वापंचपल्लवफलहेमपञ्चरत्नादि क्षिप्त्वा । धान्यपूर्णं पात्रद्वयं न्यस्य तत्र ॥ पाशहस्तं च वरुणमंभसां पतिमीश्वरम् ॥ आवाहयामि यज्ञेस्मिन्पूजेयं प्रतिगृह्यताम् ॥ १ ॥ इति वरुणमावाह्य संपूज्य । कलशस्य मुखे विष्णुरित्याद्यैः सम्प्रार्थ्य ॥ मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । आशिषः प्रार्थयन्ते ( प्रार्थनामाह ) एताः सत्या आशिषः सन्तु ॥ अवनिकृतजानुमण्डलः कमलमुकुलसदृशमञ्जलिं शिरस्याधाय दक्षिणेन पाणिना स्वर्णपूर्णकलशं धारयित्वा ॥ दीर्घा नागा नद्यो गिरयस्त्रीणि विष्णुपदानि च तेनायुःप्रमाणेन पुण्याहं दीर्घमायुरस्तु ॥ शिवा आपः सन्तु ॥ सौमनस्यमस्तु ॥ अक्षतं चारिष्टं चास्तु ॥ गन्धाः पान्तु ॥ सुमङ्गल्यं चास्तु ॥ अक्षताः पान्त्वायुष्यमस्तु ॥ पुष्पाणि पान्तु ॥ सौश्रियमस्तु ॥ ताम्बूलानि पान्तु । ऐश्वर्यमस्तु ॥ दक्षिणाः पान्तु ॥ बहुदेयं चास्तु ॥ इति विप्रहस्ते दत्वा ॥ यं कृत्वा सर्ववेदयज्ञक्रियाकरणकर्मारम्भाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्ते तमहं नत्वा भवद्भिरनुज्ञातः पुण्यं पुण्याहं वाचयिष्ये ॥ वाच्यतामिति तैरुक्ते ॥ मा विघ्नं मा च मे पापं मा सन्तु परिपन्थिनः ॥ सौम्या भवन्तु सुखिनः सर्वे लोकाः सुखावहाः ॥ १ ॥ इति कर्ता वदेत् ॥ विप्रास्तथास्त्वित्युक्त्वा ॥ करोतु स्वस्ति ते ब्रह्मा स्वस्ति वापि द्विजातयः ॥ सरीसृपाश्च ये श्रेष्ठास्तेभ्यस्ते स्वस्ति सर्वदा ॥ ययातिर्नहुषश्चैव धुन्धुमारो भगीरथः ॥ तुभ्यं राजर्षयः सर्वे स्वस्ति कुर्वन्तु नित्यशः ॥ २ ॥

स्वस्ति तेस्तु द्विपादेभ्यश्चतुष्पादेभ्य एव च ॥ स्वस्त्यस्त्वपादकेभ्यश्च सर्वेभ्यः स्वस्ति सर्वदा ॥ ३ ॥ स्वाहा स्वधा शची चैव स्वस्ति कुर्वन्तु ते सदा ॥ लक्ष्मीररुंधती चैव कुरुतां स्वस्ति तेऽनघ ॥ ४ ॥ असितो देवलश्चैव विश्वामित्रस्तथाङ्गिराः ॥ स्वस्ति तेऽद्य प्रयच्छन्तु कार्तिकेयश्च षण्मुखः ॥ ५ ॥ विवस्वान्भगवान् स्वस्ति करोतु तव सर्वशः ॥ दिग्गजाश्चैव चत्वारः क्षितिश्च गगनं ग्रहाः ॥ ६ ॥ अधस्ताद्धरणीं योऽसौ नागो धारयते सदा ॥ शेषश्च पन्नगश्रेष्ठः स्वस्ति तुभ्यं प्रयच्छतु ॥ ७ ॥ इति वदेयुः ॥ ततः कर्ता । ब्राह्मणाः मनः सभाधीयताम् ॥ समाहितमनसः स्म इति ते ॥ प्रसीदन्तु भवन्तः ॥ प्रसन्नाः स्मः इत्युक्ते ॥ कुम्भाज्जलं पातयन्वदेत् ॥ शान्तिरस्तु । पुष्टिरस्तु । तुष्टिरस्तु । वृद्धिरस्तु । अविघ्नमस्तु । आयुष्यमस्तु । आरोग्यमस्तु । शिवं कर्मास्तु । कर्मसमृद्धिरस्तु । पुत्रसमृद्धिरस्तु । धनधान्यसमृद्धिरस्तु । इष्टसम्पदस्तु । अरिष्टनिरसनमस्तु । यत्पापं तत्प्रतिहतमस्तु । यच्छ्रेयस्तदस्तु । उत्तरे कर्मण्यविघ्नमस्तु । उत्तरोत्तरमहरहरभिवृद्धिरस्तु । उत्तरोत्तराः क्रियाः शुभाः शोभनाः सम्पद्यन्ताम् । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रसम्पदस्तु । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रग्रहलग्नादिदेवताः प्रीयन्ताम् । दुर्गापाञ्चाल्यौ प्रीयेताम् । अग्निपुरोगा विश्वेदेवाः प्रीयन्ताम् । इन्द्रपुरोगा मरुद्गणाः प्रीयन्ताम् । ब्रह्मपुरोगाः सर्वे वेदाः प्रीयन्ताम् । वसिष्ठपुरोगा ऋषिगणाः प्रीयन्ताम् । अरुन्धतीपुरोगा एकपत्न्यः प्रीयन्ताम् । ब्रह्म च ब्राह्मणाश्च प्रीयन्ताम् । श्रीसरस्वत्यौ प्रीयेताम् । श्रद्धामेधे प्रीयेताम् । भगवती कात्यायनी प्रीयताम् । भगवती माहेश्वरी प्रीयताम् । भगवती पुष्टिकरी प्रीयताम् । भगवती तुष्टिकरी प्रीयताम् । भगवती वृद्धिकरी प्रीयताम् । भगवती ऋद्धिकरी प्रीयताम् । भगवन्तौ विघ्नविनायकौ प्रीयेताम् । भगवान्स्वामी महासेनः सपत्नीकः ससुतः सपार्षदः सर्वस्थानगतः प्रीयताम् । हरिहरहिरण्यगर्भाः प्रीयन्ताम् ॥ सर्वा ग्रामदेवताः प्रीयन्ताम् ॥ सर्वाः कुलदेवताः प्रीयन्ताम् ॥ सर्वा इष्टदेवताः प्रीयन्ताम् ॥ हता ब्रह्मद्विषः ॥ हताः परिपन्थिनः ॥ हता अस्य कर्मणो विघ्नकर्तारः ॥ शत्रवः पराभवं यान्तु ॥ शाम्यन्तु घोराणि ॥ शाम्यन्तु पापानि ॥ शाम्यन्त्वीतयः ॥ शुभानि वर्धन्ताम् ॥ शिवा आपः सन्तु ॥ शिवा ऋतवः सन्तु ॥ शिवा अग्नयः सन्तु ॥ शिवा ओषधयः सन्तु ॥ शिवा वनस्पतयः सन्तु ॥ शिवा अतिथयः सन्तु ॥ अहोरात्रे शिवे स्याताम् ॥ शुक्राङ्गारकबुधबृहस्पतिशनैश्चरराहुकेतुसोमसहिता आदित्यपुरोगाः सर्वे ग्रहाः प्रीयन्ताम् ॥ भगवान्नारायणः प्रीयताम् ॥ भगवान्पर्जन्यः प्रीयताम् ॥ भगवान्स्वामीमहासेनः प्रीयताम् ॥ पुण्याहकालान्वाचयिष्ये ॥ वाच्यताम् ॥ ब्राह्मं पुण्यमहर्यच्च स्वस्त्युत्पादनकारकम् ॥ वेदवृक्षोद्भवं नित्यं तत्पुण्याहं ब्रुवन्तु नः ॥ १ ॥ दीयन्ते यत्र दानानि पूज्यन्ते च द्विजातयः ॥ दृश्यते यत्र माङ्गल्यं तत्पुण्याहं सदास्तु मे ॥ २ ॥ मम गृहेऽस्य कर्मणः पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु ॥ स्वस्ति पुण्याहमिति त्रिर्विप्राः ॥ ततः । स्वस्ति या चाविनाशाख्या पुण्यकल्याणवृद्धिदा ॥ विनायकप्रिया नित्यं तां स्वस्तिं भो ब्रुवन्तु नः ॥ १ ॥ मम गृहे स्वस्ति भवन्तो ब्रुवन्तु ॥ आयुष्मते स्वस्तीति त्रिर्विप्राः ॥ सागरस्य तु या ऋद्धिर्महालक्ष्म्यादिभिः कृता ॥ सम्पूर्णा पूर्णचन्द्रे या तामृद्धिं भो ब्रु-

वन्तु नः ॥ १ ॥ मम गृहे ऋद्धिं भवन्तो ब्रुवन्तु ॥ ऋद्ध्यतामिति त्रिर्विप्राः ॥ पृथिव्यामुद्धृतायां तु यत्कल्याणं पुरा कृतम् ॥ ऋषिभिः सिद्धगन्धर्वैस्तत्कल्याणं ब्रुवन्तु नः ॥ १ ॥ मम गृहे कल्याणं भवन्तो ब्रुवन्तु ॥ कल्याणमिति त्रिर्विप्राः ॥ ततः क्षीरोदधिसमुद्भूता मथ्यमाने महोदधौ ॥ विष्णोश्चैव प्रिया नित्यं तां श्रियं भो ब्रुवन्तु नः ॥ १ ॥ मम गृहे श्रीरस्त्विति भवन्तो ब्रुवन्तु ॥ अस्तु श्रीरिति तैरुक्ते ॥ वर्षशतं पूर्णमस्तु ॥ शिवमस्तु ॥ वंशाभिवृद्धिरस्तु ॥ प्रजापतिः प्रीयताम् ॥ ततो विप्राः ॥ सुरास्त्वामभिषिञ्चन्तु ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥ वासुदेवो जगन्नाथस्तथा सङ्कर्षणो विभुः ॥ १ ॥ प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च भवन्तु विजयाय ते ॥ आखण्डलोऽग्निर्भगवान्यमो वै निर्ऋतिस्तथा ॥ २ ॥ वरुणः पवनश्चैव धनाध्यक्षस्तथा शिवः ॥ ब्रह्मणा सहिताः सर्वे दिक्पालाः पान्तु ते सदा ॥ ३ ॥ कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिर्मेधा पुष्टिः श्रद्धा क्रिया मतिः ॥ बुद्धिर्लज्जा वपुःशान्तिः कान्तिस्तुष्टिश्च मातरः ॥ ४ ॥ एतास्त्वामभिषिञ्चतु देवपत्न्यः समागताः ॥ आदित्यश्चन्द्रमा भौमो बुधजीवसितार्कजाः ॥ ५ ॥ ग्रहास्त्वामभिषिञ्चन्तु राहुः केतुश्च तर्पिताः ॥ देवदानवगन्धर्वा यक्षराक्षसपन्नगाः ॥ ६ ॥ ऋषयो मुनयो गावो देवमातर एव च ॥ देवपत्न्यो द्रुमा नागा दैत्याश्चाप्सरसां गणाः ॥ ७ ॥ अस्त्राणि सर्वशस्त्राणि राजानो वाहनानि च ॥ औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये ॥ ८ ॥ सरितः सागराः शैलास्तीर्थानि जलदा नदाः ॥ एतेत्वामभिषिञ्चन्तु सर्वकामार्थसिद्धये ॥ ९ ॥ इत्याद्यैः पूर्वोक्तैरभिषिञ्चेयुः ॥ तत्र पत्नी वामे ॥ ततः करोतु स्वस्ति ते ब्रह्मेत्याद्यैः पूर्वोक्तैर्यजमानस्य नीराजनतिलकौ आशीर्वादश्च ॥ एवं सर्वत्र ॥ इति कमलाकरभट्टकृतौ शूद्रस्य पुण्याहवाचनम् ॥

## संस्कारादिप्रकरणम् २.

यानंतर शूद्राचे गर्भाधानादि सर्व संस्कारप्रयोग सांगतो.

ते प्रयोग सांगण्यापूर्वी सर्व कर्मास अंगभूत असणारें पुण्याहवाचन आचारानुसार सांगतो. याविषयीं **व्यास**–"गंधपुष्पादिकांनीं ब्राह्मणांचें पूजन करून पुण्याहवाचन करावें. हें पुण्याहवाचन प्रत्येक काम्य[1], व मांगलिक[2] कर्मांत, तसेंच लढाईस जातेवेळीं, व अद्भुत[3]-दर्शन झालें असतां अवश्य करावें." असें ह्मणतो. **यम**–"ब्राह्मणाविषयीं ओंकारसहित (**ॐ पुण्याहम्**), क्षत्रियांविषयीं ओंकाररहित (**पुण्याहम्**), वैश्याविषयीं उपांशु (हळू), आणि शूद्राविषयीं स्वस्ति (**स्वस्ति पुण्याहम्**) असें पठण करावें." असें ह्मणतो. प्रथम पुण्याहवाचनकर्त्यानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें आचमन करून, "**सुमुखश्चै-**

१ पुत्र इत्यादिकांच्या प्राप्तीच्या उद्देशानें जें करितात त्या कर्मास काम्य असें ह्मणतात.

२ विवाह, मौंजी इत्यादि कर्मै मंगलकार्यै होत.

३ काकमैथुन इत्यादिकांचें दर्शन यांस अद्भुत ह्मणतात. हीं **शान्तिसार** इत्यादि ग्रंथांत सविस्तर वर्णिलीं आहेत.

४ "पुण्याहवाचन" याचा व्युत्पत्त्यर्थ असा आहे कीं, ज्या दिवशीं मांगलिक इत्यादि कर्मे कर्तव्य असतात तो दिवस पुण्यकारक आहे, असें ब्राह्मणाकरवीं ह्मणवायाचें. जसें–पुण्य ह्म० पुण्य-

**कदंतश्च०"** इत्यादि **श्लोक** ह्मणून, देशकालादिसंकीर्तन करून,–**अमुकं**–( येथें जें कर्तव्य कर्म असेल त्याचा उच्चार करावा.) **कर्म करिष्ये ।** असें ह्मणून उदक सोडावें. नंतर–**तदंगतया गणेशपूजनं पुण्याहवाचनं च करिष्ये ।** असें ह्मणून उदक सोडावें. नंतर गणेशपूजन करावें. तें,–**"हे हेरंब त्वमेह्येहि अम्बिकात्र्यम्बकात्मज ॥ सिद्धिबुद्धियुत त्र्यक्ष सर्वलोकपितः पितः ॥ १ ॥ नागास्य नागहार त्वं गणनाथ चतुर्भुज ॥ भूषितः स्वायुधैर्दिव्यैः पाशांकुशपरश्वधैः ॥ २ ॥ आवाहयामि पूजाऽर्थं रक्षार्थं च मम क्रतोः ॥ इहागत्य गृहाण त्वं पूजां रक्ष च मे क्रतुम्" ॥ ३ ॥** ह्या तीन मंत्रांनीं गणपतीचें आवाहन करून, त्याचें सोळा उपचा-

---

कारक अहः ह्म० दिवस तें पुण्याह, त्याचें वाचन ह्म० बोलविणें तें पुण्याहवाचन. तें ब्राह्मणाचे घरीं **"ओं पुण्याहम्"** व शूद्राचे घरीं **"स्वस्ति पुण्याहम्"** असें ह्मणावें, असा याचा आशय आहे. ५ याविषयीं पृ० ६८ टी० १ पहा.

१ येथें सर्व कर्मारंभीं जे श्लोक वगैरे ह्मणावयाचे त्यांचें मूळांत हें केवळ प्रतीक घेतलें आहे; तेवढ्यानें ज्यांला ते येत नसतील त्यांचा निर्वाह होणार नाहीं याकरितां ते साद्यंत खालीं लिहितों.—

**०कपिलो गजकर्णकः ॥ लम्बोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ॥ १ ॥ धूम्रकेतुर्गणाध्यक्षो भालचन्द्रो गजाननः ॥ द्वादशैतानि नामानि यः पठेच्छृणुयादपि ॥ २ ॥ विद्यारम्भे विवाहे च प्रवेशे निर्गमे तथा ॥ सङ्ग्रामे सङ्कटे चैव विघ्नस्तस्य न जायते ॥ ३ ॥ शुक्लाम्बरधरं देवं शशिवर्णं चतुर्भुजम् ॥ प्रसन्नवदनं ध्यायेत्सर्वविघ्नोपशान्तये ॥ ४ ॥ अभीप्सितार्थसिद्ध्यर्थं पूजितो यः सुरासुरैः ॥ सर्वविघ्नहरस्तस्मै (श्री) गणाधिपतये नमः ॥ ५ ॥ सर्वमङ्गलमाङ्गल्ये शिवे सर्वार्थसाधिके ॥ शरण्ये त्र्यम्बके गौरि नारायणि नमोस्तु ते ॥ ६ ॥ सर्वदा सर्वकार्येषु नास्ति तेषाममङ्गलम् ॥ येषां हृदिस्थो भगवान्मङ्गलायतनं हरिः ॥ ७ ॥ तदेव लग्नं सुदिनं तदेव ताराबलं चन्द्रबलं तदेव ॥ विद्याबलं दैवबलं तदेव लक्ष्मीपते तेंऽघ्रियुगं स्मरामि ॥ ८ ॥ यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ॥ तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ९ ॥ सर्वेष्वारब्धकार्येषु त्रयस्त्रिभुवनेश्वराः ॥ देवा दिशन्तु नः सिद्धिं ब्रह्मेशानजनार्दनाः ॥ १० ॥ लक्ष्मीनारायणाभ्यां नमः । उमामहेश्वराभ्यां नमः । शचीपुरन्दराभ्यां नमः । मातापितृभ्यां नमः । इष्टदेवताभ्यो नमः । कुलदेवताभ्यो नमः । सर्वेभ्यो देवेभ्यो नमः । सर्वेभ्यो ब्राह्मणेभ्यो नमो नमः ॥ श्रीमद्भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वतमन्वन्तरे अष्टाविंशतितमे कलियुगे प्रथमचरणे जम्बूद्वीपे भरतवर्षे बौद्धावतारे अमुकदेशे अमुकक्षेत्रे अमुकशके वर्तमानव्यावहारिक०** एथपर्यंत ह्मणून चालू वर्ष, अयन, ऋतु, महिना, पक्ष, तिथि, वार, नक्षत्र, योग, करण, व ग्रहांचीं स्थानें वगैरे यांचा उल्लेख करून, **एवङ्गुणविशेषविशिष्टायां पुण्यतिथौ परमेश्वराज्ञारूपसकलपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं०** । हें पूर्वीं ह्मणून मग कर्तव्यकर्माचा उल्लेख करून उदक सोडावें.

रांनीं पूजन करावें. नंतर एका पात्रांत गंध, पुष्प, फल, यांनीं युक्त असें अर्घ्य घेऊन,— **"रक्ष रक्ष गणाध्यक्ष देव त्रैलोक्यरक्षक ॥ भक्तानामभयंकर्ता त्राता भव भवार्णवात् ॥ १ ॥ द्वैमातुर कृपासिन्धो देव षाण्मातुराग्रज ॥ वरदस्त्वं वरं देहि वांछितार्थप्रदो भव ॥ २ ॥ अनेन फलदानेन फलदो भव मे प्रभो"** ॥ इत्यादि मंत्र ह्मणून अर्घ्य द्यावें; आणि, **"वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ ॥ निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा"** ॥ हा मंत्र ह्मणून अथवा, **"विघ्नेश्वराय वरदाय सुरप्रियाय लम्बोदराय सकलाय जगद्धिताय ॥ नागाननाय सितसर्पविभूषिताय गौरीसुताय गणनाथ नमो नमस्ते ॥ १ ॥ भक्तार्तिनाशनपराय गणेश्वराय सर्वेश्वराय शुभदाय सुरेश्वराय ॥ विद्याधराय विकटाय च वामनाय भक्तप्रसन्नवरदाय नमो नमस्ते ॥ २ ॥ नमस्ते ब्रह्मरूपाय विष्णुरूपाय ते नमः ॥ नमस्ते शिवरूपाय करिरूपाय ते नमः" ॥ ३ ॥** या तीन मंत्रांनीं प्रार्थना करावी. नंतर आपल्यापुढें धान्याचे दोन राशी करून त्यांवर २ कलश ठेवून त्यांत गंध, दूर्वा, पंचपल्लव, फल, सोनें, पंचरत्नें घालून, त्यांवर धान्यांनीं भरलेलीं २ पूर्णपात्रें ( ताह्मणें ) ठेवून, तेथें, **"पाशहस्तं च वरुणमम्भसां पतिमीश्वरम् ॥ आवाहयामि यज्ञेस्मिन्पूजेयं प्रतिगृह्यताम्"** या मंत्रानें वरुणाचें आवाहन करून **"कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः ॥ मूले त्वत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः ॥ १ ॥ कुक्षौ तु सागराः सर्वे सप्तद्वीपा वसुन्धरा ॥ ऋग्वेदोऽथ यजुर्वेदः सामवेदो ह्यथर्वणः ॥ २ ॥ अंगैश्च सहिताः सर्वे कलशं तु समाश्रिताः ॥ अत्र गायत्री सावित्री शांतिः पुष्टिकरी तथा ॥ ३ ॥ आयान्तु मम शान्त्यर्थं दुरितक्षयकारकाः ॥ गंगे च यमुने चैव गोदावरि सरस्वति ॥ ४ ॥ नर्मदे सिंधु कावेरि जलेऽस्मिन्संन्निधिं कुरु ॥ ५ ॥ सर्वे समुद्राः सरितस्तीर्थानि जलदानदाः ॥ आयान्तु मम शान्त्यर्थं दुरितक्षयकारकाः"** ॥ या मंत्रांनीं प्रार्थना करून, **मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव ।** असें ह्मटल्यावर, यजमानानें भूमीवर गुडघे टेंकून कमलाच्या कळ्यासारखा अंजली करून मस्तकावर ठेवून, त्यांत उजव्या हातानें उदकपूर्ण कलश, धारण करून, आशीर्वादार्थ ब्राह्मणांची प्रार्थना करावी. ती असी कीं;—**एताः सत्या आशिषः सन्तु । दीर्घा नागा नद्यो गिरयस्त्रीणि विष्णुपदानि च तेनायुःप्रमाणेन पुण्याहं दीर्घमायुरस्तु । शिवा आपः सन्तु । सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु ।** येथपर्यंत ब्राह्मणांनीं ह्मणावें. मग यजमानानें—**गन्धाः पान्तु** असें ह्मटल्यावर, विप्रांनीं—**सौमंगल्यं चास्तु;** असें ह्मणावें. असेंच यजमानानें—**अक्षताः पान्तु,** ब्राह्मणांनीं **आयुष्यमस्तु**—

१ "हीं वाक्यें ह्मणत असतां प्रत्येक वाक्याच्या अंतीं स्थापित कलशांवर अक्षता टाकाव्या" असें **नारायणभट्टानें** सांगितलें आहे, व शिष्टसंप्रदायही असाच आहे.

यज०—**पुष्पाणि पान्तु,** ब्रा०—**सौश्रियमस्तु;** यज०—**तांबूलानि पान्तु,** ब्रा०—**ऐश्वर्यमस्तु;** यज०—**दक्षिणाः पान्तु,** ब्रा०—**बहुदेयं चास्तु.** असें यजमान, व ब्राह्मण यांनीं ह्मणावें. नंतर यजमानानें ब्राह्मणांस अक्षता देऊन,—**यं कृत्वा सर्ववेदक्रियाकरणकर्मारम्भाः शुभाः शोभनाः प्रवर्तन्ते तमहं नत्वा भवद्भिरनुज्ञातः पुण्यं पुण्याहं वाचयिष्ये** येथपर्यंत ह्मणावें. मग ब्राह्मणांनीं—**वाच्यताम्** ह्मटलें असतां; **"मा विघ्नं मा च मे पापं मा सन्तु परिपन्थिनः ॥ सौम्या भवन्तु सुखिनः सर्वे लोकाः सुखावहाः"** ॥ असें कर्त्यानें ह्मणावें. ब्राह्मणांनीं—**तथास्तु** असें ह्मणून,—**"करोतु स्वस्ति ते ब्रह्मा स्वस्ति वापि द्विजातयः ॥ सरीसृपाश्च ये श्रेष्ठास्तेभ्यस्ते स्वस्ति सर्वदा ॥ १ ॥ ययातिर्नहुषश्चैव धुन्धुमारो भगीरथः ॥ तुभ्यं राजर्षयः सर्वे स्वस्ति कुर्वन्तु नित्यशः ॥ २ ॥ स्वस्ति तेस्तु द्विपादेभ्यश्चतुष्पादेभ्य एव च ॥ स्वस्त्यस्त्वपादकेभ्यश्च सर्वेभ्यः स्वस्ति सर्वदा ॥ ३ ॥ स्वाहा स्वधा शची चैव स्वस्ति कुर्वन्तु ते सदा ॥ लक्ष्मीररुन्धती चैव कुरुतां स्वस्ति ते सदा ॥ ४ ॥ असितो देवलश्चैव विश्वामित्रस्तथाङ्गिराः ॥ स्वस्ति तेऽद्य प्रयच्छन्तु कार्तिकेयश्च षण्मुखः ॥ ५ ॥ विवस्वान्भगवान्स्वस्ति करोतु तव सर्वशः ॥ दिग्गजाश्चैव चत्वारः क्षितिश्च गगनं ग्रहाः ॥ ६ ॥ अधस्ताद्धरणीं योसौ नागो धारयते सदा ॥ शेषश्च पन्नगश्रेष्ठः स्वस्ति तुभ्यं प्रयच्छतु"** ॥ येथपर्यंत ७ मंत्र ह्मणावे. नंतर कर्त्यानें—**ब्राह्मणाः मनः समाधीयताम्** असें ह्मटलें असतां, विप्रांनीं—**समाहितमनसः स्मः** असें ह्मणावें. आणखी यजमानानें—**प्रसीदन्तु भवन्तः,** ब्राह्मणांनीं—**प्रसन्नाः स्मः** असें ह्मटल्यावर स्थापित कलशांतील पाण्याची धार ताह्मणांत सोडीत असतां, **शांतिरस्तु । पुष्टिरस्तु । तुष्टिरस्तु । वृद्धिरस्तु । अविघ्नमस्तु । आयुष्यमस्तु । आरोग्यमस्तु । शिवं कर्मास्तु । कर्मसमृद्धिरस्तु । पुत्रसमृद्धिरस्तु । धनधान्यसमृद्धिरस्तु । इष्टसम्पदस्तु । अरिष्टनिरसनमस्तु । यत्पापं तत्प्रतिहतमस्तु । यच्छ्रेयस्तदस्तु । उत्तरे कर्मण्यविघ्नमस्तु । उत्तरोत्तरमहरहरभिवृद्धिरस्तु । उत्तरोत्तराः क्रियाः शुभाः शोभनाः सम्पद्यन्ताम् । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रसम्पदस्तु । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रग्रहलग्नादिदेवताः प्रीयन्ताम् । दुर्गापाञ्चाल्यौ प्रीयेताम् । अग्निपुरोगा विश्वेदेवाः प्रीयन्ताम् । इन्द्रपुरोगा मरुद्गणाः प्रीयन्ताम् । ब्रह्मपुरोगाः सर्वे वेदाः प्रीयन्ताम् । वसिष्ठपुरोगा ऋषिगणाः प्रीयन्ताम् । अरुन्धतीपुरोगा एकपत्न्यः प्रीयन्ताम् । ब्रह्म च ब्राह्मणाश्च प्रीयन्ताम् । श्रीसरस्वत्यौ प्रीयेताम् । श्रद्धामेधे प्रीयेताम् । भगवती कात्यायनी प्रीयताम् । भगवती माहेश्वरी प्रीयताम् । भगवती पुष्टिकरी प्रीयताम् । भगवती तुष्टिकरी प्रीय-**

१ हीं वाक्यें सर्वांनीं मिळून ह्मणावीं. असा **प्रयोगपारिजात**कर्त्यांचा आशय असावा असें दिसतें.

ताम् । भगवती वृद्धिकरी प्रीयताम् । भगवती ऋद्धिकरी प्रीयताम् । भगवन्तौ विघ्नविनायकौ प्रीयेताम् । भगवान्स्वामी महासेनः सपत्नीकः ससुतः सपार्षदः सर्वस्थानगतः प्रीयताम् । हरिहरहिरण्यगर्भाः प्रीयन्ताम् । सर्वा ग्रामदेवताः प्रीयन्ताम् । सर्वाः कुलदेवताः प्रीयन्ताम् । सर्वा इष्टदेवताः प्रीयन्ताम् । हता ब्रह्मद्विषः । हताः परिपन्थिनः । हता अस्य कर्मणो विघ्नकर्तारः । शत्रवः पराभवं यान्तु । शाम्यन्तु घोराणि । शाम्यन्तु पापानि । शाम्यन्त्वीतयः । शुभानि वर्धन्ताम् । शिवा आपः सन्तु । शिवा ऋतवः सन्तु । शिवा अग्नयः सन्तु । शिवा ओषधयः सन्तु । शिवा वनस्पतयः सन्तु । शिवा अतिथयः सन्तु । अहोरात्रे शिवे स्याताम् । शुक्राङ्गारकबुधबृहस्पतिशनैश्चरराहुकेतुसोमसहिता आदित्यपुरोगाः सर्वे ग्रहाः प्रीयन्ताम् । भगवान्नारायणः प्रीयताम् । भगवान्पर्जन्यः प्रीयताम् । भगवान्स्वामी महासेनः प्रीयताम् । पुण्याहकालान्वाचयिष्ये ॥ येथपर्यंत ह्मणावें. नंतर द्विजांनीं—वाच्यताम् असें प्रतिवचन दिल्यावर, यजमानानें—"ब्राह्मं पुण्यमहर्यच्च सृष्ट्युत्पादनकारकम् ॥ वेदवृक्षोद्भवं नित्यं तत्पुण्याहं ब्रुवन्तु नः ॥ १ ॥ दीयन्ते यत्र दानानि पूज्यन्ते च द्विजातयः ॥ दृश्यते यत्र माङ्गल्यं तत्पुण्याहं सदास्तु मे" ॥२॥ असे २ मंत्र ह्मणून—मम गृहे अस्य कर्मणः पुण्याहं भवन्तो ब्रुवन्तु असें ह्मणावें. विप्रांनीं—स्वस्ति पुण्याहम् असें ३ वेळ ह्मणावें. नंतर यजमानानें—"स्वस्तिर्या चाविनाशाख्या पुण्यकल्याणवृद्धिदा ॥ विनायकप्रिया नित्यं तां स्वस्ति भो ब्रुवन्तु नः" ॥ हा मंत्र ह्मणून—मम गृहे स्वस्ति भवन्तो ब्रुवन्तु असें ह्मटल्यावर विप्रांनीं—आयुष्मते स्वस्ति असें ३ वेळ ह्मणावें. पुनः यजमानानें—"सागरस्य तु या ऋद्धिर्महालक्ष्म्यादिभिः कृता ॥ सम्पूर्णा पूर्णचन्द्रे या तामृद्धिं भो ब्रुवन्तु नः" ॥ हा मंत्र ह्मणून—मम गृहे ऋद्धिं भवन्तो ब्रुवन्तु असें ह्मटल्यावर विप्रांनीं—ऋद्ध्यताम् असें ३ वेळ ह्मणावें. यजमानानें—"पृथिव्यामुद्धृतायां तु यत्कल्याणं पुरा कृतम् ॥ ऋषिभिः सिद्धगन्धर्वैस्तत्कल्याणं ब्रुवन्तु नः" हा मंत्र ह्मणून—मम गृहे कल्याणं भवन्तो ब्रुवन्तु असें ह्मटल्यावर विप्रांनीं—कल्याणम् असें ३ वेळ ह्मणावें. नंतर—"क्षीरोदधिसमुद्भूता मथ्यमाने महोदधौ ॥ विष्णोश्चैव प्रिया नित्यं तां श्रियं भो ब्रुवन्तु नः" ॥ हा मंत्र ह्मणून—मम गृहे श्रीरस्त्विति भवन्तो ब्रुवन्तु असें ह्मटल्यावर,—अस्तु श्रीः असें ब्राह्मणांनीं ३ वेळ ह्मणून—"वर्षशतं पूर्णमस्तु । शिवमस्तु । वंशाभिवृद्धिरस्तु । प्रजापतिः प्रीयताम् ॥ असें ह्मणावें. नंतर विप्रांनीं पूजन केलेल्या कलशांतील पाणी एका ताह्मणांत घेऊन, दोन विप्रांनीं त्या पाण्यानें यजमानास अभिषेक करावा. त्या वेळीं—"सुरास्त्वामभिषिंचन्तु ब्रह्मविष्णुमहेश्वराः ॥ वासुदेवो जगन्नाथस्तथा सङ्कर्षणो विभुः ॥ १ ॥ प्रद्युम्नश्चानिरुद्धश्च भवन्तु विजयाय ते ॥ आखण्डलोऽग्निर्भगवान्यमो वै निर्ऋतिस्तथा

॥ २ ॥ वरुणः पवनश्चैव धनाध्यक्षस्तथा शिवः ॥ ब्रह्मणा सहिताः सर्वे दिक्पालाः पान्तु ते सदा ॥ ३ ॥ कीर्तिर्लक्ष्मीर्धृतिर्मेधा पुष्टिः श्रद्धा क्रिया मतिः ॥ बुद्धिर्लज्जा वपुः शान्तिः कान्तिस्तुष्टिश्च मातरः ॥ ४ ॥ एतास्त्वामभिषिञ्चन्तु देवपत्न्यः समागताः ॥ आदित्यश्चन्द्रमा भौमो बुधजीवसितार्कजाः ॥ ५ ॥ ग्रहास्त्वामभिषिञ्चन्तु राहुः केतुश्च तर्पिताः ॥ देवदानवगन्धर्वा यक्षराक्षसपन्नगाः ॥ ६ ॥ ऋषयो मुनयो गावो देवमातर एव च ॥ देवपत्न्यो द्रुमा नागा दैत्याश्चाप्सरसां गणाः ॥ ७ ॥ अस्त्राणि सर्वशस्त्राणि राजानो वाहनानि च ॥ औषधानि च रत्नानि कालस्यावयवाश्च ये ॥ ८ ॥ सरितः सागराः शैलास्तीर्थानि जलदा नदाः ॥ एते त्वामभिषिञ्चन्तु सर्वकामार्थसिद्धये" ॥ ९ ॥ येथपर्यंत ९ मंत्र, आणि पूर्वी सांगितलेले **"करोतु स्वस्ति ते ब्रह्मा०"** ॥ इत्यादि ७ मंत्र यांनीं अभिषेक करावा. अभिषेकाच्या वेळीं यजमानाच्या डाव्या बाजूस यजमानस्त्री असावी. नंतर, **"करोतु स्वस्ति ते ब्रह्मा०"** ॥ या मंत्रांनीं यजमानास त्याच्या घरांतील कोणी सुवासिनीनें आरती दाखवावी. तसाच पुरोहितानें या मंत्रांनीं यजमानास कुंकुमाचा तिलक लावावा. ब्राह्मणांनीं याच मंत्रांनीं आशीर्वाद द्यावा. याप्रमाणें कोणत्याही कर्मांत **पुण्याहवाचन** करणें तें असेंच करावें. ॥ **इति पुण्याहवाचनप्रयोगः** ॥

## अथ मातृकापूजनम्.

ततः कर्ता तंडुलपुंजेषु ॥ गौरी पद्मा शची मेधा सावित्री विजया जया ॥ देवसेना स्वधा स्वाहा मातरो लोकमातरः ॥ १ ॥ धृतिः पुष्टिस्तथा तुष्टिरात्मनः[1] कुलदेवता ॥ गणेशेनाधिका ह्येता वृद्धौ पूज्यास्तु षोडश ॥ २ ॥ ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा ॥ वाराही च तथेन्द्राणी चामुण्डाः सप्त मातर इति ॥ गणेशपूर्वका गौर्यादिषोडश ब्राह्मयादिसप्त च नामभिर्मातॄरावाह्य । कुड्ये घृतेन पञ्च सप्त वा धाराः कृत्वा । वसुधारायै नम इत्यावाह्य । षोडशोपचारैः सम्पूज्य । नान्दीश्राद्धं कुर्यात् ॥

आतां मातृकापूजन सांगतो.

वर सांगितल्याप्रमाणें पुण्याहवाचन केल्यावर, कर्त्यानें तांदुळांचे २४ पुंजके करून. त्यांवर मातृका वगैरे देवतांचें अवाहन करावें. तें असें कीं,—**गौर्यै नमः । गौरीं आवाहयामि १ पद्मायै नमः । पद्मां आवाहयामि २ शच्यै नमः । शचीं आवाहयामि ३ मेधायै नमः । मेधां आवाहयामि ४ सावित्र्यै नमः । सावित्रीं आवाहयामि ५ विजयायै नमः । विजयां आवाहयामि ६ जयायै नमः । जयां आवाहयामि ७ देवसेनायै नमः । देवसेनां आवाहयामि ८ स्वधायै नमः । स्वधां आवाहयामि ९ स्वाहायै नमः । स्वाहां आवाहयामि १० मातृभ्यो नमः । मातृः आवाहयामि ११ लोकमातृभ्यो नमः । लोकमातृः आवाहयामि १२ धृत्यै नमः । धृतिं आवाहयामि १३ पुष्ट्यै नमः । पुष्टिं आ-**

१ आत्मदेवतया सहेति प्रयोगरत्नधृतः पाठः । तत्रापि आत्मदेवता स्वकुलदेवतेति ज्ञेयम्.

**वाहयामि १४ तुष्ट्यै नमः । तुष्टिं आवाहयामि १५ मम कुलदेवतायै नमः । कुलदेवतां आवाहयामि १६** या सोळा; आणि,—**ब्राह्यै नमः । ब्राह्मीं आवाहयामि १ माहेश्वर्यै नमः । माहेश्वरीं आवाहयामि २ कौमार्यै नमः ॥ कौमारीं आवाहयामि ३ वैष्णव्यै नमः । वैष्णवीं आवाहयामि ४ वाराह्यै नमः । वाराहीं आवाहयामि ५ इंद्राण्यै नमः । इंद्राणीं आवाहयामि ६ चामुंडायै नमः । चामुंडां आवाहयामि ७** या सात, आणि—**गणपतये नमः । गणपतिं आवाहयामि १** ही एक मिळून या २४ देवतांचें आवाहन करून; भिंतीवर तुपाच्या पांच, किंवा सात धारा करून,—**वसुधारायै नमः । वसुधारां आवाहयामि** असें आवाहन करून,—"**गौरी पद्मा शची मेधा सावित्री विजया जया ॥ देवसेना स्वधा स्वाहा मातरो लोकमातरः ९ धृतिः पुष्टिस्तथा तुष्टिरात्मनः कुलदेवता ॥ गणेशेनाधिका ह्येता वृद्धौ पूज्यास्तु षोडश २ ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा ॥ वाराही च तथेन्द्राणी चामुण्डाः सप्त मातरः**" इत्यादि मंत्रांनीं व—**वसुधारायै नमः** याना ममंत्रानें आवाहित देवतांचें षोडशोपचार पूजन करावें. याला मातृकापूजन ह्मणतात. हें झाल्यानंतर नान्दीश्राद्ध करावें.

## अथ नान्दीश्राद्धम्.

यथा ॥ सर्वं सव्येन देवतीर्थेन यवैश्च पित्र्येपि ॥ मात्रादित्रयपित्रादित्रयमातामहादित्रयसम्बन्धिनान्दीमुखसत्यवसुसंज्ञकविश्वेदेवस्थाने भवद्भ्यां क्षणः कर्तव्यः ॥ प्राप्नुतां भवन्तौ प्राप्नुवावेति द्वौ विप्रौ कुशचटौ वा दैवे निधाय । मातृपितामहीप्रपितामहीनां* नान्दीमुखीनां स्थाने इत्यादिना द्वौ । पितृपितामहप्रपितामहानां नान्दीमुखानां स्थाने इत्यादिना द्वौ । मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानां सपत्नीकानां नान्दीमुखानां स्थाने इत्यादिना द्वौ ॥ कोकिलमतानुसारिणां तु । मातृमातामहप्रमातामहा इति मातामहेन

---

* अत्र कमलाकरभट्टचरणैः अमुकदेवीनामित्युक्त्वा दासीनामित्याचार्यचूडामणिरिति मतान्तरमप्युपन्यस्तम् । वर्ततेचैतत्सर्वेष्वादर्शपुस्तकेषु । इदं च मात्रादावेव न पितृमातामहादौ । अग्रे च नात्र नामगोत्रे इति निषेधोपि स्वयमेवोक्तः । दृश्यते चैष निषेधो बहुषु धर्मशास्त्रग्रन्थेषु । भट्टजगद्गुरुचरणैरपि प्रयोगरत्ने । सङ्ग्रहे । शुभाय प्रथमान्तेन वृद्धौ सङ्कल्पमाचरेत् ॥ न षष्ठ्या यदि वा कुर्यान्महादोषोभिजायते ॥ १ ॥ अनस्मद्वृद्धिशब्दानामरूपाणामगोत्रिणाम् ॥ अनाम्नां चातिलाद्यैश्च नान्दीश्राद्धं च सव्यवत् ॥ २ ॥ कारिका च । सम्बन्धनामगोत्रादि वर्जयेदत्र कर्मणि ॥ इत्याद्युक्त्वाग्रे गोत्रोच्चारपूर्वकं मात्राद्युच्चारः कृत इत्युपलब्धसर्वपुस्तकेषु दृश्यते । तेन च स्वोक्तव्याघातदोषापत्तिर्भवति । न च तादृशग्रन्थेष्वेतादृग्भवितुमर्हति । नन्वेवं सति सम्बन्धनामगोत्रादिसमुदायोच्चारस्यैवायं निषेधः । न तेषामन्यतमोच्चारस्येति चेन्न । तादृशप्रमाणोपलब्ध्यभावात् इदानींतनशिष्टाचारविरोधाच्च । तदेष किं प्रमादो वा न वेति सुधियो विदाङ्कुर्वन्त्वित्यलमतिगहनावगाहेन ॥

सह मातुः श्राद्धम् । तदा पार्वणद्वयमेव ॥ नात्र नामगोत्रे ॥ मूलं निर्णयसिन्धौ ज्ञेयम्॥ ततः सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः इदं वः पाद्यम् । एष वोर्घः । एवं मात्राद्याः पित्रादयः मातामहादयश्च इदं वः पाद्यम् ॥ ततः विश्वेदेवाः इदमासनमास्यतां नमः ॥ एवं मात्रादौ ॥ अर्घ्यस्थाने सङ्कल्पसिद्धिरस्तु ॥ विश्वेदेवाः एष वो गन्धः ॥ एवं मात्रादौ ॥ एवं इमानि पुष्पाणि । धूपः । दीपः । आच्छादनम् ॥ एते अमुकेभ्यः गन्धपुष्पधूपदीपाच्छादनान्ताः सर्वे उपचारा भवन्तु ॥ ततोर्धचन्द्रमण्डलमभ्युक्षणं वा कृत्वा । पात्रेष्वामान्नानि द्विगुणानि समानि वा दत्वा । प्रोक्ष्य पात्रमालभ्य यवान्विकीर्याङ्गुष्ठं दत्वा । सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः नान्दीमुखाः इदं वः युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तं द्विगुणमामं सोपस्करं आममूल्यभूतं यथाशक्ति हेम वा सम्प्रददे स्वाहा नमः ॥ एवं मातृपितामहीप्रपितामह्यः नान्दीमुख्यः इदं वः युग्मेत्यादि ॥ पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः इदं वः युग्मेत्यादि ॥ एवं मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहाः सपत्नीकाः नान्दीमुखाः इदं वः इत्यादि ॥ अत्र पिंडाः कृताकृताः ॥ पिण्डपक्षे वेदिं कृत्वा पूर्वाग्रा ले (रे) खाः तिस्रः कृत्वा दर्भानास्तीर्य । मातर्नान्दीमुखि अवनेनिंक्ष्वेति जलं दत्वा ॥ एवं पितामही अव० प्रपितामही अव० ॥ एवं पितः नान्दीमुख अवनेनिंक्ष्वेत्यादि ॥ ततः सक्तुना गुडेन वा दधिबदरयवमिश्रान् पिण्डान् कृत्वा ॥ एतत्ते मातर्नान्दीमुखि एष ते पिण्डः इदमन्नं वा स्वाहा नमः ॥ इत्येकं पिण्डं दत्वापरं तूष्णीं द्वितीयम् । एवमेकैकस्य द्वौ द्वौ दत्वा । पुनः प्रत्यवनेनिंक्ष्वेति प्रत्यवनेजनं प्राग्वद्दत्वाभ्यञ्जनाञ्जने वासांसि दत्वा । शेषमाघ्राय पात्रस्थं परिषिच्य शिवा आपः सन्त्वित्यादि कृत्वैतन्नान्दीश्राद्धकर्मणः साङ्गतासिद्ध्यर्थं द्राक्षामलकयवः तन्निष्क्रयद्रव्यं वा दक्षिणां तुभ्यं सम्प्रददे स्वाहा नमइति ॥ प्रत्येकं दत्वानेन नान्दीश्राद्धेन नान्दीमुखदेवताः प्रीयन्ताम् ॥ माता पितामही चैव तथैव प्रपितामही ॥ पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः ॥ १ ॥ मातामहस्तत्पिता च प्रमातामहकादयः ॥ एते भवन्तु मे प्रीताः प्रयच्छन्तु च मङ्गलमिति सम्प्रार्थ्य पिण्डान्विसृजेत् ॥ इति वृद्धिश्राद्धम् ॥

आतां नान्दीश्राद्धप्रयोग सांगतो.

तो असा कीं, नान्दीश्राद्ध सर्वेहि सव्यानें करावें. त्यांत तिलांच्या ठिकाणीं पितरांसहि तांदूळ द्यावे, आणि सर्व कर्म देवतीर्थानें[1] देवस्थानीं २ ब्राह्मणांस बसवून करावें. **मात्रादित्रयपित्रादित्रयमातामहादित्रयसंबन्धिनान्दीमुखसत्यवसुसंज्ञकविश्वेदे-**

---

१ एका उजव्या हातांत ४ तीर्थें आहेत. तीं असीं कीं; सर्व बोटांचे शेवटीं देवतीर्थ, ( एथें **"तीर्थं शास्त्राध्वरक्षेत्रपात्रोपाध्यायमंत्रिषु"** ह्या **विश्वकोशा**वरून, तीर्थशब्द पात्राचा वाचक घेतला आहे; अतएव, देवतीर्थ ह्म० देवांचें पात्र. जेथें उदक दिलें असतां देवादिकांस पोहोंचतें तें, असाच प्रकृत तीर्थशब्दाचा अर्थ असावा असें वाटतें. ) करंगळी, व अनामिका यांच्या मूळांत प्रजापतितीर्थ; आंगठा, व तर्जनी यांच्या मध्यभागीं पितृतीर्थ; आणि आंगठ्याच्या मूळांत ब्राह्मतीर्थ, असीं चार तीर्थें आहेत. याविषयीं **याज्ञवल्क्य** ह्मणतो कीं, **कनिष्ठातर्जन्यंगुष्ठमूलान्यग्रं करस्य त ॥ प्रजापतिपितृब्रह्मदेवतीर्थान्यनुक्रमात्"** ॥ १ ॥ याची व्यवस्था पुढें सांगूं.

**वस्थाने भवद्भ्यां क्षणः कर्तव्यः ।** यानें त्यांस क्षण[१] द्यावा, आणि—**प्राप्नुतां भवन्तौ** असें ह्मणून प्रत्येक ब्राह्मणांच्या हातास हात लावावा. ब्राह्मणांनीं—**प्राप्नुवाव** असें ह्मणावें. कदाचित या ठिकाणीं द्विज बसविले नसतील तर, दर्भांचे दोन चेट[२] ठेवावे. **मातृपितामहीप्रपितामहीनां* नान्दीमुखीनां स्थाने भवद्भ्यां क्षणः कर्तव्यः ।** असें ह्मणून, पितरांकडेस बसविलेल्या विप्रांस क्षण देऊन,—**प्राप्नुतां भवन्तौ** असें ह्मणून त्यांच्या हातास हात लावावा. **पितृपितामहप्रपितामहानां नान्दीमुखानां स्थाने भवद्भ्यां क्षणः कर्तव्यः** ह्मणून दोघांस[३] क्षण द्यावा. पूर्ववत् **प्राप्नुतां भवन्तौ** असें ह्मणून हस्तस्पर्श करावा. विप्रांनीं—**प्राप्नुवाव** असें ह्मणावें. **मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानां सपत्नीकानां नान्दीमुखानां स्थाने भवद्भ्यां क्षणः कर्तव्यः** असा क्षण दिल्यावर, ब्राह्मणांनीं—**सुकर्तव्यः** असें ह्मणावें. यजमानानें पूर्व-

१ याचा अर्थ—अवसर असा होतो, व त्याच अभिप्रायानें ब्राह्मणांनीं फुरसद घ्यावी ह्मणून, **आसने क्षणः क्रियताम्**" ह्म० या आसनावर स्वस्थ वसावें. असी ही यजमानाची त्यांस प्रार्थना आहे.

२ कांहीं दर्भ घेऊन, त्यांच्या एक प्रकारच्या गांठी करून, त्या पानावर ठेवितात, व त्यांची जशी ब्राह्मणांची पूजा करावी त्याप्रमाणें करितात. त्यांस चट, अथवा दर्भबटु ह्मणतात.

* येथें ग्रन्थकर्त्यानें—"**अमुकदेवीम्**" ह्म० मातृत्रयीचा नामोच्चार करण्यास सांगून त्यापुढें "देवी" शब्द लावला आहे, व पुढें "**दासीनामित्याचार्यचूडामणिः**" ह्म० देवीशब्दस्थानीं "दासी" शब्द लावावा असें **आचार्यचूडामणि**नामक ग्रन्थकर्ता ह्मणतो असें सांगितलें आहे. आह्मी प्राकृत ग्रन्थाचीं लेखी, व छापी जीं पुस्तकें पाहिलीं त्या सर्वांत हा विषय उपलब्ध होतो, व पुढें यानेंच "**नात्र नामगोत्रे**" ह्या श्राद्धांत नांव व गोत्र यांचा उच्चार करूं नये, असा निषेधही लिहिला आहे. नान्दीश्राद्धांत संबंध, नांव, गोत्र, रूप इत्यादिकांचा उच्चार करूं नये असें ज्यांवरून सिद्ध होतें तीं मूलवचनें पृ० ७९ टिपेंत दिलीं आहेत, व हा निषेध धर्मशास्त्रसंबंधीं सर्व ग्रंथकर्त्यांस मान्य आहे. त्यामुळें येथें स्वोक्तव्याघातदोष येतो. कदाचित् पृ० ७९ टी० दिलेल्या वचनांत ज्यांचा निषेध केला आहे, तीं बाकीचीं सर्व उच्चारूं नयेत परंतु नामोच्चारास दोष नाहीं असें ह्मणावें तर, तो पितृत्रयी, व मातामहत्रयीकडेही असावा परंतु तसें नसून तो फक्त मातृत्रयीकडेसच आहे, व **नारायणभट्टां**नीं आपल्या **प्रयोगरत्नां**त पूर्वीं निषेधवचनें घेऊन पुढें प्रयोग सांगतेवेळीं "**अमुकगोत्राणाम्**" असें ह्मटलें आहे. यावरून गोत्रोच्चार करावा असें होतें. तेव्हां नामोच्चारास दोष नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. आतां, पूर्वोक्त **संग्रह**वचनांतील निषेध संबंध नामादिसमुदायोच्चाराचा आहे; त्यांपैकीं एखाद्याचा उच्चार करण्यास दोष नाहीं असें ह्मणावें तर, तसें मानण्यास प्रमाणापेक्षा आहे, व तें मिळत नाहीं, व शिष्टाचारही तसा नाहीं. असल्या महापंडितांच्या ग्रंथांत पूर्वोक्त असण्याचा संभव मुळींच नाहीं. तेव्हां हे नांवाचा, व गोत्राचा उच्चार कां करितात? यांतील तत्वाचा शोध करण्याचें काम सुज्ञ वाचकांवर सोंपवून लेखनीव्यापार पुरे करितों.

३ ह्या श्राद्धांत प्रत्येक पितृस्थानीं दोन दोन ब्राह्मण असावे हा विशेष आहे.

वत्—**प्राभुतौ भवन्तौ** 'ह्मणून हस्तस्पर्श करावा. ब्राह्मणांनीं—**प्राभुवाव** असें प्रतिवचन द्यावें. **कोकिल**नामक ग्रंथकाराच्या मतानें वागणाऱ्यांचें, **मातृमातामहप्रमातामहाः** असा उच्चार करून, मातृपार्वण[1] आणि मातामहपार्वण एकच होतें. तेव्हां पितरांकडे दोनच पार्वणें होतात. या नान्दीश्राद्धांत पितरांचें नांव, व गोत्र यांचा उच्चार नाहीं. यांचीं मूलवचनें **निर्णयसिंधूंत** पहावीं. नंतर, **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः**—( स्वाहा हा शब्द प्रत्येक उपचाराच्या शेवटीं ह्मणावा. ) असें ह्मणून पाद्य द्यावें. **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः एष वोर्घः स्वाहा** असें ह्मणून अर्घ द्यावा. असेंच सव्यानेंच—"**मातृपितामहीप्रपितामह्यः नान्दीमुख्यः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः । पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः । मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहाः नान्दीमुखाः इदं वः पाद्यं स्वाहा नम इयं च वृद्धिः** असें ह्मणून अनुक्रमें प्रत्येकास पाद्य देऊन, पूर्ववत्—**मातृपितामही०** इत्यादि उच्चार करून अर्घ्य द्यावें. नंतर, **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः इदमासनं आस्यतां नमः** ह्मणून देवांस, आणि पूर्ववत् उच्चार करून अनुक्रमानें पितरांस आसन द्यावें. यावेळीं ब्राह्मणानें **सुआसनम्** असें प्रतिवचन द्यावें. नंतर—**सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः अर्घ्यस्थाने संकल्पसिद्धिरस्तु** ह्मणून अर्घ्य द्यावें. ब्राह्मणानें—**अस्तु संकल्पसिद्धिः** असें प्रतिवचन द्यावें. असेंच पितरांसहि द्यावें. **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः पूजार्थे एष वो गन्धः** ह्मणून गंध द्यावें. ब्राह्मणानें,—**सुगन्धः** ह्मणावें. असेंच पितरांसही द्यावें. **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः इमानि वः पुष्पाणि** ह्मणून फुलें द्यावीं. ब्राह्मणानें **सुपुष्पाणि** असें प्रतिवचन द्यावें. असेंच पितरांस. **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः एष वो धूपः** ह्मणून धूप द्यावा. ब्राह्मणानें **सुधूपः** ह्मणावें. असेंच पितरांस. **सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः एष वो दीपः** ह्मणून दीप द्यावा. ब्राह्मणांनीं—**सुदीपः** असें ह्मणावें. असेंच पितरांस—**सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः इदमाच्छादनम्** ह्मणून आच्छादन द्यावें. तें नसल्यास—**आच्छादनार्थे किंचिद्व्यावहारिकं द्रव्यं** ह्मणून द्रव्य द्यावें. असेंच पितरांस द्यावें. नंतर—**सत्यवसुसंज्ञकेभ्यो विश्वेभ्योदेवेभ्यः नान्दीमुखेभ्यः एते गंधपुष्पधूपदीपाच्छादनांताः सर्वे उपचाराः संपूर्णा भवन्तु** ह्मणून देवस्थानीं बसविलेल्या ब्राह्मणांच्या मस्तकांवर अक्षता टाकून हात जोडावे. ब्राह्मणांनीं—**अर्चनविधिष्वर्चितमस्तु** असें ह्मणावें असेंच—**मातृपितामहीप्रपिता-**

---

१ "पार्वण" या शब्दाचा व्युत्पत्त्यर्थ, पर्वणि ह्मणजे–अमावास्या, व पौर्णमासी या तिथींवर भवम् होणारें, अर्थात् कांहीं तरी कर्म, तें पार्वण असा होतो; व **आश्वलायनगृह्यसूत्र** अ० १ कं० १० सू० १ यांतील पार्वण शब्दाचा अर्थ त्याचा वृत्तिकार **गार्ग्यनारायण** यानें असाच केला आहे, परंतु येथें तसा न घेतां बाप, आजा, व पणजा हे तिघेहि मृत झाले असल्यास पार्वण ह्या त्रयीस ह्मणतात असें वाटतें. तसें नातें तर मातृपार्वण, पितृपार्वण असा निर्देश कसा होईल ? याप्रमाणें मातामहादित्रयीसही पार्वण ह्मणतात.

**महीभ्यः ।** **पितृपितामहप्रपितामहेभ्यः । मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहेभ्यः सपत्नीकेभ्यः नान्दीमुखेभ्यः एते गंधपुष्पधूपदीपाच्छादनांताः सर्वे उपचाराः संपूर्णा भवन्तु** म्हणून. पितृस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांवर अक्षता टाकून हात जोडावे. ब्राह्मणांनीं **अर्चनविधिष्वर्चितमस्तु** म्हटल्यानंतर, ब्राह्मणांपुढें अर्धचंद्रासारखें उदकानें मंडल किंवा प्रोक्षण करून, त्यावर द्विगुणित आमान्नें ठेऊन प्रोक्षण करून, पात्रास हस्त लावून, अक्षता टाकून, अन्नावर आंगठा लावून,—**सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवाः नान्दीमुखाः इदं वः युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तं द्विगुणमामं सोपस्करं संप्रददे स्वाहानमः** असें म्हणावें. आमान्न नसेल तर,—**सत्यवसु०**—इत्यादि पूर्ववत् उच्चारून **आममूल्यभूतं यथाशक्ति हेम संप्रददे स्वाहा नमः** असें म्हणून आमान्न किंवा सुवर्ण द्यावें. असेंच **मातृपितामहीप्रपितामह्यः नान्दीमुख्यः इदं वः युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तं द्विगुणमामं** (हेम वा) **संप्रददे स्वाहा नमः** म्हणून पूर्ववत् आमान्न किंवा द्रव्य द्यावें. **पितृपितामहप्रपितामहाः नान्दीमुखाः इदं वः युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तं द्विगुणमामं सोपस्करं संप्रददे स्वाहा नमः** म्हणून पूर्ववत् आमान्न किंवा द्रव्य द्यावें. **मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहाः सपत्नीकाः नान्दीमुखाः इदं वः युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तं द्विगुणमामं सोपस्करं संप्रददे स्वाहा नमः** म्हणून आम किंवा द्रव्य द्यावें. या श्राद्धांत पिंडदान करावें किंवा न करावें असे दोन पक्ष आहेत. करण्याचा पक्ष स्वीकारल्यास मृत्तिकेची वेदी करून तीवर दर्भ अंथरून,—**मातः नान्दीमुखि अवनेनिंक्ष्व** म्हणून अंगुष्ठानें उदक द्यावें. असेंच—**पितामहि अवनेनिंक्ष्व । प्रपितामहि अवनेनिंक्ष्व । पितः नान्दीमुख अवनेनिंक्ष्व । पितामह नान्दीमुख अवनेनिंक्ष्व । प्रपितामह नान्दीमुख अवनेनिंक्ष्व । मातामह नान्दीमुख अवनेनिंक्ष्व । प्रमातामह नान्दीमुख अवनेनिंक्ष्व । वृद्धप्रमातामह नान्दीमुख अवनेनिंक्ष्व** म्हणून उदक द्यावें. पिंड, सातूचें पीठ अथवा गूळ यांत दहीं, बोरें आणि यव मिश्र करून त्याचे करावे. नंतर **एतत्ते मातः नान्दीमुखि एष ते पिंडः**, अथवा—**इदमन्नं स्वाहा नमः** याप्रमाणें म्हणून एक पिंड देऊन तूष्णीं दुसरा पिंड द्यावा. **पितामहि नान्दीमुखि एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २ **प्रपितामहि नान्दीमुखि एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह०२, **पितः नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २, **पितामह नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २, **प्रपितामह नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २, **मातामह नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २, **प्रमातामह नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २; **वृद्धप्रमातामह नान्दीमुख एष ते पिंडः स्वाहा नमः** म्ह० २, असे एकेकास वर सांगितल्याप्रमाणें दोन दोन पिंड देऊन, पुनः प्रत्येकाचा पूर्ववत् उच्चार करून, **प्रत्यवनेनिंक्ष्व** म्हणून, अंगुष्ठानें पाणी द्यावें. नंतर पिंडांस तूप, व काजळ लावून, त्यांस वस्त्रें देऊन पिंडशेष हुंगून पात्रांतील उदक, व गंधादि त्यांस द्यावें. आणि **एतन्नान्दीश्राद्धकर्मणः**

**सांगतासिद्ध्यर्थं द्राक्षामलकयवत्तन्निष्क्रयद्रव्यं वा दक्षिणां तुभ्यमहं संप्रददे स्वाहा नमः** ह्मणून, प्रत्येक ब्राह्मणांस दक्षिणा देऊन, **अनेन नान्दीश्राद्धेन नान्दीमुखदेवताः प्रीयन्ताम्** ह्मणून उदक सोडून हात जोडावे, आणि "**माता पितामही चैव तथैव प्रपितामही ॥ पिता पितामहश्चैव तथैव प्रपितामहः ॥ १ ॥ मातामहस्तत्पिता च प्रमातामहकादयः ॥ एते भवन्तु सुप्रीताः प्रयच्छन्तु च मंगलम्**" या मंत्रांनीं प्रार्थना करून पिंडविसर्जन करावें. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे नान्दीश्राद्धप्रयोगः ॥**

## प्रासङ्गिकम्.

एतदन्तं सर्वत्र संस्कारेषु समानम् ॥ यत्र तु ग्रहयज्ञतुलादौ ऋत्विग्वरणं तत्राचाराच्छरावे ॥ आपः क्षीरं कुशाग्राणि दधि दूर्वाक्षतास्तथा ॥ सर्षपाः कुङ्कुमं चेति अर्घोऽष्टाङ्गः प्रकीर्तित इति ॥ अष्टाङ्गमर्घं कृत्वा पिधाय ॥ स्वागतं भो द्विजश्रेष्ठा मदनुग्रहकारकाः ॥ इदमर्घ्यमिदं पाद्यं भवद्भिः प्रतिगृह्यताम् ॥ १ ॥ इति पादार्घमाचारात्कृत्वाचार्यब्राह्मर्त्विग्वरणं कृत्वा ब्राह्मणान्प्रार्थयेत् ॥ ब्राह्मणाः सन्तु मे शस्ताः पापात्पान्तु समाहिताः ॥ वेदानां चैव दातारः पातारः सर्वदेहिनाम् ॥ १ ॥ जपयज्ञैस्तथा होमैर्दानैश्च विविधैः पुनः ॥ देवानां च पितॄणां च तृप्त्यर्थं याजकाः कृताः ॥ २ ॥ येषां देहे स्थिता वेदाः पावयन्ति जगत्त्रयम् ॥ रक्षन्तु सततं ते मां जपयज्ञे व्यवस्थिताः ॥ ३ ॥ ब्राह्मणा जङ्गमं तीर्थं लोकेषु त्रिषु विश्रुतम् ॥ येषां वाक्योदकेनैव शुद्ध्यन्ति मलिना जनाः ॥ ४ ॥ पावनाः सर्ववर्णानां ब्राह्मणा ब्रह्मरूपिणः ॥ सर्वकर्मरता नित्यं वेदशास्त्रार्थकोविदाः ॥ ५ ॥ श्रोत्रियाः सत्यवाचश्च देवध्यानरताः सदा ॥ यद्वाक्यामृतसंसिक्ता ऋद्धिं यान्ति नरद्रुमाः ॥ ६ ॥ अङ्गीकुर्वन्तु कर्मैतत् कल्पद्रुमसमाशिषः ॥ यथोक्तनियमैर्युक्ता मन्त्रार्थे स्थिरबुद्धयः ॥ ७ ॥ यत्कृपालोचनात्सर्वा ऋद्धयो वृद्धिमाप्नुयुः ॥ मम यज्ञे जपे पूज्याः सन्तु मे नियमान्विताः ॥ ८ ॥ अक्रोधनाः शौचपराः सततं ब्रह्मचारिणः ॥ देवध्यानरता नित्यं प्रसन्नमनसः सदा ॥ ९ ॥ अदुष्टभाषिणः सन्तु मा सन्तु परनिन्दकाः ॥ ममापि नियमा ह्येते भवन्तु भवतामपि ॥ १० ॥ आस्तां प्रासङ्गिकम् ॥

येथपर्यंत सर्व संस्कारांत पुण्याहवाचन वगैरे करावयाचें तें एकसारखेंच; परंतु जेथें ग्रहयज्ञ, तुलादान, इत्यादि कर्मांत ऋत्विज करावयाचे असतात, तेथें आचारानुसार एका शरावांत ( परळांत ) उदक, दूध, दर्भांचीं अग्रें, दहीं, दूर्वा, अक्षता, मोहऱ्या, आणि कुंकूं हीं घालावीं. यास अष्टांग अर्घ्य ह्मणतात. असें करून तो परळ झांकून—"**स्वागतं भो द्विजश्रेष्ठा मदनुग्रहकारकाः ॥ इदमर्घ्यमिदं पाद्यं भवद्भिः प्रतिगृह्य-**

१ हें श्राद्ध मोठ्या कर्मांत पूर्वदिवशीं, व लहानांत त्याच दिवशीं करावें. आणखी एतत्संबंधी विशेष शास्त्रार्थ सांगण्यासारखे बहुत आहेत. परंतु विस्तरभयास्तव ते येथें दिले नाहींत. ज्यांला पहावयाचे असतील त्यांनीं **प्रयोगरत्नां**तील नान्दीश्राद्धप्रकरण, व **आश्वलायनगृह्यपरिशिष्ट** अ० २ कं० १९ हीं पहावी.

**ताम्"** या मंत्रानें यथाचार पादार्घ्य वगैरे देऊन, आचार्य ब्रह्मा इत्यादि ऋत्विज वरून, हात जोडून ब्राह्मणांची प्रार्थना करावी. तिचे मंत्र—"**ब्राह्मणाः सन्तु मे शस्ताः पापात्पान्तु समाहिताः ॥ वेदानां चैव दातारः पातारः सर्वदेहिनाम् ॥ १ ॥ जपयज्ञैस्तथा होमैर्दानैश्च विविधैः पुनः ॥ देवानां च पितृणां च तृप्त्यर्थं याजकाः कृताः ॥ २ ॥ येषां देहे स्थिता वेदाः पावयन्ति जगत्रयम् ॥ रक्षन्तु सततं ते मां जपयज्ञे व्यवस्थिताः ॥ ३ ॥ ब्राह्मणा जङ्गमं तीर्थं लोकेषु त्रिषु विश्रुतम् ॥ येषां वाक्योदकेनैव शुद्ध्यन्ति मलिना जनाः ॥ ४ ॥ पावनाः सर्ववर्णानां ब्राह्मणा ब्रह्मरूपिणः ॥ सर्वकर्मरता नित्यं वेदशास्त्रार्थकोविदाः ॥ ५ ॥ श्रोत्रियाः सत्यवाचश्च देवध्यानरताः सदा ॥ यद्वाक्यामृतसंसिक्ता ऋद्धिं यान्ति नरद्रुमाः ॥ ६ ॥ अङ्गीकुर्वन्तु कर्मैतत्कल्पद्रुमसमाशिषः ॥ यथोक्तनियमैर्युक्ता मन्त्रार्थे स्थिरबुद्धयः ॥ ७ ॥ यत्कृपालोचनात्सर्वा ऋद्धयो वृद्धिमाप्नुयुः ॥ मम यज्ञे जपे पूज्याः सन्तु मे नियमान्विताः ॥ ८ ॥ अक्रोधनाः शौचपराः सततं ब्रह्मचारिणः ॥ देवध्यानरता नित्यं प्रसन्नमनसः सदा ॥ ९ ॥ अदुष्टभाषिणः सन्तु मा सन्तु परनिन्दकाः ॥ ममापि नियमा ह्येते भवन्तु भवतामपि" ॥ १० ॥** येथपर्यंत १० मंत्रांनीं प्रार्थना करावी. हा विशेष येथें प्रसंगानुसार सांगितला आहे. बाकी सर्व पूर्ववत् आहे असें जाणावें.

## अथ गर्भाधानम्.

**तत्राद्ये रजोदर्शने दुष्टवारर्क्षतिथ्यादौ शान्तिं मत्कृतशान्तिरत्नोक्तविधिना कृत्वा आद्यरात्रिचतुष्टयवर्जं समरात्रिषु मत्कृतनिर्णयसिन्धावुक्ते काले तत्कार्यम् ॥ कर्ता सभार्यो देशकालौ स्मृत्वाऽस्यां मम भार्यायां जनिष्यमाणसर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गर्भाधानं करिष्ये इत्युक्त्वा तदङ्गतया गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि प्राग्वत्कृत्वालङ्कृतो नववस्त्रं धृत्वाश्वगन्धारसं दूर्वारसं भार्यादक्षिणनासाबिले सेचयेत् ॥ नीराजितः सूर्यं नमस्कुर्यात् ॥ ततो रात्रौ शय्यायां विष्णवे नमः । एवं त्वष्ट्रे नमः । प्रजापतये नमः । धात्रे नमः । सिनीवाल्यै नमः । सरस्वत्यै नमः । अश्विभ्यां नमः । पर्जन्याय नमः । इति योनिमभिमृश्य स्त्रियं गत्वा ऋतौ स्नायात् ॥ स्त्रिया न स्नानम् ॥ अनृतौ मूत्रवच्छौचाचमने ॥ इति गर्भाधानम्.**

आतां गर्भाधान सांगतो.

यांत, प्रथमरजोदर्शनकालीं दुष्ट वार[1], दुष्ट नक्षत्र[2], दुष्ट तिथि[3], दुष्ट मास यांच्या दोष-

१ रजोदर्शन कोणत्या वारीं शुभ, व अशुभ तें पुढें लिहिल्याप्रमाणें समजावें.—रविवारीं रजोदृष्टा झाल्यास रोगिणी, सोमवारीं पतिव्रता, मंगळवारीं दुःख भोगणारी, बुधवारीं पुत्रवती, गुरुवारीं भाग्यवती, शुक्रवारीं पतिव्रता, शनिवारीं क्लेश भोगणारी होते; अशीं सात वारांचीं फळें **मदनरत्नांत नारदानें** सांगितलीं आहेत. यांत रवि, मंगळ व शनि हे वार निंद्य होत.

२ भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, विशाखा, आणि ज्येष्ठा, हीं नक्षत्रें प्रथमरजोदर्शनीं अनिष्ट फल देणारीं होत; असें **वसिष्ठाचें** मत आहे.

परिहारार्थं भुवनेश्वरीशांति करावी. या शांतीचा प्रयोग, मीं केलेल्या **शान्तिरत्न** नांवाच्या ग्रंथांत सांगितलेल्या विधीनें करून, रजोदर्शनापासून पहिल्या चार रात्रि सोडून पुढें सम रात्रींचेठायीं मीं केलेल्या **निर्णयसिंधूं**त सांगितलेल्या कालीं गर्भाधान करावें. तें असें कीं,—कर्त्यानें स्वस्त्रीसहवर्तमान मंगलस्नान करून कुंकुमतिलक लावून पूर्ववत्—(पृ० ७६ टी० १ येथें सांगितल्याप्रमाणें) देशकालादि स्मरण करून;—**अस्यां मम भार्यायां जनिष्यमाणसर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गर्भाधानं करिष्ये ।** ह्मणून उदक सोडून, **तदंगतया गणपतिपूजनपुण्याहवाचनमातृकापूजननान्दीश्राद्धानि करिष्ये ।** ह्मणून आणखी उदक सोडून पूर्ववत् गणेशादिकांचें पूजन करून, अलंकार, नवीन वस्त्रें भूषणें वगैरे धारण करून, अश्वगंधा (आसंध, माका), व दूर्वा यांचा रस स्त्रीच्या उजव्या नाकपुडींत पिळावा. नंतर सुवासिनी स्त्रियांनीं उभयतांस ओवाळलें असतां, त्यांनीं सूर्यास नमस्कार करून, "**यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु ॥ न्यूनं सम्पूर्णतां याति सद्यो वन्दे तमच्युतम् ॥ १ ॥ मन्त्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर ॥ यत्कृतं तु मया देव परिपूर्णं तदस्तु मे** "। हें ह्मणून कर्म ईश्वरार्पण करावें. असें दिवसास करून, रात्रौ शय्येवर स्त्री निजली असतां, "**विष्णवे नमः । त्वष्ट्रे नमः । प्रजापतये नमः । धात्रे नमः । सिनीवाल्यै नमः । सरस्वत्यै नमः । अश्विभ्यां नमः । पर्जन्याय नमः**" असें ह्मणून योनिस्पर्श करून नंतर, स्त्रीसंग करावा. त्यांत ऋतुकालीं (रजोदर्शनापासून सोळा रात्रींपर्यंत) स्त्रीगमन केल्यास, पुरुषानें

---

३ प्रतिपदा, ४।६।९।१२।१४।१५ या तिथि प्रथमरजोदर्शनास अनिष्ट होत. **ज्योतिर्निबंधांत वसिष्ठानें** अमावास्याही वर्ज केली आहे. याशिवाय विष्कंभ, गंड, अतिगंड, शूल, व्याघात, वज्र, परिघाचें पूर्वार्ध, वैधृति, व्यतीपात हे योग, व विष्टी, ग्रहण, रात्र, तीन संध्याकाल, अपराह्न (दिवसाचा ४ था भाग) या कालीं, व स्त्री निजली असतां, फाटकें, तांबडें, निळें, व चित्रविचित्र, रंगीत, यांतून कोणत्याहि प्रकारचें वस्त्र नेसली असतां, नग्नपणीं, परक्याच्या घरांत, बापाच्या व सासऱ्याच्या गांवांहून इतर गांवीं, प्रथमरजोदर्शन झाल्यास अनिष्टफलप्रद होय. तसेंच झाडणी, लांकूड, अग्नि, सूप, गवत, हीं हातांत असतां रजोदर्शन होईल तर ती स्त्री निश्चयानें जारिणी होईल, असें **गर्गाचार्यांचें** मत आहे. जो रक्तस्राव होईल तो अल्प, अधिक, किंवा निळ्या रंगाचा झाल्यास अशुभकारक होय. त्या वेळीं नेसलेल्या वस्त्रावर विषम—(१।३।५ इत्यादि) बिंदु पडल्यास पुत्र, व सम—(२।४।६ इ० ) असल्यास कन्या, असें फल देणारे होत, असें **वसिष्ठ**मत आहे. याविषयीं प्रत्येक तिथि, वार, व नक्षत्रदिकांचीं निरनिराळीं फलें, व तद्दोषपरिहारार्थ **शौनकोक्त**, व **नारदोक्त** शांति वगैरे **निर्णयसिंधूं**त सांगितलें आहे,—परंतु तें विस्तरभयास्तव येथें सांगितलें नाहीं. पाहिजे असल्यास **निर्णयसिंधु** प० ३ पूर्वार्धगर्भाधानप्रकरण पहा.

४ चैत्र ज्येष्ठ आषाढ भाद्रपद कार्तिक पौष हे महिने; प्रथमरजोदर्शनाविषयीं अशुभकारक आहेत. असें **ज्योतिर्निबंधांत वसिष्ठवचन** आहे.

स्नान करावें म्हणजे तो शुद्ध होतो. स्त्रीनें स्नान करूं नये. ऋतुकाल नसतां मूत्रवत् उदकानें शुद्धी करून आचमन करावें. **इति श्रीशूद्रकमलाकरे गर्भाधानप्रयोगः ॥**

## अथ पुंसवनम्.

**द्वितीये तृतीये चतुर्थे वा मासि पुन्नक्षत्रे भर्ताभ्यङ्गं कृत्वा देशकालौ स्मृत्वा अस्यां मम भार्यायां जनिष्यमाणगर्भस्य पुंरूपताप्राप्त्यर्थं बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणार्थं च परमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनं करिष्ये ॥ इति सङ्कल्प्य ॥ गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि कृत्वा । समानवर्णसवत्सगोर्दधि पत्न्या दक्षिणपाणौ दत्त्वा मध्ये प्रागग्रं यवं द्वौ माषौ पार्श्वयोर्दत्त्वा किं पिबसीति त्रिःपृष्ट्वा पुंसवनं पुंसवनमिति त्रिरुक्त्वा सा प्राश्नीयात् ॥ एवं त्रिः कुर्यात् ॥ इति पुंसवनम् ॥**

आतां पुंसवनप्रयोग सांगतों.

हें, गरोदर झाल्यापासून २।३ किंवा चतुर्थ महिन्यांत दिनशुद्धि पाहून, ज्या दिवशीं पुरुषनक्षत्र[2] असेल त्या दिवशीं, भर्त्यानें अभ्यंगस्नान करून देशकालादिसंकीर्तन करून—**अस्यां मम भार्यायां जनिष्यमाणगर्भस्य पुंरूपताप्राप्त्यर्थं बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणार्थं च श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनं करिष्ये ।** असा संकल्प करून उदक सोडावें. आणि गणेशपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, व नान्दीश्राद्ध करून, एकरंगाची असून सवत्स अशा गायीचें दहीं स्त्रीच्या उजव्या हातांत ठेवून त्यांत पूर्वदिशेस शेवट करून, एक यव आणि पार्श्वभागीं दोन उडीद देऊन—**किं पिबसि** असें त्रिवार स्त्रीस विचारावें. स्त्रीनें—**पुंसवनम्** असें उत्तर देऊन तें दहीं प्यावें. असें ३ वेळ करून (पृ० ८८ ओ० १२ येथें सांगितल्याप्रमाणें) कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीकमलाकरे पुंसवनप्रयोगः ॥**

## अथ सीमन्तः.

**चतुर्थे षष्ठेऽष्टमे वा मासि प्राग्वा प्रसवात्पुन्नक्षत्रे भर्त्ता देशकालौ संकीर्त्य । ममास्यां भार्यायां जनिष्यमाणसर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिरसनद्वारा प्रतिगर्भे संस्कारातिशयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सीमन्तोन्नयनं करिष्ये ॥ इत्युक्त्वातदङ्गतया गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि कृत्वालङ्कृतो नववस्त्रधरो दूर्वारसं भार्यादक्षिणनासायां ॥ अग्नये नमः । राज्ञे वरुणाय नमः ॥ इति सिञ्चेत् ॥ ततस्त्रिःशुक्लां**

---

१ येथें पुरुषास स्नान करण्याविषयीं आणि स्त्रीस न करण्याविषयीं सांगितलें आहे; त्याचें मूळवचन **पराशरस्मृतीं**त आहे तें—"**शयनादुत्थिता नारी शुचिः स्यादशुचिः पुमान्**" शयनावरून उठल्यावर पुरुष अशुचि होतो, व स्त्री शुद्ध होते.

२ या पुंसवनास शुद्ध ५ मीपासून वद्य ५ मीपर्यंत ४।९।१४।१५ या तिथि वर्ज करून, रवि, मंगळ, व गुरु या वारीं करावें. कित्येक ग्रंथकर्त्यांनीं चंद्र, बुध, शुक्र हेही वार योग्यच सांगितले आहेत. तशींच पुन्नक्षत्रें, म्ह० पुष्य, श्रवण, हस्त, पुनर्वसु, मृग, अभिजित् ( उत्तराषाढा आणि श्रवण यांचा संधि ), मूळ व अनुराधा, अश्विनी या ९ नक्षत्रांस पुन्नक्षत्रें म्हणतात. यांचा योग पाहून हा संस्कार करावा.

**शलली कुशत्रययुतामुदुंबरफलगुच्छयुतामादाय पश्चात्स्थित्वा ॥ प्रजापतये नम इति भ्रूमध्यादारभ्य मूर्ध्नो द्वेधा केशान् कृत्वा त्रिःसीमन्तं कुर्यात् ॥ ततो नीराज्य तदुत्सङ्गे फललड्डुकादि दत्त्वा विप्रेभ्यो दशामान्नानि दक्षिणां च दद्यात् ॥ नारदः ॥ विप्रक्षत्रिययोः कुर्यादिवा सीमन्तकर्म तु ॥ वैश्यशूद्रकयोस्त्वेतद्दिवा निश्यपि केचन ॥ अत्र वि-शेषो गर्भिणीतत्पतिधर्माश्च मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयाः ॥ इति सीमन्तः ॥**

आतां सीमंतोन्नयनप्रयोग सांगतो.

स्त्री गर्भिणी झाल्यानंतर ४।६।८ या मासीं किंवा प्रसूति होईपर्यंत कोणत्याही दिवसीं पुन्नक्षत्र असतां दिनशुद्धि पाहून भर्त्यानें देशकालादि स्मरण करून—**ममास्यां भार्यायां जनिष्यमाणसर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा प्रतिगर्भं संस्कारातिशयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सीमन्तोन्नयनं करिष्ये** । म्हणून—पाणी सोडून—**तदंगतया गणेशपूजनपुण्याहवाचनमातृकापूजननान्दीश्राद्धानि करिष्ये** । असें म्हणून उदक सोडून, नंतर गणेशादिकांची पूजा करावी. आणि अलंकार व नवीन वस्त्र इत्यादि धारण करून, दूर्वारस स्त्रीच्या उजव्या नाकपुडींत "**अग्नये नमः। राज्ञे वरुणाय नमः**" हे मंत्र म्हणून पिळावा. नंतर तीन ठिकाणीं पांढरा साळिंदराचा कांटा, तीन दर्भ, व उंबराच्या फळांचा घोंस, ह्यांबरोबर घेऊन आपण स्त्रीच्या मागें उभें राहून "**प्रजापतये नमः**" हा मंत्र म्हणून त्या कांट्यानें तिच्या भोंवयांच्या मध्यापासून मस्तकापर्यंत केश द्विधा करून तीन वेळ भांग करावा. नंतर आरती ओंवाळून स्त्रीच्या मांडीवर फळें, लाडू वगैरे टेवून, ब्राह्मणांस १० आमान्नें व दक्षिणा द्यावी. पृ० ८८ येथें सांगितल्याप्रमाणें कर्म ईश्वरार्पण करावें. याविषयीं नारद म्हणतो कीं, "हें सीमंतकर्म ब्राह्मण, व क्षत्रिय यांनीं दिवसा करावें. आणि वैश्य, व शूद्र यांनीं दिवसा अथवा रात्रीं करावें. असें कित्येक ऋषींचें मत आहे." एतत्संबन्धी विशेष, आणि गर्भि-

---

१ गर्भारस्त्रीनें कसें वागावें तें संक्षेपतः लिहितों.—"गर्भिणीनें मांसयुक्त अन्नभोजन करूं नये" असें **वराह** म्हणतो. "अंगार ( कोळसा ), भस्म ( राख ), हाडें, कपाल ( करटें ), चूल, सूप, उखळ, यंत्र, कोंडा, झाडणी, शेण, चाकाचा मध्यभाग इत्यादिकांवर बसूं नये. उदकांत बुडी मारून स्नान करूं नये. कोळसा राख व नखें यांनीं, भूमीवर रेघा काढूं नयेत. कलह, आंग मोडणें हीं करूं नयेत. केश मोकळे सोडूं नये. असावध असूं नये. संध्याकाळीं भोजन व शयन करूं नये. अमंगल भापण, ओसाडघरीं राहणें, झाडाखालीं बसणें हीं वर्जावीं," असें **गृह्यकारिकेंत** सांगितलें आहे. "हत्ती, घोडे, इत्यादिक वाहनांवर बसणें, व डोंगर, माडी, इत्यादिकांवर चढणें, व्यायाम, जलद चालणें, गाड्यांवर वसणें, शोक करणें, आंगांतील रक्त काढणें, भय धरणें, कुक्कुटासन ( दोन पावलें टेंकून बसणें ), अन्य प्रकारचे श्रम, दिवसा निद्रा, रात्रौ जागरण हीं गर्भारस्त्रीनें त्याग करावीं." असें **प्रयोगपारिजातांत कश्यप** म्हणतो. "कडू, तीक्ष्ण, कषाय, अति ऊन, खारट, असले पदार्थ तिनें खाऊं नयेत" असें **विष्णुधर्मोत्तरांत** सांगितलें आहे. "हळद, कुंकू, सिंदूर, काजळ, चोळी, विडा, मंगलसूत्रादि अलंकार, वेणीफणी, व सुगंधी-तेलादि लावणें; हातांतील, व कानांतील अलंकार हे पतीचें आयुष्य वाढण्याची इच्छा करणाऱ्या

णीचे, व तिच्या पतीचे धर्म इत्यादि **निर्णयसिंधू**वरून जाणावे. **इति शूद्रकमलाकरे सीमंतोन्नयनम्.**

## ॥ अथ जातकर्म ॥

**पृथ्वीचन्द्रोदये** काष्र्णाजिनिः ॥ प्रादुर्भावे पुत्रपुत्र्योश्चन्द्रसूर्यग्रहे तथा ॥ स्नात्वानन्तरमात्मीयान्पितॄन् श्राद्धेन तर्पयेत् ॥ १ ॥ कुमारे जाते नाभिच्छेदात्प्राक् पिता सचैलं स्नानं कृत्वा देशकालौ सङ्कीर्त्य अस्य कुमारस्य गर्भाम्बुपानजनितदोषपरिहारद्वारा बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थं श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्म करिष्ये ॥ इति सङ्कल्प्य गणेशपूजां पुण्याहवाचनं मातृकापूजां हेम्ना नान्दीश्राद्धं च कृत्वाज्यमधुनी हेम्ना घर्षयित्वा हेम्ना प्राशयित्वा कर्णयोर्निधाय । देवाय सवित्रे नमः । सरस्वत्यै नमः । अश्विभ्यां नमः । इत्युक्त्वांसावभिमृश्य इन्द्राय नमः इत्युक्त्वा विप्रान् पूजयेत् ॥ इति जातकर्म ॥

आतां जातकर्म सांगतो.

त्याविषयीं **पृथ्वीचंद्रोदय**नामक ग्रंथांत **काष्र्णाजिनि** ह्मणतो कीं, "मुलगा किंवा मुलगी उत्पन्न झाली असतां, आणि चंद्र किंवा सूर्यग्रहण आलें असतां तत्काल स्नान क-

गर्भिणी स्त्रीनें, कधींही वर्जू नयेत." असें **मदनरत्नां**त **स्कंदपुराण**वचन आहे. असे गर्भिणीचे अनेक धर्म ग्रंथांतरीं सांगितले आहेत. परंतु ते सर्व सविस्तर येथें दिले नाहींत.

१ गर्भिणीपतीचे धर्म पुढें लिहिल्याप्रमाणें,—"मुण्डन, पिण्डदान, शववाहणें, प्रेतकर्म, हीं २ महिन्यांपासून पुढें करूं नयेत," असें, **हेमाद्रींत कौण्डिन्यानें** सांगितलें आहे. "समुद्रस्नान, केशकर्तन ( हजामत ) हीं करूं नयेत" असें **मिताक्षरें**त सांगितलें आहे. "मैथुन, तीर्थयात्रा, श्राद्धभोजन, हीं ७ व्या महिन्यापासून वर्जावीं; व युद्ध, वास्तुकर्म, दूरप्रवास, विवाह, मुंज, हीं केल्यास आयुष्यक्षय होतो" असें **कालविधान** व, **मुहूर्तदीपिका** यांत सांगितलें आहे. "डोंगरावर चढणें, व नावेंत बसणें हीं देखील गर्भिणीपतीनें वर्जावीं" असें **रत्नसंग्रहांत गालव** ह्मणतो. "तीन महिन्यांनंतर हीं कर्मे करूं नयेत" असें **अन्यत्र** सांगितलें आहे. असे गर्भिणीपतीचे धर्म संक्षेपतः सांगितले आहेत. याशिवाय "स्त्रीचे डोहाळे न पुरविले तर गर्भ दूषित होतो, व त्यास विरूपता अथवा मरण प्राप्त होतें, याकरितां तिचे डोहाळे पुरवावे" असें **याज्ञवल्क्य** ह्मणतो. 'गर्भिणीचे शक्त्यनुसार मनोरथ पुरवावे, व तिला सर्वप्रकारें सुख द्यावें, तिला अपशब्द बोलूं नये." इत्यादि प्रकार **गद्यहारिता**दिकांनीं सांगितले आहेत. विशेष विस्तार अन्यत्र पहावा. सांप्रत याप्रमाणें गर्भारस्त्रीचें रक्षण करणारे पति विरळाच सांपडतील. नाहींतर तिच्या पोटांत दुखूं लागलें तरी हातचें काम सुटणें कठीण! असे प्रकार बहुतकरून सर्वत्र आढळतात.

२ पुत्रमुख पाहून नदींत उत्तराभिमुख राहून स्नान करावें" अथवा घरांत थंड पाण्यांत सोनें घालून त्यानें स्नान करावें. मूळनक्षत्रादिकांवर मूल झालें असेल तर त्याचें मुख पाहूं नये.

रून आपल्या पितरांचें श्राद्ध करावें." पुत्रजन्म होतांच नालच्छेदनाच्या पूर्वी पित्यानें अंगावरील वस्त्रासह थंड पाण्यानें स्नान करून देशकालसंकीर्तन करून,[१]—**अस्य कुमारस्य गर्भांबुपानजनितदोषपरिहारद्वारा बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थं श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्म करिष्ये ।** असा संकल्प करून गणेशपूजा, पुण्याहवाचन, मातृकापूजन, व नान्दीश्राद्ध (या प्रसंगीं नान्दीश्राद्ध करणें तें हिरण्यद्वाराच करावें)—करून तूप, व मध यांत सुवर्ण उगाळून सोन्यानें (पुतळीनें) मुलाच्या तोंडांत, व तसेंच दोनी कानांत घालून—"**देवाय सवित्रे नमः । सरस्वत्यै नमः । अश्विभ्यां नमः**" असे मंत्र ह्मणून मुलाच्या खांद्यास स्पर्श करून "**इंद्राय नमः**" ह्मणून नंतर ब्राह्मणपूजन करावें. आणि कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीशूद्रकमलाकरे जातकर्मप्रयोगः ॥**

## ॥ अथ षष्ठीपूजा ॥

**मिताक्षरायां मार्कण्डेयः ॥ रक्षणीया तथा षष्ठी निशा तत्र विशेषतः ॥ रात्रौ जागरणं कार्यं जन्मदानां तथा बलिः ॥ १ ॥ पुरुषाः शस्त्रहस्ताश्च नृत्यगीतैश्च योषितः ॥ रात्रौ जागरणं कुर्युर्दशम्यां चैव सूतके ॥ २ ॥ व्यासः ॥ सूतिकावासनिलया जन्मदानाम देवताः ॥ तासां यागनिमित्तं तु शुद्धिर्जन्मनि कीर्तिता ॥ १ ॥ प्रथमे दिवसे षष्ठे दशमे चैव सर्वदा ॥ त्रिष्वेतेषु न कुर्वीत सूतकं पुत्रजन्मनि ॥ २ ॥ अपरार्के ब्राह्मे ॥ कन्याश्चतस्रो राकाद्या वातघ्नी चैव पञ्चमी ॥ क्रीडनार्था च बालानां षष्ठी च शिशुरक्षिणी ॥ १ ॥ खड्गे तु पूजनीया वै वैश्यैर्व्रात्यैर्द्विजातिभिः ॥ राका अनुमतिः सिनीवाली कुहूरिति चतस्रः कन्या इत्यर्थः ॥ पिता देशकालौ स्मृत्वा । ममास्य शिशोः सर्वारिष्टशान्त्यायुरारोग्यसिद्ध्यर्थं गणेशजन्मदाजीवन्तिकाराकादीनां पूजनं करिष्ये ॥ इति सङ्कल्प्य । कलशं संस्थाप्य तत्र पूर्णपात्रे वस्त्रोपरि गणेशं जन्मदां जीवन्तिकां स्कंदं राकामनुमतिं सिनीवालीं कुहूं वातघ्नीं च प्रतिमास्वावाह्य । खड्गे शिशुरक्षिणीं कुड्ये लिखितां षष्ठीं चावाह्य । षोडशोपचारैः सम्पूज्य माषभक्तादिबलिं दत्त्वा प्रार्थयेत् ॥ गौरीपुत्रो यथा स्कन्दः शिशुत्वे रक्षितः पुरा ॥ तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नम इति ॥ इति षष्ठीपूजा ॥**

आतां षष्ठीपूजन सांगतों.

याविषयीं **मिताक्षरेंत मार्कण्डेय** ह्मणतो कीं, "स्त्री प्रसूत झाल्यानंतर विशेषेंकरून सहावी रात्र मोठ्या हुशारीनें रक्षण करावी. ती अशी कीं, रात्रौ जागरण करावें. **जन्मदा**नामक देवींस बलि द्यावा. पुरुषांनीं हातांत शस्त्रें घेऊन व स्त्रियांनीं गायन, नाच

---

१ "हें नाल कापण्याच्या व स्तनप्राशनाच्या पूर्वी करावें" असें **बैजवाप** ह्मणतो. व असें करणें हेंच युक्त आहे. कारण,—"**यावन्न छिद्यते नालं तावन्नाप्नोति सूतकम्**" या वचनावरून नाल कापल्यावर आशौचांत श्राद्ध असें करतां येईल ? द्रव्यद्वारा अथवा आमान्नानेंच करावें," असें **पृथ्वीचंद्रोदयांत आदित्यपुराण**वचन आहे. "हें आशौचांतही करावें," असें **मिताक्षरेंत प्रजापतीनें** सांगितलें आहे; आणि "हें मृताशौचांत न करितां शेवटीं करावें," असें **कित्येक** ह्मणतात.

इत्यादि करून दाहाव्या रात्रींही जागरण करावें." **व्यास** ह्मणतो कीं, "बाळंतिणीच्या घरांत राहणाऱ्या जन्मदा नांवाच्या ज्या देवी आहेत, त्यांची पूजा करावी. त्याकरितां जननाशौचांतही धर्मशास्त्रकर्त्यांनीं शुद्धि सांगितली आहे." ती प्रथम, ६ वा, व १० वा, या दिवशीं आहे. या तिन्ही दिवशीं सूतकदोष मानूं नये." **अपरार्क**नामक ग्रंथांत **ब्रह्मपुराणां**त—"राका १, अनुमती २, सिनीवाली ३, कुहू ४ ह्या चार कन्या; आणि वातघ्नी ५ वी ह्यांचें प्रतिमांवर व सहावी शिशुरक्षिणी हिचें वैश्य, व संस्काररहित ब्राह्मण यांनीं तलवारीवर आवाहन करून पूजन करावें. यांलाच जन्मदा असें ह्मणतात." बापानें स्नान, व देशकालादि स्मरण करून,—**ममास्य शिशोः सर्वारिष्टशांत्यायुरारोग्यसिद्ध्यर्थं गणेशजन्मदाजीवंतिकाराकादीनां पूजनं करिष्ये ।** असा संकल्प करून, कलश ठेवून त्यावर पूर्णपात्रांत नवीन वस्त्रावर,—"**गणेशाय नमः । गणेशं आवाहयामि १ जन्मदायै नमः । जन्मदां आवाहयामि २ जीवंतिकायै नमः । जीवंतिकामावाहयामि ३ स्कंदाय नमः । स्कंदमावाहयामि ४ राकायै नमः । राकामावाहयामि ५ अनुमत्यै नमः । अनुमतीमावाहयामि ६ सिनीवाल्यै नमः । सिनीवालीमावाहयामि ७ कुव्हे नमः । कुहूमावाहयामि ८ वातघ्न्यै नमः । वातघ्नीमावाहयामि ९** ह्या मंत्रांनीं या देवतांचें स्वर्णप्रतिमांवर आवाहन करून, तलवारीवर—"**शिशुरक्षिण्यै नमः । शिशुरक्षिणीमावाहयामि**" ह्मणून हिचें आवाहन करावें; आणि भिंतीवर षष्ठी देवीचें चित्र काढून—"**षष्ठ्यै नमः । षष्ठीमावाहयामि**" असें आवाहन करून, सर्व देवतांचें षोडशोपचार पूजन करून भाताचा राशि करून त्यावर उडीद, गुलाल वगैरे घालून तो बलि देऊन पुढील मंत्रानें प्रार्थना करावी. "**गौरीपुत्रो यथा स्कंदः शिशुत्वे रक्षितः पुरा ॥ तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः १**" नंतर सर्व रात्र वाद्यें वाजवून जागरण करून प्रातःकालीं स्नान करून देवतांची उत्तरपूजा करून त्यांचें विसर्जन करावें. कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीशूद्रकमलाकरे षष्ठीपूजनप्रयोगः ॥**

## ॥ अथ दत्तकपुत्रविधिः ॥

**व्याहृत्यादिहोमस्य पुत्रप्रतिग्रहाङ्गत्वात्तत्र च स्त्रीशूद्रयोरनधिकारात्तयोर्दत्तकः पुत्रो न भवत्येवेति रुद्रधरादयः ॥ विप्रद्वारा होमादि कारयेदिति वर्द्धमानहरिनाथादयो गौडाः॥ सम्बन्धतत्त्वेऽप्येवम् ॥** प्रयोगपारिजाते शौनकः ॥ **अपुत्रो मृतपुत्रो वा पुत्रार्थं समुपोष्य च ॥ वाससी कुण्डले दत्त्वा उष्णीषं चाङ्गुलीयकम् ॥ १ ॥ बन्धूनन्नेन सम्भोज्य ब्राह्मणांश्च विशेषतः ॥ अन्वाधानादि यत्तन्त्रं कृत्वाज्योत्पवनान्तकम् ॥ २ ॥ दातुः समक्षं गत्वा तु पुत्रं देहीति याचयेत् ॥ देवस्यत्वेति मन्त्रेण हस्ताभ्यां परिगृह्य च ॥ ३ ॥ अङ्गादङ्गेत्यृचं जप्त्वा आघ्राय शिशुमूर्धनि ॥ गृहमध्ये तमाधाय चरुं हुत्वा विधानतः ॥ ४ ॥ यस्त्वाहृदेत्यृचा चैव तुभ्यमग्ने ऋचैकया ॥ सोमो ददादित्येताभिः प्रत्यृचं पञ्चभिस्तथा ॥ ५ ॥ स्विष्टकृदादिहोमं च कृत्वा शेषं समापयेत् ॥ मिताक्षरादौ वसिष्ठेन तु व्याहृतिभिराज्येन होम उक्तः ॥ स च विप्रद्वारा कारणीयः ॥ विशेषस्तु मत्कृते निर्णयसिन्धौ**

**ज्ञेयः ॥ स च दत्तकः पञ्चवर्षमध्ये ग्राह्यो नोर्ध्वम् ॥ ऊर्ध्वं तु पञ्चमाद्वर्षान्न दत्ताद्याः सुता नृपेति कालिकापुराणात् ॥ ऊर्ध्वं पु स्वदानेच्छोरेव दानम् ॥ विक्रयं चैव दानं च न देयाः स्युरनिच्छवः ॥ दाराः पुत्राश्च सर्वस्वमात्मनैव तु योजयेदिति हेमाद्रौ व्यासोक्तेः ॥ यत्तु याज्ञवल्क्यः ॥ स्वकुटुम्बाविरोधेन देयं दारसुताद्दते इति ॥ तत्स्वदानानिच्छुपुत्रपरमित्यन्यत्र विस्तरः ॥ इति दत्तकपुत्रविधिः ॥**

आतां दत्तकपुत्रविधि सांगतो.

त्यांत शूद्रानें दत्तक घ्यावा किंवा काय? याविषयीं अनेक मतें आहेत. तीं अशीं कीं, "दत्तक पुत्र घेण्यास व्याहृतिहोम अवश्य असून तो पुत्रप्रतिग्रहाचा अंगभूत आहे, व स्त्रीशूद्रांस तो होम करण्याचा अधिकार नाहीं; ह्मणून त्यांस दत्तक पुत्र होतच नाहीं," असें **रुद्रधरा**दि ग्रंथकारांचें मत आहे. "ब्राह्मणद्वारा होमादि करून स्त्रीशूद्रांनीं दत्तक पुत्र घ्यावा," असें **वर्धमान, व हरिनाथ** इत्यादि **गौड** ह्मणतात. **संबंधतत्त्व**नामक ग्रंथांत असेंच आहे. **प्रयोगपारिजातां**त **शौनक** ह्मणतो, "ज्यास पुत्र मुळींच झाला नसेल, किंवा होऊन मेला असेल त्यास पुत्र घेण्याची इच्छा असल्यास १ दिवस उपवास करून त्या मुलास २ वस्त्रें, कुंडलें, पागोटें, आंगठी वगैरे देऊन त्याच्या बंधूस, व ब्राह्मणांस भोजन घालून अन्वाधानादि जें तंत्र आहे, तें आज्योत्पवनापर्यंत करून पुत्र देणाराकडेस जाऊन, मला पुत्र दे ह्मणून मागावा. त्यानें दिल्यावर **देवस्य त्वा०** या मंत्रानें दोनी हातांनीं त्या मुलास घेऊन, **अंगादंगात्०** ही ऋचा ह्मणून, त्याच्या मस्तकास हुंगून, आपल्या घरीं त्यास आणून **यस्त्वा हृदा०** या ऋचेनें, व **तुभ्यमग्ने०** आणि **सोमोदद०** ह्या ऋचांनीं प्रतिऋचेस यथाविधि चरु हवन करून, स्विष्टकृदादि होम करून, होमशेष समाप्त करावें." **मिताक्षरा**दि ग्रंथांत **वसिष्ठानें** तर व्याहृतींनीं आज्यहोम करण्यास सांगितला आहे. तो ब्राह्मणद्वारा करण्यास योग्य आहे. याविषयीं विशेष प्रकार **निर्णयसिंधू**वरून जाणावा. दत्तक पुत्र घेणें तो ५ वर्षांच्या आंत असावा. त्याहून अधिक वयाचा घेऊं नये. कारण,—"पांचव्या वर्षांवर वयाचे दत्तकादिक पुत्र घेतां येत नाहींत," असें **कालिकापुराण**वचन आहे. कदाचित् पांच वर्षांहून अधिक वयाचा दत्तक घेण्याचा व देण्याचा असेल तर जो पुत्र त्याविषयीं राजी असेल त्याचेंच पित्याच्यानें दान करवेल; इतरांचें करतां येणार नाहीं. "कारण, पुत्रांचा विक्रय, व दान हें प्रौढ असून त्यांची इच्छा नसेल तर होत नाहीं. स्त्रिया, पुत्र अथवा सर्वस्व हें आपलें आपणच द्यावें" अशी **हेमाद्रीं**त **व्यासो**क्ति आहे. जें तर **याज्ञवल्क्य** ह्मणतो कीं,—"स्त्रीपुत्रादि जें द्यावयाचें तें आपल्या कुटुंबाच्या अविरोधानें द्यावें," तें आपल्या दाना-

१ येथें "स्त्रिया, पुत्र, अथवा सर्वस्व हें आपलें आपणच द्यावें," असें ह्मटलें आहे, व त्याप्रमाणें स्त्रीपुत्रादि देतां येईल; परंतु सांप्रत आपल्यास आपण देतां येत नाहीं. कारण,—आपल्यास आपण देणें यास स्वयंदत्त ह्मणतात. असा पुत्र कलियुगांत वर्ज्य आहे. याविषयीं **निर्णयसिंधूं**तील कलिवर्ज्यप्रकरण पाहिलें असतां समजेल. अतएव पूर्वोक्तवचनाचा अर्थ—मातापितरांकडून आपणच आपणास देववावें, असा घ्यावा.

विषयीं इच्छा न करणाऱ्या पुत्राविषयीं आहे असें समजावें. याविषयीं अन्यत्र सविस्तर लिहिलें आहे. **इति श्रीशूद्रकमलाकरे दत्तकपुत्रविधिः ॥**

## ॥ अथ सूतिकास्नानम् ॥

**ज्योतिःशास्त्रे ॥ करेन्द्रभाग्यानिलवासवान्त्यमैन्द्रैन्दवाश्विध्रुवभेह्नि पुंसाम् ॥ तिथावरिक्ते शुभमामनन्ति प्रसूतिकास्नानविधिं मुनीन्द्राः ॥ १ ॥**

यानंतर बाळंतिणीच्या स्नानास दिनशुद्धि सांगतो.—

याविषयीं **ज्योतिषशास्त्रांत**—"हस्त, पूर्वा, स्वाती, अनुराधा, रेवती, ज्येष्ठा, मृग, अश्विनी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा हीं नक्षत्रें, व चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ह्या तिथि वर्ज्य करून, बाळंतिणीला स्नान घातल्यास शुभकारक आहे. असें **ऋषिश्रेष्ठ** ह्मणतात," असें सांगितलें आहे. याप्रमाणें शुभ मुहूर्त पाहून बाळंतिणीला स्नान घालावें.

## ॥ अथ नामकर्म ॥

**मदनरत्ने बृहस्पतिः ॥ द्वादशे दशमे वापि जन्मतोऽपि त्रयोदशे ॥ षोडशे विंशतौ चैव द्वात्रिंशे वर्णतः क्रमात् ॥ १ ॥ नारदीये ॥ सूतकान्ते नामकर्म विधेयं स्वकुलोचितम् ॥ नाम पूर्वन्तु बालस्य मङ्गलं सुसमाक्षरैः ॥ तत्रैव गार्ग्यः ॥ मासनाम गुरोर्नाम दद्याद्बालस्य वै पिता ॥ कृष्णोनन्तोच्युतश्चक्री वैकुण्ठोऽथ जनार्दनः ॥ १ ॥ उपेन्द्रो यज्ञपुरुषो वासुदेवस्तथा हरिः ॥ योगीशः पुण्डरीकाक्षो मासनामान्यनुक्रमात् ॥ २ ॥ अत्र मार्गशीर्षादिश्चैत्रादिर्वा क्रम इति मदनरत्ने ॥ नाक्षत्रमपि नाम कार्यम् ॥ कुलदेवतानक्षत्रसम्बद्धं पिता नाम कुर्यादिति तत्रैव शङ्खोक्तेः ॥ परिशिष्टेऽपि ॥ तदक्षरादिकं नाम यस्मिन्धिष्ण्ये यदक्षरम् ॥ मनुः ॥ शूद्रस्य प्रेष्यसंयुतम् ॥ [ म० स्मृ० अ० श्लोक ३२ ] तत्र स्वाशौचान्ते द्वाविंशे वाह्नि पिता देशकालौ स्मृत्वा अस्य कुमारस्य बीजगर्भसमुद्भवैनोनिवर्हणद्वारा नामव्यवहारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकरणं करिष्ये ॥ इति सङ्कल्प्य गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि कृत्वा कांस्यादिपात्रे तण्डुलपूर्णे हेम्ना गणेशनाम ततः कुलदेवतानाम ततो मासनाम ततो नाक्षत्रं ततो व्यावहारिकं शिवदासइत्यादि लिखित्वा नामदेवताः सम्पूज्य शिशोर्दक्षिणकर्णेऽमुकभक्तोऽसि अमुकोऽसीत्यादिनामानि उक्त्वोर्ध्वं कृताञ्जलिः कुलदेवतानाम्नामुकदासो भवतः सर्वान् ब्राह्मणानभिवादयते ॥ आयुष्मान्भवत्वमुकदास इति विप्राः ॥ एवं मासनाम्ना नाक्षत्रेण नाम्ना व्यावहारिकेण नाम्नेत्यादि वाच्यम् ॥ ततः शतं दश वाऽमान्नानि दत्वा विप्रेभ्यो आशिषो गृह्णीयात् ॥ इति नामकर्म ॥**

यानंतर नामकरण सांगतोः—

याविषयीं **मदनरत्न**नामक ग्रंथांत **बृहस्पति** ह्मणतो—"जन्मदिवसापासून ब्राह्मणादि वर्णक्रमानें दहाव्या, बाराव्या, तेराव्या, सोळाव्या, विसाव्या, किंवा बाविसाव्या दि-

---

१ पुस्तकान्तरे मासस्य ईत्यपि दृश्यते.

बशीं मुलाचें नांव ठेवावें." **नारदीयांत**—"सूतकाच्या[1] शेवटीं स्वकीयकुलास योग्य असेल त्याप्रमाणें नामकरण करावें, व त्यांत प्रथमतः बालकाचें नांव समाक्षर[2] असून मंगल असावें." असें सांगितलें आहे. आणखी त्याच **नारदीयांत गार्ग्य** ह्मणतो—"बापानें मुलाला मासनाम, अथवा गुरूचें नांव ठेवावें. कृष्ण १ अनंत २ अच्युत ३ चक्री ४ वैकुंठ ५ जनार्दन ६ उपेंद्र ७ यज्ञपुरुष ८ वासुदेव ९ हरि १० योगीश ११आणि पुंडरीकाक्ष १२ हीं बारा अनुक्रमें मासनामें[3] होत." येथें जी माससंख्या धरावयाची ती—"मार्गशीर्षापासून अथवा चैत्रापासून धरण्याचा क्रम आहे," असें **मदनरत्नां**त सांगितलें आहे. याचप्रमाणें नाक्षत्रनामही ठेवावें. कारण,—"बापानें कुलदेवता व जन्मनक्षत्र एतत्संबंधी मुलाचें नांव ठेवावें," अशी **शंखा**ची उक्ति आहे. **गृह्यपरिशिष्टां-तही**—"ज्या नक्षत्रावर मूल जन्मलें असेल त्या नक्षत्राच्या नांवांतलें पहिलें अक्षर घेऊन तें नांवाच्या पहिल्या अक्षराच्या ठिकाणीं जोडावें," असें सांगितलें आहे. अशा प्रकारच्या नांवास नाक्षत्र[4] नांव असें ह्मणतात. **मनु** ह्मणतो कीं, "शूद्राचें नांव प्रेष्य-

---

१ हा शब्द व्यवहारांत मेलेल्याच्या आशौचाचा वाचक असें मानितात, परंतु संस्कृत ग्रंथांत बहुतकरून तो वृद्धीचा वाचक धरला आहे. त्याप्रमाणें आह्मीही येथें घेतला आहे. यावरून सूतक ह्म० वृद्धि ( सुवेर ) असें समजावें.

२ पुरुषाच्या नांवांत सम ह्मणजे २।४।६।८ अशीं अक्षरें असावीं; आणि १।३।५।७ अशीं विषम अक्षरें स्त्रियांच्या नांवांत असावीं. याविषयीं **धर्मसिन्धु** प० ३ पूर्वार्ध, व **आश्वलायन**गृह्यसूत्र अ० १ कं० १५ सू० ८ । ९ पहा. येथें अक्षरशब्दानें स्वरांचें ग्रहण करावें. वरील नियम त्यांचाच आहे. व्यंजनांचा नाहीं.

३ येथें कृष्ण, अनंत इत्यादिकांस मासनामें ह्मटलें आहे; यावरून चैत्रादि महिन्यांच्या कृष्णादिदेवता कल्पून त्यांचींही नांवें ठेवण्यास सांगितलीं असावीं. नाहींपेक्षां महिन्यांशीं यांचा कांहींच संबंध दिसत नाहीं. कदाचित् मासाचें जें नाम—तें मासनाम असा अर्थ करून चैत्र, वैशाख असीं नांवें ठेवलीं असतीं तरी होतें. परंतु तसें केल्यास सर्व महिन्यांचीं नांवें नक्षत्रसंबंधानेंच आहेत. अतएव नाक्षत्र, व मासनामें एकच होतील. उदाहरणार्थ,—चैत्रमहिन्यांत चित्रा नक्षत्रावर ज्याचें जन्म झालें असेल त्याचें नाक्षत्र, व मासनाम चैत्र असेंच येईल. याप्रमाणेंच सर्वत्र होईल, ह्मणून तसें केलें नसावें असें वाटतें.

४ **धर्मसिंधूंत सुदर्शनभाष्या**नुसार नाक्षत्रनाम याची व्याख्या अशी केली आहे कीं, ज्या अश्विन्यादि नक्षत्रीं मुलाचें जन्म झालें असेल त्या नक्षत्राच्या वाचक शब्दाहून **"तत्र जातः"** ह्या अधिकारांत विहित असलेला तद्धित प्रत्यय केला असतां निष्पन्न होणारें जें नांव तें नाक्षत्र नाम होय. जसें,—आश्वयुक्, आपभरण, कार्तिक, रौहिण इत्यादि. सांप्रत महाराष्ट्र देशांत ब्राह्मण लोक नाक्षत्र नाम अथवा संध्येंतलें नांव ह्मणून जें ठेवितात तें—चू, चे, चो, ला—अश्विनी. ली, लू, ले, लो—भरणी. याप्रमाणें **ज्योतिषशास्त्रां**त सांगितलेल्या अवकहडाचक्रानुसार प्रत्येक नक्षत्राच्या ४ चरणांतून ज्या चरणावर मुलाचें जन्म झालें असेल त्याचें अक्षर घेऊन नांव ठेवितात. तें चूडामणि, चेदीश इत्यादिप्रकारचें असतें; परंतु असल्या नांवाला व्याकरणरीत्या नाक्षत्र

युक्त असावें." त्यांत आपल्या सूतकाच्या अंतीं अथवा बत्तिसाव्या दिवशीं बापानें देशकालसंकीर्तन करून—**अस्य कुमारस्य बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा नामव्यवहारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकरणं करिष्ये ।** असा संकल्प करून, गणेशपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, नांदीश्राद्ध हीं करून, तांदुळांनीं भरलेल्या कांशाच्या वगैरे पात्रांत सोन्याच्या लेखणीनें प्रथम "**गणेशाय नमः,**" नंतर "**कुलदेवतायै नमः,**" असें लिहून मग वर सांगितलेल्या बारा मासनामांपैकीं जें कोणतें येत असेल तें नांव लिहून, नंतर नाक्षत्रनाम, आणि मग शिवदास विष्णुदास इत्यादि व्यावहारिक नांव लिहून "**नामदेवताभ्यो नमः**" या मंत्रानें त्यांची पूजा करून, मुलग्याच्या उजव्या कानांत—**अमुकभक्तोऽसि,** व कन्या असेल तर—**अमुकासि** असा सर्व नांवांचा उच्चार करून वर हात जोडून, आपल्या कुलदेवतेच्या नांवानें—**अमुकदासो भवतः सर्वान्ब्राह्मणानभिवादयते ।** असें ह्मणून ब्राह्मणांस नमस्कार करावा. ब्राह्मणांनीं—**आयुष्मान्भवत्वमुकदासः ।** असें ह्मणावें. याप्रमाणें मासनामानें, नाक्षत्रनामानें, व व्यावहारिकनामानें अभिवादन करून ब्राह्मणांकडून आशीर्वचन घ्यावें. नंतर शंभर, दहा, अथवा यथाशक्ति ब्राह्मणांस आमान्नें देऊन, त्यांच्यापासून आशीर्वाद घ्यावे. कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीकमलाकरभट्टविरचिते शूद्रकमलाकरे नामकर्मप्रयोगः ॥**

## ॥ अथ दोलारोहः ॥

**पारिजाते बृहस्पतिः ॥ खट्वारोहस्तु कर्तव्यो दशमे द्वादशेऽपि वा ॥ ज्योतिर्निबन्धे ॥ आन्दोलाशयने पुंसो द्वादशो दिवसः शुभः ॥ त्रयोदशस्तु कन्याया न नक्षत्रविचारणा ॥ १ ॥ करत्रये वैष्णवरेवतीषु दितिद्वये चाश्विनकद्वयेषु ॥ कुर्याच्छिशूनां नृपतेश्च तद्वदान्दोलनं वै सुखिनो भवन्ति ॥ २ ॥**

यानंतर दोलारोहण सांगतो.

याविषयीं **प्रयोगपारिजातांत बृहस्पति** ह्मणतो—"जन्मदिवसापासून १० व्या, अथवा १२ व्या दिवशीं खट्वारोह करावा (मुलास पाळण्यांत घालावें.) **ज्योतिर्निबंधांत**—"पुरुषाला (मुलग्याला) पाळण्यांत निजण्याविषयीं १२ वा दिवस शुभकारक, व मुलगीला १३ वा दिवस शुभ होय. या दिवशीं नक्षत्रादिकांचा विचार करण्याचें प्रयोजन नाहीं. अन्य दिवशीं करणार तर—हस्त, चित्रा, स्वाती, श्रवण, रेवती, पुनर्वसु, पुष्य, अश्विनी, भरणी ह्या नऊ नक्षत्रांवर मुलास पाळण्यांत घालावें, व राजास पालखींत बस-

---

ही संज्ञा संभवणार नाहीं असें वाटतें. आणि **काशिनाथोपाध्यायां**नींही—"तें **श्रौतग्रंथादि** बहुतेकांस मान्य नाहीं," असें ह्मटलें आहे. तथापि **नारायणभट्टां**नीं असेंच घेतलें आहे, व असेंच घेण्याविषयीं **परिशिष्टां**तलें वाक्य येथें मूळांत, व **निर्णयसिन्धूं**त घेतलें आहे, परंतु कलकत्त्यांत छापलेल्या सदर ग्रंथाच्या पुस्तकांत तें आह्मास मिळालें नाहीं. याविषयींचे अन्यही प्रकार आहेत ते विस्तारभीतीस्तव दिले नाहींत.

४ "**प्रेष्य**" हा शब्द सेवकाचा वाचक आहे. यावरून नावांपुढें दासशब्द असावा.

वावें म्हणजे ते सुखी होतात," असें सांगितलें आहे. याप्रमाणें दिनशुद्धि वगैरे पाहून संप्रदायानुसार मुलास पाळण्यांत घालावें. **॥ इति श्रीकमलाकरभट्टविरचिते शूद्रकमलाकरे दोलारोहः ॥**

## ॥ अथ कर्णवेधः ॥

**ज्योतिर्निबन्धे गर्गः ॥ मासे षष्ठे सप्तमे वाप्यष्टमे मासि वत्सरे ॥ कर्णवेधं प्रशंसन्ति पुण्यायुःश्रीविवृद्धये ॥ १ ॥ मदनरत्ने वसिष्ठः ॥ मासे षष्ठे सप्तमे वाष्टमे वा वेध्यौ कर्णौ द्वादशे षोडशेऽह्नि ॥ हेमाद्रौ व्यासः ॥ कार्तिके पौषमासे वा चैत्रे वा फाल्गुनेऽपि वा ॥ कर्णवेधं प्रशंसन्ति शुक्लपक्षे शुभे दिने ॥ १ ॥ स च मृगार्द्राहस्तचित्रापुनर्वसुपुष्यश्रवणधनिष्ठारेवतीषु रिक्तापर्ववर्जतिथौ कार्यः ॥ मदनरत्ने ॥ सौवर्णी राजपुत्रस्य राजती विप्रवैश्ययोः ॥ शूद्रस्य चायसी सूची मध्यमाष्टाङ्गुलात्मिका ॥**

यानंतर कर्णवेध सांगतो.

याविषयीं **ज्योतिर्निबंधांत गर्ग** ह्मणतो—"६ व्या ७ व्या, अथवा ८ व्या महिन्यांत, अथवा वर्षोतीं कान टोंचावे. म्हणजे तें पुण्य, आयुष्य, लक्ष्मी यांच्या वृद्धीला कारण होतें. अशी त्याची धर्मवेत्ते प्रशंसा करितात." **मदनरत्नांत वसिष्ठ** म्हणतो–"६ व्या, ७ सातव्या, अथवा ८ व्या महिन्यांत, किंवा प्रथम १२ व्या अथवा सोळाव्या दिवशीं कर्णवेध करावा." **हेमाद्रींत व्यास** ह्मणतो—'कार्तिक, पौष, चैत्र, अथवा फाल्गुन ह्या महिन्यांत शुक्लपक्षीं शुभ दिवशीं कर्णवेध करावा असें ऋषि सांगतात." तो कर्णवेध मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, श्रवण, धनिष्ठा, रेवती ह्या नऊ नक्षत्रांवर, व चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, अमावास्या, पौर्णिमा ह्यांवांचून अन्य तिथींवर करावा. कान टोंचण्यास सुई कशी असावी त्याविषयीं **मदनरत्नांत**—"क्षत्रियांस सोन्याची ब्राह्मण व वैश्य यांस रुप्याची, शूद्रांस लोखंडाची असून मध्यम मानानें आठ बोटें लांबीची सुई असावी,' असें सांगितलें आहे. या प्रकारच्या सुईनें यथाचार कर्णवेध करावा. **॥ इति श्रीकमलाकरभट्टविरचिते शूद्रकमलाकरे कर्णवेधः ॥**

## अथ ताम्बूलभक्षणम् ॥

**चण्डेश्वरः ॥ सार्धमासद्वये दद्यात्ताम्बूलं प्रथमं शिशोः ॥**

आतां तांबूलभक्षणविधि सांगतो.—

त्याविषयीं **चंडेश्वर** ह्मणतो—"मुलाला अडीच महिने होतांच शुभलग्नीं प्रथमतः तांबूल द्यावा; अर्थात् विड्याचा रस द्यावा."

## अथ निष्क्रमणम् ॥

**ज्योतिर्निबन्धे यमः ॥ तृतीये वा चतुर्थे वा मासि निष्क्रमणं भवेत् ॥ मनुः ॥ मासे चतुर्थे कर्तव्यं शिशोर्निष्क्रमणं गृहात् ॥ षष्ठेऽन्नप्राशनं मासि यद्वेष्टं मङ्गलं कुले १ अत्र शिशूक्तिर्नतु द्विजोक्तिः ॥ तेन शूद्रस्यापीति मेधातिथिः ॥ मदनरत्ने बृहस्पतिः ॥ अन्नप्राशनकाले वा कुर्यान्निष्क्रमणक्रियाम् ॥ विष्णुधर्मोत्तरे ॥ दिगीशानां दिने तत्र तथा**

चन्द्रार्कयोर्द्विज ॥ पूजनं वासुदेवस्य गगनस्य च कारयेत् ॥ १ ॥ बहिर्निष्कासयेद्गेहाच्छंखपुण्याहनिःस्वनैः ॥ पिता देशकालौ स्मृत्वाऽस्य शिशोर्बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थं निष्क्रमणं करिष्ये ॥ इति सङ्कल्प्य गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि कृत्वा प्रतिमास्वक्षतपुञ्जेषु वैंद्रादिदशदिक्पालचन्द्रसूर्यवासुदेवगगनानां नामभिरावाहनादिपूजां कृत्वा शंखतूर्यमङ्गलस्वनैः ॥ सूर्यचन्द्रधेनूनां दर्शनं कारयित्वा पठेत् ॥ चन्द्रार्कयोर्दिगीशानां दिशां च गगनस्य च ॥ निक्षेपार्थमिमं दद्मि ते त्वां रक्षन्तु सर्वदा ॥ १ ॥ अप्रमत्तं प्रमत्तं वा दिवारात्रमथापि वा ॥ रक्षन्तु सततं सर्वे देवाः शक्रपुरोगमाः ॥ २ ॥ ततो विप्राः ॥ करोतु स्वस्ति ते ब्रह्मेत्याद्याशिषं दद्युः ॥ इति निष्क्रमणम् ॥

यानंतर निष्क्रमणविधि सांगतो.

याविषयीं **ज्योतिर्निबंधां**त **यम** ह्मणतो—"तिसऱ्या अथवा चवथ्या महिन्यांत निष्क्रमण करावें. **मनु** ह्मणतो—"चवथ्या महिन्यांत मुलाला गृहापासून बाहेर आणावें, व सहाव्या महिन्यांत त्याच्याकडून अन्नप्राशन करवावें. आणि जें आपल्या कुलास इष्ट असेल तें मंगल करावें." या वाक्यांत शिशोः (मुलाचें) असें ह्मटलें आहे. "द्विज शब्द नाहीं ह्मणून शिशुशब्द साधारणतः चारही वर्णांस लागू आहे ह्मणून हा संस्कार शूद्रालाही विहित आहे," असें **मेधातिथि** ह्मणतो. **मदनरत्नां**त **बृहस्पति** ह्मणतो कीं—"वर सांगितल्याप्रमाणें अथवा अन्नप्राशनकालीं निष्क्रमणकर्म करावें." **विष्णुधर्मोत्तरांत**,—"सोमवारीं व रविवारीं अष्टौ दिक्पालांचें, वासुदेवाचें, व आकाशाचें पूजन करवून शंख व इतर वाद्यें, व पुण्याह शब्द यांचा गजर करून मुलाला गृहापासून बाहेर आणावें," असें सांगितलें आहे. बापानें देशकाल यांचें स्मरण करून—**अस्य शिशोर्बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थं निष्क्रमणं करिष्ये ॥ तदंगतया गणेशपूजापुण्याहवाचन—मातृकापूजा—नांदीश्राद्धादि करिष्ये ॥** असा संकल्प करून गणपतिपूजनादि करून प्रतिमांवर अथवा अक्षतपुंजांवर इंद्रादि (इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, ईश्वर, ब्रह्मा, अनंत) हे दहा दिक्पाल, चंद्र, सूर्य, वासुदेव, व गगन यांची नाममंत्रांनीं आवाहनादि सोळा उपचारांनीं पूजा करून शंख, वाजंत्रें व मंगलशब्द यांनीं युक्त असें सूर्य, चंद्र, व गायी यांचें दर्शन करवून पुढील मंत्र ह्मणावे—"**चंद्रार्कयोर्दिगीशानां दिशां च गगनस्य च ॥ निक्षेपार्थमिमं दद्मि ते त्वां रक्षन्तु सर्वदा ॥ १ ॥ अप्रमत्तं प्रमत्तं वा दिवारात्रमथापि वा ॥ रक्षन्तु सततं सर्वे देवाः शक्रपुरोगमाः**" ॥ २ ॥ हे मंत्र ह्मटल्यावर ब्राह्मणांनीं—"**करोतु स्वस्ति ते ब्रह्मा०**" इत्यादि मंत्र ह्मणून आशीर्वाद द्यावा.

**इति श्रीशूद्रकमलाकरे निष्क्रमणप्रयोगः ॥**

## अथोपवेशनम् ॥

प्रयोगपारिजाते पाद्मे ॥ पञ्चमे च तथा मासि भूमौ तमुपवेशयेत् ॥ तत्र सर्वे ग्रहाः शस्ता भौमोऽप्यत्र विशेषतः ॥ १ ॥ विष्णुधर्मोत्तरे ॥ वाराहं पूजयेद्देवं पृथ्वीं चैव तथा

द्विजम् ॥ पिता देशकालौ स्मृत्वास्य कुमारस्य सर्वारिष्टशान्त्यायुरारोग्यक्षेमार्थमुपवेशनं करिष्ये इति सङ्कल्प्य ॥ गणेशपूजां पुण्याहवाचनं च कृत्वा पीठे प्रतिमायाम् ॥ वाराहं पृथ्वीं च नाम्ना षोडशोपचारैः सम्पूज्य। तदग्रे पञ्च सप्त वा धान्यपुञ्जान् कृत्वा तन्मध्ये भूमौ वस्त्रे । करोतु स्वस्ति ते ब्रह्मेत्याद्यैर्वाद्यघोषेण शिशुमुपवेश्य । मृत्युंजयं स्मृत्वा भस्मना रक्षां कृत्वा पठेत् । रक्षैनं वसुधे देवि सदा सर्वगतं शुभे ॥ आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये ॥ १ ॥ अचिरादायुपस्त्वस्य ये केचित्परिपन्थिनः ॥ जीवितारोग्यवित्तेषु निर्दहस्वाचिरेण तान् ॥ २ ॥ धारिण्यशेषभूतानां माता त्वमसि कामधुक् ॥ अजरा चाप्रमेया च सर्वभूतनमस्कृता ॥ ३ ॥ चराचराणां भूतानां प्रतिष्टा चाव्यया ह्यसि॥ कुमारं पाहि मातस्त्वं ब्रह्मा तदनुमन्यतामिति ॥ अत्रैव कटिसूत्रबन्धनम् ॥ शिष्टास्त्वन्नप्राशनदिने एव निष्क्रमणमुपवेशनं च कुर्वन्ति ॥ इत्युपवेशनादि ॥

आतां उपवेशनप्रयोग सांगतो.

याविषयीं **प्रयोगपारिजातां**त **पद्मपुराणां**त—"मुलास पांचवा महिना लागल्यानंतर भूमीवर बसवावें. ज्या दिवशीं बसविण्याचें असेल त्यादिवशीं अन्य सर्व ग्रह प्रशस्त असून मंगळ विशेषेंकरून अनुकूल असावा," असें सांगितलें आहे. या उपवेशनाच्या प्रकाराविषयीं **विष्णुधर्मोत्तरां**त—"वराहरूपी देवाचें, पृथ्वीचें, व ब्राह्मणाचें पूजन करून भूमीवर उपवशेन करावें," असें सांगितलें आहे. बापानें देशकालादि स्मरण करून—**अस्य कुमारस्य सर्वारिष्टशान्त्यायुरारोग्यक्षेमार्थमुपवेशनं करिष्ये ।** असा संकल्प करून, गणेशपूजा, व पुण्याहवाचन करून, पीठावर प्रतिमेचे ठायीं "**वराहाय नमः, वराहमावाहयामि । पृथिव्यै नमः, पृथिवीमावाहयामि**" या नाममंत्रांनीं आवाहनादि षोडशोपचार पूजा करून, प्रतिमेपुढें ५ किंवा ७ धान्याचे पुंजके करून त्यांच्या मध्यभागीं भूमीवर वस्त्र घालून, त्यावर वाद्यांचा गजर करीत असतां—"**करोतु स्वस्ति ते ब्रह्मा०**" (पृ० ७१ पहा.) इत्यादि ७ सात मंत्रांनीं मुलास बसवून "**मृत्युञ्जयाय नमः**" असें ह्मणून त्याच्या अंगास विभूति लावून रक्षा करावी; आणि पुढील मंत्र ह्मणावे. "**रक्षैनं वसुधे देवि सदा सर्वगतं शुभे ॥ आयुःप्रमाणं सकलं निक्षिपस्व हरिप्रिये ॥ १ ॥ अचिरादायुपस्त्वस्य ये केचित्परिपंथिनः ॥ जीवितारोग्यवित्तेषु निर्दहस्वाचिरेण तान् ॥ २ ॥ धारिण्यशेषभूतानां माता त्वमसि कामधुक् ॥ अजरा चाप्रमेया च सर्वभूतनमस्कृता ॥ ३ ॥ चराचराणां भूतानां प्रतिष्ठा चाव्यया ह्यसि ॥ कुमारं पाहि मातस्त्वं ब्रह्मा तदनुमन्यताम्**"॥ ४ ॥ या मंत्रांनीं प्रार्थना करावी. मुलास कटदोरा बांधणें तो याच दिवशीं बांधावा. सांप्रतकालीं अन्नप्राशन करण्याचे दिवशीं निष्क्रमण, व उपवेशन करण्याचा शिष्टसंप्रदाय आहे. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे उपवेशनप्रयोगः ॥**

## ॥ अथान्नप्राशनम् ॥

**मदनरत्ने नारदः ॥ षष्ठे वाप्यष्टमे मासि पुंसां स्त्रीणां तु पञ्चमे ॥ सप्तमे मासि वा**

**कार्यं नवान्नप्राशनं शुभम् ॥ १ ॥ लौगाक्षिः ॥ षष्ठेऽन्नप्राशनं जातेषु दन्तेषु वा ॥ विष्णुधर्मोत्तरे ॥ ब्रह्माणं शङ्करं विष्णुं चन्द्राकौं च दिगीश्वरान् ॥ भुवं दिशश्च सम्पूज्य हुत्वा वह्नौ तथा चरुम् ॥ १ ॥ देवतापुरतस्तस्य धात्र्युत्सङ्गगतस्य च ॥ अलङ्कृतस्य दातव्यमन्नपात्रं सकाञ्चनम् ॥ २ ॥ मध्वाज्यदधिसंयुक्तं प्राशयेत्पायसं तु वा ॥ सर्वत्र मूलं विशेषश्च मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥ पिता देशकालौ स्मृत्वाऽस्य शिशोर्बीजगर्भसमुद्भवैनोविनाशद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थमन्नप्राशनं करिष्ये । इति सङ्कल्प्य गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानान्दीश्राद्धानि कृत्वा । ब्रह्मादीन् प्रतिमासु तण्डुलपुञ्जेषु वा सम्पूज्य । तन्नामभिर्वह्नौ चरुं हुत्वाज्यदधिमधुयुतमन्नं पायसं वा प्राशयित्वा ताम्बूलं च दत्त्वा । रत्नहेममणिभाजनाद्यग्रे निधाय यत् बालः स्पृशेत्सास्य जीविकेति परीक्षयेत ॥ इत्यन्नप्राशनम् ॥**

यानंतर अन्नप्राशनप्रयोग सांगतो.

याविषयीं **मदनरत्नां**त **नारद** ह्मणतो.—"पुरुषांचें सहाव्या किंवा आठव्या महिन्यांत; व स्त्रियांचें ५ व्या किंवा ७ व्या महिन्यांत प्रथम अन्नप्राशन करावें. ह्मणजे तें शुभकारक होय." **लौगाक्षि** ह्मणतो कीं,—"अन्नप्राशन सहाव्या महिन्यांत, किंवा दांत आल्यावर करावें." हें अन्नप्राशन कसें करावें? तें **विष्णुधर्मोत्तरां**त सांगितलें आहे. जसें—"ब्रह्मदेव, शंकर, विष्णु, चंद्र, सूर्य, इंद्रादि दश दिक्पाल, भूमि, व दिशा यांचें स्थापन व पूजन करून, अग्नींत चरूचें हवन करून, स्थापित देवतांच्या पुढें अलंकृत अशा मुलाला दायीच्या मांडीवर बसवून, सुवर्णपात्रांत किंवा तें नसेल तर इतर पात्रांत सुवर्ण घालून त्यांत मध, तूप, व दहीं यांसहित; असें अन्न किंवा केवल पायस मुलास प्राशनास द्यावा." येथें सर्वत्र मूलवचनें, व विशेष प्रकार **निर्णयसिंधू**वरून जाणावा. बापानें देशकाल स्मरून—**अस्य शिशोः बीजगर्भसमुद्भवैनोविनाशद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थमन्नप्राशनं करिष्ये । तदंगतया गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजानांदीश्राद्धानि करिष्ये ।** असा संकल्प करून, गणेशपूजा, पुण्याहवाचन, मातृकापूजा, व नांदीश्राद्ध हीं करून, ब्रह्मादिदेवतांस प्रतिमेवर अथवा तांदुळांच्या पुंजांवर आवाहन करून, १६ उपचारांनीं पूजून, त्या देवतांच्या नाममंत्रानें अग्नींत चरूचें हवन करून तूप, दहीं, व मध यांनीं युक्त असा भात अथवा पायस मुलास खाऊं घालून, व तांबूल देऊन त्याच्या पुढें नानातऱ्हेचे शिल्पपदार्थ, शस्त्रें, वस्त्रें, दौत लेखणी, पुस्तक वगैरे ठेवावीं. मग मुलगा स्वेच्छेनें प्रथम ज्या वस्तूस हात लावील तीवर तो आपली जीविका करील. असें त्याचें लक्षण जाणावें. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे अन्नप्राशनप्रयोगः समाप्तः ॥**

## ॥ अथाब्दपूर्तिः ॥

**गौडव्यवहारनिर्णये ॥ नवांबरधरो भूत्वा पूजयेच्च चिरायुषम् ॥ मार्कण्डेयं नरो भक्त्या पूजयेत्प्रयतस्तथा ॥ १ ॥ ततो दीर्घायुषं व्यासं रामं द्रौणिं कृपं बलिम् ॥ प्रह्लादं च**

हनूमन्तं बिभीषणमथार्चयेत् ॥ २ ॥ स्वनक्षत्रं जन्मतिथिं प्राप्य सम्पूजयेन्नरः ॥ षष्ठीं च दधिभक्तेन वर्षे वर्षे पुनः पुनः ॥ ३ ॥ तिथितत्त्वे तन्नाम्ना तिलहोमोऽप्युक्तः ॥ आदित्यपुराणे ॥ सर्वैश्च जन्मदिवसे स्नातैर्मङ्गलवारिभिः ॥ गुरुदेवाग्निविप्राश्च पूजनीयाः प्रयत्नतः ॥ १ ॥ स्वनक्षत्रं च पितरस्तथा देवः प्रजापतिः ॥ प्रतिसंवत्सरं यत्नात्कर्तव्यश्च महोत्सवः ॥ २ ॥ कृत्यचिन्तामणौ ॥ गुडदुग्धतिलान् दद्याद्धस्ते ग्रन्थौ च बन्धयेत् ॥ गुग्गुलं निम्बसिद्धार्थं दूर्वां गोरोचनादिकम् ॥ १ ॥ सम्पूज्य भानुविघ्नेशौ महर्षिं प्रार्थये-दिदम् ॥ जन्मतिथिश्चौदयिकी ग्राह्या ॥ तदुक्तं कृत्यतत्त्वार्णवे स्कान्दे ॥ युगाद्या वर्षवृद्धिश्च सप्तमी पार्वतीप्रिया ॥ रवेरुदयमीक्षन्ते न तत्र तिथियुग्मतेति ॥ पिता सबालोऽभ्यङ्गं कृत्वा नववस्त्रधरो देशकालौ स्मृत्वास्य शिशोर्दीर्घायुरारोग्यार्थं वर्षदिनकृत्यं करिष्य इत्युक्त्वा । प्रतिमास्वक्षतपुंजेषु वा गणेशं सूर्यं मार्कंडेयं व्यासं परशुराममश्वत्थामानं कृपं बलिं प्रह्लादं हनुमन्तं बिभीषणं षष्ठीं स्वनक्षत्रं पितरौ प्रजापतिं गुरुमग्निं च सम्पूज्य । पक्षे तन्नाम्ना तिलहोमं च कृत्वा गुग्गुलनिंबसर्षपदूर्वागोरोचना-गुडानां पोटलिं हस्ते बध्वा मार्कण्डेयं प्रार्थयेत् ॥ चिरञ्जीवी यथा त्वं भो भविष्यामि तथा मुने ॥ रूपवान्वित्तवांश्चैव श्रिया युक्तश्च सर्वदा ॥ १ ॥ मार्कण्डेय नमस्तेऽस्तु सप्तकल्पान्तजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थं प्रसीद भगवन् मुने ॥ २ ॥ चिरंजीवी यथा त्वं तु मुनीनां प्रवर द्विज ॥ कुरुष्व मुनिशार्दूल तथा मां चिरजीविनम् ॥ ३ ॥ मार्कण्डेय महाभाग सप्तकल्पांतजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकं वरदो भव ॥ ४ ॥ पिता त्वेनमिति वदेत् ॥ ततो गुडतिलयुतं दुग्धमादाय । सतिलं गुडसम्मिश्रमञ्जल्यर्धमितं पयः ॥ मार्कण्डेयाद्वरं लब्ध्वा पिबाम्यायुर्विवृद्धये ॥ १ ॥ इति पीत्वा ततो गुरुदेवविप्राः पूज्याः ॥ गौडतिथितत्त्वे स्कान्दे ॥ खंडनं नखकेशानां मैथुनाध्वगमौ तथा ॥ आमिषं कलहं हिंसां वर्षवृद्धौ विवर्जयेत् ॥ १ ॥ तत्रैव ॥ कृतान्तकुजयोर्वारे यस्य जन्मतिथिर्भवेत् ॥ अनृक्षयोगसम्प्राप्तौ विघ्नस्तस्य पदे पदे ॥ २ ॥ (कृतान्तः शनिः) जन्मनक्षत्रयोगे न दोषः ॥ तस्य सर्वौषधिस्नानम् ॥ गुरुदेवाग्निपूजनम् ॥ विशेषो निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥

यानंतर वर्धापन अथवा अब्दपूर्तिप्रयोग सांगतो.—

याविषयीं **गौडव्यवहारनिर्णयां**त—"नूतन वस्त्रें धारण करून, व चिरायु ( बहुकाल वांचणारा ) अशा मार्कंडेयऋषीचें भक्तिपूर्वक पूजन करून नंतर दीर्घायुषी—व्यास, परशुराम, अश्वत्थामा, कृपाचार्य, बली, प्रल्हाद, हनुमान्, व बिभीषण यांचें ज्या दिवशीं आपली जन्मतिथि, जन्मनक्षत्र वगैरे असेल त्या दिवशीं पूजन करावें. तसेंच षष्ठीदेवीस दधिमिश्रित भाताचा बलि द्यावा. या प्रकारचें हें कर्म प्रतिवर्षी नियमानें करावें." असें सांगितलें आहे. **तिथितत्त्वां**त—"त्या त्या देवतांच्या नाममंत्रांनीं तिलांचा होम करावा," असें सांगितलें आहे. **आदित्यपुराणां**त—"सर्व मनुष्यांनीं आपल्या जन्मदिवशीं मंगल उदकानें स्नान करून, गुरु, देव, अग्नि, ब्राह्मण, स्वनक्षत्रदेवता, पितर, व प्रजापति यांचें प्रयत्नानें पूजन करावें, आणि त्या दिवशीं मोठा उत्साह करावा, असें प्रति-

वर्षीं करावें" असें सांगितलें आहे. **कृत्यचिंतामणींत** "गूळ, तीळ, व दूध ब्राह्मणांस द्यावें. गुळादिकांची पोथंडी करून दंडास बांधावी. त्या पोथंडींत गुग्गुळ, लिंब, पांढऱ्या मोहोऱ्या, दूर्वा, गोरोचन वगैरे असावीं. सूर्य, गणपति, व महर्षि यांचें पूजन करून यांस ही प्रार्थना करावी," असें सांगितलें आहे. ह्या कर्माविषयीं जन्मतिथि सूर्योदयकालीं असेल ती घ्यावी. तेंच **कृत्य तत्त्वार्णवांत स्कन्दपुराणांत** सांगितलें आहे. जसें "युगादि वर्धापन, व पार्वतीप्रिया सप्तमी या कर्माविषयीं सूर्योदयकालीं असलेली तिथि घ्यावी, तेथें तिथियुग्मता[1] नाहीं." बापानें[2] मुलासहवर्तमान अभ्यंगस्नान[3] करून, नवीं वस्त्रें धारण करून, देशकालस्मरण करून,—**अस्य शिशोः दीर्घायुरारोग्यार्थं वर्षदिनकृत्यं करिष्ये ।** असा संकल्प करून प्रतिमांवर किंवा अक्षतपुंजांवर—गणेश, सूर्य, मार्कंडेय, व्यास, परशुराम, अश्वत्थामा, कृपाचार्य, बलि, प्रल्हाद, हनुमान्, बिभीषण, षष्ठीदेवी, आपलें जन्मनक्षत्र, पितर, प्रजापति, गुरु, व अग्नि यांचें आवाहनादि सोळा उपचारांनीं पूजन करावें. होम करण्याचा पक्ष घेतल्यास त्यांच्या नाममंत्रानें तिलहोम करावा. नंतर गुग्गुळ, लिंब, पांढऱ्या मोहोऱ्या, दूर्वा, गोरोचन, आणि गूळ यांची फडक्यांत घालून गांठोडी करून ती उजव्या हाताला बांधून मार्कंडेयास प्रार्थावें. त्याचे मंत्र—**"चिरंजीवी यथा त्वं भो भविष्यामि तथा मुने ॥ रूपवान्वित्तवांश्चैव श्रिया युक्तश्च सर्वदा ॥ १ ॥ मार्कंडेय नमस्तेऽस्तु सप्तकल्पान्तजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थं प्रसीद भगवन्मुने ॥ २ ॥ चिरंजीवी यथा त्वं तु मुनीनां प्रवर द्विज ॥ कुरुष्व मुनिशार्दूल तथा मां चिरजीविनम् ॥ ३ ॥ मार्कंडेय महाभाग सप्तकल्पान्तजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकं वरदो भव ॥४॥** हें कर्म स्वतः कर्तव्य असेल तर हे मंत्र असे ह्मणावे, व बाप करणारा असल्यास तिसऱ्या मंत्राचा चवथा चरण **"०तथैनं चिरजीविनम्"** असा पाठभेद करून ह्मणावा[4]. नंतर

१ पूर्व दिवसीं किंवा दुसऱ्या दिवसीं तिथीचें ग्रहण करणें यास तिथियुग्मता ह्मणतात.

२ मुलगा लहान असतां हें कर्म बापानें करावें, आणि तो थोर झाल्यावर स्वतः त्यानेंच करावें, असें धर्मशास्त्रांत सांगितलें आहे.

३ येथें अभ्यंग करावें असें सांगितलें आहे, परंतु—**"मृते जन्मनि संक्रान्तौ श्राद्धे जन्मदिने तथा ॥ अस्पृश्यस्पर्शने चैव न स्नायादुष्णवारिणा"** अर्थ—आपला कोणी संबंधी मेला असतां, पुत्रजन्मकालीं, संक्रांति, श्राद्ध व आपल्या जन्मदिवशीं, आणि शिवाशिव झाली असतां ऊन पाण्यानें स्नान करूं नये. ह्या **वृद्धमनूच्या** वचनावरून ऊनपाण्याचा निषेध होतो. तेव्हां वाढदिवसीं सुगंधि तेल वगैरे अंगास लावून थंड पाण्यानें स्नान करावें. ह्यावरून "अभ्यंग करून थंड पाण्यानें स्नान करूं नये," असा जो निषेध आहे त्याची पूर्ववचनांत सांगितलेल्या स्थलीं प्रवृत्ति होत नसेल असें वाटतें.

४ येथें मूळांत ३ ऱ्या श्लोकाच्या ४ थ्या चरणाचा मात्र पाठभेद सांगितला आहे, परंतु पहिला श्लोकही प्रथम चरण सोडून **"०कुरुष्वैनं तथा मुने ॥ रूपवन्तं वित्तवन्तं श्रिया युक्तं च सर्वदा"** असा ह्मटला असतां चालेल, असें आह्मास वाटतें.

गूळ, व तीळ यांनीं युक्त असें दूध घेऊन—"**सतिलं गुडसंमिश्रं अञ्जल्यर्धमितं पयः ॥ मार्कंडेयाद्वरं लब्ध्वा पिबाम्यायुर्विवृद्धये**" ॥ १ ॥ हा मंत्र ह्मणून तें दूध पिऊन नंतर गुरु, देव, ब्राह्मण यांची पूजा करावी. कर्म ईश्वरार्पण करावें. ह्या दिवशीं काय काय वर्ज्य करावें तें **गौडतिथितत्त्वां**त **स्कन्दपुराणां**त सांगितलें आहे. जसें—"नखें व केश तोडणें, मैथुन करणें, मार्ग चालणें, मांस भक्षण, भांडण करणें, व सर्वप्रकारची हिंसा हीं वर्धापनाचे दिवशीं करूं नयेत." आणखी तेथेंच—"ज्याची जन्मतिथि शनिवारीं अथवा मंगळवारीं होईल आणि त्या दिवशीं जन्मनक्षत्रयोग नसेल तर त्यास पदोपदीं विघ्नें येतील," असें सांगितलें आहे. त्या दिवशीं जन्मनक्षत्रयोग असल्यास पूर्वोक्त दोष नाहीं. असा दुष्टयोग ज्याला प्राप्त झाला असेल त्यानें शुभप्राप्तीकरितां सर्वौषधींनीं स्नान, व गुरु," देव आणि अग्नि यांचें पूजन करावें. याचा विशेष **निर्णयसिंधूं**त पहावा.

## ॥ अथ हेमाद्रौ वर्धापने विशेषः ॥

**भविष्ये । युधिष्ठिर उवाच ॥ देव देव महाभाग बालानां हितकाम्यया ॥ वर्द्धापनविधिं ब्रूहि राज्ञामपि विशेषतः ॥ १ ॥ कृष्ण उवाच ॥ एवं प्रयागे व्यासेन पृष्टः सनत्कुमारः प्राह ॥ मासि प्रविष्टे प्रथमे बालवर्द्धापनं बुधैः ॥ राज्ञां वा तन्मुनिश्रेष्ठ समान्ते च विधीयते ॥ १ ॥ कुमुदा माधवी गौरी रुद्राणी पार्वती उमा ॥ काली सरस्वती चैव सावित्री ब्रह्मणः प्रिया ॥ २ ॥ सती संज्ञा तथा मेधा पुष्टिस्तुष्टिसमन्विता ॥ नृपडिम्भपरित्राणा जीवन्ती नाम षोडशी ॥ ३ ॥ पूजनीयाः प्रयत्नेन सूर्यमध्ये विलिख्य तु ॥ रजनीपिष्टतो वापि लिखेद्वा कुङ्कुमेन तु ॥ ४ ॥ गन्धपुष्पैः सुगन्धैश्च दीपवस्त्रनिवेदनैः॥ पूजनीयास्तु संस्थाप्य कुमुदाद्याः पृथक् पृथक् ॥ ५ ॥ नामभिः पूजनीयास्ताः पूजयित्वा तु बालकम् ॥ भूपतिं तु मुने वाथ सर्वालङ्कारभूषितम् ॥ ६ ॥ पूजयेन्मातृपितरौ बालवर्धापने सति ॥ पुरोधाः पूजयेद्ब्रह्मन् राजवर्धापनाविधौ ॥ ७ ॥ कुमुदाद्याः समुद्दिश्य वंशपात्राणि कल्पयेत् ॥ एकैकस्या धनाढ्यस्तु दद्यात्षोडश षोडश ॥ ८ ॥ तदर्धानि तदर्धानि द्वे चैकैकमथापि वा ॥ बहुपक्वान्नयुक्तानि बहुपुष्पफलानि तु ॥ ९ ॥ सुवासिनीभ्यो विप्राणां दद्याद्भक्तिपुरःसरम् ॥ प्रीयतां कुमुदाद्या मे बालकायुर्विवर्द्धनाः ॥ १० ॥ बलेन यशसा तुष्ट्या बालं मे वर्द्धयन्तु वै ॥ प्रयच्छन्तु सदारोग्यं सौख्यं सौभाग्यमेव च ॥ ११ ॥ श्रीश्च तेति च मन्त्रेण ह्यर्घ्यं ताभ्यः प्रदापयेत् ॥ वस्त्रताम्बूलपुष्पादि दिने तस्मिन्प्रकल्पयेत् ॥ १२ ॥ सुवासिनीनां देयं तु कुमुदा प्रीयतामिति ॥ तत्रैव स्कान्दे ॥ एवं वर्द्धापनं वत्सरान्ते वै जन्मवासरे ॥ व्यतीतेषु च मासेषु बालानां बलवृद्धये ॥ १ ॥ न बालरोगाः प्रभवन्ति तस्य न स्कन्दरोगा न तु शाकिनीभ्यः ॥भयं भवेन्नैव जलाग्निदिग्भ्यो बालस्य भूतादि विशेषतश्च ॥ २ ॥ सम्प्राप्य राज्यं नृपतिः समान्ते कुर्यादिमं शान्तिमहोत्सवं च ॥ ग्रहांस्तथा पूज्य विनायकं च दुर्गां च भक्त्या कुमुदादिदेवीः ॥ ३ ॥ यः पूजयेद्भक्तिपुरःसरं हि स हेमपूर्णो बलवृद्धियुक्तः ॥ गोपथब्राह्मणे तु ॥ राजानमभिवर्द्धयिष्यन्नायुषा वर्चसा तेजसा यशसा विजयेन कीर्त्या पवि-**

ग्र्मैङ्गलैरभ्युक्ष्य उदकै रुक्मैरर्चयित्वा । माहेन्द्रं हविर्निरूप्य । लोकपालेभ्यश्च श्रपयेन्म-हांइन्द्रो य ओजसेति । लोकपलांश्चेष्ट्वा राजानमन्वारभ्य जुहुयात् । अर्वाञ्चमिंद्रं । त्रा-तारमिंद्रं वर्धय इति त्रिभिः । रक्षां कृत्वा सुगुरुणास आसते इति रोचनेनालङ्कुर्यात् । प्रजायै तंतुमिति सूक्तं संपातवतं कृत्वा धाता तेयमित्युक्तमभिवर्द्धस्वेति ॥ इति श्रीकम-लाकरभट्टकृतौ शूद्रधर्मतत्त्वेऽब्दपूर्तिः ॥

यानंतर **हेमाद्रीं**त याच कर्माचा विशेष सांगितला आहे तो सांगतो.

**भविष्यपुराणां**त **धर्मराजा** कृष्णाला **प्रश्न** करितो,—"हे देवांच्या देवा । हे म-हाभाग! बालांचें हित करण्याच्या बुद्धीनें वर्धापनाचा विधि सांग ? व त्यांत राजाला कांहीं विशेष असला तर तोही सांग?" याचें **श्रीकृष्ण** उत्तर सांगतात कीं,—"पूर्वी प्र-याग क्षेत्रांत **व्यासानें** याचप्रमाणें **सनत्कुमारा**ला प्रश्न केला होता. तेव्हां **व्यासा**ला हा विधि त्याणें सांगितला आहे. तो असा कीं,—प्रथम मुलाला एक महिना होतांच श-हाण्यांनीं त्याचें वर्धापन करावें, राजाचेंही याप्रमाणेंच करावें. किंवा हेंच कर्म वर्षांतींही करावें. तें असें कीं, कुमुदा, माधवी, गौरी, रुद्राणी, पार्वती, काली, सरस्वती, सावित्री, सती, संज्ञा, मेधा, पुष्टि, तुष्टि, उमा, ब्राह्मी, व राजपुत्राचें रक्षण करणारी जीवंती ह्या सोळा देवतांचीं चित्रें काढून त्यांचें मोठ्या प्रयत्नानें पूजन करावें. चित्रें काढायाचीं तीं र-जनीच्या ( हळदीच्या ) पिठानें अथवा कुंकुमानें काढावीं. गंध, पुष्पें, सुगंध, धूप, दीप, वस्त्रें वगैरे अर्पण करून कुमुदादि देवींचें नाममंत्रानें निरनिराळें पूजन करून आईबापांनीं बालकाचें पूजन करावें; अर्थात् त्यास अलंकारादिकांनीं भूषित करावें. राजाचें असेल तर पुरोहितानें त्याचें पूजन करावें. नंतर कुमुदादि देवींचा उच्चार करून सुपांतून वायनें द्यावी. तीं सामर्थ्य असेल तर प्रत्येक देवतेस सोळा, अथवा आठ, किंवा चार; अथवा दोन, किंवा एक एक द्यावीं. त्यांत बहुत पक्वान्नें, पुष्पें फळें वगैरे असावीं, व तीं भक्तिपूर्वक सुवासिनीस, व ब्राह्मणास द्यावीं. देतेवेळीं— "**प्रीयतां कुमुदाद्या मे बालकायुर्विवर्धनाः ॥ बलेन यशसा तुष्ट्या बालं मे वर्धयन्तु वै ॥ १ ॥ प्रयच्छन्तु सदारोग्यं सौख्यं सौभाग्यमेव च**" ॥ हे मंत्र ह्मणावे. कर्ता ब्राह्मण असेल तर– "**श्रीश्च ते लक्ष्मीश्च०**" या मंत्रानें अर्घ्य द्यावें. वस्त्र, तांबूल इत्यादि सुवासिनींला द्यावीं. कुमुदादि देवी मजवर प्रसन्न असोत ! असें ह्मणावें, आणखी तेथेंच ( **हेमाद्रींत** ) **स्कन्दपुराणां**त– "याप्रमाणें वर्षान्तीं जन्मदिवशीं अथवा प्रतिमासीं जन्मनक्षत्रीं मुलाचें बल वाढावें ह्मणून वर्धापन करावें. असें करील त्यास बालरोग, स्कन्दरोग, शाकिनी इत्यादिकांपासून, व उदक, अग्नि, दिशा, भूतवि-शेष, इत्यादिकांपासून भय होणार नाहीं. ज्या राजपुत्राला राज्य मिळालें असेल त्यानें प्रतिवर्षी ग्रह, विनायक, दुर्गा, व कुमुदादि सोळा देवी यांची पूजा करून भक्तिपूर्वक हा शान्तिमहोत्सव ( वर्धापन ) करावा. ह्मणजे तो द्रव्यादिकानें पूर्ण होतो," असा विशेष प्रकार सांगितला आहे. आणखी **गोपथ ब्राह्मणांत** "राजास आयुष्य, बल, तेज, यश, विजय, कीर्ति यांहीं वृद्धिंगत करण्याचें असेल तर त्यास त्याच्या जन्मदिवसीं

पवित्र, व मंगलकारक उदकानें अभिषेक करून अलंकारादिकांनीं भूषित करून, महेंद्र-देवताक हवीचा निर्वाप करून लोकपालांस हवीचें श्रपण करावें;" **महांइंद्रो य ओजसा०**" या मंत्रानें लोकपालांचें यजन करून राजास अन्वारब्ध होऊन हातास हात लावून '**अर्वाञ्चमिंद्रं० १ त्रातारमिंद्रं० २ वर्धय० ३** या मंत्रांनीं हवन करावें. नंतर रक्षा करून '**सुगुरुणास आसते०**' या मंत्रानें त्यास गोरोचनानें अलंकृत करावें. '**प्रजायै तन्तुं०**' हें सूक्त ह्मणत असतां, अग्निकुंडांत तुपाची धार धरून '**धाता ते य०** ' या मंत्रानें '**अभिवर्धस्व**' ह्मणून आशीर्वचन द्यावें असें सांगितलें आहे, परंतु कलियुगांत वेदमंत्राधिकारी असे क्षत्रिय नाहींत, ह्मणून सांप्रत याचा प्रचार नाहीं. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे अब्दपूर्तिप्रयोगः समाप्तः ॥**

## ॥ अथ चौलम् ॥

**बृहस्पतिः ॥ पापग्रहाणां वारादौ विप्राणां शुभदो रविः ॥ क्षत्रियाणां क्षमासूनौ विट्शूद्राणां शनौ शुभम् ॥ १ ॥ अस्य कालनिर्णयः सर्वैर्मातुर्गर्भे रजोदर्शने च न कार्य-मित्यादिरन्यश्च विशेषो द्विजतुल्यो मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयः ॥ शूद्रस्य विशेषमात्रं तूच्यते ॥ प्रथमे द्वितीये तृतीये पञ्चमे वाऽब्दे यथाकुलधर्मं चोक्तकाले पिता देशकालौ स्मृत्वास्य शिशोर्बीजगर्भसमुद्भवदोषनाशद्वारा बलायुर्वर्चोभिवृद्ध्यर्थं चौलकर्म करिष्ये । इति संकल्प्य । गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजावसोर्धारानान्दीश्राद्धानि कृत्वा । भद्रासने शिशुमुपवेश्यैकां शिखां केशपङ्क्तिं वा संरक्ष्य सर्वं वा वपनं यथाचारं कार्यम् ॥ ततो नीराजनादि कार्यम् ॥ ॥ इति चौलम् ॥**

आतां चौल सांगतो.

तें कोणत्या वारीं करावें ? याविषयीं **बृहस्पति** ह्मणतो.– "पापग्रहांच्या वारादिकांत ब्राह्मणांस रविवार, क्षत्रियांस भौमवार, वैश्य व शूद्र यांस शनिवार, हे चौलकर्मास शुभ होत. आतां यांचा कालनिर्णय आई रजस्वाला अथवा गर्भिणी असतां करूं नये इत्यादि व अन्यही विशेष विचार द्विजांसारखाच आहे. तो **निर्णयसिन्धू**वरून जाणावा. त्यांतून शूद्रांस विशेष असेल तेवढाच येथें सांगतों. पहिलें, दुसरें, तिसरें, व पांचवें ह्या वर्षी; अथवा कुलधर्मानुसार शास्त्रोक्तकालीं बापानें देशकाल स्मरून,—"**अस्य शिशोः बीजगर्भसमुद्भवदोषनाशद्वारा बलायुर्वर्चोऽभिवृद्ध्यर्थं चौलकर्म करिष्ये ।**" असा संकल्प करून, गणेशपूजन, पुण्याहवाचन, मातृकापूजन, वसोर्धारा, नान्दीश्राद्ध, हीं करून, भद्रासना ( रंगित पाट वगैरे ) वर मुलास बसवून त्याची शेंडी किंवा कांहीं केसांची ओळ राखून, किंवा सर्व वपन करून, नंतर त्यास मंगलस्नान घालून ओवाळणी वगैरे झाल्यावर ब्राह्मणाचें पूजन करून कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे चौलप्रयोगः ॥**

---

**१ शुभदं भवेत्–इतिपाठः । तत्र वारादिशब्देन रविवारस्यैवात्र ग्रहणम् । रवौ इति सप्तम्यन्तोपि पाठः ।**

## ॥ अथ विद्यारम्भः ॥

मदनरत्ने नृसिंहः ॥ अक्षरस्वीकृतिं कुर्यात्प्राप्ते पञ्चमहायने ॥ उत्तरायणगे सूर्ये कुम्भमासं विवर्जयेत् ॥ १ ॥ अथ धनुर्विद्यादीपिकायाम् ॥ अदितिगुरुयमार्कस्वातिचित्राग्निपित्र्यध्रुवहरिवसुमूलेष्विन्दुभागान्त्यभेषु ॥ शनिशशिबुधवारे विष्णुबोधेऽपि पौषे सुसमयतिथियोगे चापविद्याप्रदानम् ॥ १ ॥ तच्च हरिं लक्ष्मीं सरस्वतीं च पूजयित्वा कार्यम् ॥ सर्वायुधमहामात्र सर्वदेवारिसूदन ॥ चाप मां समरे रक्ष साकं शरवरैरिह ॥ १ ॥ धृतं कृष्णेन रक्षार्थं संहाराय हरेण च ॥ त्रयीमूर्तिगतं देवं धनुरस्त्रं नमाम्यहम् ॥ २ ॥ इति मन्त्रेण सम्पूज्य नत्वा बाणं प्राच्यां मुक्त्वा विप्रान् पूजयेत् ॥

आतां विद्यारंभ सांगतो.-

याविषयीं **मदनरत्नांत नृसिंह** ह्मणतो- "पंचम वर्षी उत्तरायणांत कुंभसंक्रांतिमास (माघ) वर्ज्य करून लिहिण्यास प्रारंभ करावा." (शूद्रास) धनुर्विद्येचा अभ्यास करण्याचाहि अधिकार आहे. तिच्या आरंभाविषयीं दिनशुद्धि वगैरे **धनुर्विद्यादीपिकेंत** सांगितली आहे. ती- "पुनर्वसु, पुष्य, भरणी, हस्त, स्वाती, चित्रा, कृत्तिका, मघा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, मूळ, मृग, पूर्वा, रेवती हीं नक्षत्रें; शनि, चंद्र, व बुध या वारीं चातुर्मास्य वर्ज्य करून, पौषांत देखील उत्तम वेळ व तिथियोग पाहून धनुर्विद्या घ्यावी." त्या वेळीं प्रथम विष्णु, लक्ष्मी, सरस्वती यांचें व धनुष्य भाते वगैरेंचें पूजन करून— "**सर्वायुधमहामात्र सर्वदेवारिसूदन ॥ चाप मां समरे रक्ष साकं शरवरैरिह ॥ १ ॥ धृतं कृष्णेन रक्षार्थं संहाराय हरेण च ॥ त्रयीमूर्तिगतं देवं धनुरस्त्रं नमाम्यहम् ॥ २ ॥**" या मंत्रांनीं पूजानमस्कारादि करून व धनुष्यास बाण लावून पूर्वेस सोडून, ब्राह्मणादिकांचें पूजन करून, कर्म ईश्वरार्पण करावें. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे विद्यारंभप्रयोगः ॥**

## ॥ अथ छुरिकाबन्धनम् ॥

ज्योतिर्निबन्धे नारदः ॥ छुरिकाबन्धनं वक्ष्ये नृपाणां प्राक्करग्रहात् ॥ विवाहोक्तेषु मासेषु शुक्लपक्षेऽप्यनस्तगे ॥ १ ॥ जीवे शुक्रे च भूपुत्रे चन्द्रताराबलान्विते ॥ मौञ्जिबन्धर्क्षतिथिषु कुजवर्जितवासरे ॥ २ ॥ संग्रहे ॥ शूद्राणां राजपुत्राणां मौञ्ज्यभावेऽस्त्रबन्धनम् ॥ मौञ्जीबन्धोक्ततिथ्यादौ कार्यं भौमदिनं विना ॥ १ ॥ विष्णुधर्मे ॥ पूजयित्वा हरिं लक्ष्मीं तथा देवीं सरस्वतीम् ॥ स्वविद्यासूत्रकारांश्च स्वां च विद्यां विशेषतः ॥ १ ॥ एतेषामेव देवानां नाम्ना तु जुहुयाद्घृतम् ॥ दक्षिणाभिर्द्विजेन्द्राणां कर्तव्यं चात्र पूजनम् ॥ २ ॥ मन्त्रस्तु ॥ सर्वायुधानां प्रथमं निर्मितासि पिनाकिना ॥ शूलायुधाद्विनि-

---

१ शूद्रास द्विजांसारखा विद्याग्रहणाचा अधिकार नाहीं हें पहिल्या प्रकरणांत सविस्तर सांगितलें आहे. परंतु त्यांस लिहिण्यावाचण्याचा अभ्यास करण्याचा अधिकार आहे; ह्मणून तो कधीं करावा हें येथें सांगितलें आहे.

**ष्कृष्य कृत्वा मुष्टिग्रहं शुभम् ॥ १ ॥ चण्डिकायाः प्रदत्तासि सर्वदुष्टनिबर्हिणी ॥ तया विस्तारिता चासि देवानां प्रतिपादिता ॥ २ ॥ सर्वसत्त्वाङ्गभूतासि सर्वाशुभनिबर्हिणी ॥ छुरिके रक्ष मां नित्यं शान्तिं यच्छ नमोऽस्तु ते ॥ ३ ॥ इति सम्पूज्य नत्वा दक्षिणे कटिभागे बध्नीयात् ॥ अपरार्के वृद्धशातातपः ॥ शिशोरभ्युक्षणं प्रोक्तं बालस्याचमनं स्मृतम् ॥ जलस्थलादिसंस्पर्शे स्नानमेव कुमारके ॥ १ ॥ प्राक्चूडाकरणाद्बालः प्रागन्नप्राशनाच्छिशुः ॥ कुमारः स तु विज्ञेयो यावन्मौञ्जी निबध्यते ॥ २ ॥ बालस्य पञ्चमाद्वर्षाद्रक्षार्थं शौचमादिशेदित्यादि मत्कृते निर्णयसिन्धौ ज्ञेयम् ॥**

यानंतर छुरिका( सुरी )बंधन सांगतोः—

याविषयीं **ज्योतिर्निबंधां**त **नारद** ह्मणतो, "शूद्रराजांस विवाहाच्या पूर्वी कर्तव्य असें छुरिकाबंधन सांगतों. हें लग्नास उक्त अशा महिन्यांत शुक्लपक्षांत गुरु, शुक्र, मंगळ हे अस्तंगत नसतां, व चंद्र, तारा इत्यादिकांचें बल पाहून मंगळवार वर्ज्य करून मुंजीस सांगितलेल्या नक्षत्र, तिथि, व वार यांवर करावें." **संग्रह** नामक ग्रंथांत "शूद्र, व तज्जातीय राजपुत्र यांस मुंजीच्या अभावीं छुरिकाबंधन करणें विहित आहे. तें मुंजीस उक्त नक्षत्रतिथ्यादिकांवर भौमवार वर्जून करावें," असें सांगितलें आहे. **विष्णुधर्मांत**— "हरि, लक्ष्मी, सरस्वती, व स्वविद्येचे सूत्रकार, आणि आपली विद्या यांचें पूजन करून, त्यांच्या नाममंत्रानें घृतहोम करावा. दक्षिणादिक देऊन ब्राह्मणांची पूजा करावी. नंतर छुरिकाबंधन करावें," असें सांगितलें आहे. तिच्या बंधनाचे मंत्र—" **सर्वायुधानां प्रथमं निर्मितासि पिनाकिना ॥ शूलायुधाद्विनिष्कृष्य कृत्वा मुष्टिग्रहं शुभम् ॥ १ ॥ चंडिकायाः प्रदत्तासि सर्वदुष्टनिबर्हिणी ॥ तया विस्तारिता चासि देवानां प्रतिपादिता ॥ २ ॥ सर्वसत्त्वांगभूतासि सर्वाशुभनिबर्हिणी ॥ छुरिके रक्ष मां नित्यं शान्तिं यच्छ नमोऽस्तु ते" ॥ ३ ॥** या मंत्रांनीं सुरीचें पूजन करून ती कमरेच्या उजव्या भागीं बांधावी. हा छुरिकाबंधनसंस्कार झाल्यावर त्यानें नियमानें[१] वागावें. मुलांस लहानपणींचे नियम, **अपरार्क**ग्रंथांत **वृद्धशातातप** सांगतो,—" उच्छिष्टादिस्पर्श[२] किंवा दुसरें कांहीं स्नानाचें निमित्त झालें असतां, स्नानाबद्दल शिशूंस प्रोक्षण, व बालांस आचमन, विहित आहे. अस्पृश्यस्पर्श झाल्यास कुमारानें स्नान करावें, असें प्राचीन ऋषींनीं सांगितलें आहे. मुलास अन्नप्राशनसंस्कार होईपर्यंत, किंवा पुरुषांस ८ वा, व स्त्रियांस ७ वा महिना होई तोंपर्यंत शिशु, व चौल होईपर्यंत किंवा तीन वर्षे होत तोंपर्यंत बाल, आणि मुंज ( शूद्रास छुरिकाबंधन ) होईपर्यंत कुमार, अशा संज्ञा आहेत. बालास ५ व्या वर्षापासून त्याचें रक्षण होण्याकरितां हातपाय धुण्यास, व अन्य शौच वगैरे करण्यास लावावें.

---

१ जसें ब्राह्मणानें मुंज होण्यापूर्वी यथेच्छ वागल्यास त्याचा दोष नाहीं, परंतु नंतर नियमानें वागलें पाहिजे. तसेंच शूद्रानें छुरिकाबंधन झाल्यावर नियमानें वागलें पाहिजे. ते नियम पुढें आह्निकप्रकरणांत येतील.

२ हातपाय धुतले नाहींं, व स्नान करण्याचें निमित्त झालें असतां केलें नाहीं, अथवा आच-

एतत्संबंधी विशेष मत्कृत **निर्णयसिंधूं**त पहावा ॥ **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे छुरिकाबंधनप्रयोगः समाप्तः ॥**

## ॥ अथ विवाहः ॥

तत्र सापिण्ड्यं शूद्राणां द्विजवदेव । सर्वत्रावयवानुवृत्तेः सद्भावादिति विज्ञानेश्वरः ॥ तच्च मया निर्णयसिन्धावुक्तमिति नात्रोच्यते ॥ तत्र ब्राह्मार्षदैवप्राजापत्यगांधर्वासुरराक्षसपैशाचा अष्टौ विवाहाः ॥ तानाह याज्ञवल्क्यः ॥ ब्राह्मो विवाह आहूय दीयते शक्त्यलङ्कृता ॥ यज्ञस्थऋत्विजे दैव आदायार्षस्तु गोद्वयम् ॥ १ ॥ इत्युक्त्वा चरतां धर्मं सह या दीयतेऽर्थिने ॥ स कायः पावयेत्तज्जः षट् षड् वंश्यान्सहात्मना ॥ २ ॥ आसुरो द्रविणादानाद्गान्धर्वः समयान्मिथः ॥ राक्षसो युद्धहरणात्पैशाचः कन्यकाछलादिति ॥ एषु शूद्रस्य प्राजापत्यो मुख्यः ॥ आसुरगांधर्वौ मध्यमौ ॥ राक्षसपैशाचौ कनिष्ठौ ॥ तदाह मनुः ॥ ०आसुरं वैश्यशूद्रयोः ॥ २४ ॥ षडानुपूर्व्या विप्रस्य क्षत्रस्य चतुरोऽवरान् ॥ विट्शूद्रयोस्तु तानेव विद्याद्धर्म्यानराक्षसान् ॥ [ म० स्मृ० ३ श्लो० २३ ] ( चतुरः आसुरगान्धर्वराक्षसपैशाचाः । तान् चतुरो राक्षसवर्जान् ) ॥ कल्पतरौ ब्राह्मविवाहमुक्त्वा ब्राह्मणानां सतामेष धर्म इत्युक्तेर्ब्राह्मदैवौ विप्रस्यैव ॥ अन्ये त्रयाणां तुल्याः ॥ हेमाद्रौ पैठीनसिः ॥ पैशाचः प्रतिलोमानाम् ॥ काश्यपः ॥ शुल्केन ये प्रयच्छन्ति स्वसुतां लोभमोहिताः ॥ आत्मविक्रयिणः पापा महाकिल्बिषकारिणः ॥ १ ॥ पतन्ति नरके घोरे घ्नन्ति वा सप्तमं कुलम् ॥ शूद्रेणासुरत्वसिद्ध्यै प्रीत्या देयं । न तु मूल्यम् । तेन न दोषः ॥ अतएव गान्धर्वासुरयोः फलमादित्यपुराणे ॥ गान्धर्वेण विवाहेन यस्तु कन्यां प्रयच्छति ॥ गन्धर्वलोकं व्रजति गंधर्वैः पूज्यते च सः ॥ १ ॥ शुल्केन दद्याद्यः कन्यां वराय सदृशाय च ॥ किन्नरैरुपगीयेत गान्धर्वं लोकमेति च ॥ २ ॥ हारीतः ॥ एषामन्यतमेनोढां धर्मपत्नीं परे प्राहुः ॥ विशेषो मेधातिथौ कल्पतरौ च ज्ञेयः ॥ तत्र गान्धर्वराक्षसपैशाचान् विना सर्वत्रोदकपूर्वं दानं नियतम् ॥ वसिष्ठः ॥ नोदकेन न वा वाचा कन्यायाः पतिरुच्यते ॥ पाणिग्रहणसंस्कारात्पतित्वं सप्तमे पदे ॥ गान्धर्वादिष्वपि होमादि कार्यमेव ॥ गान्धर्वासुरपैशाचा विवाहा राक्षसश्च यः ॥ पूर्वं परिग्रहस्तेषु पश्चाद्धोमो विधीयते ॥ १ ॥ इत्यपरार्के वसिष्ठोक्तेः ॥ अत एव होमाद्यभावेऽन्यस्मै दानमाहतुस्तत्रैव वसिष्ठबौधायनौ ॥ बलादपहृता कन्या मन्त्रैर्यदि न संस्कृता ॥ अन्यस्मै विधिवद्देया यथा कन्या तथैव सा ॥ १ ॥ इदं राक्षसपैशाचपरम् ॥ तयोरेव बलादपहारात् ॥ ~~शूद्रस्य नमोमन्त्र एव ॥~~ मनुरपि ॥ पाणिग्रहणिका मन्त्रा नियतं दारलक्षणम् ॥ तेषां निष्ठा तु विज्ञेया विद्वद्भिः सप्तमे पदे ॥ १ ॥ तत्र पाणिग्रहणं सर्ववर्णसमानम् ॥ पाणिर्ग्राह्यः सवर्णास्वित्यविशेषेण याज्ञवल्क्योक्तेः ॥ उदकपूर्वं कन्यादानस्य शूद्रे विकल्पः ॥ तदुक्तं स्मृतिकौमुद्यां ब्राह्मे ॥ युक्तं तु पाणिग्रहणं सर्ववर्णेषु सर्वशः ॥ जलपूर्वं तु विप्राणामन्येषामपि काम्ययेति ॥

---

मननिमित्त झालें असतांही तें केलें नाहीं तर भूतप्रेतादिकांपासून बाधा होते; असें **धर्मशास्त्रकर्त्यांचें** मत आहे.

**अन्ये त्वेतेन ब्राह्मोऽपि भवति । अलङ्कृत्य कन्यामुदकपूर्वां दद्यादेष ब्राह्मो विवाहः** [ गृ० सू० अ० १ कं० ६ सू० १ ] **इत्याश्वलायनेन ब्राह्म एव जलपूर्वतोक्तेः ॥ अन्ये विशेषा निर्णयसिन्धौ ज्ञेयाः ॥ स्मृतिकौमुद्यां ब्राह्मे ॥ इष्टिं वैनायकीं कृत्वा शचीयागं च शोधनम् ॥ नान्दीमुखेभ्यः श्राद्धं च पितृभ्यः कार्यसिद्धये ॥ १ ॥ वाराहसंहितायाम् ॥ गृहे स्थितां वै पुरुहूतपत्नीं प्राङ्मध्यसंध्यास्तमयेषु कन्या ॥ स्रक्गंधधूपैः प्रतिपूजयेत्तु पाणिग्रहे या समुपागतेति ॥**

आतां विवाहविचार सांगतोः–

त्यांत सापिंड्य शूद्रांस विप्रासारखेंच आहे. कारण,—"सर्वत्र अवयवांची अनुवृत्ति सारखीच असून तिचा सद्भाव ( असणें ) आहे ह्मणून," असें **विज्ञानेश्वर** ह्मणतो. तें सर्व ऱ्यां **निर्णयसिंधूंत** सांगितलें आहे; ह्मणून येथें सांगत नाहीं. त्यांत ब्राह्म, आर्ष, दैव, प्राजापत्य, गांधर्व, आसुर, राक्षस, व पैशाच असे आठ प्रकारचे विवाह आहेत. तेंच **याज्ञवल्क्य** सांगतो,—"वरास बोलावून यथाशक्ति अलंकार घालून त्यास कन्या देतात तो ब्राह्म १, यज्ञांतील ऋत्विजांस कन्या देतात तो दैव २, वरापासून दोन गायी घेऊन त्यास कन्यादान केल्यास तो आर्ष ३, विवाह होतो. असें सांगून,—स्त्रीसह धर्माचरण करण्याविषयीं इच्छा करून मागणाऱ्यास कन्या दिल्यास तो प्राजापत्य ४, विवाह होतो. या प्रकारें विवाहित स्त्रीपासून झालेला पुत्र आपल्यासह मातृपितृकुलांतील सहा सहा पुरुषांस पवित्र करितो. वरापासून कांहीं द्रव्य घेऊन त्यास कन्या दिल्यास तो आसुर ५, परस्परांत कांहीं पण ( शर्त ) करून विवाह झाल्यास तो गांधर्व ६, युद्धांत कन्या हरण केल्यास तो राक्षस ७, व कपटानें कन्याहरण

१ हा विवाह सात्विकपणानें होत असून ब्रह्म ह्मणजे–वेद तदुक्तविधीनें हा होत असतो ह्मणून यास "ब्राह्म" असें ह्मटलें असावें.

२ यज्ञ हें दैविक कर्म त्यांत तत्संपादकास कन्यादान होत असल्यामुळें यास "दैव" ह्मटलें आहे असें वाटतें.

३ गायी वगैरे दान घेणें हा ऋषींचा धर्म होय. ह्या विवाहांत तें होतें ह्मणून यास "आर्ष" ह्मटलें असावें.

४ संतति उत्पन्न करणें, व इतर धर्माचरण करणें हें प्रजापती–( ब्रह्मदेवा ) चें प्रियकर्म होय. ह्या विवाहांत त्याच्या उद्देशानें कन्यादान, व ग्रहण होत असल्यामुळें " प्राजापत्य " हें नांव पडलें असावें.

५ आपल्या मुलीस द्रव्याच्या आशेनें विकणें हें असुरासारख्या निर्दय मनुष्याचें कर्म होय. तें यांत होतें ह्मणून याला "आसुर" हें नांव दिलें असावें.

६ गंधर्व हे देवलोकींचे गायक होत. यांस उपदेव ह्मणतात. हे बहुतकरून अप्सरांचे साथीदार असावेत, व अप्सरा ह्या देवांच्या वेश्या होत. जसा वेश्या, व अन्य पुरुष यांची परस्पर प्रीति झाली ह्मणजे त्यांचा संबंध होतो; तसाच वधूवरांची परस्पर प्रीति होऊन हा विवाहसंबंध होतो. ह्मणून यास "गांधर्व" असें ह्मटलें असावे.

केल्यास तो पैशाच ८, असे आठ प्रकारचे विवाह होतात. •या सर्वांत ४ था ह्मणजे प्राजापत्य हा शूद्रांस मुख्य आहे. गांधर्व, व आसुर हे मध्यम; राक्षस व पैशाच हे कनिष्ठ होत. तेंच **मनु** सांगतो,—"वैश्य, व शूद्र यांस आसुर विवाह विहित आहे. अनुक्रमानें सहा (ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, व गांधर्व) ब्राह्मणांस; शेवटील चार (आसुर, गांधर्व, राक्षस, आणि पैशाच) हे क्षत्रियांस; वैश्य, व शूद्र यांस राक्षसविवाहरहित तेच (आसुर, गांधर्व, व पैशाच) हे धर्म्य आहेत." **कल्पतरूं**त ब्राह्मविवाहप्रकार सांगून "उत्तम ब्राह्मणांस हा धर्म्य आहे," असें सांगितलें आहे. ह्मणून ब्राह्मणांस ब्राह्म, व दैव हे विवाह मुख्य आहेत. अन्य विवाह तिन्ही वर्णांस (द्विजांस) समान आहेत. **हेमाद्रींत पैठीनसि** ह्मणतो,—"प्रतिलोमांस (उत्तम वर्णांतील कन्या असून ती नीच वर्णास प्राप्त होऊन तिजपासून जो पुत्र झाला असेल त्यास) पैशाच मुख्य आहे." कन्याविक्रयाविषयीं **काश्यप** ह्मणतो कीं,—"जे पुरुष लोभानें मोहित होत्साते द्रव्य घेऊन आपल्या मुलीस देतात, ते केवळ आत्मविक्रयच करणारे महापापकारी होत. ते भयंकर नरकांत पडतात, अथवा सात कुलांचा नाश करितात." यावरून कन्यादानसंबंधानें द्रव्य घेऊं नये असें सिद्ध होतें; परंतु आसुर विवाहांत द्रव्य देणें आवश्यक असून त्या प्रकारचा विवाह शूद्रांस मुख्य आहे. तस्मात् शूद्रानें आसुरत्व सिद्ध होण्याकरितां मुलीच्या बापास प्रीतिपूर्वक कांहीं द्रव्य द्यावें. परंतु तें कन्येची किंमत ह्मणून देऊं नये; व घेणारानें तें घेऊं नये. तेणेंकरून त्यास पूर्वोक्त दोष लागणार नाहीं. याकरितांच गांधर्व, व आसुर विवाहाचें फल **आदित्यपुराणांत**—"जो गांधर्वविवाहविधीनें कन्यादान करितो तो गंधर्वलोकास जातो, आणि गंधर्व त्याची पूजा करितात. तसेंच जो योग्य वराला प्रीतिपूर्वक त्यापासून कांहीं द्रव्य घेऊन कन्या देईल, तो गंधर्वलोकाप्रत प्राप्त होतो, व किन्नर

---

७ लढाई वगैरे तामस कर्म, व बलात्कार करणें हें राक्षसांचें कृत्य ह्यांत होतें, ह्मणून यास "राक्षसविवाह" ह्मणत असतील.

१ कपट (चोरी वगैरे) हें पिशाचांचें कर्म होय. ह्या विवाहांत तेंच होतें ह्मणून यास "पैशाच" ह्मटलें असें वाटतें.

२ पूर्वकालीं आणखी एक प्रकारचा विवाह होत असे. त्यास पुत्रिकाधर्म ह्मणत. त्याचा प्रकार असा कीं, कन्येच्या बापानें आपल्या कन्येपासून जो पुत्र होईल तो मला द्यावा, असा वराशीं करार करून त्यास कन्या द्यावी, आणि त्यानें कराराप्रमाणें वागावें, ह्मणजे पुत्रिकाधर्म होतो. याप्रमाणें **स्वायंभुव मनूनें आकूति** नांवाची आपली मुलगी **रुचि** नामक ऋषीला दिली होती. भा० स्कं० ४ अ० १ पहा. याचा गांधर्वविवाहांत अंतर्भाव होत असेल असें वाटतें.

३ **अग्निपुराणांत**—"**अपत्यविक्रयासक्ते निष्कृतिर्न विधीयते**" [अ० १५४ श्लो० ४] अर्थ मुलीचा विक्रय करण्यास आसक्त होणाऱ्या पुरुषास दोषपरिहारार्थ प्रायश्चित्तच नाहीं, असें सांगितलें आहे.

त्याचें यश गायन करितात, असें सांगितलें आहे. **हारीत** ह्मणतो,—"पूर्वी सांगितलेल्या विवाहविधींपैकीं कोणत्याही आपल्यास विहित असलेल्या एखाद्या विधीनें विवाहित स्त्रीलाच धर्मपत्नी असें अन्य ऋषि ह्मणतात." एतत्संबंधी विशेष विचार **मेधातिथि** व **कल्पतरु** यांत पहावा. पूर्वोक्त सर्व विवाहांत गांधर्व, राक्षस, व पैशाच यांवांचून उदकपूर्वक कन्यादान करणें हें नित्य आहे. याविषयीं आणखी **वसिष्ठ** ह्मणतो कीं,—"उदकपूर्वक दानानें, अथवा वाग्दानानें दान घेणारास कन्येचा पति असें ह्मणत नाहींत, तर पाणिग्रहणसंस्कारानें सप्तपदींत सातव्या पावलास त्याचें पतित्व सिद्ध होतें." गांधर्वादिक विवाहांतहि विवाहहोमादि अवश्य केलें पाहिजे. कारण,—" गांधर्व, आसुर, पैशाच, राक्षस ह्या विवाहांत पूर्वी कन्येचा स्वीकार, आणि नंतर, तदंग होम करण्याचें विधान करितो," असी **अपरार्कां**त **वसिष्ठा**ची उक्ति आहे; याकरितां शेवटच्या चार विवाहांत होमादि कदाचित् केलें नसेल, कांहीं कारणामुळें तो वर मान्य नसेल तर, अन्य वराला कन्यादान करावें, असें त्याच **अपरार्कां**त **वसिष्ठ** व **बौधायन** यांनीं सांगितलें आहे. जसें—"बलात्कारानें कन्या हरण केली असून, जर ती मंत्रांनीं ( नमःमंत्र ) संस्कृत ( यथाविधि विवाहित ) केली नसेल, तर ती अन्य वराला यथाविधि द्यावी. कारण, समंत्रक संस्कार होण्यापूर्वी ती अविवाहित कन्येसारखीच होय[१]." हें वचन राक्षस, व पैशाच विवाहपर आहे. कारण, त्याच विवाहांत बलात्कारानें कन्येचा अपहार होत असतो. **मनु**हि याचप्रमाणें ह्मणतो, जसें—"पाणिग्रहणसंबंधी मंत्र हेंच स्त्रीत्वाचें खरें लक्षण होय. परंतु त्यांची निष्ठा ( शेवट, तर विद्वानांनीं सप्तपदींत सातव्या पावलीं जाणावी." त्यांत पाणिग्रहण हें सर्व वर्णांस तुल्य[२] आहे. कारण, "समानवर्णस्त्रियांचेठायीं समानवर्ण पुरुषानें पाणिग्रहणविधि करावा," असें चहूंतून एखाद्या वर्णाचें ग्रहण न करितां **याज्ञवल्क्यानें** सामान्यतः पाणिग्रहण सांगितलें आहे; ह्मणून उदकपूर्वक कन्यादान करण्याचा शूद्राविषयीं विकल्प आहे. तेंच **स्मृतिकौमुदींत ब्राह्मपुराणां**त सांगितलें आहे. जसें–"सर्व वर्णांत सर्वांनीं पाणिग्रहण करणें हें योग्य आहे. तथापि उदकपूर्वक कन्या देणें हें

१ सांप्रत राक्षस, व पैशाच विवाह होतात, परंतु ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें करीत नाहींत याचें कारण कांहीं समजत नाहीं. आमच्या लोकांत "एकदां माळ गळ्यांत पडली ह्मणजे फिरावयाचें नाहीं," ही अंधपरंपरा दृढमूल झाली आहे. यामुळें असीं अनेक वचनें एका बाजूस पडलीं आहेत !

२ येथें "पाणिग्रहण सर्व वर्णांस सारखें" असें सांगितलें आहे, परंतु "**अग्निपुराणां**त **पाणिग्राह्यः सवर्णासु गृह्णीयात् क्षत्रिया शरम् ॥ वैश्या प्रतोदमादद्यद्दशां वै चान्त्यजातिजा**" [ अ० १५४ श्लो० ३ ] असें सांगितलें आहे; तेव्हां समानवर्ण स्त्रीनें पाणिग्रहण करावें. आणि असवर्ण असेल तर बाण इत्यादि ध्यावें असा याचा अभिप्राय असेल असें वाटतें.

ब्राह्मणासच आवश्यक, व अन्य वर्णांस त्यांच्या इच्छेनुसार [1]आहे" अन्य कितीएक **ग्रंथकर्त्ते,**—"या वाक्यावरून ब्राह्मविवाहही इतर वर्णांस करतां येतो असें **होतें.** कारण–'अलंकृत करून उदकपूर्वक कन्या द्यावी, हा ब्राह्मविवाह होय." **आश्वलायनानें** "ब्राह्म विवाहांतच उदकपूर्वक कन्यादान करावें असें सांगितलें आहे **ह्मणून,"** असें ह्मणतात. एतत्संबंधी अन्य विशेष विचार **निर्णयसिंधू**वरून जाणावा. **स्मृतिकौमुदींत, ब्राह्मपुराणां**त—"विनायकशांति, व उत्तम असें इंद्राणीचें पूजन करून कार्यसिद्धि होण्याकरितां नांदीमुख पितरांस श्राद्ध द्यावें," असें सांगितलें आहे. **वराहसंहितें**त—"घरांत असलेल्या इंद्राणीचें प्रातःकालीं, माध्यान्हकालीं आणि सायंकालीं गंध, पुष्प, धूप, फुलांच्या माळा इत्यादि उपचारांनीं, जी पाणिग्रहणाला प्राप्त झाली असेल त्या कन्येनें पूजन करावें," असें सांगितलें आहे. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे विवाहविचारः ॥**

## ॥ अथ प्रयोगः ॥

शूद्रस्य शूद्रापरिणयने मन्त्ररहितं क्रियामात्रं कार्यमिति हरिहरभाष्ये उक्तम् ॥ तेन कातीयं कर्मोच्यते ॥ तत्र विवाहोक्ते मुहूर्ते कन्यायाः पिता भ्रातान्यो वा बन्धुर्वरगृहं गत्वाचम्य देशकालौ सङ्कीर्त्य करिष्यमाणविवाहाङ्गत्वेन वाग्दानं करिष्ये । इति सङ्कल्प्य । गणेशं वरुणं च सम्पूज्य । वरस्य पादप्रक्षालनम् गन्धवस्त्राद्यैः पूजां कृत्वा । पूगीफलनालि( रि )केरकुंकुमादिरंजितवस्त्रं चादायामुकप्रपौत्रायामुकपौत्रायामुकपुत्रायामुकदासाय वराय अमुकप्रपौत्रीं अमुकपौत्रीं अमुकपुत्रीं अमुकनाम्नीं कन्यां तुभ्यं ज्योतिर्विदुक्ते मुहूर्त्ते दास्ये । इत्युक्त्वा ॥ अव्यङ्गेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते ॥ तत्कालोपस्थिते कन्यां पिता तुभ्यं प्रदास्यतीति ॥ पिता तु–० अहं दास्याम्यसंशयमिति वदेत् ॥ स्नाते स्नातामरोगिणीम् इति वा पाठः ॥ केचित्तु कन्यागृहे गत्वा तां सम्पूज्य । अव्यंगेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते ॥ इमां कन्यां प्रदास्यामि देवाग्निद्विजसन्निधौ । इति कन्यापिता वरबंधुहस्ते दत्त्वा । वाचा दत्ता मया कन्या वरार्थं स्वीकृता त्वया । कन्यावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भवेति कन्यापिता ॥ वाचा दत्ता त्वया कन्या वरार्थं स्वीकृता मया ॥ वरावलोकनविधौ इत्यूहेन वरपिता वदेदित्याहुः ॥ ततः परस्परमर्चनविप्रपूजादि कार्यम् ॥ आचाराद्धरिद्राचन्दनादि विवाहोक्ते मुहूर्त्ते कार्यम् ॥ इति वाग्दानम् ॥

आतां विवाहाचा प्रयोग सांगतो:—

"शूद्रास समानवर्ण शूद्रकन्येशीं होणाऱ्या विवाहांत मंत्रावांचून, सर्व कर्म मात्र करावें," असें **हरिहरभाष्यां**त सांगितलें आहे. या वाक्यानें **कात्यायनो**क्त कर्म करावें असें होतें. त्यांत प्रथम वाग्दान विवाहास उक्त असलेल्या मुहूर्तावर करावें. तें असें कीं,–मुलीचा बंधु किंवा अन्य जो कन्यादान करणारा असेल त्यानें वराच्या घरीं जाऊन आचमन करून देशकालसंकीर्तन करून,—**करिष्यमाणविवाहांगत्वेन**

१ आहतेति पाठः.

**वाग्दानं करिष्ये ।** असा संकल्प करून, गणेश, व वरुण यांची पूजा करून, वराचे पाय धुऊन, गंधवस्त्रादिकांनीं त्याची पूजा करून, सुपारी, नारळ, व कुंकूनें रंगित वस्त्र हातांत घेऊन **अमुकप्रपौत्राय अमुकपौत्राय अमुकपुत्राय अमुकदासाय । अमुकप्रपौत्रीं अमुकपौत्रीं अमुकपुत्रीं अमुकनाम्नीं कन्यां तुभ्यं ज्योतिर्विदुक्ते मुहूर्ते दास्ये ।** असें ह्मणून,—"**अव्यंगेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते ॥ तत्कालोपस्थिते कन्यां पिता तुभ्यं प्रदास्यति**" ॥ १ ॥ हा मंत्र ह्मणावा. जर, बापच स्वतः वाग्दान करणारा असेल तर पूर्वोक्त मंत्राचा चतुर्थ चरण—"**०अहं दास्याम्यसंशयम्**" । असा ह्मणावा. दुसऱ्या चरणाचा—"**०स्नाते स्नातामरोगिणीम्**" असाहि पाठ आहे. कित्येक **ग्रंथकर्ते**—"वराच्या बापानें कन्येच्या गृहास जाऊन, वस्त्रादिकांनीं तिचें पूजन करावें, व तिच्या बापानें "**अव्यंगेऽपतितेऽक्लीबे दशदोषविवर्जिते ॥ इमां कन्यां प्रदास्यापि देवाग्निद्विजसंनिधौ**" ॥ १ ॥ असा मंत्र ह्मणून, कन्येच्या बापानें वस्त्रादि वराच्या बंधूच्या हातांत देऊन,—"**वाचा दत्ता मया कन्या वरार्थं स्वीकृता त्वया ॥ कन्यावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव**" ॥ १ ॥ असा मंत्र कन्येच्या बापानें ह्मणावा. नंतर वराच्या बापानें, "**वाचा दत्ता त्वया कन्या पुत्रा (वरा) र्थं स्वीकृता मया ॥ वरावलोकनविधौ निश्चितस्त्वं सुखी भव**" ॥ १ ॥ असा मंत्र ह्मणावा, ह्मणजे वाग्दान होतें असें ह्मणतात. नंतर एकमेकांचें पूजन, व ब्राह्मणांची पूजा करून, आचाराप्रमाणें हळदचंदन इत्यादि विवाहोक्त मुहूर्तावर करावीं. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे वाग्दानप्रयोगः ॥**

**ततः पूर्वदिने विवाहदिने वा प्रातः कन्यावरयोः पिताभ्यङ्गं कृत्वा । ग्रहविनायकशांत्यादि कृत्वा । देशकालौ संकीर्त्य । अमुकस्य विवाहांगतया गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजावसोर्धाराशचीपूजानांदीमुखानि श्राद्धानि करिष्ये इत्युक्त्वा । तानि पूर्ववत्कृत्वा । तंडुलपूर्णकुंभद्वयेऽविघ्नार्थं वंशपात्रे शाखासु । नंदिनी नलिनी मैत्रा ह्युमा च पशुवर्द्धिनी ॥ शस्त्रे भगवतीं च मातृसंनिधौ संस्थाप्य चतुर्थदिने मंडपदेवताः पूजयेत् ॥ पीतसूत्रेण कंकणं बध्वा । कन्यायाः सप्तभिः पंचभिर्वा करैर्मितां पंचसप्तसोपानां वेदिं कुर्यात् ॥ चतुर्हस्ता वेदीति हरिहरः ॥ वरस्य सीमांतपूजां कृत्वा गृहागतं वरं संमानेनोपवेशयेत् ॥ तत आचार्यो वेद्यां हस्तमात्रं स्थंडिलं दर्भैः परिसमूह्य । गोमयेनोपलिप्य । यज्ञियकाष्टेन प्रागग्रास्तिस्रो लेखाः कृत्वा । त्रिर्मृदमुद्धृत्याभ्युक्ष्याग्निं प्रतिष्ठाप्य वरस्य प्राङ्मुखस्य मधुपर्कपूजां कुर्यात् ॥ यथा । कन्यापितासनं दत्त्वा । तस्य पश्चात्तिष्ठंतं वरमाह । साधु भवानास्तामर्चयिष्यामो भवंतमिति ॥ अर्चयेति वरः ॥ ततो विष्टरो इत्यनेन त्रिरुक्तेन दाता प्रत्यङ्मुखस्तिष्ठन् प्रतिगृह्यता-**

---

१ "**दश दोषविवर्जिते**" ह्मणजे दहा दोषरहित. हे १० दोष **व्यवहारोच्चय** नामक ग्रंथांत सांगितले आहेत. ते—वेध, लत्ता, पात, खर्जूरवेध, दशयोगचक्र, पूति, जामित्र, उपग्रह, बाण आणि वज्र, असे दहा दोष होत. यांचीं लक्षणें विस्तरभयास्तव येथें सांगितलीं नाहींत.

मिति कूर्चं पंचविंशतिकुशमयं च दद्यात् ॥ तं वर आसनस्थे पश्चात्तिष्ठन् गृहीत्वा विष्टराय नम इत्यासने दत्त्वोपविशेत् । ततोऽन्येन त्रिःपाद्यमित्युक्ते गंधदूर्वाक्षतायुतं पाद्यं दाता प्रतिगृह्यतामिति दद्यात् ॥ तेन वरः आदौ सव्यं ततो दक्षिणमिति पादौ प्रक्षालयेत् ॥ तदा दातान्यं विष्टरमन्येन त्रिर्निवेदितमादाय वरपादाधो दद्यात् ॥ ततो गंधपुष्पाक्षतकुशतिलसर्षपदधिदूर्वायुतमर्घ्यमादायान्येनार्घ्य इति त्रिरुक्ते दाता प्रतिगृह्यतामिति दद्यात् ॥ वरस्तमद्भ्यो नम इत्यंजलिनादाय शिरसाभिवाद्य भूमौ क्षिपेत् ॥ ततोऽन्येनाचमनीयमिति त्रिरुक्त्वा दत्तं प्रतिगृह्य सकृत्प्राश्याचामेत् ॥ ततोऽन्येन मधुपर्क इत्युक्ते दात्रा दत्तं कांस्यस्थं तेनैव पिहितं दधि मधु घृतं वा वरो दातृहस्तस्थमुद्घाट्य । सवित्रे नम इत्यवेक्ष्य । सवित्रे नम इति प्रतिगृह्य । वामे निधाय । मधुपर्काय नम इत्यनामिकयालोड्यानामिकांगुष्ठाभ्यां बहिः क्षिप्त्वा । पुनरेवं द्विः कृत्वा । ताभ्यामेव त्रिः प्राश्नीयात् ॥ मधुपर्काय नम इति वा ॥ अंगुष्ठानामिकाभ्यां द्वितीयमंगुष्ठमध्यमाभ्यां तृतीयमिति स्मृतिकौमुदी ॥ तच्चिन्त्यम् ॥ ततः शेषमसंचरे निनीय । द्विराचम्य । पुनराचम्य । वाचे नमः मुखे । प्राणाय नमः नसोः । चक्षुर्भ्यां नमः चक्षुषोः । श्रोत्राभ्यां नमः कर्णयोः । बलाय नमः बाह्वोः । ओजसे नमः इत्यूर्वोः । अंगेभ्यो नमः इत्यंगेषु ॥ ततोऽन्येन त्रिर्गौरित्युक्ते प्रतिगृह्य । रुद्राणां मात्रे वसूनां दुहित्रे आदित्यस्वस्रे गवे नमः । ममार्चकस्य च पाप्मा हत इत्युपांशु उत्सृजत तृणान्यत्तु इत्युच्चैर्विसृजेत् ॥ ततो दाता वस्त्रालंकारगंधस्रगाद्यैर्वरं पूजयेत् ॥ ततः सुलग्नेऽतःपटं धृत्वा । मुखं निरीक्षेत ॥ अन्ये तु लग्नसमये पाणिग्रहणमिच्छंति ॥ ततोऽतःपटमपसार्य । वरो वधूमुखमीक्षेत ॥ अत्र वाग्निं प्रतिष्ठाप्य पश्चादग्नेस्तृणफलं कटं वा निधाय । कन्यापितृदत्तवस्त्रचतुष्टयमध्ये द्वे आयुष्मतीदं वासः परिधत्स्वेति आवृत्त्या दद्यात् ॥ सा च वाससे नम इत्यावृत्त्या परिदधीत ॥ ततो दात्रा वधूमीक्षस्वेति प्रेषितो वधूमीक्षेत ॥ ततः कन्यादानमिति हरिहरः ॥ अन्ये तु कन्यादानोत्तरं वस्त्राद्याहुः ॥ ततः करोतु स्वस्ति ते ब्रह्मेत्याद्यैरक्षतारोपणांते कन्यापितोदङ्मुखः स्वदक्षिणे पत्नीमुपवेश्य कुशपाणिराचम्य । देशकालौ संकीर्त्य । मम समस्तपितॄणां निरतिशयसानंदब्रह्मलोकावाप्त्यादि कन्यादानकल्पोक्तफलावाप्तयेऽनेन वरेणास्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या—ब्राह्मपक्षे द्वादशावरान् द्वादश परान् । प्राजापत्यपक्षेऽष्टावरान् अष्टौ परान् पुरुषान् पवित्रीकर्तुमात्मनश्च लक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधिना प्राजापत्यविधिना वालंकृत्य कन्यादानमहं करिष्ये । इत्युक्त्वा पठेत् ॥ कन्यां कनकसंपन्नां कनकाभरणैर्युताम् ॥ दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥ १ ॥ विश्वम्भरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः ॥ इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय चेति ॥ ततः कांस्यपात्रे वरहस्तोपरि वधूहस्ते स्वहस्तं न्यस्य । वरहस्ते—सुप्रोक्षितमस्तु । शिवा आपः सन्तु । सौमनस्यमस्तु । इत्युक्त्वा । कन्या तारयतु । पुण्यं वर्धतां । शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रसंपदस्तु । पुण्याहं भवंतो ब्रुवंतु । पुण्याहमिति विप्राः ॥ स्वस्ति भवंतो ब्रुवन्तु । ऋद्धिं भवंतो ब्रुवन्तु । श्रीरस्त्विति भवंतो ब्रुवन्तु । अमुकदासोहम् । मम

समस्तपितॄणामित्यादि० लक्ष्मीनारायणप्रीतये इत्यंतं प्राग्वदुक्त्वा । काश्यपगोत्रस्य ब्रह्मदासस्य प्रपौत्राय विष्णुदासस्य पौत्राय शिवदासस्य पुत्राय काश्यपगोत्राय देवदत्तदासाय वराय । काश्यपगोत्रां चैत्रदासस्य प्रपौत्रीं मैत्रदासस्य पौत्रीं भोजदासस्य मम पुत्रीममुकप्रेष्यां नाम्नीं वा कन्यां प्रजापतिदैवत्यां यथाशक्त्यलंकृतामित्युक्त्वा । पुनरेवं द्विरुच्चार्य शतज्योतिष्टोमातिरात्रफलसमफलप्राप्तिकामः प्रजोत्पादनार्थं सहधर्मचरणार्थं प्राजापत्ये सहधर्मचरतं भार्यात्वेन तुभ्यमहं संप्रददे । इति कुशयवयुतं जलं कन्याहस्तं च वरहस्ते क्षिपेत् ॥ मयापि दत्तेति मातापि वदेदिति केचित् ॥ गोत्रोच्चारणं नेति केचित् ॥ वरः प्रतिगृह्णामि । स्वस्तीत्युक्त्वा भुवं स्पृशेत् ॥ गौरीं कन्यामिमां भो त्वं यथाशक्ति विभूपिताम् ॥ गोत्राय चैव दासाय तुभ्यं दत्तां समाश्रय ॥ १ ॥ कन्ये ममाग्रतो भूयाः कन्ये मे देवि पार्श्वयोः ॥ कन्ये मे पृष्ठतो भूयास्त्वद्दानात्स्वर्गमाप्नुयाम् ॥ २ ॥ मम वंशकुले जाता पालिता वत्सराष्टकम् ॥ तुभ्यं दास मया दत्ता पुत्रपौत्रविवर्धिनी ॥ ३ ॥ इति पठेत् ॥ ततः कन्यादानप्रतिष्ठार्थमिदं सुवर्णं गोमिथुनं च दक्षिणां संप्रददे इति दद्यात् ॥ ततः शक्तौ सत्यां ताम्रकांस्यपात्रगवाश्वदासीदासादि दद्यात् ॥ कन्याबांधवांश्च यौतकं दद्युः ॥ वरस्तत्पित्रादयोऽपि दद्युरिति केचित् ॥ होमांते यौतकं केचिदाहुः ॥ ततः चतुर्वारं पंचवारं वा वधूवरौ सूत्रेणावेष्ट्योपरितनमधोमार्गेणाधस्तनं चोपरि निष्काश्य । त्रिगुणं पीतं च कृत्वाधस्तनं वरहस्ते । उपरितनं च वधूहस्ते कंकणं बध्नीयात् ॥ येन बद्धो बली राजा दानवेंद्रो महाबलः ॥ तेन त्वामपि बध्नामि रक्षे मा चल मा चलेति ॥ ततः वधूवराभ्यां दुग्धाद्राक्षतारोपणम् ॥ वध्वादौ ततो वरेण च कार्यम् ॥ मंत्रास्तु–भगाय नमः । यज्ञाय नमः । श्रियै नमः । धर्माय नमः । प्रजायै नमः । यशसे नमः इति । ततः प्राङ्मुख उपविश्य वस्त्रं कन्यायै दद्यात् ॥ सा च वासोभ्यां नम इति परिदध्यात् ॥ ततो वरो मांगल्यतंतुनानेन भर्तृजीवनहेतुना ॥ कंठे बध्नामि सुभगे सा जीव शरदां शतमिति सौभाग्यतंतुं वधूगले बध्नीयात् ॥ ततो विश्वेदेवायुमातरिश्वधातृभ्यो नम इति वधूमीक्षेत् ॥ अत्र वा कौसुंभसूत्रेण कंकणम् ॥ ततो वेद्यां प्राङ्मुखस्तेजनावीरणकटे पश्चादग्नेरुपविश्य दक्षिण ईशान्यां वा मंगलकुंभं स्कंधे गृहीत्वा कश्चित्तिष्ठेदासप्तमं पदं ॥ उत्तरतो दृषदुपले चालंकृते निधायान्नं वरः कन्यानाम वदेदित्याचारः ॥ ततो वधूपित्रा परस्परं समीक्षितव्यमित्युक्तेऽन्योन्यं समीक्ष्य । अरौद्रचक्षुरपतिघ्नी शिवा च सुमनास्तथा ॥ सुवर्चाः पुत्रसूर्देवकामा च सुखदा भवेति वरो वदेत् ॥ सोमगंधर्वाग्निपूषभ्यो नम इति च ॥ शूद्राणां गृह्यसूत्राध्ययनाभावात्तदुक्तहोमांगकलापज्ञानाभावात्प्रयुक्तिशक्त्यभावाच्च विवाहे होम एव नास्तीति मदनपालः ॥ अन्ये तु प्रधानेऽधिकारसिद्धौ स्थपतीष्टिवदंगेऽपि श्रवणोपदेशादिना ज्ञानसंभवाद्धोममाहुः ॥ यथा–गुरुर्दक्षिणे ब्रह्मासनं दत्त्वा तमुपवेश्य । मृन्मये पात्रे जलपूर्णे कुशान्निधायोत्तरतः कुशेषु निधायाग्निं दर्भैः पूर्वादि परिस्तीर्यासादनं कुर्यात् ॥ त्रीणि तृणानि द्वे पवित्रे प्रोक्षणीमाज्यस्थालीं चरुस्थालीं संमार्गकुशाः उपयमनकुशास्तिस्रः समिधः स्रुवं आज्यं तंदुलाः लाजाः शूर्पं संस्रावपात्रं अश्मा

आनडुहं चर्म गौर्दक्षिणेति ॥ ततः प्रादेशमात्रे पवित्रे छित्वा प्रोक्षणीं संस्कृत्य पवित्राभ्यामुत्पूय• तत्र ते निधाय दक्षिणेन सव्ये कृत्वोद्दीपनं कृत्वा पात्राणि प्रोक्ष्य निधायाज्यं स्थाल्यां निरुप्याग्नौ दक्षिणेऽधिश्रित्योल्मुकेन लाजैः सह पर्यग्नि कृत्वा स्रुवं प्रताप्य कुशैः संमृज्य प्रोक्षणीभिः प्रोक्ष्य पुनः प्रताप्य दक्षिणे निधायाज्यमुद्वास्योत्पूयावेक्ष्य शूकं निरस्य पुनः प्रोक्षणीरुत्पूयावेक्ष्योपयमनकुशानादायोत्थायाग्नौ तिस्रः समिधोऽभ्याधाय प्रोक्षणीभिः पर्युक्ष्य वरेणान्वारब्धो गुरुर्दक्षिणं जान्वाच्य ब्रह्मणा दक्षिणहस्तेनान्वारब्धः स्रुवेण जुहुयात् ॥ प्रजापतये नमः । इंद्राय नमः । इत्याघारौ ॥ इदं प्रजापतये न ममेत्यादि वरः सर्वत्र त्यागं कुर्यात् ॥ अग्नये नमः । सोमाय नमः इत्याज्यभागौ ॥ अग्नये नमः । वायवे नमः । सूर्याय नमः । अग्निवरुणाभ्यां नमः । द्विःअग्नये नमः । वरुणसवितृविष्णुविश्वेदेवमरुत्स्वर्केभ्यो नमः । वरुणायादित्यायादितये प्रजापतये नमः । इति न वा ॥ ततस्त्रिरग्नये मृत्यवे च जुहुयान्न वा ॥ ततः कन्यांजलावुपस्तीर्य वध्वाः भ्राता तत्स्थानो वान्यः शमीपलाशमिश्रान् लाजान् शूर्पादञ्जलिना द्विः क्षिपति ॥ ततोऽभिघार्य तिष्ठंती अग्नये नम इति त्रिर्जुहुयात् ॥ मंत्रो वरस्यैव ॥ ततः वरो वध्वा दक्षिणं हस्तं सांगुष्ठमुत्तानमुत्तानेन हस्तेन गृह्णीयात् ॥ तत्र मंत्रः भगोर्यमसवितृभ्यो नमः ॥ वित्तसौम्यगुणैर्युक्ता वीरसूर्जीवसूर्भव ॥ कुले मदीये सम्राज्ञी मच्चित्तानुगता सदेति ॥ ततो गृहीतामेव वधूमुत्तरतोऽग्नेर्दक्षिणेन पदाश्मानमारोहयति ॥ कन्यायै नमः इति । ततः सरस्वत्यै नमः इति । गाथा गायंति ॥ ततोऽग्नये नम इति । अग्निं परिक्रम्य । पुनर्द्विर्लाजादि परिक्रमांतं कृत्वा । चतुर्थे शूर्पपुटेन वधूभ्राता सर्वलाजान्कन्यांजलावावपति ॥ तान् भगाय नम इति तिष्ठंती जुहोति ॥ ततोऽग्निं चतुर्थे परिक्रम्योपविश्य । ब्रह्मान्वारब्धः प्रजापतये नम इति हुत्वोत्तरतः उदक्संस्थान्सप्त तंडुलपुंजान्कृत्वा वधूं विष्णवे नम इति दक्षिणेन पदा वरः सप्तपदानि क्रामयति ॥ इषे नमः । विष्णवे नमः । सर्वत्र ऊर्जे नमः । रायस्पोषाय नमः । मायोभव्याय नमः । प्रजाभ्यो नमः । ऋतुभ्यो नम इति ॥ एतैरिति केचित् ॥ ततः सप्तमे पदे गुरुर्द्वयोः शिरसी सन्निधाय । पूर्वकुंभोदकेन वर आम्रपल्लवैरभिषिंचेत् ॥ वरेण सूर्यमुदीक्षस्वेत्युक्त्वा सूयार्य नम इति सूर्यं पश्येत् ॥ मम तव चित्त• वाग्भ्यो नम इति वधूदक्षिणांसोपरि हस्तं नीत्वा हृदयमालभ्य उत्तरतो वधूमुपवेश्य वध्वै नम इत्यभिमंत्र्य । तस्याः सीमंते सिंदूरं दत्वान्यो वरो वा वधूमुत्थाप्य गोश्वपुरुषेभ्यो नम इत्यानडुहे रक्तचर्मणि वधूमुपवेश्याग्नये स्विष्टकृते नम इति हुत्वा संस्रवप्राशनम् ॥ प्रणीतानां पवित्राभ्यां मार्जनम् ॥ तयोरग्नौ क्षेपः ॥ आचार्याय गोदानं । प्रणीताविमोकः ॥ ब्रह्मणे पूर्णपात्रं विप्रेभ्य आमान्नसंकल्पः ॥ दिने विवाहे रात्रौ ध्रुवमुदीक्षस्वेति वरप्रेषिता वधूर्ध्रुवाय नम इति पश्येत् ॥ ततोऽब्दं द्वादशरात्रं षड्रात्रं त्रिरात्रं वाऽक्षारलवणाशिनौ ब्रह्मचारिणावलंकुर्वाणावधःशायिनौ दंपती स्याताम् ॥ तैलाक्षतचंदनादि यथाचारं कुर्यात् ॥ चतुर्थ्यामपररात्रे पंचभूसंस्कारान् कृत्वा । विवाहाग्निं संस्थाप्य । ब्रह्मोपवेशनादि समिदाधानांतं प्राग्वत्कुर्यात् ॥ तत्राज्यं निरुप्य स्थाल्यां तूष्णीं चरुं निरुप्य तथैव त्रिःप्रोक्ष्य त्रिः प्रक्षाल्याग्नौ पक्त्वा

समिधोभ्याधायाग्निं पर्युक्ष्याघाराज्यभागांतेऽग्नये प्रायश्चित्ताय नमः । एवं वायवे प्रायश्चित्ताय नमः । सूर्याय प्रायश्चित्ताय नमः । चंद्राय प्रायश्चित्ताय नमः । गंधर्वाय प्रायश्चित्ताय नमः । नवाहुत्यंते प्रजापतये नमः इति चरुं हुत्वोदकुंभात्संस्रवानादायाग्निवायुसूर्यचंद्रनक्षत्रगंधर्वप्रजापतिभ्यो नमइति वधूशिरसि दत्त्वा । मम व्रतानुसारिणी भवेत्युक्त्वोत्तरतोऽग्नेश्चरुशेषं प्राणेभ्यो नमः । अस्थिभ्यो नमः । मांसेभ्यो नमः । त्वचे नम इति वधूं प्राशयित्वा तामाचमय्याज्येनाग्नये स्विष्टकृते नमइति हुत्वा । अग्न्यादिप्रजापत्यंता नवाहुतयः ॥ प्राशनार्थं भिन्नपात्रे संस्रवाः ॥ संस्रवप्राशनं मार्जनपवित्रप्रतिपत्तिर्गुरवे दक्षिणां ब्रह्मणे पूर्णपात्रमामान्नदानं चेति ॥ स्मृतिकौमुद्यां तु । शूद्रस्य कोऽपि होमो नेत्युक्तम् ॥ तन्न । सा मृतापि हि तेनैक्यं गता मंत्राहुतिव्रतैरित्यस्य शूद्रेऽप्यविशेषात् ॥ ततो वरस्य तत्पक्षीयाणां पूजनं वरमात्रे वंशपात्रदानं च कार्यं कन्यापित्रेति केचित् ॥ तद्यथा षोडशलघुशूर्पयुतवंशपात्रे उमामहेश्वरौ संपूज्य प्रार्थयेत् ॥ ऐरिणी त्वमुमा देवी महेशो गिरिजापतिः ॥ अतस्त्वां पूजयिष्यामि ऐरिणीं सर्वकामदाम् ॥ १ ॥ सवस्त्रां च सदीपां च शूर्पैः षोडशभिर्युताम् ॥ वरमात्रे प्रदास्यामि कन्यादानस्य सिद्धये ॥ २ ॥ इत्युक्त्वा । कृतस्य कन्यादानस्य संपूर्णफलप्राप्त्यर्थमिदं वंशपात्रं वरमात्रे संप्रददे न ममेत्युक्त्वा पठेत् ॥ वंशो वंशकरश्रेष्ठो वंशो वंशविवर्धनः ॥ अनेन वंशदानेन तुष्टस्त्वृद्धिं करोतु मे ॥ १ ॥ वंशपात्रमिदं पुण्यं वंशजातसमुद्भवम् ॥ दानानामुत्तमं दानमतः शांतिं प्रयच्छ मे ॥ २ ॥ इति ॥ इदं केचिन्न कुर्वंति ॥ ततः कन्यापिता । अष्टवर्षा त्वियं कन्या पुत्रवत्पालिता मया ॥ इदानीं तु मया तुभ्यं दत्ता स्नेहेन पाल्यतामिति वरांके वधूमुपवेशयेत् ॥ ततो वरो यानेन वध्वा सह गृहे गत्वा तत्र श्रियं संपूज्य स्थापितानां मातॄणां मंडपदेवतानां च पूजां कृत्वा विसृज्य वस्त्रग्रंथिकंकणमोक्षौ कृत्वा विप्रान् पूजयेत् ॥ वध्वा गृहप्रवेशे मंडपोद्वासनकालेऽन्यश्च विशेषो मत्कृते निर्णयसिंधौ ज्ञेयः ॥ एते संस्काराः सच्छूद्राणाम् ॥ एवं वक्ष्यमाणमाह्निकाद्यपि तेषां नियतम् ॥ असच्छूद्राणां विवाहमात्रम् ॥ इति श्रीकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्रस्य विवाहप्रयोगः संस्कारादिप्रयोगकरणं च समाप्तम् ॥

## ॥ समाप्तमिदं द्वितीयं प्रकरणम् ॥

नंतर, विवहाच्या पूर्वदिवशीं किंवा त्याच दिवशीं कन्येच्या, व वराच्या बापानें, अभ्यंगस्नान करून, ग्रहमख, विनायकशांति[१] वगैरे करून, देशकालसंकीर्तन करून,—

१ अमुक दिवशीं विवाह करावयाचा असा निश्चय झाल्यावर आपल्या गोत्रांतील कोणी मेला तर तें प्रतिकूल समजावें, असें धर्मशास्त्रकर्त्यांनें मत आहे. आणि प्रतिकूल झाल्यानंतर दोषपरिहारार्थ विनायकशांति केल्यावांचून विवाह करूं नये. ती ग्रहमखसहित, व केवल असी दोन प्रकारची आहे. तिचा काल, व प्रयोग वगैरे **शान्तिकमलाकर** व **संस्कारभास्कर** यांत पहावा. तो सर्व येथें सांगितल्यास विस्तर होईल ह्मणून सांगितला नाहीं.

**अमुकस्य विवाहांगतया गणेशपूजापुण्याहवाचनमातृकापूजावसोर्धाराशचीपूजानांदीमुखानि श्राद्धानि करिष्ये ।** असा संकल्प करून, पुण्याहवाचनादि पूर्वोक्त रीतीनें करून तांदुळांनीं भरलेल्या दोन कलशांवर नव्या सुपांत शाखां—(आंब्याच्या फांद्यां) वर नंदिनी, नलिनी, मैत्रा, उमा, आणि पशुवर्धिनी, व शस्त्रावर भगवती यांचें मातृकांच्या जवळ आवाहन करून, तें सूप वगैरे घरांतील देवाजवळ ठेवावें, आणि चवथ्या दिवशीं त्या मंडपदेवतांचें पूजन करावें. पिंवळ्या सुतानें कंकण बांधून, मुलीच्या ७ किंवा ५ हातांच्या परिमाणानें ७, किंवा ५ पायऱ्यांची वेदी (बोहलें) करावी. "चार हस्तपरिमित वेदी असावी," असें **हरिहर** ह्मणतो. वराची सीमांतपूजा[1] करून, आपल्या घरास आलेल्या वरास सन्मानानें आसनावर बसवावा. नंतर, आचार्यानें बोहल्यावर, हमचौक एक हाताचें स्थंडिल करून, त्याला दर्भांनीं परिसमूहन—(भोंवतालीं दर्भ घालणें) करून त्यावर गोमय शिंपडून, यज्ञियवृक्षाच्या[2] समिधेनें[3] पूर्वेस शेवट होईल अशा ३ रेघा काढून, ३ वेळ मातीचा उद्धार करून, त्या स्थंडिलावर प्रोक्षण, व अग्निप्रतिष्ठापन करून, पूर्वाभिमुख—(पूर्वेस तोंड करून) बसलेल्या वराची मधुपर्कपूजा करावी. ती असी कीं,—कन्येच्या दात्यानें वरास आसन देऊन, त्या आसनाच्या मागें उभा असलेल्या वरास,—**साधु भवानास्तामर्चयिष्यामो भवंतं ।** असें ह्मणावें. वरानें—**अर्चय** असें ह्मणावें. मग, **विष्टरः** असें ३ वेळ ह्मणून दात्यानें पश्चिमाभिमुख राहून,—**प्रतिगृह्यताम् ।** ह्मणून २५ दर्भांचा कूर्च वरास द्यावा. वरानें—आसनाच्या मागें उभा राहून तो कूर्च घेऊन,—"**विष्टराय नमः**" ह्मणून—तो आसनावर ठेवून, त्यावर बसावें. मग अन्यानें—**पाद्यं** असें ३ वेळ ह्मटलें असतां गंध, दूर्वा, अक्षता यांहीं युक्त उदक कन्यादात्यानें—**प्रतिगृह्यतां** ह्मणून वरास द्यावें. वरानें तें घेऊन त्यानें प्रथम डावा, व मग उजवा पाय धुवावा. त्या वेळीं दुसरें एक आसन अन्यानें—**विष्टरः** असें ३ वेळ ह्मणून निवेदन केलेलें आपल्या हातांत घेऊन, दात्यानें वराच्या पायांखालीं द्यावें. मग गंध, पुष्प, अक्षता, दर्भ, तीळ, मोहऱ्या, दहीं, व दूर्वा यांहीं युक्त उदक घेऊन, अन्य पुरुषानें—**अर्घः**[4] असें ३ वेळ ह्मणून दिल्यावर तें आपल्या

१ "सीमांतपूजा" सीमा ह्मणजे शींव, तिचा अंत ह्मणजे मध्य अथवा शेवट त्या ठिकाणीं करावयाची पूजा तिला सीमांतपूजा ह्मणतात. ही वराच्या घरींही करतां येते. हिचा प्रयोग **संस्कारभास्करांत** पहावा.

२ शमी, पळस, पिंपळ, उंबर, इत्यादि वृक्षांचा यज्ञांत उपयोग होतो; ह्मणून त्यांस यज्ञियवृक्ष ह्मणतात.

३ वर सांगितलेल्या झाडांच्या बारीक टीचभर लांबीच्या काटक्या करितात, त्यांस समिधा असें नांव आहे.

४ ह्या प्रकारचा अर्घ—"आचार्य, ऋत्विज, वर, राजा, प्रियमित्र, व स्नातक ह्या साहांशिवाय इतरांस देऊं नये," असें **ऋषिभट्टाचें** मत आहे.

ह्यातांत घेऊन दात्यानें—**प्रतिगृह्यतां** ह्मणून वरास द्यावें. वरानें "**अद्भ्योनमः**" ह्मणून ओंजळीनें घेऊन, मस्तकानें वंदन करून, भूमीवर टाकावें. मग **आचमनीयं** असें ३ वेळ ह्मणून, अन्यानें—दिलेलें उदक दात्यानें वरास द्यावें. वरानें तें १ वेळ पिऊन आचमन करावें. मग अन्यानें **मधुपर्कः** असें ३ वेळ ह्मणून दिलेलें, दात्यानें आपले ह्यातांत घेऊन, कांस्यपात्रांत असलेलें व तसल्याच पात्रानें झांकलेलें दहीं, मध, किंवा तूप, वरानें दात्याच्या ह्यातांत असतां उघडून, तें—"**सवित्रे नमः**" या मंत्रानें पाहून, पुनः त्याच मंत्रानें आपल्या ह्यातांत घेऊन, डावेकडे ठेवून, "**मधुपर्काय नमः**" या मंत्रानें अनामिकेनें ढवळून, अनामिका व अंगुष्ठ यानें त्यांतील थोडें बाहेर शिंपडून पुनः असेंच २ वेळ करून, त्या मंत्रांनींच ३ वेळ प्यावें. किंवा "**मधुपर्काय नमः**" ह्मणून, प्यावें. "प्रथम आंगठ्यानें, आंगठा व अनामिका यांनीं २ ऱ्या, आणि अंगुष्ठ, व मध्यमिका यांनीं ३ ऱ्या वेळीं ढवळून प्यावें," असें **स्मृतिकौमुदींत** सांगितलें आहे. तें असें कां सांगितलें? त्याचा विचार करावा. नंतर बाकी राहिलेलें असंचरांत[1] ( एकीकडे ) ठेवून, २ वेळ आचमन करावें, नंतर पुनः आचमन करून, "**वाचे नमः**" यानें मुखास, "**प्राणाय नमः**" नासिकेस, "**चक्षुर्भ्यां नमः**" नेत्रांस, "**श्रोत्राभ्यां नमः**" कर्णांस, "**बलाय नमः**" बांहूंस, "**ओजसे नमः**" मांड्यांस, व "**अंगेभ्यो नमः**" ह्मणून सर्वांगांस स्पर्श करावा. नंतर इतरानें ३ वेळ—**गौः** असें ह्मटलें असतां ती घेऊन, "**रुद्राणां मात्रे वसूनां दुहित्रे आदित्यस्वस्रे गवे नमः । ममार्चकस्य च पाप्मा हतः**" । असें हळूच ह्मणून—**उत्सृजत तृणान्यत्तु** । असें मोठ्यानें ह्मणून, गाय सोडावी. नंतर दात्यानें, वस्त्रें, अलंकार, गंध, माळादिकांनीं वरपूजा करावी. नंतर उत्तम लग्नावर वधूवरांमध्यें अंतःपट[2] धरून, वरानें वधूचें मुख पहावें. अन्य **ग्रंथकर्त्ते**—"लग्नसमयीं पाणिग्रहण करावें, असें मानितात." नंतर अंतःपट दूर करून वरानें वधूमुख पहावें[3]. येथेंच होम करण्याचा पक्ष घेतला असेल तर, अग्निस्थापन करून अग्नीच्या मागें तृणफल किंवा कट ठेवून, कन्येच्या बापानें दिलेल्या ४ वस्त्रांतून दोन—**आयुष्मतीदं वासः परिधत्स्व २** ह्मणून एकेक द्यावें; तिनें "**वाससे नमः २**" ह्मणून तें परिधान करावें. नंतर

१ "असंचर" याचा साधारण अर्थ, जेथें कोणाचा संचार नाहीं असें स्थल, असा होतो परंतु **कारिकेंत** "**असंचरः प्रणीताग्न्योरंतरेण प्रकीर्तितः**" प्रणीता आणि अग्नि यांच्या मध्यभागास असंचर ह्मणतात, असें सांगितलें आहे.

२ वधूवरांच्या मध्यें पिवळें वस्त्र धरितात त्यास अंतःपट हें नांव आहे. हा अंतर्पाट "उत्तरेकडे दशा करून धरावा," असें **नारायणभट्टानें** सांगितलें आहे.

३ ह्याच वेळीं मंगळाष्टकें ह्मणण्याचा शिष्टसंप्रदाय सर्वांस विदित आहेच. **नारायणभट्टांनीं** येथें कांहीं विशेष सांगितला आहे. तो असा कीं—"धान्याच्या राशीवर पश्चिमेस तोंड करून वरास, व पूर्वेकडे मुख करून कन्येस, त्यांच्या ओंजळींत तांदूळ, गूळ, जिरें हीं देऊन उभें करावें." सांप्रत आचारही याचप्रमाणें आहे.

दाल्यानें—**वधूं ईक्षस्व** ह्मणून पाठवलेल्या वरानें वधूस पहावें. • "यानंतर कन्यादान करावें," असें **हरिहर** ह्मणतो. अन्य कित्येक **ग्रंथकर्ते** तर—"कन्यादानानंतर वस्त्रादिक द्यावें." असें ह्मणतात. नंतर—**"करोतु स्वस्ति ते ब्रह्मा०"** या ७ मंत्रांनीं अक्षतारोपण केल्यावर, कन्येचा बाप उत्तराभिमुख असून, त्यानें आपल्या उजव्या बाजूस स्त्रीस बसवून, हातांत दर्भपवित्र घालून, आचमन करून देशकालसंकीर्तनानंतर,—**मम समस्तपितृणां निरतिशयसानंदब्रह्मलोकावाप्त्यादि कन्यादानकल्पोक्तफलावाप्तये अनेन वरेणास्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या**—( ब्राह्मविवाह असेल तर, ) **द्वादशावरान्-द्वादश परान्**—( प्राजापत्यविवाहपक्षीं ) **अष्टौ अवरानष्टौ परान् पुरुषान्पवित्रीकर्तुं आत्मनश्च लक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधिना**—( अथवा ) **प्राजापत्यविवाहविधिना अलंकृत्य कन्यादानमहं करिष्ये ।** असा संकल्प करून मंत्र ह्मणावे. ते—**"कन्यां कनकसंपन्नां कनकाभरणैर्युतां । दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥ १ ॥ विश्वंभरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः ॥ इमां कन्यां प्रदास्यामि पितृणां तारणाय च ॥ २ ॥"** नंतर कांस्यपात्रांत वराच्या हातावर वधूचा हात, व त्यावर आपला हात ठेवून, वराच्या हातांत—**सुप्रोक्षितमस्तु । शिवा आपः संतु । सौमनस्यमस्तु ।** असें ह्मणून—**कन्या तारयतु । पुण्यं वर्धताम् । शांतिस्तुष्टिः पुष्टिश्चास्तु । तिथिकरणमुहूर्तनक्षत्रसंपदस्तु । पुण्याहं भवंतो ब्रुवंतु ।** असें दाल्यानें ह्मटल्यावर ब्राह्मणांनीं—**पुण्याहं** असें ह्मणावें. नंतर, यजमानानें—**स्वस्ति भवंतो ब्रुवन्तु । ऋद्धिं भवंतो ब्रुवन्तु । श्रीरस्त्विति भवन्तो ब्रुवन्तु । अमुकदासोहं मम समस्तपितृणां०** इत्यादि—**पूर्वोक्तलक्ष्मीनारायणप्रीतये**—येथपर्यंत ह्मणून—**काश्यपगोत्रस्य अमुकदासस्य प्रपौत्राय विष्णुदासस्य पौत्राय शिवदासस्य पुत्राय काश्यपगोत्राय देवदत्तदासाय वराय । काश्यपगोत्रां चैत्रदासस्य प्रपौत्रीं मैत्रदासस्य पौत्रीं भोजदासस्य मम पुत्रीं अमुकप्रेष्यां** ( किंवा अ० **नाम्नीं** ) **कन्यां प्रजापतिदैवत्यां यथाशक्त्यलंकृतां**—३ वेळ असेंच ह्मणून,—**शतज्योतिष्टोमातिरात्रफलसमफलप्राप्तिकामः प्रजोत्पादनार्थं सहधर्मचरणार्थं** ( प्राजापत्यविवाहांत ) **सहधर्मं चरतं भार्यात्वेन तुभ्यमहं संप्रददे ।** ह्मणून, दर्भ व यव यांनीं युक्त उदक आणि कन्येचा हात वराच्या हातांत द्यावा. "**मयापि दत्ता** असें मुलीच्या आईनेंही ह्मणावें;" असें **कित्येक** ह्मणतात. येथें "शूद्रांनीं गोत्राचा उच्चार करूं नये," असें **कित्येक** ह्मणतात. नंतर वरानें—**प्रतिगृह्णामि स्वस्ति ।** असें ह्मणून भूमिस्पर्श करावा. **"गौरीं कन्यामिमां भो त्वं यथाशक्ति विभूषिताम् ॥ गोत्राय चैव दासाय तुभ्यं दत्तां समाश्रय ॥ १ ॥ कन्ये ममाग्रतो भूयाः कन्ये मे देवि पार्श्वयोः ॥ कन्ये मे पृष्ठतो भूयास्त्वद्दानात्स्वर्गमाप्नुयाम्**

॥ २ ॥ **मम वंशकुले जाता पालिता वत्सराष्टकम्**॥ **तुभ्यं दास मया दत्ता पुत्रपौत्रविवर्धिनी**" ॥ ३ ॥ हे मंत्र कन्येच्या पित्यानें ह्मणावे. नंतर—**कन्यादानप्रतिष्ठार्थमिदं सुवर्णं गोमिथुनं च दक्षिणां संप्रददे ।** असें ह्मणून सोनें, गाय, व बैल वरास द्यावीं. नंतर शक्ति असल्यास तांब्याचीं कांशाचीं वगैरे पात्रें, गायी, घोडे, दासी, दास, वगैरे वस्तु आंदण द्याव्या. तसेंच वरपक्षीयांस कन्येच्या बांधवांनीं यौतक द्यावें. नंतर—"वर, व त्याचा बाप इत्यादिकांनींही वधूच्या बापादिकांस असेंच द्यावें," असें **कित्येक ग्रंथकर्ते** ह्मणतात. "विवाहहोमांतीं यौतक द्यावें," असें **कित्येक** ह्मणतात. नंतर चार वेळ किंवा पांच वेळ वधूवरांस सुतानें वेढून वरचें सूत खालच्या मार्गानें; व खालचें सूत्र वरच्या मार्गानें काढून तें त्रिगुणित (तिप्पट) व पिंवळें करून खालचें सूत वधूनें वरांच्या उजव्या हातास, व वरचें सूत वरानें वधूच्या डाव्या हातास कंकण बांधावें. वरानें बांधतेवेळीं मंत्र ह्मणावा तो—"**येन बद्धो बली राजा दानवेंद्रो महाबलः ॥ तेन त्वामपि बध्नामि रक्षे मा चल मा चल**" ॥ १ ॥ नंतर वधूवरांनीं दुधानें ओलसर केलेल्या अक्षतांचें परस्पर आरोपण करावें. त्यांत प्रथम वधूनें, व नंतर वरानें करावें असा क्रम आहे. त्याचे मंत्र—"**भगाय नमः । यज्ञाय नमः । श्रियै नमः । धर्माय नमः । प्रजायै नमः । यशसे नमः**" । नंतर पूर्वाभिमुख बसून कन्येस २ वस्त्रें द्यावीं. तिनें—"**वासोभ्यां नमः**" । ह्मणून तीं परिधान करावीं. नंतर वरानें—"**मांगल्यतंतुनानेन भर्तृजीवनहेतुना ॥ कंठे बध्नामि सुभगे सा जीव शरदां शतम्**" ॥ १ ॥ या मंत्रानें वधूच्या गळ्यांत सौभाग्यसूत्र ( मंगळसूत्र ) बांधावें. मग "**विश्वेदेवायुमातरिश्वधातृभ्यो नमः**" ह्मणून वधूचें मुख पहावें. येथें कौसुंभसूत्रानेंही कंकण बांधावें असें आहे, परंतु तें वैकल्पिक आहे. नंतर बोहल्यावर पूर्वाभिमुख तेजणी किंवा वीरण कटावर अग्नीच्या मागें बसून, त्याच्या दक्षिणेस किंवा ईशान्येस मंगलकुंभ खांद्यांवर घेऊन सप्तपदी होईपर्यंत कोणीएकानें उभें रहावें. अग्नीच्या उत्तरेस २ पाषाण अलंकृत असे ठेवावे. येथें वरानें वधूचें नांव घेऊं नये असा आचार आहे. नंतर वधूच्या बापानें "एकमेकांस अवलोकन करावें." असें सांगितल्यावर वधूवरांनीं एकमेकांस पहावें, त्या वेळीं—"**अरौद्रचक्षुरपतिघ्नी शिवा च सुमनास्तथा ॥ सुवर्चाः पुत्रसूर्देवकामा च सुखदा भव**" ॥ १ ॥ असें वरानें ह्मणावें. आणखी—"**सोमगंधर्वा-**

१ लग्नाच्या वेळीं मुलगी ८ वर्षांची असेल तर हा चरण असा ह्मणावा, आणि त्याहून अधिक वर्षें असतील तर "**०नववर्षकम् । ०दशवर्षकम्**" असा ऊह करावा, असें कित्येकांचें मत आहे.

२ युतक हें वधूवरांचें नांव आहे. तत्संबंधी जें तें यौतक, अर्थात् वधूवरांच्या बंध्वादिकांस देण्याच्या वस्तु. कन्यादानकालीं वराच्या बंधूंस जें देतात त्यास यौतक ह्मणतात.

३ हें वधूवरांच्या हातांत कड्यासारखें बांधितात व त्यानें हाताला एक प्रकारची शोभा येते ह्मणून त्यास "कंकण" ( हाताचें भूषण ) ह्मणतात.

**ग्निपूषभ्यो नमः**" असेंही ह्मणावें. "शूद्रास **गृह्यसूत्रा**ध्ययनाचा अभाव आहे यास्तव; सूत्रोक्त होम, व तत्संबंधी अंगसमुदाय यांचें ज्ञान नाहीं यास्तव, व प्रयुक्ति ( प्रयोग )-शक्तीच्या अभावास्तव त्यांच्या विवाहांत होमच नाहीं, " असें **मदनपाल** ह्मणतो. अन्य **ग्रंथकार** तर—"प्रधान( मुख्य )भूत विवाहाविषयीं शूद्रांस अधिकार सिद्ध असतां स्थपती ( सुतार ) च्या इष्टीप्रमाणें विवाहाच्या होमादि अंगांचे ठायींही मंत्र ऐकणें. व त्यांचा उपदेश इत्यादिकानें ज्ञान होण्याचा संभव आहे; ह्मणून शूद्रांनींहीं विवाहांत होम करावा," असें ह्मणतात. होम करण्याचा प्रकार पुढें लिहिल्याप्रमाणें,-आचार्योनें अग्नीच्या दक्षिणेस ब्रह्मासन ( कांहीं दर्भ ) देऊन, ब्रह्मानामक ऋत्विजास त्यावर बसवून, मातीच्या पात्रांत पाणी भरून, त्यावर दर्भ ठेवून, अग्नीच्या उत्तरेस दर्भांवर तें ठेवून, अग्नीस दर्भांनीं पूर्वेपासून परिस्तरण ( ४ । ४ दर्भ ) घालून, पात्रासादन करावें. तें असें कीं,— ३ गवताच्या काड्या, २ पवित्रें, प्रोक्षणीपात्र, आज्यस्थाली, चरुस्थाली, संमार्गदर्भ, उपयमनदर्भ, ३ समिधा, स्रुवा, आज्य, तंदुल, लाह्या, सूप, संस्रावपात्र, अश्मा ( धोंडा ), बैलाचें चर्म, दक्षिणा, व गाय हीं अग्नीच्या उत्तरेस ठेवावीं. नंतर १ टीचभर २ दर्भ तोडून प्रोक्षणीस संस्कार करून, त्या दर्भांनीं उत्पवन करून, ते दर्भ प्रोक्षणीवर ठेवून, उजव्या हातानें डाव्या हस्तावर घेऊन, खालीं ठेवून पात्र प्रोक्षण करून तें खालीं ठेवून, आज्यस्थालींत तूप घालून, तें अग्नींत उजव्या भागांत ठेवून, पेटलेल्या दर्भांनीं लाह्यांसह ३ वेळ त्याच्या परितः भ्रमण करून, स्रुवा तापवून त्यावर दर्भांनीं मार्जन करून, प्रोक्षणीपात्रोदकानें प्रोक्षून पुनः तापवून, तो दक्षिण बाजूस ठेवून आज्य खालीं काढून त्याचें उत्पवन करून, अवेक्षण करून, दूर करून, पुनः प्रोक्षणीचें उत्पवन व अवेक्षण करून, उपयमनदर्भ घेऊन, उठून पूर्वी ठेवलेल्या ३ समिधा अग्नींत घालून, प्रोक्षणींतल्या उदकानें पर्युक्षण करून, वरानें व ब्रह्मयानें उजव्या हस्तानें अन्वारब्ध अशा गुरूनें उजव्या गुडघ्याच्या आंतून हात घेऊन स्रुव्यानें हवन करावें. त्याचे मंत्र,-"**प्रजापतये नमः । इंद्राय नमः**" या दोन मंत्रांनीं आघारहोम करावा. वरानें "**इदं प्रजापतये न मम**" असा सर्वत्र त्याग करावा. "**अग्नये नमः । सोमाय नमः**" यांनीं आज्यभाग करावे. "**अग्नये नमः । वायवे नमः । सूर्याय नमः । अग्नीवरुणाभ्यां नमः** । ( २ वेळ ) **अग्नये नमः । वरुणाय नमः । सवित्रे नमः । विष्णवे नमः । विश्वदेवेभ्यो नमः । मरुद्भ्यो नमः । वरुणायादित्यायादितये प्रजापतये नमः** ।" यांनीं हवन करावें किंवा न करावें. नंतर त्रिरग्नि मृत्यु यांस हवन करावें. अथवा न करावें.

---

१ "संमार्गदर्भ" याचा अर्थ-उत्तम प्रकारें शोधन करण्याकरितां घेतलेले दर्भ, असा होतो. याविषयीं **ब्रह्मयज्ञकल्पवल्लींत** "**स्रुवसम्मार्जनार्थाय पंच वाथ त्रयोऽपि वा ॥ प्रादेशमात्रान्गृह्णीयात्सम्मार्गकुशसंज्ञकान्**" ॥ १ ॥ स्रुव्याला स्वच्छ करण्याकरितां सम्मार्ग असें ज्यांस नांव आहे असे ३ किंवा ५ टीचभर लांबीचे दर्भ घ्यावे, असें सांगितलें आहे.

२ "वर सांगितलेल्या प्रकारचे ७।५ किंवा ३ दर्भ घ्यावे. त्यास "उपयमनदर्भ" असें नांव आहे," असें त्याच **ब्रह्मयज्ञकल्पवल्लींत** सांगितलें आहे.

नंतर वधूच्या ओंजळींत उपस्तरण करून, तिच्या बंधूनें किंवा तत्सम दुसऱ्यानें शमीच्या पानांनीं मिश्र अशा लाह्या सुपांतून ओंजळीनें २ वेळ मुलीच्या ओंजळींत घालाव्या. मग त्यांवर अभिघार करावा. वधूनें वरासह—**"अग्नये नमः"** या मंत्रानें ३ वेळ हवन करावें. येथें मंत्र वरानेंच ह्मणावा. नंतर वरानें वधूचा उताणा उजवा हात अंगुष्ठसह आपल्या उताण्या हातानें घ्यावा. त्या वेळीं मंत्र—**"भगोऽर्यमसवितृभ्यो नमः ॥ वित्तसौम्यगुणैर्युक्ता वीरसूर्जीवसूर्भव ॥ कुले मदीये सम्राज्ञी मच्चितानुगता सदा"** ॥ १ ॥ असा ह्मणावा. नंतर, हस्त ग्रहण केलेल्या वधूस अग्नीच्या उत्तरेस उजव्या पायानें, अश्म्या-( दगडा )वर उभी करावी. त्या वेळीं—**"कन्यायै नमः । सरस्वत्यै नमः"** हे मंत्र ह्मणावे. या वेळीं बायकांनीं मंगलकारक कांहीं गाणीं गावीं. मग—**"अग्नये नमः"** यानें १ वेळ अग्नीस प्रदक्षिणा करावी. पुनः २ वेळ लाह्यांच्या होमापासून अग्निप्रदक्षिणेपर्यंतचें सर्व असेंच करून, चवथ्या वेळेस सूप वांकवून त्या घालणाऱ्यानें वधूच्या ओंजळींत राहिलेल्या सर्व लाह्या घालाव्या. वधूनें—**"भगाय नमः"** ह्मणून त्यांचें हवन करावें. या खेपेस अग्निप्रदक्षिणा करून खालीं बसून, ब्रह्म्यानें अन्वारब्ध असून—**"प्रजापतये नमः"** ह्मणून हवन करून, उत्तरेस ७ तांदुळांचे पुंजके करीत ते उत्तरेस संपवून, वधूस—**"विष्णवे नमः"** या मंत्रानें उजव्या पावलानें वरानें ७ पावलें बरोबर चालवावें. त्याचे मंत्र—**"इषे नमः १ विष्णवे नमः २ सर्वत्र ऊर्जे नमः ३ रायस्पोषाय नमः ४ मायोभव्याय नमः ५ प्रजाभ्यो नमः ६ ऋतुभ्यो नमः ७"** असें ह्मणावें, असें **कित्येक** ह्मणतात. नंतर, सातव्या पाउलीं गुरूनें वधूवरांचीं मस्तकें जवळ करून, त्यांवर पूर्वी स्थापित कलशांतील उदकानें आंब्याच्या पानांनीं अभिषेक करावा. वरानें—**सूर्यमुदीक्षस्व** असें ह्मटल्यावर वधूनें—**"सूर्याय नमः"** ह्मणून सूर्यास पहावें. **"मम तव चित्तवाग्भ्यो नमः"** ह्मणून, वरानें वधूच्या उजव्या स्कंधावर आपला हात नेऊन तिच्या हृदयास स्पर्श करून, उत्तरेस वधूस बसवून **"वध्वै नमः"** यानें अभिमंत्रण करून, वधूच्या भांगांत सेंदूर लावून, दुसऱ्यानें किंवा वरानेंच वधूस उठवून, **"गोऽश्वपुरुषेभ्यो नमः"** ह्मणून पूर्वस्थापित बैलाच्या लाल चर्मावर[१] वधूस बसवून, **"अग्नये स्विष्टकृते नमः"** ह्मणून स्विष्टकृत् हवन करून, संस्रावाचें प्राशन, व प्रणीतांचें पवित्रांनीं मार्जन करून, तीं पवित्रें अग्नींत टाकावीं. आचार्यास गोदान द्यावें. प्रणीतेचा विमोक करावा. ब्रह्म्याला पूर्णपात्र देऊन ब्राह्मणांस आमान्नें देण्याचा संकल्प करावा. दिवसा विवाह झाला असतां—**सूर्यमुदीक्षस्व** । व रात्रीं विवाह झाला असतां **ध्रुवमुदीक्षस्व** ह्मणून, वरानें पाठविलेल्या वधूनें, **"ध्रुवाय नमः"** ह्मणून त्यास पहावा. नंतर १ वर्ष, १२ रात्रि, ६ रात्रि, किंवा ३ रात्रि खारट, तिखट, आंबट वगैरे पदार्थ न खातां दोघांनीं ब्रह्मचर्यानें असून, निरंतर अलंकार वगैरे

---

१ येथें "बैलाच्या लाल कातड्यावर वधूला बसवावें," असें सांगितलें आहे, परंतु तें सांप्रत चालू असलेल्या शिष्टाचारास विरुद्ध आहे; व **संस्कारभास्करांत** "कातड्याबद्दल दर्भ घालावे," असें सांगितलें आहे. याविषयीं त्यांतला विवाहप्रयोग पहावा.

धारण करून, पलंगावर न निजतां पूर्वोक्तप्रमाणें रात्रि घालवाव्या. तेल अक्षता, चंदन वगैरे आचाराप्रमाणें एकमेकांस द्यावें. चवथ्या दिवसीं मध्यरात्रीनंतर पंचभूसंस्कार[1] करून विवाहाग्निस्थापन करून ब्रह्मोपवेशनापासून समिदाधानापर्यंत पूर्ववत् करावें. नंतर आज्य-निर्वाप करून, स्थालींत तूष्णीं ४ मुष्टि तांदुळांचा निर्वाप करून, ३ वेळ प्रोक्षून तें धुवून अग्नीवर शिजवून, समिधांवर ठेवून, अग्नीस पर्युक्षण करून; आज्यभागांतीं—"**अग्नये प्रायश्चित्ताय नमः। वायवे प्रायश्चित्ताय नमः। सूर्याय प्रायश्चित्ताय नमः। चंद्राय प्रायश्चित्ताय नमः। गंधर्वाय प्रायश्चित्ताय नमः**"। यांनीं हवन करून, पूर्वोक्त आघार, व आज्यभागाच्या ४, व ह्या ५ मिळून ९ आहुति झाल्यावर—"**प्रजापतये नमः**" ह्मणून, चरु होम करून, कुंभांतून संस्रव घेऊन—"**अग्निवायुसूर्यचंद्र-नक्षत्रगंधर्वप्रजापतिभ्यो नमः**" ह्मणून ते संस्रव वधूच्या मस्तकावर देऊन—"**मम व्रतानुसारिणी भव**" असें ह्मणून, अग्नीच्या उत्तरेस चरुशेष घेऊन,—"**प्राणेभ्यो नमः। अस्थिभ्यो नमः। मांसेभ्यो नमः। त्वचे नमः**" या मंत्रांनीं ते वधूकडून भक्षण करवून, तिच्या कडून आचमन करवून, आज्यानें—"**अग्नये स्विष्टकृते नमः**"। यानें स्विष्टकृत् हवन करावें. अग्नीपासून, प्रजापतीपर्यंत ९ देवतांस आहुति द्याव्या. पिण्यास संस्रव ध्यावयाचे ते दुसऱ्या पात्रांत घेऊन वधूनें प्यावें; नंतर मार्जन, पवित्रत्याग, गुरुदक्षिणा, ब्रह्मयास पूर्णपात्र, ब्राह्मणांस आमान्नें द्यावीं. **स्मृतिकौमुदींत** "शूद्रास कोणत्याच होम करण्याचा अधिकार नाहीं," असें सांगितलें आहे. तें योग्य नाहीं. कारण, "ती ( कन्या ) मेली असतांही त्याशीं ( वराशीं ) मंत्र, आहुति, व्रतें इत्यादिकांनीं ऐक्य पावली." या वाक्याचा शूद्रांविषयीं कांहीं जर विशेष असता तर त्याचें मत योग्य होतें, परंतु तसें नाहीं. नंतर, वर व वऱ्हाडी यांची पूजा वस्त्रालंकारांनीं करावी. वराच्या आईस वंशपात्र ( ऐरिणी ) दान करावें. हें ऐरिणीदान "मुलीच्या बापासही द्यावें," असें कित्येक **ग्रंथकर्ते** ह्मणतात. तें देण्याचा प्रकार असा कीं,—१६ सुपल्या एका वंशपात्रांत ( पांटींत ) घालून, त्यांत उमा व महेश्वर यांची गंधादिकांनीं पूजा करून, त्यांची—"**ऐरिणि त्वमुमा देवी महेशो गिरिजापतिः॥ अतस्त्वां पूजयिष्यामि ऐरिणीं सर्वकामदाम्॥१॥ सवस्त्रां च सदीपां च शूर्पैः षोडशभिर्युताम्॥ वरमात्रे प्रदास्यामि कन्यादानस्य सिद्धये**"॥ २॥ ह्या मंत्रांनीं प्रार्थना करून, **कृतस्य कन्यादानस्य संपूर्णफलप्राप्त्यर्थमिदं वंशपात्रं वरमात्रे संप्रददे न मम**। असें ह्मणून, पुढें—"**वंशो वंशकरः श्रेष्ठो वंशो वंशविवर्धनः॥ अनेन वंशदानेन तुष्टस्त्वृद्धिं करोतु मे॥ १॥ वंशपात्रमिदं पुण्यं वंशजातसमुद्भवम्॥ दानानामुत्तमं दानमतः शांतिं प्रयच्छ मे**"॥ २॥ या मंत्रांनीं तें पात्र

१ "भूमीची शुद्धता व्हावी एतदर्थ पंचभूसंस्कार करावे," असें **ग्रह्ययज्ञकल्पवल्लींत** सांगितलें आहे. ते कसे करावे? याविषयीं **संस्कारभास्करांत**—"**पृथिवीकूर्मानंतदेवताभ्यो नमः**" या मंत्रानें पृथिवीचें पूजन करावें, व, आसमंतात् मोहऱ्या टाकाव्या, आणि सर्वत्र पंचगव्यानें ( शूद्रांनीं गोमूत्रानें ) प्रोक्षण करावें. हें **शान्तिसारांत** सांगितलें आहे, असें वर्णन केलें आहे.

वरमातेला द्यावें. हें ऐरिणीदान कित्येक करीत नाहींत. नंतर कन्येच्या बापानें—"**अष्टवर्षा त्वियं कन्या पुत्रवत्पालिता मया ॥ इदानीं तु मया तुभ्यं दत्ता स्नेहेन पाल्यताम्**" ॥ १ ॥ हा मंत्र ह्मणून वधूस वराच्या मांडीवर बसवावें. नंतर वरानें आपल्यास अनुकूल असेल त्याप्रमाणें घोडा, पालखी इ० यानांत उभयतां बसून आपल्या घरांत शुभवेळीं प्रवेश करून, तेथें लक्ष्मीपूजन, व पूर्वस्थापित मातृका आणि मंडपदेवता यांची उत्तम पूजा करून त्यांचें विसर्जन करावें. पूर्वी बांधलेल्या वस्त्रगांठी, व हातांतील कंकण सोडून, ब्राह्मणपूजन करावें. वधूसह गृहप्रवेश, व **मण्डपोद्वासन** यांचे काल; व

---

१ **निर्णयसिंधूंत** तृ० परि० पूर्वा० पृष्ठ ३८ येथें देवकोत्थापनाचा काळ सांगितला आहे तो—"तें समदिवसीं ह्मणजे विवाहदिवसापासून २।४।८ इ० दिवसीं करावें. परंतु समदिवसांत ६ वा दिवस वर्ज्य करावा. विषमदिवस ५ व ७ वा यांवांचून सर्व वर्जावे."

येथें प्रसंगत: विवाहानंतर देवकोत्थापनापूर्वी कांहीं कर्में वर्ज्य आहेत तीं सांगतो—"नांदीश्राद्धानंतर, देवकोत्थापन होईपर्यंत दर्शश्राद्ध, वार्षिक श्राद्ध, थंड पाण्यानें स्नान, अपसव्य, स्वधाशब्दोच्चार, नित्यश्राद्ध, ब्रह्मयज्ञ, अध्ययन, नदीच्या अथवा आपल्या गांवच्या सीमेपलीकडे जाणें, उपवासव्रत, व श्राद्धान्नभोजन इतकीं कर्में ज्या घरीं विवाह झाला असेल त्या घरच्या मनुष्यांनीं, व त्याच्या सपिण्डांनीं करूं नयेत. तसेंच मंडपोद्वासन होईपर्यंत साधारणत: स्पर्शदोष मानूं नये. तसेंच विवाह झाल्यापासून १ वर्षपर्यंत सचैल स्नान, तिलमिश्रकर्म, प्रेताबरोबर जाणें, कलशदान, व पूर्वी न गेलेल्या तीर्थास किंवा देवदर्शनास जाणें हीं कर्में करूं नयेत. इतकीं कर्में वर्ज्य आहेत. आपल्या पुत्राच्या विवाहानंतर १ वर्षपर्यंत क्षौर करूं नये. तसेंच विवाहापासून ६ महिनेपर्यंत घरांतील जुनें सामान बाहेर टाकूं नये. अभ्यंग, सूतक, विवाह, पुत्रजन्मकाल, व सर्व मंगलकार्यांत, गोपीचंदन लावूं नये.

२ वधूप्रवेशकाल पुढें लिहिल्याप्रमाणें:—मार्गशीर्ष, माघ, वैशाख, व ज्येष्ठ, या महिन्यांत उत्तम योगावर वधूसह गृहांत प्रवेश करावा. **नारद**मतानें—विवाहदिवसापासून ६ व्या व ८ व्या दिवसीं वधूप्रवेश केल्यास संपत्तिकारक होतो. त्या दिवसीं न झाल्यास १० व्या दिवसीं, किंवा कोणत्याहि सम दिवसीं विवाहापासून १६ दिवसांच्या आंत करावा. नाहींतर भिन्न वर्षांत ५ महिन्यांच्या आंत केल्यास वरील दिनशुद्धि अवश्य पहावी. नंतर दिनशुद्धि पाहाण्याची गरज नाहीं. एकंदरींत वर्ष व मास सम असूं नये. **प्रयोगरत्नांत नारायणभट्टांनीं**—"१।३।५ या दिवसीं वधूप्रवेश केल्यास तो सुखप्रद, व २।४।६ दिवसीं केल्यास वियोग, दुःख व रोगप्रद होतो." याप्रमाणें विषमदिवसीं प्रवेश करावा असें सांगितलें आहे, परंतु याविषयीं मूळवचन मिळत नाहीं. त्याचा सुज्ञवाचकांनीं विचार करावा. ६।८।१० व्या दिवसीं यद्यपि चंद्र वाईट स्थानीं असला, व पंचांगशुद्धि नसली तथापि वधूप्रवेश करावा. तसाच या कर्मास प्रतिशुक्राचा, व गुरु आणि शुक्र यांच्या अस्ताचा दोष नाहीं. यद्यपि गमनकालीं—" वधूच्या डाव्या बाजूस शुक्र असल्यास सुख, उजव्या बाजूस असल्यास हानि, मागें असल्यास धनधान्य, व समोर सर्वनाश आणि कन्येला वैधव्य " इत्यादि दोष सांगितले आहेत; तथापि ते, द्विरागमनाविषयीं आहेत असें समजावें. गृहप्रवेशदिवसीं शुक्राचा उदय पूर्वेस झाला असल्यास दक्षिणेस, व पश्चिमेस झाला

अन्यही एतत्संबंधी अन्य विशेष निर्णयसिंधूंत पहावे. याप्रमाणें गर्भाधानापासून विवाहापर्यंत, सांगितलेले सर्व संस्कार, व पुढें सांगणार तें आह्निक वगैरे हीं सर्व कर्में सच्छूद्रांस विहित आहेत. असच्छूद्रांस केवळ विवाहमात्र विहित आहे. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य विवाहप्रयोगः संस्कारप्रयोगप्रकरणं च समाप्तम् ॥**

**॥ समाप्तमिदं द्वितीयं प्रकरणम ॥**



असल्यास वधूनें पूर्वेस व उत्तरेस जावें. रेवती, हस्त, श्रवण, धनिष्ठा, शततारका, चित्रा, स्वाती, विशाखा, मूळ, मघा, उत्तरा, पुष्य, व अनुराधा इतक्या नक्षत्रांवर, ४।९।१४ या रिक्तातिथि, मंगळ व रविवार व व्यतीपात, संक्रांति, ग्रहण, वैधृति, श्राद्धदिवस, अमावास्या, विष्टि इत्यादि वर्ज्य करून पूर्वोक्त नक्षत्रांवर शुभ योग पाहून तिनें पतिगृहास गमन करावें.

१ विवाहानंतर पति, व पित्याच्या घरीं वधूनें कोणकोणत्या महिन्यांत राहूं नये तें सांगतों,—"विवाहानंतर प्रथम येणाऱ्या—आषाढ महिन्यांत पतिगृहीं कन्या राहील तर सासूला मारील. क्षयमासीं राहील तर आपणच मरेल. ज्येष्ठांत राहील तर नवऱ्याच्या वडील बंधूस मारील. पौषांत राहील तर सासऱ्यास मारील. अधिक मासांत राहील तर पतीला मारील. चैत्रांत आपल्या बापाचे घरीं राहील तर बापास मारील. असें आहे. परंतु ते ते मनुष्य नसतील तर त्या त्या महिन्यांत राहण्यास दोष नाहीं.

आतां द्विरागमनकाल सांगतो:—माघ, फाल्गुन, वैशाख, ह्या तीन महिन्यांत शुक्लपक्षीं शुभदिवसीं गुरु, व सूर्य अनुकूल आहेत असें पाहून द्विरागमन करावें.

२ सत् व असत् शूद्रांचीं लक्षणें ३ ऱ्या जातिनिर्णयप्रकरणांत पहावीं. असच्छूद्रांस पूर्वोक्त कर्में विहित नाहींत असें असून कदाचित् असच्छूद्रांनीं तीं आचरण केल्यास, ते केवळ दोषास पात्र होतील.

## ॥ अथ शूद्रस्याह्निकमुच्यते ॥

तत्र विष्णुः ॥ ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय॰ [ वि॰ स्मृ॰ अ॰ १ श्लो॰ १७ ] इति ॥ विष्णुधर्मे ॥ शयनादुत्थितो यस्तु कीर्तयेन्मधुसूदनम् ॥ कीर्तनात्तस्य पापानि नाशमायांत्यशेषतः ॥ १ ॥ तत्राचम्य पितरौ इष्टदेवं च नत्वा । प्रातः स्मरामि भवभीतिमहार्तिशांत्यै नारायणं गरुडवाहनमब्जनाभम् ॥ ग्राहाभिभूतवरवारणमुक्तिहेतुं चक्रायुधं तरुणवारिजपत्रनेत्रम् ॥ १ ॥ प्रातर्नमामि मनसा वचसा च मूर्ध्ना पादारविंदयुगुलं परमस्य पुंसः ॥ नारायणस्य नरकार्णवतारणस्य पारायणप्रवणविप्रपरायणस्य ॥ २ ॥ प्रातर्भजामि भजतामभयंकरं तं प्राग् सर्वजन्मकृतपापभयापहत्यै ॥ यो ग्राहवक्त्रपतितांघ्रिगजेंद्रघोरशोकप्रणाशमकरोद्धृतशंखचक्रः ॥ ३ ॥ श्लोकत्रयमिदं पुण्यं प्रातः प्रातस्तु यः पठेत् ॥ लोकत्रयगुरुस्तस्मै दद्यादात्मपदं हरिः ॥ ४ ॥ प्रातः स्मरामि शिवमेकमनंतमाद्यमित्यादि यथावासनं पठित्वा । पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ॥ पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥ ५ ॥ इत्युक्त्वा भूमिं नमस्कृत्य । अंतर्धाय तृणैर्भूमिं शिरः प्रावृत्य वाससा ॥ वाचं नियम्य यत्नेन निष्ठीवोच्छ्वासवर्जितः ॥ १ ॥ कुर्यान्मूत्रपुरीषे तु शुचौ देशे समाहितः ॥ इत्यंगिरसोक्तविधिना दिवा संध्यासु उदङ्मुखः ॥ कुर्यान्मूत्रपुरीषे तु रात्रौ चेद्दक्षिणामुखः ॥ ग्रामात्पदशतं गच्छेन्नगराच्च चतुर्गुणमिति याज्ञवल्क्यपराशराद्युक्ते देशे मूत्रपुरीषे कृत्वा । अपकृष्य च विण्मूत्रं काष्ठलोष्टतृणादिनेति भारद्वाजोक्तेर्लोष्टादिना वामेन गुदं प्रमृज्य । गृहीतशिश्नश्चोत्थाय मृद्भिरभ्युद्धृतैर्जलैः ॥ गंधलेपक्षयकरं शौचं कुर्यादतंद्रितः ॥ १ ॥ इति याज्ञवल्क्योक्तेः शौचं कुर्यात् ॥ तत्र मूत्रे शातातपः ॥ एका लिङ्गे करे सव्ये तिस्रो द्वे हस्तयोर्द्वयोः ॥ मूत्रे शौचं समाख्यातं शुक्रे तद्द्विगुणं भवेत् ॥ १ ॥ पुरीषे तु दक्षः ॥ द्वे लिंगे मृत्तिके देये गुदे पंच करे दश ॥ उभयोः सप्त दातव्या मृदः शौचोपपादिकाः[२] ॥ १ ॥ शङ्खः ॥ मेहने मृत्तिकाः सप्त लिंगे द्वे परिकीर्तिते ॥ २१ ॥ एकस्मिन्विंशतिर्हस्ते द्वयोर्ज्ञेयाश्चतुर्दश ॥ ( एको वामः ) तिस्रस्तु मृत्तिका देयाः कर्तुर्वै नखशोधनम् ॥ २२ ॥ तिस्रस्तु पादयोर्ज्ञेयाः शौचकामस्य सर्वदा ॥ २३ ॥ [ शं॰ स्मृ॰ अ॰ १६ ] विष्णुपुराणे ॥ एका लिङ्गे गुदे तिस्रो दश वामकरे तथा ॥ उभयोः सप्त दातव्या मृदः शौचोपपादिकाः ॥ १ ॥ अत्र लेपन्यूनाधिकभावाभ्यां गृहापत्त्यादिपरतया वा व्यवस्था ॥ मूत्रे मृत्परिमाणमाह दक्षः ॥ लिंगे तु मृत्समाख्याता त्रिपर्वं पूर्यते यया [ द॰ स्मृ॰ अ॰ ४ ] ॥ गुदे तु मनुः ॥ अर्धप्रसृतिमात्रा तु प्रथमा मृत्तिका स्मृता ॥ द्वितीया च तृतीया च तदर्धार्धा प्रकीर्तिता ॥ आदित्यपुराणे ॥ स्त्रीशूद्रयोरर्धमानं शौचं प्रोक्तं मनीषिभिः ॥

---

१ चोपस्पृश्य पयस्तथा ॥ त्रिराचम्य ततः प्राणांस्तिष्ठेन्मौनी समाहितः ॥ [ वि. स्मृ. अ. १ श्लो. १७ ]

२ एका लिंगे गुदे तिस्र उभयोर्मृद्द्वयं स्मृतम् ॥ चतस्रस्तु दशैकस्मिन्नुभयोः सप्त मृत्तिका इति पुस्तकान्तरे पाठः ॥

उक्तशौचेन गंधानपगमे तु देवलः ॥ यावत्साध्विति मन्येत तावच्छौचं विधीयते ॥ दक्षः ॥ यद्दिवा विहितं शौचं तदर्धं च निशि स्मृतम् ॥ तदर्धमातुरे प्रोक्तमातुरस्यार्धमध्वनि ॥१३॥ [ द० स्मृ० अ० ४ ] ॥ वृद्धपराशरः ॥ उपविश्य तु विण्मूत्रं कर्तुं यस्तु न विंदति ॥ स कुर्यादर्धशौचं तु स्वस्य शौचस्य सर्वदा ॥ १ ॥ बालस्यानुपनीतस्य गंधलेपक्षयावहम् ॥ ब्राह्मे ॥ न यावदुपनीयेत विप्रः शूद्रस्तथांगना ॥ गंधलेपक्षयकरं शौचं तेषां विधीयते ॥ १ ॥ प्रमाणं शौचसंख्या वा न शिष्टैरुपपादितेति शूद्रे ॥ विवाहात्प्रागेवं विवाहाभावे तु द्वादशवर्षोर्ध्वं षोडशवर्षोर्ध्वं वा सर्वे धर्मा नियताः ॥ न प्राक् ॥ एतच्च वक्ष्यामः ॥ भोजने गुदस्रावे बृहस्पतिः ॥ भुंजानस्य तु विप्रस्य कदाचित्प्रस्रवेद्गुदम् ॥ पूर्वं कृत्वा तु शौचं तु ततः प्रश्चादुपस्पृशेत् ॥ १ ॥ ततः कृत्वोपवासं च पंचगव्येन शुद्ध्यति ॥ हस्तं प्रक्षाल्य शौचं कृत्वा गंडूपोत्तरमुपवसेदित्यर्थः ॥ विप्रस्येत्युपलक्षणम् ॥

॥ इति श्रीकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शौचविधिः ॥

## अथ तृतीयप्रकरणम्

यानंतर शूद्रांचें प्रातःकृत्य सांगतों.

याविषयीं **विष्णु** ह्मणतो कीं,–"ब्राह्ममुहूर्तीं[2] उठून आत्महित चिंतावें." **विष्णुधर्मोत**–"जो पूर्वोक्तकालीं ( पहांटेस ४ घटका रात्रीस ) अंथरुणावरून उठून, विष्णूचें नामसंकीर्तन करितो त्याचीं त्या कीर्तनेंकरून सर्व पापें नाश पावतात" असें सांगितलें आहे. त्याप्रमाणें उठून आचमन करून मातापितर, व इष्टदेवता यांस नमस्कार करून,–"**प्रातः स्मरामि भवभी०**" हे श्लोक ह्मणून,—"**प्रातः स्मरामि शिवमे०**" हे श्लोक ह्मणण्यास अवकाश असल्यास ह्मणावे. नंतर,—"**पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ॥ पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः**" ॥ १ ॥ हा श्लोक ह्मणून,—"**समुद्रवसने देवि पर्वतस्तनमण्डले[3] ॥ विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे**" ॥ १ ॥ या मंत्रानें भूमीस नमस्कार करावा. नंतर "भूमीवर गवत घालून, वस्त्रानें बुर्खा घेऊन, यत्नानें वाङ्नियम करून, श्वास न सोडतां, मलविसर्जन करावें. तें शुद्ध प्रदेशांत स्वस्थ अंतःकरणानें करावें. मूत्रविसर्जनही असेंच करावें" याप्रमाणें **आंगिरसोक्त** विधीनें—"दिवसा, व संध्याकालीं उत्तराभिमुख; आणि रात्रीं दक्षिणाभिमुख मूत्र, व पुरीष विसर्जन करावें. तें गांवापासून १००, नगरापासून ४०० शें पावलें दूर जाऊन तेथें करावें," असें **याज्ञवल्क्य व पराशर** इत्यादिकांनीं उक्त प्रदेशांत मूत्र पुरीष विसर्जन करून,—"लांकूड ढेंकूळ किंवा गवत यांनीं मूत्रपुरीषांचें अपकर्षण करावें ( गुद पुसावें )." असें **भरद्वाजानें** सांगितलें आहे ह्मणून, ढेंकुळादिक घेऊन डाव्या हस्तानें गुदप्रमार्जन करून,—"हातांत इंद्रिय ( ॐ ) धरून तेथून

---

१ दिवा कृतस्य शौचस्य रात्रावर्धं विधीयत इत्यपि पठ्यते ॥

२ "ब्राह्ममुहूर्त" ह्या सूर्योदयापूर्वींच्या ४ घटिका अथवा सूर्योदयापासून ५६ घटिका झाल्यावर दुसऱ्या दिवशीं सूर्योदय होईपर्यंतचा काल, यास पूर्वोक्त संज्ञा आहे.

३ पर्वतस्तनमण्डिते इति धर्माब्धिसारधृतः पाठः ॥

उठून, मातीनें व वेगळें घेतलेल्या उदकानें दुर्गंधी जाईल असें शौच करावें ( धुवावें ). आळस करूं नये," असें **याज्ञवल्क्यानें** ह्मटलें आहे. ह्मणून उक्तविधीनें शौच करावें. केवळ मूत्रविसर्जन केल्यास शौचाविषयीं **शातातप** ह्मणतो कीं,—"एकवेळ लिंगास, ३ वेळ डाव्या हातास, २ वेळ दोनी हातांस मृत्तिका लावून धुवावे. रेत पतन झाल्यास याच्या दुप्पट शौच करावें." पुरीषविसर्जन केलें असतां तर दक्ष व यम ह्मणतात कीं,—" लिंगास २ वेळ गुदास ५ वेळ, डाव्या हस्तास १० वेळ, दोनी पायांस ७ । ७ वेळ मृत्तिका लावून प्रक्षालन करावें." **शंख** ह्मणतो कीं—"गुदास ७ वेळ, लिंगास २ वेळ डाव्या हातास २० वेळ, दोनी हातांस १४ वेळ, व ३ वेळ मृत्तिका लावून नखशोधन करावें, आणि ३ वेळ दोन्ही पायांस लावून प्रक्षालन करावें." **विष्णुपुराणांत**—" १ वेळ लिंगास, ३ वेळ गुदास, १० वेळ डाव्या हातास, दोनी हातांस ७ । ७ वेळ मृ० लावावी" असें सांगितलें आहे. येथें परस्पर भिन्न मतांचें एकीकरण करून, मळाचा कमी किंवा अधिकपणा पाहून, व घरीं किंवा प्रवासांत इत्यादि पाहून व्यवस्था करावी. मूत्रशौचास मृत्तिकेचें प्रमाण **दक्षानें** सांगितलें आहे. जसें—"लिंगास त्याच्या ३ वेळ पर्वापर्यंत लावण्यास पुरेल अशी घ्यावी." गुदास लावण्याविषयीं मृत्तिका किती घ्यावी तें **मनु** सांगतो,—"अर्धपसा प्रथम, २ व ३ री तदर्ध मृत्तिका घ्यावी." **आदित्यपुराणां**त—"स्त्रीशूद्रांनीं पूर्वोक्त शौचांतून अर्ध करावें असें धर्मज्ञांनीं सांगितलें आहे." उक्त शौचानें गंधी न गेल्यास–देवल ह्मणतो कीं,–दुर्गंधी जाण्याकरितां शौच करावें. "जोंपर्यंत दुर्गंधी आहे असें वाटेल तोंपर्यंत शौच करावें." **दक्ष** ह्मणतो कीं, "दिवसा जें उक्त आहे त्याच्या निमें रात्रीं, व तदर्ध आतुरानें आणि तदर्ध मार्गस्थानें शौच करावें." **पराशर** ह्मणतो—"जो बसून विष्ठामूत्रविसर्जन करण्यास जाणत नाहीं त्यानें आपल्यास ज्या वेळीं जितकें शौच सांगितलें असेल त्याचें अर्ध करावें. बालक व अनुपनीत यांनीं दुर्गंध व मल जाई तों शौच करावें." **ब्राह्मपुराणां**त—"जोंपर्यंत ब्राह्मणाचें उपनयन झालें नाहीं तोंपर्यंत त्यानें आणि शूद्र, व स्त्रिया यांनीं गंध, व मल दूर होईल असें शौच करावें. त्यास मातीचें प्रमाण, शौचाची संख्या, हीं शिष्टांनीं सांगितलीं नाहींत," असें सांगितलें आहे. ह्या वचनांत शूद्रांविषयीं पूर्वनियम नाहीं असें ह्मटलें आहे तें विवाहाच्या पूर्वी लागू आहे. तो झाल्यावर अथवा १२ किंवा १६ वर्षांनंतर त्यांस सर्व धर्म आवश्यक आहेत. तत्पूर्वी मात्र नाहींत हें पुढें सांगूं. भोजनकालीं गुदस्राव झाला असतां **बृहस्पति** ह्मणतो कीं,—"भोजन करणाऱ्या ब्राह्मणाचें गुद कदाचित् स्रवल्यास त्यानें प्रथम शौच करून मग आचमन करून त्या दिवशीं उपवास करून पंचगव्य प्राशन केल्यानें तो शुद्ध होतो; अर्थात् प्रथम हात धुवून नंतर शौच करून १६ चूळ भरल्यावर उपवास करावा असें सिद्ध होतें." ह्या वचनांत विप्राचें असें ह्मटलें आहे; तें केवळ उपलक्षण आहे. शूद्रानेंही असेंच करावें, हें अर्थात् सिद्ध होतें. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य शौचविधिः॥**

## ॥ अथाचमनम् ॥

**शुचौ देशे प्राङ्मुख उदङ्मुखो वोपविश्यांतर्जानुकरं गोकर्णाकृतिं कृत्वा तालुगाभिः**

**शुद्धाभिरद्भिः सकृदाचामेत् ॥ त्रिर्वेति स्मृतिकौमुद्याम् ॥ अंगुष्ठमात्रं स्पृशेदिति भट्टाः॥ ततोऽगुष्ठमूलेनौष्ठौ द्विरुन्मृज्यांगुष्ठतर्जनीभ्यां नासिकेंऽगुष्ठमध्यमाभ्यां चक्षुषी अंगुष्ठानामिकाभ्यां श्रोत्रेंऽगुष्ठकनिष्ठिकाभ्यां नाभिं पाणितलेन हृदयं सर्वैः शिरोंऽसौ च स्पृशेत् ॥**

यानंतर आचमनविधि सांगतोः—

शुद्ध प्रदेशांत पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख बसून, गुडघ्याच्या आंत हात घेऊन, गायीच्या कर्णासारखा हस्त करून, तालूपर्यंत पोंचणाऱ्या शुद्धोदकानें, एकवेळ आचमन करावें. "किंवा ३ वेळ करावें," असें **स्मृतिकौमुदीं**त सांगितलें आहे. "अंगुष्ठमात्र स्पर्श करावा," असें **भट्ट** ह्मणतात. नंतर अंगुष्ठमूलानें ओटांस २ वेळ उन्मार्जन करून, अंगुष्ठतर्जनींनीं २ नीं नाकपुड्यांस स्पर्श करून; अंगुष्ठमध्यमांनीं नेत्रांस, अंगुष्ठ व अनामिका यांनीं कर्णांस, अंगुष्ठकनिष्ठिकांनीं नाभीस; तळहातानें हृदयास, सर्व अंगुलींनीं मस्तक, व दोन स्कंधांस अनुक्रमें उजव्यापासून स्पर्श करावा. ॥ **इति आचमनविधिः॥**

## ॥ अथ दंतधावनम् ॥

**बदरोदुंबरापामार्गपनसकदंबाम्रजातीबिल्वप्रियंगुमयं कंटकिक्षीरवृक्षोत्थम् । द्वादशांगुलकं विप्रे काष्ठमाहुर्मनीषिणः ॥ क्षत्रविट्शूद्रजातीनां नवषट्चतुरंगुलमिति मदनपारिजाते विष्णूक्तम् । कनिष्ठाग्रस्थूलं पर्वार्द्धकृतकूर्चं दंतधावनं प्रक्षाल्य । आयुर्बलं यशो वर्चः प्रजाः पशुवसूनि च ॥ ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो धेहि वनस्पते ॥ १ ॥ इति मंत्रेण प्राङ्मुखो भक्षयित्वा दंतान् संशोध्य तथैव जिह्वोलेखं कृत्वा प्राच्यामुदीच्यां वा त्यक्त्वा षोडश द्वादश वा गंडूषान् कुर्यात् ॥ एतत्प्रतिपन्नवमीषष्ठमापौर्णमासीचतुर्दश्यष्टमीसंक्रमश्राद्धव्रतरविदिनेषु न कार्यम् ॥ तत्र द्वादश गंडूषाः । ततः केशप्रसाधनं कृत्वा स्नायात् ॥**

यानंतर दंतधावन सांगतोः—

बोर, उंबर, आघाडा, फणस, कळंब, आंबा, जाई, बेल व कांग या झाडांचें, किंवा ज्यास कांटें व चीक आहे अशा झाडांचें—"ब्राह्मणास १२, क्षत्रियांस ९, वैश्यांस ६, शूद्रांस ४ अंगुलें लांब काष्ठ असावें, असें **मदनपारिजातांत विष्णूनें** सांगितल्याप्रकारचें करंगळीच्या शेवटाएवढें मोठें काष्ठ घेऊन, त्याचें मोठें अग्र तासून तें धुवून,—

**"आयुर्बलं यशो वर्चः प्रजाः पशुवसूनि च । ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो धेहि वनस्पते." ॥ १ ॥** यानें पूर्वाभिमुख बसून तें चावून त्यानें दांत घांसून जिह्वेचें मूळ खर्डून तें काष्ठ पूर्वेस किंवा उत्तरेस टाकून, १६ किंवा १२ चूळ भरावे. हें प्रतिपदा, ६ । ९ । १५ । १४ । ८ मी संक्रांति, श्राद्धदिन, व्रतदिन, रविवार, या दिवशीं करूं नये. ह्या दिवसीं केवळ १२ चूळ भरून मुखशुद्धि करावी. नंतर, केश विंचरून स्नान करावें.

## ॥ अथ स्नानम् ॥

**छंदोगपरिशिष्टे ॥ यथाऽहनि तथा प्रातर्नित्यं स्नायादनातुरः ॥ दंतान्प्रक्षाल्य नद्यादौ**

गृहे चेत्तदमंत्रवत् ॥ १ ॥ स्मृतिकौमुद्यां, योगियाज्ञवल्क्यः ॥ मृत्तिलान् गोमयं दर्भान् पुष्पाणि सुरभीणि च ॥ आहरेत्स्नानकाले तु स्नानार्थं प्रयतः शुचिः ॥ १ ॥ गंगोदकांतं गत्वा तु संस्थाप्यैतत्पृथक् क्षितौ ॥ त्रिधा कृत्वा मृदं तां तु गोमयं च विचक्षणः ॥ २ ॥ अधमोत्तममध्यानामंगानां क्षालनं तु वै ॥ भागैः पृथक् पृथक्कुर्यात्क्षालने मृदसंकरः ॥ ३ ॥ अद्भिर्मृद्भिश्च चरणौ प्रक्षाल्याचम्य वै शुचिः ॥ अद्भिर्मृद्भिश्च गात्राणि क्रमशस्त्ववनेजयेत् ॥ ४ ॥ एकया शिरः प्रक्षाल्य द्वाभ्यां नाभेस्तथोपरि ॥ कटिबस्त्यूरुजंघे च चरणौ च त्रिभिस्त्रिभिः ॥ ५ ॥ प्रक्षाल्य हस्तावाचम्य नमस्कृत्य जलं तु तत् ॥ यत्किंचेदं तु मंत्रेण नमस्येत्प्रयतांजलिः ॥ ६ ॥ ततः कातीयविधिना स्नानमुक्त्वाह ॥ ब्रह्मक्षत्रविशां त्वेवं मंत्रवत्स्नानमिष्यते ॥ तूष्णीमेव तु शूद्रस्य सनमस्कारकं मतम् ॥ ७ ॥ तेन शूद्राणां कातीयएवामंत्रस्नानविधिः ॥ मैथिलश्रीदत्तेन तु पाद्मोक्तं स्नानं सर्ववर्णसाधारणमुक्तम् ॥ यथा अनुद्धृतैरुद्धृतैर्वा जलैः स्नानं समाचरेत् ॥ तीर्थं प्रकल्पयेद्विद्वान् मूलमंत्रेण मंत्रवित् ॥ १ ॥ नमोनारायणायेति मूलमंत्र उदाहृतः ॥ दर्भपाणिस्तु विधिना ह्याचांतः प्रयतः शुचिः ॥ २ ॥ चतुर्हस्तसमायुक्तं चतुरस्रं समं ततः ॥ प्रकल्प्यावाहयेद्गंगामेभिर्मंत्रैर्विचक्षणः ॥ ३ ॥ विष्णोः पादप्रसूतासि वैष्णवी विष्णुपूजिता ॥ पाहि नस्त्वेनसस्तस्मादाजन्ममरणांतिकात् ॥ ४ ॥ तिस्रः कोट्योऽर्धकोटी च तीर्थानां वायुरब्रवीत्[1] ॥ दिवि भुव्यंतरिक्षे च तानि ते संति जाह्नवि ॥ ५ ॥ नंदिनीत्येव ते नाम देवेषु नलिनीति च ॥ वृंदा पृथ्वी च सुभगा विश्वकाया शिवा सिता ॥ ६ ॥ विद्याधरी सुप्रसन्ना तथा लोकप्रसादिनी ॥ वेण्या च जाह्नवी चैव शांता शांतिप्रदायिनी ॥ एतानि पुण्यनामानि स्नानकाले प्रकीर्तयेत् ॥ भवेत्सन्निहिता तत्र गंगा त्रिपथगामिनी ॥ ८ ॥ विप्रेण वाऽयं पठनीयः ॥ सप्तवाराभिजप्तेन करसंपुटयोजितम् ॥ प्रागुक्तमूलमंत्रेणेत्यर्थः ॥ मूर्ध्नि कुर्याज्जलं भूयस्त्रिचतुः पंच सप्त वा ॥ ९ ॥ स्नानं कुर्यान्मृदा पश्चादामंत्र्य च विधानतः ॥ अश्वक्रांते रथक्रांते विष्णुक्रांते वसुंधरे ॥ १० ॥ शिरसा धारयिष्यामि रक्षस्व मां पदे पदे ॥ उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ॥ ११ ॥ मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतम् ॥ नमस्ते सर्वलोकानां प्रभवारणि सुव्रते ॥ १२ ॥ इति ॥ एतत्पूर्वोक्तवचने शूद्रस्य विशेषोक्तेरत्र तदभावात् पुराणमंत्रपाठे शूद्रस्यानधिकाराच्च चिंत्यम् ॥ सत्वेऽपि सर्वेषां पूर्वोक्तेनास्य समुच्चय इति तत्त्वम् ॥ नृसिंहपुराणे ॥ नद्यां स्रवःसु च स्नायात् प्रतिस्रोतःस्थितो द्विजः ॥ तडागादिषु तोयेषु प्रत्यर्कं स्नानमाचरेत् ॥ १ ॥ कातीयानां नद्यामपि सूर्यमुखस्य स्नानम् ॥ तत्रैव ब्रह्मांडपुराणे ॥ ऊर्ध्वपुंड्रं द्विजः कुर्यात्क्षत्रियस्तु त्रिपुंड्रकम् ॥ अर्धचंद्रं तु वैश्यस्य वर्त्तुलं शूद्रजातिषु ॥ १ ॥ इत्युक्तम् ॥ ललाटशिरःकंठबाहुहृदयनाभिपृष्टपार्श्वद्वयेषु तिलकं कृत्वा कुशासनोपविष्टः नमोनमइति त्रिर्जपेत् ॥

**छंदोगपरिशिष्टांत**-"निरोगी मनुष्यानें प्रतिदिनीं प्रातःकाळीं स्नान करावें. तें दंतधावनानंतर नदीवर समंत्रक, व घरीं केल्यास अमंत्रक करावें," असें सांगितलें आहे.

---

१ यानि तीर्थानि सन्ति वै इत्यपि पठ्यते.

**स्मृतिकौमुदींत** याविषयीं **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो कीं—"माती, तीळ, गोमय, दर्भ, व सुगंधिपुष्पें हीं स्नानाच्या पूर्वीं आणावीं. स्नानार्थ प्रतिदिवशीं गंगेच्या ( सन्निहित नदीच्या ) उदकासमीप जाऊन, तीं ( मृत्तिकादिक ) निरनिराळीं ठेवून, माती व गोमय यांचे ३।३ विभाग करून अधम, मध्यम, उत्तम अंगांचें त्या भागांनीं निरनिराळें क्षालन करावें. त्या वेळीं माती एकमेकांत मिसळूं नये. पाणी व मृत्तिका यांनीं पाय धुवून, आचमन करून, शुद्ध झाल्यावर त्यांनींच अनुक्रमें सर्वांगें धुवावीं. तीं अशीं कीं एक भागानें मस्तक धुवून, नाभीवरील अवयव २ वेळ धुवून कंबरेपासून पायांपर्यंत ३।३ वेळ प्रक्षालन करून, हात धुवून, आचमन करून त्या उदकास—"**यत्किंचेदं०**" या मंत्रानें हातांचा अंजली करून नमस्कार करावा. नंतर **कातीयविधीनें** स्नान सांगून, पुढें ह्मणतो कीं,—"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांस असें समंत्रक स्नान योग्य, व शूद्रांस तूष्णीं किंवा नमस्कारमंत्रयुक्त योग्य आहे." यावरून शूद्रांस कातीयांचा अमंत्रकस्नानविधि योग्य आहे असें होतें. **मैथिलश्रीदत्तानें** "**पद्मपुराणोक्त** स्नान सर्ववर्णांस समान आहे" असें सांगितलें आहे. जसें—वर काढलेल्या किंवा न काढलेल्या उदकानें स्नान करावें. झाल्यानें त्या उदकांत मूलमंत्रानें तीर्थकल्पना करावी. मूलमंत्र—"**नमो नारायणाय**" हा होय. हातांत दर्भ घेऊन यथाविधि आचमन करून; ४ हात लांबीरुंदीचें मंडल कल्पून तेथें पुढील मंत्रांनीं गंगेचें आवाहन करावें "**विष्णोः पादप्रसूतासि वैष्णवी विष्णुपूजिता**" ॥ इत्यादि ५ मंत्र ह्मणावे किंवा ब्राह्मणाकरवीं ह्मणवावे. पूर्वोक्त मूलमंत्र सात वेळ जपून अभिमंत्रित करसंपुटोदकानें ३ । ४ । ५ । किंवा ७ वेळ मस्तकीं मार्जन करावें. नंतर मृत्तिका उदक यथाविधि **अश्वक्रांते रथक्रांते विष्णुक्रांते वसुंधरे ॥ शिरसा धारयिष्यामि रक्षस्व मां पदे पदे ॥ १ ॥ उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ॥ मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतं ॥ नमस्ते सर्वलोकाना प्रभवारणि सुव्रते ॥ २ ॥**" यांनीं अभिमंत्रून स्नान करावें. पूर्वोक्त **योगयाज्ञवल्क्य**वचनांत शूद्रास विशेष सांगितला असून येथें त्याचा अभाव असल्यावरून, व पौराण मंत्रपाठाविषयीं शूद्राचा अधिकार नसल्यामुळें हें मत विचारार्ह आहे. कदाचित् योग्य असल्यास पूर्वोक्त वचनाशीं या सर्व वचनांचा समुच्चय होतो हें यांतील तत्त्व होय. **नृसिंहपुराणांत**—"नदींत व ओझरांत त्याच्या अभिमुख असून, व तळीं, सरोवरें इत्यादिकांत सूर्याभिमुख राहून स्नान करावें." **कात्यायनशाखीयांस** नदीवरही सूर्याभिमुखच स्नान उक्त आहे. नंतर ( पृ० ५१ ) सांगितलेल्या विधीनें कपाळ, मस्तक, गळा, बाहू, हृदय, नाभि, पाठ, व कुक्षी यांवर तिलक लावून, दर्भासनावर बसून, "नमः" या मंत्राचा ३ वेळ जप करावा.

## ॥ अथ तर्पणम् ॥

**व्यासः ॥ एकैकमंजलिं देवा द्वौ द्वौ तु सनकादयः ॥ अर्हंति पितरस्त्रींस्त्रीन् स्त्रियस्त्वेकैकमञ्जलिम् ॥ १ ॥ मातृवर्गेऽञ्जलित्रयमेकैकस्य ॥ विष्णुपुराणे तु ॥ त्रिरपः प्रीणनार्थाय देवानामपि निर्वपेदिति दैवे त्रय उक्ताः ॥ पाद्मे ॥ देवान् ब्रह्मऋषीन् सर्वांस्तर्पयेता-**

क्षतोदकैः ॥ संतर्पयेत्, पितॄन् भक्त्या सतिलोदकचंदनैः ॥ १ ॥ शंखः ॥ सौवर्णेन राजतेनौदुंबरेण शृंगपात्रेण कुशेन वाप्युदकं पितृतीर्थं स्पृशन् दद्यात् ॥ योगयाज्ञवल्क्यः ॥ तिलानामप्यलाभे तु सुवर्णरजतान्वितम् ॥ तदभावे निषिंचेत्तु दर्भैर्मंत्रेण वाप्यथ ॥ १ ॥ तृप्यत्विति समुच्चार्य तृप्यतामित्यथापि वा ॥ विधिज्ञो निक्षिपेत्तोयं देवादीनामशेषतः ॥ २ ॥ सव्यं जान्वाच्य च ततः सतिलं दक्षिणामुख इति तेनैवोक्तेर्देवर्ष्योर्दक्षिणजानुपातः सिद्धः ॥ यमः ॥ द्वौ हस्तौ युग्मतः[२] कृत्वा पूरयेदुदकांजलिम् ॥ गोशृंगमात्रमुद्धृत्य जलमध्ये जलं क्षिपेत् [ य० स्मृ० श्लो० ९१ ] ॥ दक्षः ॥ अग्रैस्तु तर्पयेद्देवान्मनुष्यान्कुशमध्यतः ॥ पितॄंस्तु कुशमूलाग्रैर्विधिः कौशो यथाक्रमम् ॥ १ ॥ योगयाज्ञवल्क्यः ॥ ब्रह्माणं तर्पयेत्पूर्वं विष्णुं रुद्रं प्रजापतिम् ॥ देवान् छंदांसि वेदांश्च ऋषींश्चैव सनातनान् ॥ १ ॥ आचार्यांश्चैव गंधर्वानाचार्यतनयांस्तथा ॥ संवत्सरं सावयवं देवीश्चाप्सरसस्तथा ॥ २ ॥ तथा देवानुगान्नागान्सागरान् पर्वतानपि ॥ सरितोऽथ मनुष्यांश्च यक्षान् रक्षांसि चैव हि ॥ ३ ॥ पिशाचांश्च सुपर्णांश्च भूतान्यथ पशूंस्तथा ॥ वनस्पतीनोषधींश्च भूतग्रामं चतुर्विधम् ॥ ४ ॥ विष्णुः ॥ ततः कृत्वा निवीतं तु यज्ञसूत्रमतंद्रितः ॥ प्राजापत्येन तीर्थेन मनुष्यांस्तर्पयेत्पृथक् ॥ १ ॥ कार्ष्णाजिनिः ॥ सनकश्च सनंदश्च तृतीयश्च सनातनः ॥ कपिलश्चासुरिश्चैव वोढुः पंचशिखस्तथा ॥ १ ॥ पाद्मेऽस्यानंतरम् ॥ मरीचिरत्र्यंगिरसौ पुलस्त्यं पुलहं क्रतुम् ॥ प्राचेतसं वसिष्ठं च भृगुं नारदमेव च ॥ १ ॥ योगयाज्ञवल्क्यः ॥ अपसव्यं ततः कृत्वा भूत्वा च पितृदिङ्मुखः ॥ पितॄन् दिव्यानदिव्यांश्च पितृतीर्थेन तर्पयेत् ॥ १ ॥ दिव्या धरो ध्रुव इत्यादयोऽष्टौ वसवः । अजैकपादादयो रुद्राः । इंद्रधात्रादय आदित्याश्च ॥ प्रत्येकं समुदिता वा ॥ स एव ॥ कव्यवालं नलं सोमं यममर्यमणं तथा ॥ अग्निष्वात्ताः सोमपाश्च तथा बर्हिषदोऽपि च ॥ १ ॥ यदि स्याज्जीवत्पितृक एतान्विद्यात्तदा पितॄन् ॥ तर्पणे यद्यप्यनेके प्रकाराः स्मृतिकौमुद्यां पाद्मादावुक्तास्तथापि कात्यायनसूत्रसंवादात् शूद्रा वाजसनेयिन इति गौडोक्तदक्षसंवादात्स्नानादौ दर्शनाच्च योगयाज्ञवल्क्योक्त एवायं प्रकारः शूद्राणामिति तत्त्वम् ॥ एवं वैश्वदेवाद्यपि कातीयमेव ॥

यानंतर तर्पण सांगतो.

तर्पण करावें त्याविषयीं **व्यास** ह्मणतो कीं,—"देवांस १ । १, सनकादिकांस २ । २, व पितरांस ३ । ३, आणि स्त्रियांस १ । १ अंजली द्यावा." यावरून मातृवर्गांत एकेकास ३ । ३ अंजली द्यावे असें सिद्ध होतें. **विष्णुपुराणांत**—"ते संतुष्ट होण्याकरितां देवांसही ३ । ३ अंजली द्यावे." असें देवांस ३ । ३ अंजली देण्यास सांगितलें आहे. **पद्मपुराणां**त—"देव, व ब्रह्मऋषि या सर्वांचें साक्षत उदकानें, व पितरांचें तीळ,

---

१ नाभिमात्रे जले स्थित्वा हृदयेनाभिचिंतयेत् ॥ आगच्छन्तु मे पितरः गृह्णन्त्वेतान् जलाञ्जलीन् ॥ ९० ॥ पुस्तकान्तरेऽयमंशोऽधिको दृश्यते ॥

२ हस्तौ कृत्वा तु संयुक्तौ पूरयित्वा जलेन चेति पाठान्तरम् ॥

चंदन यांहीं मिश्र उदकानें तर्पण करावें," असें सांगितलें आहे. • **शंख** ह्मणतो—"सोन्याचें, रुप्याचें, किंवा उमराचें, किंवा शिंगाचें पात्र घेऊन, किंवा केवळ दर्भानें पितृतीर्थानें उदक द्यावें." **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो कीं,—"तीळ न मिळाल्यास सोनें, व रुपें यांनीं युक्त उदक ध्यावें. त्यांच्याही अभावीं केवळ दर्भानीं, आणि तेही न मिळतील तर केवळ मंत्रांनीं तृप्यतु अ० तृप्यतां असें ह्मणून विधिज्ञानें देव ऋषि इत्यादिकांस तर्पण करावें. "नंतर डावा गुडघा टेकून दक्षिणाभिमुख होऊन, पितरांस तर्पण करावें," असें त्यानेंच सांगितलें आहे. यावरून देव व ऋषि यांस उजवा गुडघा टेकून हातानें तर्पण करावें असें अर्थात् सिद्ध होतें. **यम** ह्मणतो कीं,—"दोनी हात जोडून ( ओंजळ करून ) उदकानें ती ओंजळ भरून त्यांतलें पाणी गायीच्या शिंगाइतकें वर उडवून उदकांत सोडावें." **दक्ष** ह्मणतो कीं,—"देवांस दर्भांच्या अग्रांनीं, ऋष्यादिकांस त्यांच्या मध्यांनीं, आणि पितरांस त्यांचीं मूलें व अग्रें यांनीं तर्पण करावें." **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो—"प्रथम ब्रह्मा, नंतर विष्णु, रुद्र, प्रजापति, देव, छंद, वेद, ऋषि, आचार्य, गंधर्व, आचार्यांचे तनय, संवत्सर, त्यांचे अवयव ( ह्मणजे अयन, ऋतु, मास, पक्ष, दिवस इत्यादि ), देवी, अप्सरा, देवानुग ह्मणजे—गंधर्व, यक्ष व किन्नरादिक, नाग, सागर, पर्वत, नद्या, मनुष्य, यक्ष, राक्षस, पिशाच, सुपर्ण, भूतें, पशु, वनस्पति, ओषधी, स्थावरजंगमात्मक चतुर्विध भूतग्राम, ह्मणजे—जारज, स्वेदज, अंडज, उद्भिज्ज जीवांचा समुदाय; यांस तर्पण करावें," असें सांगितलें आहे. **विष्णु** ह्मणतो—"याप्रमाणें तर्पण झाल्यानंतर यज्ञोपवीत निवीत करून प्राजापत्यतीर्थानें निरनिराळें मनुष्यतर्पण करावें." **कार्ष्णाजिनि** ह्मणतो कीं,—"सनक, सनंदन, सनातन, कपिल, आसुरी, वोढु, व पंचशिख यांस तर्पण करावें." यापुढील तर्पण **पद्मपुराणां**त सांगितलें आहे. जसें—"मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु, प्राचेतस वाल्मीकि ) वसिष्ठ, भृगु, व नारद यांस तर्पण करावें. **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो—"असें ऋषितर्पण झाल्यावर अपसव्य करून, दक्षिणाभिमुख होऊन दिव्य ह्मणजे—धर ध्रुव इत्यादि ८ वसु, अजैकपात् इत्यादि ११ **रुद्र,** इंद्र धाता इत्यादि १२ आदित्य ज्यांस किंवा प्रत्येकास सांगितले असतील ते. अदिव्य ह्मणजे बाप, आजा इत्यादिक पितरांस पितृतीर्थानें तर्पण करावें. या प्रत्येकाचें तर्पण करावें. आणखी तोच **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो कीं,—"कव्यवाह( ल ), नल, सोम, यम, अर्यमा, अग्निष्वात्त, सोमप, बर्हिषद इत्यादि; व पितृगणांस तर्पण करावें. जर जीवत्पितृक असेल तर, यांसच पितर जाणून तर्पण करावें." यद्यपि **स्मृतिकौमुदीं**त व **पद्मपुराणा**दिकांत तर्पणाचे अनेक प्रकार सांगितले आहेत, तथापि **कात्यायनसूत्र** संवादास्तव ह्मणजे—हा प्रकार त्याशीं मिळतो या हेतूस्तव, व शूद्र वाजसनेय, असें **गौडां**नीं उक्त दक्षवचनसंवादास्तव व स्नानादिकांत तोच प्रकार दृष्टीस पडतो, या हेतूस्तव **योगयाज्ञवल्क्या**नें सांगितलेला हाच प्रकार शूद्रांस योग्य आहे. हें यांतील तत्त्व होय. अशींच वैश्वदेवादिक कर्मेंही कातीयानुसार जाणावीं.

---

१ ह्याविषयीं पृष्ठ ८२ टी० १ पहावी.

## ॥ अथ प्रयोगः ॥

यथा मृद्गोमयकुशतिलपुष्पाक्षतानादाय नद्यादौ गत्वा पाणिपादं प्रक्षाल्यानामिकाभ्यामेककुशपत्रात्मके पवित्रे धृत्वा कुशोपग्रहः । ऊर्ध्वकेशि विरूपाक्षि मांसशोणितभोजने ॥ तिष्ठ देवि शिखाबद्धे[1] चामुंडे ह्यपराजिते ॥ १ ॥ इत्युक्त्वा शिखां बध्वा आचम्य देशकालौ स्मृत्वा । मम सर्वपापक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःस्नानमहं करिष्ये ॥ तीर्थेतु । सागरस्वननिर्घोष दंडहस्तासुरांतक ॥ जगत्स्रष्टा जगन्मर्दी नमामि त्वां सुरेश्वर ॥ १ ॥ तीक्ष्णदंष्ट्र महाकाय कल्पांतदहनोपम ॥ भैरवाय नमस्तुभ्यमनुज्ञां दातुमर्हसीति संप्रार्थ्य ॥ वरुणाय नमः । इति जलमालभ्य तेनैवावर्त्य नमोऽद्भ्यो मम पापं यात्वित्यञ्जलिं बहिः क्षिप्त्वाऽमुकतीर्थाय नम इत्यञ्जलिं दत्वा मृदमादाय कटिं बस्त्यूरुजंघापादकरान् त्रिर्विलिप्य प्रक्षाल्यैकं जले परं स्थले पादं कृत्वा । विष्णवे नम इति सर्वांगं मृदा लिप्त्वा सूर्याभिमुखो द्विस्त्रिर्द्वादश वा निमज्याद्भ्यो नम इत्युन्मृज्य निमज्योन्मज्याचम्य तथैव रुद्राय नम इति गोमयेनालिप्य स्नात्वाचम्य कुशैर्मार्जयेत् ॥ वरुणाय नम इत्यष्टवारं । परमात्मने नमः । अग्नये नमः । वायवे नमः। सूर्याय नमः । सवित्रे नमः । यज्ञाय नम इति ॥ निमज्याद्भ्यो नम इति द्वाविंशतिवारम् ॥ यद्वाग्नये नम इति त्रिर्जातवेदसे सवित्रे चित्यादिभ्यो नम इति ॥ सवित्रे इत्येतैः नाभित आनाभिदर्भैः पावयित्वा परमात्मने नम इति सवित्रे नमइत्यंतैः पुनः पावयित्वा । नमइति त्रिःपरमात्मने नमइति वा अघमर्षणं कृत्वा स्नात्वा विष्णवे नमइति स्मृत्वा । ब्रह्मादिदेवास्तृप्यंतां नमइति वा देवतीर्थेन त्रिः सव्येन देवान् । निवीती कृष्णद्वैपायनादिऋषयस्तृप्यंतामिति द्वौ द्वावित्यृपीनपसव्येन सोमपितृमदादिपितरस्तृप्यंतामित्यञ्जलित्रयं त्रिर्दत्वा । धौते वाससी परिधाय । मृदूरू करौ प्रक्षाल्याचम्य वेणुपत्राकारमर्धचंद्रवर्तुलं वा तिलकं कृत्वा मुद्रादि कृत्वा धृत्वा वा । नमो ब्रह्मणे विष्णवे सवित्रे मित्राय वरुणाय दिग्भ्यो दिग्देवताभ्य इति प्रत्येकं जलपुष्पांजलिरित्याचार्यचूडामणिः ॥ तत उदितं सूर्यं रक्तचंदनाक्षतपुष्पैरष्टदलेभ्यर्च्य तद्युक्तमर्घ्यं । नमो विवस्वते तुभ्यं भास्वते विष्णुतेजसे ॥ नमः सवित्रे शुचये सवित्रे कर्मदायिने ॥ १ ॥ इत्यर्घं दद्यादिति कल्पतरौ ॥ ततः सूर्यमंडलस्थाय परमात्मने नमइति पुनरर्घ्यं दत्वा ब्रह्मविष्णुरुद्रेभ्यो नम इति वा । विष्णुशिवनामादि वा यथाशक्त्यावर्त्य । नमः सवित्रे जगदेकचक्षुषे जगत्प्रसूतिस्थितिनाशहेतवे ॥ त्रयीमयाय त्रिगुणात्मधारिणे[2] विरिंचिनारायणशंकरात्मने । नम इति नमस्कुर्यात् ॥ एवं स्नानं प्रातर्मध्याह्ने च कार्यम् ॥ अशक्तौ मध्याह्न एव ॥ गृहे उष्णोदकेन स्नानेऽप्येवम् ॥ आतुरादीनां स्नानाशक्तौ दर्भैर्मार्जनं भस्मस्नानं गोरजसा वाऽऽर्द्रवस्त्रेणांगमार्जनं कार्यम् ॥ जाबालिः ॥ अशिरस्कं भवेत्स्नानं स्नानाशक्तौ तु कर्मिणाम् ॥ आर्द्रेण वाससा वापि मार्जनं दैहिकं विदुः ॥ १ ॥ विद्वत्सरस्वतीप्राप्तं स्नानं सारस्वतं विदुः ॥ विप्रवाक्येनेत्यर्थः ॥ मार्जनं मानसं वा स्नानं कार्यम् ॥ यथा ॥

---

१ शिखाबन्धे इत्यपि पाठः ॥ २ त्रिगुणात्मकायेति पाठान्तरम् ॥

ध्यायेदादित्यसंकाशं वासुदेवं चतुर्भुजम् ॥ शंखचक्रगदापद्मवनमालाविराजितम् ॥ १ ॥ तत्पादोदकजां धारां निपतंतीं स्वमूर्द्धनि ॥ चिंतयेद्ब्रह्मरंध्रेण प्रविशंतीं स्वकां तनुम् ॥ २ ॥ तया संक्षालयेत्सर्वमंतर्देहगतं मलम् ॥ तथा ॥ अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यः स्मरेत्पुंडरीकाक्षं सबाह्याभ्यंतरः शुचिरिति ॥ ततः कांस्यपात्रे आज्ये प्रतिबिंबमवलोक्य । आज्यं तेजःसमुद्दिष्टमाज्यं पापहरं स्मृतम् ॥ आज्यं सुराणामाहार आज्ये लोकाः प्रतिष्ठिताः ॥ १ ॥ कामधेनुषु संभूतं[1] सर्वक्रतुषु संस्थितम् ॥ देवानामाज्यमाहारमतः शांतिं प्रयच्छ मे ॥ २ ॥ इति विप्राय दत्त्वा दक्षिणां दद्यात् ॥ एतद्विष्णुधर्मोत्तरे स्पष्टम् ॥

आतां स्नानाचा प्रयोग सांगतो.

तो असा कीं,—माती, शेण, दर्भ, तीळ, फुलें, आणि अक्षता घेऊन, नद्यादिकांवर जाऊन, हातपाय धुवून, डाव्या व उजव्या अनामिकेंत एकेक दर्भाचें पवित्र धारण करून, दर्भांवर बसून,—"**ऊर्ध्वकेशि विरूपाक्षि मांसशोणितभक्षणे ॥ तिष्ठ देवि शिखाबद्धे चामुंडे ह्यपराजिते**" ॥ १ ॥ असें ह्मणून शेंडी बांधून, आचमन व देशकालादि स्मरण करून,—"**मम सर्वपापक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःस्नानमहं करिष्ये**" । असा संकल्प करावा. तीर्थावर स्नान कर्तव्य असल्यास—"**सागरस्वननिर्घोष दंडहस्तासुरांतक ॥ जगत्स्रष्टा जगन्मर्दी नमामि त्वां सुरेश्वर ॥ १ ॥ तीक्ष्णदंष्ट्र महाकाय कल्पांतदहनोपम ॥ भैरवाय नमस्तुभ्यमनुज्ञां दातुमर्हसि**" ॥ २ ॥ यांनीं प्रार्थून,—"**वरुणाय नमः**" ह्म० उदक स्पर्श करून, **वरुणाय नमोऽद्भ्यो मम पापं यातु** ह्मणून उदकांजली बाहेर टाकून, "**अमुकतीर्थाय** ( येथें तीर्थाचें नांव घ्यावें ) **नमः**" ह्मणजे अंजली देऊन, मातीनें कंबर, बस्ती, मांड्या, गुडघे, पाय, हात यांस ३ वेळ लेपवून, धुवून १ उदकांत व २ रा स्थलांत पाय ठेवून,—**विष्णवे नमः**" ह्मणून सर्वांगास माती लावून सूर्याभिमुख २।३।१० वेळ बुड्या मारून, "**अद्भ्यो नमः**" ह्म० आंग घांसून, पुनः बुड्या मारून, आचमन करून, पुनः—"**रुद्राय नमः**" ह्मणून मातीसारखें शेण लावून, स्नान करून, आचमन करून दर्भांनीं मार्जन करावें. तें असें कीं,—"**अग्नये नमः**" यानें ८ वेळ **वरुणाय परमात्मने नमः । अग्नये नमः । वायवे नमः । सूर्याय नमः । सवित्रे नमः । यज्ञाय नमः ।** यांनीं मार्जन करून, बुडी मारून, "**अद्भ्यो नमः**" यानें २।२ वेळ मार्जन करावें. अथवा **अग्नये नमः** ह्मणून ३ वेळ, **जातवेदसे नमः । सवित्रे नमः । चित्यादिभ्यो नमः । सवित्रे नमः**" या मंत्रांनीं नाभिपर्यंत दर्भांनीं पवित्र करून, "**परमात्मने नमः**" यापासून,—"**सवित्रे नमः**" पर्यंत पुनः पावन करून "**नमः**" यानें किंवा "**परमात्मने नमः**" असें ३ तीन वेळ ह्मणून अघमर्षण करून, स्नान करून, "**विष्णवे नमः**" असें विष्णूला स्मरून,—**ब्रह्मादिदेवास्तृप्यंतां नमः ।** यांनीं देवतीर्थानें सव्यानें ३ वेळ देवांस, व निवीती

---

१ कामधेनुसमुद्भूतमिति, पाठः ॥

करून, **कृष्णद्वैपायनादिऋषयस्तृप्यंतां नमः** । ह्म० २ । २ वेळ ऋषींस, आणि अपसव्यानें—**सोमपितृमदादिपितरस्तृप्यंतां नमः** ह्मणून ३ अंजली ३ । ३ वेळ देऊन, धौतवस्त्रें २ परिधान करून, मृत्तिकेनें मांड्या हात क्षालन करून, आचमन करून, वेळवाच्या पानासारखा, किंवा अर्धचंद्राकार, किंवा वर्तुळ तिलक करून, मुद्रा करून किंवा धारण करून,—"**नमो ब्रह्मणे विष्णवे सवित्रे मित्राय वरुणाय दिग्देवताभ्यः**" ह्मणून प्रत्येकास उदकयुक्त पुष्पांजलि द्यावा, असें **आचार्यचूडामणि** ह्मणतो. नंतर उदय पावलेल्या सूर्यास रक्तचंदन, अक्षता, व पुष्पादिकांनीं अष्टदल कमलावर पूजन करून, चंदनाक्षतापुष्पयुक्त अर्घ्य द्यावें. त्याचा मंत्र—"**नमो विवस्वते तुभ्यं भास्वते विष्णुतेजसे ॥ नमः सवित्रे शुचये सवित्रे कर्मदायिने ॥ १ ॥** ह्मणून अर्घ्य द्यावें," असें **कल्पतरूं**त सांगितलें आहे. नंतर "**सूर्यमंडलस्थाय परमात्मने नमः**" ह्म० पुनः अर्घ्य देऊन, "**ब्रह्मविष्णुरुद्रेभ्यो नमः**" किंवा विष्णु व शिव या नांवांची आवृत्ति करून,—**नमः सवित्रे जगदेकचक्षुषे जगत्प्रसूतिस्थितिनाशहेतवे ॥ त्रयीमयाय त्रिगुणात्मधारिणे विरिंचिनारायणशंकरात्मने नमः ॥ १ ॥** ह्मणून नमस्कार करावा. असें सकाळीं, दुपारीं, व सायंकाळीं स्नान करावें अशक्तानें एकवेळ दुपारींच करावें घरांत उष्णोदक स्नान कर्तव्य असल्यासही असेंच करावें. आतुरादिकांस स्नानाविषयीं सामर्थ्य नसल्यास, त्यांनीं दर्भांनीं मार्जन, किंवा भस्मस्नान, अथवा गायीच्या धुळीनें किंवा आर्द्रवस्त्रानें आंग पुसावें **जाबालि** ह्मणतो कीं,—"संध्यादि कर्मकर्त्यांस सामर्थ्य नसेल तर त्यांनीं खांद्यावरून स्नान करावें किंवा ओल्या वस्त्रानें आंग पुसावें, किंवा मंत्रस्नान करावें, किंवा विद्वान् ब्राह्मणाच्या वचनानें होणारें असें सारस्वत[1] स्नान करावें." अथवा मार्जन किंवा मानसस्नान करावें. तें करण्याचा प्रकार असा कीं,—"आपलें अंतःकरण शुद्ध, व स्वस्थ करून हृदयकमलांत सूर्यासारखा प्रकाशमान शंख, चक्र, गदा, पद्म, आणि वनमाला यांनीं सुशोभित अशा चतुर्भुज वासुदेवाचें ध्यान करावें. आणि त्याच्या पायांपासून गंगोदकाची धारा आपल्या मस्तकावर पडत असून, ती ब्रह्मरंध्रानें आपल्या देहांत प्रवेश करीत आहे असें ध्यान करून, त्या उदकधारेनें देहाच्या आंतला मल धुवून टाकावा." हें नाहीं झालें तर "**ध्यायेदादित्यसंकाशं वासुदेवं चतुर्भुजम् ॥ शंखचक्रगदापद्मवनमालाविराजितम् ॥ १ ॥ तत्पादोदकजां धारां निपतंतीं स्वमूर्धनि ॥ चिंतयेद्ब्रह्मरंध्रेण प्रविशंतीं स्वकां तनुं ॥ २ ॥ तया संक्षालयेत्सर्वमंतर्देहगतं मलम्**" याचा पाठ करावा. तसेंच "**अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यः स्मरेत्पुंडरीकाक्षं स बाह्याभ्यंतरः शुचिः**" ॥ १ ॥ यांत सांगितल्याप्रमाणें विष्णुध्यान करावें. नाहीं तर, याचें पठण तरी करावें. ह्मणजे मानसस्नान होतें. असें स्नान झाल्यावर कांस्यपात्रांत तूप घालून त्यांत आपलें प्रतिबिंब पाहून,—"**आज्यं तेजः समुद्दिष्टमाज्यं पापहरं स्मृतं ॥**

१ सरस्वती ह्म० वाणी, अर्थात् ब्राह्मणवाणीनें होतें ह्मणून याला सारस्वत ह्मटलें आहे.

**आज्यं सुराणामाहार आज्ये लोकाः प्रतिष्ठिताः ॥ १ ॥ कामधेनुषु संभूतं सर्वक्रतुषु संस्थितं ॥ देवानामाज्यमाहारमतः शांतिं प्रयच्छ मे"** यांनीं तें ब्राह्मणास देऊन दक्षिणा द्यावी. हें आज्यदान **विष्णुधर्मोत्तरां**त स्पष्ट सांगितलें आहे. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य प्रातःकृत्यं समाप्तम् ॥**

ततो मध्याह्ने पूर्ववत् स्नात्वा ब्रह्मयज्ञं कुर्यात् ॥ तत्र यद्ब्राह्मणानितिहासान्पुराणानि कल्पानिति श्रुतेर्वेदाथर्वपुराणानि सेतिहासानि शक्तितः ॥ जपयज्ञप्रसिद्ध्यर्थं विद्यां चाध्यात्मिकीं जपेत् [ या० स्मृति अ० १ श्लो० १०१ ] ॥ इति याज्ञवल्क्योक्तेश्च पुराणभारतादिपाठविधानेऽपि शूद्रस्य पाठाप्रसक्तेः श्रवणस्यैव कर्मांगत्वात्पुराणश्रवणमेव ब्रह्मयज्ञ इति केचित् ॥ तन्न ॥ नमस्कारेण मंत्रेण पंचयज्ञान्न हापयेदिति याज्ञवल्क्योक्तेः नमस्कारेण तस्य बाधात् ॥ तत्र यो नमसा स्वध्वरइति श्रुतेर्यज्ञो वै नम इति हि ब्राह्मणं भवतीति वचनाच्च नमो नमो नमइति त्रिर्जपेदिति स्मृतिकौमुद्यामुक्तम् ॥ तत्त्वं तु वेदादीनामर्थबोधे स्वरूपस्यैव ग्रहणात् नमःश्रुतेश्च तदंतत्वेनाप्युपपत्तेर्नमोंतशब्दैः कार्यमिति ॥ तद्यथा दर्भासने उपविश्याचम्य परमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञं करिष्ये । इति संकल्प्योपस्थं कृत्वा दर्भगर्भं ब्रह्मांजलिं कृत्वा नमो नमो नम इति जपेत् ॥ यद्वा तत्र ऋग्वेदाय नमः ॥ एवं यजुर्वेदाय नमः । सामवेदाय नमः । अथर्ववेदाय नमः । शिक्षायै नमः । कल्पाय नमः । व्याकरणाय नमः । निरुक्ताय नमः । ज्योतिषाय नमः । छंदोविचित्यै नमः । अध्यात्मविद्यायै नमः । इतिहासपुराणेभ्यो नमः । तर्कविद्यायै नमः । पूर्वमीमांसायै नमः । उत्तरमीमांसायै नमइति जपित्वा । देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै स्वधायै नित्यमेव नमो नमइति त्रिर्जपित्वा विद्याधर[1] तपोयोनिरयोनिर्विष्णुरीडितः ॥ वाग्यज्ञेनार्चितो देवः प्रीयतां मे जनार्दनइत्युक्त्वा तदुदकं स्पृशेत् ॥

आतां ब्रह्मयज्ञविचार सांगतो.

मध्यान्हीं पूर्ववत् स्नान करून ब्रह्मयज्ञ करावा. "**ब्राह्मणें** ( ऐतरेयादिक ), **इतिहास** ( भारतादिक ), **पुराणें** ( मत्स्यादिक ), **कल्प** ( सूत्रादि ), पठण करावींत अशी श्रुति असून,—वेद, अथर्वण, पुराणें, इतिहास, व आध्यात्मिकी विद्या वगैरे ब्रह्मयज्ञसिध्यर्थ यथाशक्ति जपावीं," असें **याज्ञवल्क्या**नें सांगितलें ह्मणून पुराणभारतादि पाठाचें विधान असतांहि शूद्रास पाठप्रसक्ति नाहीं ह्मणून पुराणश्रवणच कर्मांगभूत असल्यावरून तेंच ब्रह्मयज्ञ होय, असें **कित्येक** ह्म० तें योग्य नाहीं. कारण "नमस्कारमंत्रानें पंचयज्ञ चुकवूं नयेत," अशी **याज्ञवल्क्याची** उक्ति आहे ह्मणून नमस्कारविधीनें त्याचा बाध होतो. तस्मात्—'**यो नमसा०**' या श्रुतीवरून, व '**यज्ञो वै नमः**' या ब्राह्मणवचनावरून, "नमो नमो नमः असें त्रिवार जपावें," असें **स्मृतिकौमुदीं**त सांगितलें आहे. यांतील तत्त्व तर वेदादिकांचा अर्थबोध झाला असतां स्वरूपाचेंच ग्रहण आहे; तस्मात् **नमः** हा श्रुतीच्या अंतीं आहे ह्मणून, नमोंतशब्दांनीं करावें असें

---

१ इति विद्यातपोयोनिरिति पाठान्तरम् ॥

आहे. प्रयोग सांगतो. दर्भासनावर बसून,—आचमन करून, **श्रीपरमेश्वर-प्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञं करिष्ये ।** असा संकल्प करून, मांडी घालून, डावा हात उताणा गुडघ्यावर ठेवून, त्यावर २ दर्भ व थोडेंसें पाणी घालून, तो उजव्या हातानें झांकून, "**नमो नमो नमः**" ह्मणून जप करावा. किंवा, तेथें **ऋग्वेदाय नमः । यजुर्वेदाय नमः । सामवेदाय नमः । अथर्ववेदाय नमः । शिक्षायै नमः । कल्पाय नमः । व्याकरणाय नमः । निरुक्ताय नमः । ज्योतिषाय नमः । छंदोविचित्यै नमः । अध्यात्मविद्यायै नमः । इतिहासपुराणेभ्यो नमः । तर्कविद्यायै नमः । पूर्वमीमांसायै नमः । उत्तरमीमांसायै नमः ।** असा जप करून,—"**देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै स्वधायै नित्यमेव नमो नमः**" ॥ १ ॥ याचा ३ वेळ जप करून,—"**विद्याधरतपोयोनिरयोनिर्विष्णुरीडितः ॥ वाग्यज्ञेनार्चितो देवः प्रीयतां मे जनार्दनः**" ॥ १ ॥ असें ह्मणून हातावरचें उदक डोळ्यांस लावावें.

## ॥ अथ तर्पणम् ॥

तच्च ब्रह्मणे नम इति नमोंतैर्मंत्रैः कार्यं । तस्य नमः शब्दोक्तेरिति केचित् । अन्ये तु तृप्यतामित्योंकारपूर्वमिति कातीयसूत्रस्य तृप्यतां शब्दस्य त्यागे मानाभावात्तदंतावित्याहुः । आसने दक्षिणं जान्वाच्य समदर्भाक्षतैर्हस्तद्वयेन देवतीर्थेन तर्पयेत् ॥ तच्च मदनपारिजाते योगियाज्ञवल्क्योक्तं कातीयसूत्रानुसारेणोच्यते ॥ यथा ब्रह्मा तृप्यताम् । विष्णुस्तृप्यताम् । रुद्रस्तृप्यताम् । प्रजापतिस्तृप्यताम् । देवाः तृप्यंताम् । छंदांसि तृप्यंताम् । वेदाः तृप्यंताम् । ऋषयः तृप्यंताम् । पुराणाचार्याः तृप्यंताम् । गंधर्वाः तृप्यंताम् । इतराचार्याः तृप्यंताम् । संवत्सरः तृप्यताम् । सावयवः तृप्यताम् । देव्यः तृप्यंताम् । अप्सरसः तृप्यंताम् । देवानुगाः तृप्यंताम् । नागाः तृप्यंताम् । सागराः तृप्यंताम् । पर्वताः तृप्यंताम् । सरितः तृप्यंताम् । मनुष्याः तृप्यंताम् । सागराः तृप्यंताम् । रक्षांसि तृप्यंताम् । पिशाचाः तृप्यंताम् । सुपर्णाः तृप्यंताम् । भूतानि तृप्यंताम् । पशवः तृप्यंताम् । वनस्पतयः तृप्यंताम् । औषधयः तृप्यंताम् । भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यताम् । आचार्यचूडामणौ तु प्रजापत्यंते देवायक्षास्तथा नागा गंधर्वाप्सरसोऽसुराः ॥ क्रूराः सर्पाः सुपर्णाश्च तरवो जंभकाः खगाः ॥ १ ॥ विद्याधरा जलधरास्तथैवाकाशगामिनः ॥ निराहाराश्च ये जीवाः पापे धर्मे रताश्च ये ॥ २ ॥ तेषामाप्यायनायैतद्दीयते सलिलं मयेति मात्स्योक्तं तर्पणमुक्तम् ॥

यानंतर तर्पण सांगतों.

तें,—"**ब्रह्मणे नमः ।** इत्यादि नमोंतमंत्रांनीं करावें, कारण शूद्रांस नमः शब्द सांगितला आहे ह्मणून," असें **कित्येक** ह्मणतात. इतर **ग्रंथकर्ते** तर—"तृप्यतां हें ओंकारपूर्वक असावें, असें **कातीयसूत्र** आहे. यांतील तृप्यतां या शब्दाचा त्याग करण्याविषयीं प्रमाण नाहीं ह्मणून तदंत नांवांनीं तर्पण करावें" असें ह्मणतात. तें असें कीं,—आसनावर बसून उजव्या गुडघ्याच्या आंतून घेऊन दर्भ अक्षतादिकांसह दोनी

हातांनीं तर्पण करावें. तें **मदनपारिजातांत योगियाज्ञवल्क्यानें** सांगितलें आहे. तें **कातीयसूत्रा**नुसारें येथें सांगतों. जसें "**ब्रह्मा तृप्यताम् । विष्णुस्तृप्यतां । रुद्रस्तृ० । प्रजापतिस्तृ० । देवास्तृप्यंतु । छंदांसि तृप्यंतु । वेदास्तृ० । ऋषयस्तृ० । पुराणाचार्यास्तृ० । गंधर्वास्तृ० । इतराचार्यास्तृ० । संवत्सरस्तृप्यतां । सावयवस्तृप्यतां । देवास्तृप्यंतु । अप्सरसस्तृप्यं० । देवानुगास्तृप्यं० । नागास्तृप्यं० । सागरास्तृप्यं० । पर्वतास्तृप्यं० । सरितस्तृप्यं० । मनुष्यास्तृप्यं० । यक्षास्तृप्यं० । रक्षांसि तृप्यं० । पिशाचास्तृप्यं० । सुपर्णास्तृप्यं० । भूतानि तृप्यं० । पशवस्तृप्यं० । वनस्पतयस्तृप्यं० । ओषधयस्तृ० । भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यताम्** । **आचार्यचूडामणींत** "**प्रजापतिस्तृप्यतां**" यापुढें—'**देवाः तृप्यंतु । यक्षाः तृप्यंतु । नागाः तृप्यंतु । गंधर्वास्तृप्यंतु । अप्सरसस्तृप्यंतु । असुरास्तृप्यंतु । क्रूरास्तृप्यंतु । सर्पास्तृप्यंतु । सुपर्णास्तृप्यंतु । तरवस्तृप्यंतु । जंभकास्तृप्यंतु । खगाः तृप्यंतु । विद्याधराः तृप्यंतु । जलधराः तृप्यंतु । आकाशगामिनः तृप्यंतु**" ॥ नंतर "**निराहाराश्च ये जीवाः पापे धर्मे रताश्च ये ॥ तेषामाप्यायनायैतद्दीयते सलिलं मया** ॥ १ ॥ या मंत्रानें उदक द्यावें. असें **मत्स्यपुराणांत** सांगितलें आहे म्हणून याप्रमाणें तर्पण करावें," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ ऋषयः ॥

**निवीतं कृत्वोदगग्रदर्भमध्येन प्रजापतितीर्थेन तिलाक्षतमिश्रौ द्वौ द्वावंजली मंत्रावृत्त्या दद्यात्** ॥ सनकः तृप्यताम् । सनंदनः तृप्यताम् । सनातनः तृप्यताम् । कपिलः तृप्यताम् । आसुरः तृप्यताम् । वोढुः तृप्यताम् । पंचशिखः तृप्यताम् ।

आतां ऋषितर्पण सांगतो.

निवीति करून, हातांतील दर्भ दुहून त्यांचीं अग्रें उत्तरेस असून मध्याहीं प्रजापतितीर्थानें तिलाक्षतामिश्र २ । २ उदकांजलि मंत्रावृत्ति २ करून सोडावें. जसें—**सनकस्तृप्यताम् । सनंदनस्तृप्यतां । सनातनस्तृप्यतां । कपिलः तृप्यतां । आसुरस्तृप्यतां । वोढुः तृप्यतां । पंचशिखः तृप्यताम्** ॥

## ॥ अथ पितृतर्पणम् ॥

**दक्षिणाभिमुखः सव्यं जान्वाच्य प्राचीनावीती । पितृतीर्थेन द्विगुणदर्भैस्तिलमिश्रांस्त्रींस्त्रीनंजलीन् दद्यात्** ॥ वसवस्तृप्यंताम् । रुद्राः तृप्यंताम् । आदित्याः तृप्यंताम् । मरुतः तृप्यंताम् । अश्विनौ तृप्येताम् । कव्यवाडनलस्तृप्यताम् । सोमः तृप्यताम् । यमः तृप्यताम् । अर्यमा तृप्यताम् । अग्निष्वात्ताः तृप्यंताम् । सोमपाः तृप्यंताम् । बर्हिषदः तृप्यंताम् । यमः तृप्यताम् । धर्मराजः तृप्यताम् । मृत्युः तृप्यताम् । अंतकः तृप्यताम् । वैवस्वतः तृप्यताम् । कालः तृप्यताम् । सर्वभूतक्षयः तृप्यताम् । औदुंबरः तृप्यताम् । दध्नः तृप्यताम् । नीलः तृप्यताम् । परमेष्ठी तृप्यताम् । वृकोदरः

तृप्यताम् । चित्रः तृप्यताम् । चित्रगुप्तः तृप्यताम् । जीवत्पितृकोप्येतदंतान्सर्वांस्तर्पयेत् ॥ ततः स्वपितृतर्पणम् ॥ पितृभ्यो नम इत्यावाह्य काश्यपगोत्रः अस्मत्पिताऽमुकदासस्तृप्यताम् ॥ एवं त्रिः । एवं पितामहः तृप्यताम् । प्रपितामहः तृप्यताम् । पितृभ्यो नम इति षट् त्रिर्मधुशब्देन वा अंजलिं प्रसिंचेत् ॥ अस्मन्माता काश्यपगोत्राऽमुकदेवीदा तृप्यताम् ॥ एवं पितामही अमुकदेवीदा तृप्यताम् । प्रपितामही तृप्यताम् । सापत्नमाता तृप्यताम् । एवं पितृभ्यो नम इत्यावाह्य मातामहः तृप्यताम् । प्रमातामहः तृप्यताम् । वृद्धप्रमातामहः तृप्यताम् । एवं मातामही अमुकदेवीदा तृप्यताम् । प्रमातामही अमुकदेवीदा तृप्यताम् । वृद्धप्रमातामही अमुकदेवीदा तृप्यताम् । एवं स्वभार्या अमुकदेवीदा तृप्यताम् । पुत्रः । कन्या । पितृव्यः । मातुलः । स्वभ्राता । तत्पत्न्यः । पितृष्वसा । मातृष्वसा । स्वभगिनी । सापत्न्या सभर्तृकेति तिसृषु ॥ श्वशुरः । गुरुः । सखा । मित्रभूतः ॥ यद्वा । आब्रह्मस्तंबपर्यंतं देवर्षिपितृमानवाः ॥ तृप्यंतु पितरः सर्वे मातृमातामहादयः ॥ १ ॥ अतीतकुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनाम् ॥ आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तु तिलोदकमिति ॥ यत्तु मदनपारिजाते हारीतः ॥ वसित्वा वसनं शुक्लं स्थले निस्तीर्णबर्हिषि । विधिज्ञस्तर्पणं कुर्यान्न तु पात्रे कदाचनेति ॥ तदनुद्धृतोदकस्थलतर्पणपरम् ॥ उद्धृते स एव । पात्राद्वा जलमादाय स्वयं पात्रांतरे क्षिपेत् ॥ जलपूर्णेऽथवा गर्ते न स्थले न तु बर्हिषि ॥ १ ॥ योगयाज्ञवल्क्यः ॥ यद्युद्धृतेन सिंचेत तिलान्संमिश्रयेज्जले ॥ अतोऽन्यथा तु सव्येन तिला ग्राह्या विचक्षणैः ॥ १ ॥ एतच्च गृहे पुत्रवता न कार्यम् ॥ सप्तम्यां रविवारे च गृहे जन्मदिने तथा । भृत्यपुत्रकलत्रार्थी न कुर्यात्तिलतर्पणमिति मरीचिस्मृतेः ॥ ततः ये के चास्मत्कुले जाता अपुत्रा गोत्रिणो मृताः ॥ ते गृह्णंतु मया दत्तं वस्त्रनिष्पीडनोदकमिति तीरे स्थले वस्त्रं पीडयेत् ॥ आचार्यचूडामणौ तु ॥ ये बांधवाबांधवा वा ये[१] च जन्मनि बांधवाः ॥ ते तृप्तिमखिला यांतु ये वास्मत्तोऽभिकांक्षिणः ॥ १ ॥ नमो नम इति शाटीपीडनमुक्तम् ॥ ततः सव्येन विष्णुपुराणोक्तैस्तर्पयेत् ॥ देवासुरास्तथा नागा यक्षगंधर्वराक्षसाः ॥ पिशाचा गुह्यकाः सिद्धाः कूष्मांडास्तरवः खगाः ॥ १ ॥ जलेचरा भूनिलया वाय्वाधाराश्च जंतवः ॥ तृप्तिमेतेन यांत्वाशु मद्दत्तेनांबुनाऽखिलाः ॥ २ ॥ नरकेषु समस्तेषु यातनासु च ये स्थिताः ॥ तेषामाप्यायनायैतद्दीयते सलिलं मया ॥ ३ ॥ ये बांधवाबांधवा वा येन्ये जन्मनि बांधवाः ॥ ते सर्वे तृप्तिमायान्तु मया दत्तैस्तिलोदकैरिति ॥ संक्षेपस्तु ॥ आब्रह्मस्तंबपर्यंतं जगत्तृप्यतु इत्येकांजलिः ॥ ततो ब्रह्मणे नमः । विष्णवे नमः । रुद्राय नमः । सवित्रे नमः । मित्राय नमः । वरुणाय नम इति जले संपूज्य । हस्तेन पुनः ब्रह्मणे नमः । अग्नये नमः । पृथिव्यै नमः । ओषधिभ्यो नमः । वाचस्पतये नमः । विष्णवे नमः । महद्भ्यो नमः । अद्भ्यो नमः । अपांपतये नमः । वरुणाय नम इति तर्पणं कृत्वा । मुखं संपूज्य देवेभ्यो नम इति विसर्जयेत् ॥ इति कमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्रस्य स्नानतर्पणादि ॥

---

१ येन्यजन्मनीति पाठान्तरम्.

आतां पितृतर्पण सांगतो.

दक्षिणाभिमुख डाव्या गुडघ्यावर हस्त ठेवून, अपसव्यानें पितृतीर्थानें दुडलेल्या दर्भांच्या अग्रांनीं तिलमिश्रित ३ । ३ उदकांजलि द्यावे. जसें—"**वसवस्तृप्यंतां । रुद्रास्तृप्यंतां । आदित्याः तृप्यंतां । मरुतः तृप्यंतां । अश्विनौ तृप्येतां । कव्यवाडनलस्तृप्यतु । सोमः तृप्यतु । यमः तृप्यतु । अर्यमा तृप्यतु । अग्निष्वात्तास्तृप्यंतां । सोमपाः तृप्यंतां । बर्हिषदः तृप्यंतां । यमस्तृप्यतु । धर्मराजः तृप्यतु । मृत्युः तृप्यतु । अंतकः तृप्यतु । वैवस्वतः तृप्यतु । कालः तृप्यतु । सर्वभूतक्षयः तृप्यतु । औदुंबरः तृप्यतु०। दध्नः तृप्यतु । नीलः तृप्यतु । परमेष्ठी तृप्यतु । वृकोदरः तृप्यतु । चित्रः तृप्यतु । चित्रगुप्तस्तृप्यतु**" ॥ जीवत्पितृकांनींही एथपर्यंत सर्वांचें तर्पण करावें. नंतर, मृतपितृकानें आपल्या पितरांचें तर्पण करावें, तें—"**पितृभ्यो नमः**" यानें आवाहन करून,—**काश्यपगोत्रोऽस्मत्पितामुकदासस्तृप्यतां** । असेंच—**काश्यपगोत्रोऽस्मत्पितामहस्तृप्यतां काश्यपगोत्रोऽस्मत्प्रपितामहस्तृप्यतां** असें किंवा—"**पितृभ्यो नमः**" ह्मणून ६ किंवा ३ मधुशब्दानें अंजलिसेचन करावें. **अस्मन्माता काश्यपगोत्रा अमुकदेवीदा तृप्यतां । पितामही काश्यपगोत्रा अमुकदेवीदा तृप्यतां । प्रपितामही काश्यपगोत्रा अमुकदेवीदा तृप्यतां । सापत्नमाता काश्यप० तृप्यतां** । असेंच—"**पितृभ्यो नमः**" ह्मणून आवाहन करून,—"**काश्यप० मातामहः अमुकदासस्तृप्यतां । काश्यप० प्रमातामहः अमुकदासः तृ० । काश्यप० वृद्धप्रमातामहः अमु० तृ० । अस्मन्मातामही काश्यप० अमुकदेवीदा तृप्यतां । प्रमातामही काश्यप० अमु० तृप्यतां । वृद्धप्रमातामही काश्यप० अमु० तृप्यतां । अस्मद्भार्या० काश्यप० अमुकदेवीदा तृप्यतां । काश्य० पुत्रः अमुकदासः तृप्यतां । अस्मत्कन्या काश्यप० तृप्यतां । काश्यप० पितृव्यः० अमुकस्तृप्यतां । काश्यप० मातुलः अमुकस्तृप्यतां । काश्यप० अस्मद्भ्राता सपत्नीकः ससुतः अमुकस्तृप्यतां । अस्मत्पितृष्वसा काश्यप० तृप्यतां । मातृष्वसा काश्यप० अमुका तृप्यतां । अस्मद्भगिनी काश्यप० सभर्तृका ससुता तृप्यतां । अस्मत् श्वशुरः काश्यप० तृप्यतां । गुरुः काश्यप० तृप्यताम् । सखा तृप्यतां ।० मित्रभूतः तृप्यतां**" । याप्रमाणें अथवा "**आब्रह्मस्तंबपर्यंतं देवर्षिपितृमानवाः ॥ तृप्यंतु पितरः सर्वे मातृमातामहादयः ॥ १ ॥ अतीतकुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनाम् ॥ आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तु तिलोदकम्**" ॥ २ ॥ असें ह्मणून उदक सोडावें. जें, **मदनपारिजातांत हारीतानें** ह्मटलें आहे कीं,—"शुक्लवस्त्र परिधान करून स्थलावर दर्भ अंथरून, विधिज्ञानें तर्पण करावें. पात्रांत करूं नये." तें अनुद्धृत उदकानें स्थलावर तर्पण न करण्याविषयीं आहे. उद्धृतोदक तर्पणाविषयीं तर, **तोच** ह्मणतो कीं,—"एक पात्रांत उदक घेऊन, पूर्वोक्त मंत्रांनीं दुसऱ्या

पात्रांत सोडावें. किंवा उदकानें भरलेल्या गर्तांत ( खळग्यांत ) सोडावें. केवळ भूमीवर किंवा स्थळावर किंवा दर्भांवर सोडूं नये." **योगयाज्ञवल्क्य** ह्मणतो कीं, "जर अनुद्धृतोदकानें तर्पण करील तर, उदकांत तीळ मिसळून करावें. नाहींपेक्षां प्रत्येक अंजलींत वामहस्तानें तीळ घालावें." हें तिळतर्पण पुत्रवान् गृहस्थानें घरांत करूं नये, "सप्तमी, रविवार, या दिवशीं व घरीं आणि आपला जन्मदिवस, या दिवशीं सेवक, पुत्र, स्त्री यांची इच्छा करणाऱ्या गृहस्थानें तिलतर्पण करूं नये," अशी **मरीचिस्मृति** आहे. नंतर—"**ये के चास्मत्कुले जाता अपुत्रा गोत्रिणो मृताः ॥ ते गृह्णंतु मया दत्तं वस्त्रनिष्पीडनोदकम्**" ॥ १ ॥ यानें अंगवस्त्राचें शेवट भिजवून पिळावें. **आचार्यचूडामणीं**त दुसऱ्या प्रकारचा मंत्र आहे तो—"**ये बांधवाऽबांधवा वा ये च जन्मनि बांधवाः ॥ ते तृप्तिमखिला यांतु ये वाऽस्मत्तोभिकांक्षिणः**" ॥ १ ॥ हा ह्मणून, "**नमो नमः**" यानें पूर्ववत् वस्त्र पिळावें असें सांगितलें आहे. नंतर सव्यानें **विष्णुपुराणां**त सांगितलेल्या मंत्रांनीं तर्पण करावें. तें—"**देवासुरास्तथा नागा यक्षगंधर्वराक्षसाः ॥ पिशाचा गुह्यकाः सिद्धाः कूष्माण्डास्तरवः खगाः ॥ १ ॥ जलेचरा भूनिलया वाय्वाधाराश्च जंतवः ॥ तृप्तिमेतेन यांत्वाशु मद्दत्तेनांबुनाऽखिलाः ॥ २ ॥ नरकेषु समस्तेषु यातनासु च ये स्थिताः ॥ तेषामाप्यायनायैतद्दीयते सलिलं मया ॥ ३ ॥ ये बांधवाबांधवा वा येन्यजन्मनि बांधवाः ॥ ते सर्वे तृप्तिमायान्तु मया दत्तैस्तिलोदकैः**" ॥ ४ ॥ यांनीं करावें. संक्षेपतः तर्पण करणें असल्यास—"**आब्रह्मस्तम्बपर्यंतं जगत्तृप्यतु**" ह्मणून एकच अंजली द्यावा. नंतर "**ब्रह्मणे नमः । विष्णवे नमः । रुद्राय नमः । सवित्रे नमः । मित्राय नमः । वरुणाय नमः** " ह्मणून उदकांत पूजन करून, हातानें पुनः—"**ब्रह्मणे नमः । अग्नये नमः । पृथिव्यै नमः । ओषधिभ्यो नमः । वाचस्पतये नमः । विष्णवे नमः । महद्भ्यो नमः । अद्भ्यो नमः । अपांपतये नमः । वरुणाय नमः**" । असें तर्पण करून, मुखाचें पूजन करून, "**देवेभ्यो नमः**" ह्मणून विसर्जन करावें. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे ब्रह्मयज्ञतर्पणादिप्रयोगः ॥**

## ॥ अथ देवपूजा ॥

सा च विश्वेश्वरादिजीर्णलिंगार्चादौ स्वस्थापितपार्थिवलिंगादौ स्पर्शसहिता कार्या ॥ शालग्रामस्फटिकद्विजस्थापितलिंगार्चादौ स्पर्शरहिता दूरतः कार्या ॥ यदा प्रतिष्ठितं लिंगं मंत्रविद्भिर्यथाविधि ॥ तदाप्रभृति शूद्रश्च योषिद्वापि न संस्पृशेदिति नारदीयात् ॥ एतच्च प्रागुक्तम् ॥ सा च नाम्ना कार्या ॥ एवं स्त्रिया अपि ॥ विष्णोस्तु पूजनं कार्यं पतिबुद्ध्या न चान्यथेति मदनपारिजाते विधवाधर्मे स्कांदोक्तेः ॥ तत्रैव पाद्मे ॥ आदित्यं गणनाथं च देवेंद्रं च यथाक्रमम् ॥ नारायणं विशुद्धाख्यमंते च कुलदेवताम् ॥ १ ॥ निगमः ॥ ब्रह्माणं विष्णुमीशं वा सूर्यमग्निं गणाधिपम् ॥ दुर्गां सरस्वतीं लक्ष्मीं गौरीं वा नित्यमर्चयेत् ॥ १ ॥ यत्तु मनुः ॥ जपस्तपस्तीर्थसेवा प्रव्रज्या मंत्रसा-

धनम् ॥ देवताराधनं चैव स्त्रीशूद्रपतनानि षडिति ॥ तद्विहितभिन्नपरम् ॥ मात्स्ये ॥ सौवर्णी राजती वापि ताम्री रत्नमयी तथा ॥ शैली दारुमयी वापि लोहसंघमयी तथा ॥ १ ॥ ( लोहसंघः पंचधातुरसाः ) ॥ रीतिकाधातुयुक्ता वा ताम्रकांस्यमयी तथा ॥ शुभदारुमयी वापि देवतार्चा प्रशस्यते ॥ २ ॥ अंगुष्ठपर्वादारभ्य वितस्तिं यावदेव तु ॥ गृहेषु प्रतिमा कार्या नाधिका शस्यते बुधैः ॥ ३ ॥ भागवते ॥ वैदिकस्तांत्रिको मिश्र इति मे त्रिविधो मखः [ भा० स्कं० ११ अ० २७ श्लो० ७ ] ॥ शिवार्चनचंद्रिकायां पाद्मे ॥ वैदिको मिश्रितो वापि विप्रादीनां विधीयते ॥ तांत्रिको विप्रभक्तस्य शूद्रस्यापि प्रकीर्तितः ॥ १ ॥ तत्रोपचारा अनेकविधा राघवभट्टैः पदार्थादर्शे उक्ताः ॥ आचारचिंतामणौ ॥ सपर्या विविधाः प्रोक्तास्तासामेकां समाश्रयेत् ॥

. यानंतर देवपूजा सांगतो.

ती विश्वेश्वरादि पुरातन लिंगांची अथवा आपण स्थापित लिंगांची अथवा पार्थिव लिंगादिकांची स्पर्शपूर्वक पूजा करावी. शालग्राम इत्यादिकांच्या स्फटिक ब्राह्मणस्थापित लिंगादिकांची स्पर्श न करितां दुरून पूजा करावी. कारण, **यदाप्रति०** ह्या **नारदीय** वचनानें निषेध होतो, हें पूर्वी सांगितलें आहे. शूद्रानें पूजा करणें ती नाममंत्रानें करावी. स्त्रीनेंही अशीच करावी. कारण,—"विष्णूचें पूजन जर करणें असेल तर पतिबुद्धीनें करावें. अन्यथा करूं नये," अशी **मदनपारिजातां**त विधवाधर्मांत **स्कंदपुराणो**क्ति आहे. तेथेंच ( म० पा० ) **पद्मपुराणां**त—"आदित्य, गणपति, इंद्र, नारायण, कुलदेवता यांचें क्रमशः पूजन करावें." **निगमां**त—"ब्रह्मदेव, विष्णु, शिव, सूर्य, अग्नि, गणपति, दुर्गा, सरस्वती, लक्ष्मी, यांचें नित्य पूजन करावें." जें **मनु** ह्म०—"जपतप, तीर्थसेवा, संन्यास, मंत्रसाधन, आणि देवांचें आराधन हीं स्त्रिया व शूद्र यांस पातित्यकारक आहेत." तें विहितभिन्नपर आहे असें समजावें. **मत्स्यपुराणां**त—"सोन्याची, रुप्याची, किंवा तांब्याची, अथवा रत्न पाषाण काष्ठ इत्यादिकांची, किंवा पंचधातूंची, किंवा पितळ, तांबें, कांसें, यज्ञियवृक्ष यांची मूर्ति पूजनास प्रशस्त आहे. अंगुष्ठपर्वापासून, वितीपर्यंत उंचीची प्रतिमा घरीं पूजनास योग्य. याहून अधिक असूं नये असें सांगितलें आहे." **श्रीमद्भागवतां**त—'वैदिक, व तांत्रिक, किंवा उभयमिश्र माझी पूजा आहे," असें सांगितलें आहे. अशी ३ प्रकारची शिवार्चनचंद्रिकेंत **पद्मपुराणां**त, "वैदिक, व मिश्र पूजा ब्राह्मणादिकांस, आणि केवळ तांत्रिक ब्राह्मणभक्त शूद्रांस विहित आहे." त्या पूजेंत उपचार अनेक प्रकारचे **राघवभट्टांनीं पदार्थादर्श**नामक ग्रंथांत सांगितले आहेत. **आचारचिंतामणीं**त—"निरनिराळ्या ग्रंथांत पूजा अनेक तऱ्हेच्या सांगितल्या आहेत त्यांतून एक प्रकार स्वीकारून पूजा करावी."

**गंधादिका नैवेद्यांता पूजा पंचोपचारिका ॥ १ ॥**

गंधादिनैवेद्यांत पूजेस पंचोपचारपूजा ह्मणतात असें सांगितलें आहे.

## ॥ अथ दशोपचाराः ॥

**अर्घपाद्यमाचमनमधुपर्कासनादि च ॥ गंधादिपंचकं चेति उपचारा दशोदिताः ॥ १ ॥**

आतां दशोपचार सांगतो.

अर्घ्य १, पाद्य २, आचमन ३, मधुपर्क ४, आसन ५, गंध ६, पुष्प ७, धूप ८, दीप ९, नैवेद्य १०, ही दशोपचारपूजा होय.

## ॥ अथ षोडशोपचाराः ॥

**आसनं स्वागतं चार्घः पाद्यमाचमनं तथा । मधुपर्काचमनस्नानवसनाभरणानि च ॥ १ ॥ गंधपुष्पे धूपदीपौ नैवेद्यं चंदनं तथा ॥**

आतां षोडशोपचार सांगतो.

आसन १, स्वागत २, अर्घ्य ३, पाद्य ४, आचमन ५, मधुपर्क ६, आसन ७, स्नान ८, वस्त्र ९, अलंकार १०, गंध ११, पुष्प १२, धूप १३, दीप १४, नैवेद्य १५, चंदन १६ ॥

## ॥ अथाष्टादशोपचाराः ॥

**आसनावाहने चार्घ्यं पाद्यमाचमनं तथा ॥ स्नानं वस्त्रोपवीतं च भूषणानि च सर्वशः ॥ गंधपुष्पे तथा धूपं दीपं नैवेद्यमेव च ॥ माल्यानुलेपनं चैव नमस्कारविसर्जने ॥**

आतां अष्टादशोपचार सांगतो.

आसन १, आवाहन २, अर्घ्य ३, पाद्य ४, आचमन ५, स्नान ६, वस्त्र ७, उपवीत ८, अलंकार ९, गंध १०, पुष्प ११, धूप १२, दीप १३, नैवेद्य १४, माल्यें १५, अनुलेपन १६, नमस्कार १७, विसर्जन १८, हे अष्टादशोपचार होत.

## ॥ अथ षट्त्रिंशोपचाराः ॥

**आसनाभ्यंजने तद्वदुद्वर्तनविरूक्षणे ॥ संमार्जनं सर्पिरादिस्नपनावाहने ततः ॥ १ ॥ पाद्यार्घाचमनीयं च स्नानीयमधुपर्ककौ ॥ पुनराचमनीयं च वस्त्रयज्ञोपवीतके ॥ २ ॥ अलंकारो गंधपुष्पे धूपदीपौ तथैव च ॥ तांबूलानि च नैवेद्यं पुष्पमालास्तथैव च ॥ ३ ॥ अनुलेपं च शय्यां च चामरं व्यजनं तथा ॥ आदर्शदर्शनं छत्रं नमस्कारोथ वर्तनम् ॥ ४ ॥ गीतवाद्ये च दानानि स्तुतिहोमप्रदक्षिणम् ॥ दंतकाष्ठप्रदानं च ततो देवविसर्जनम् ॥ ५ ॥ उपचारा इमे ज्ञेयाः षट्त्रिंशत्सुरपूजने ॥ अन्ये चतुःषष्ट्युपचाराः ॥ ते च काम्यपूजायाम् ॥ एते विकल्पा यथाविभवं ग्राह्याः ॥**

आतां ३६ उपचार सांगतो.

आसन, अभ्यंग, उद्वर्तन, विरूक्षण, संमार्जन, घृतादिस्नान, आवाहन, पाद्य, अर्घ्य, आचमन, स्नान, मधुपर्क, आचमनीय, वस्त्र, यज्ञोपवीत, अलंकार, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, तांबूल, पुष्पमाळा, अनुलेप, शय्या, चामर, व्यजन, आदर्श दाखविणें, छत्र, नर्तन, गायन, वाद्यें, वाजविणें, दान, स्तुति, होम, प्रदक्षिणा, दंतकाष्ठप्रदान, आणि विसर्जन, हे देवपूजेविषयींचें ३६ उपचार होत. अन्य ६४ उपचारही सांगितले आहेत, परंतु ते काम्य पूजेविषयीं योग्य आहेत. हे पूर्वोक्त विकल्प सामर्थ्यानुसार घ्यावे.

## ॥ अथ प्रदक्षिणा नमस्काराः ॥

**बह्वृचपरिशिष्टे ॥ एकं विनायके कुर्यात् द्वे सूर्ये त्रीणि शंकरे ॥ चत्वारि केशवे दद्यात् सप्ताश्वत्थे प्रदक्षिणाः ॥ १ ॥ अन्यत्र तु एका चंड्यां रवेः सप्त तिस्रो दद्याद्विनायके ॥ चतस्रो विष्णवे देयाः शिवस्यार्धप्रदक्षिणा ॥ १ ॥ वृषं चंडं वृषं चैव सोमसूत्रं पुनर्वृषम् ॥ चंडं च सोमसूत्रं च पुनश्चंडं पुनर्वृषं ॥ २ ॥ अपसव्यं यतीनां तु सव्यं तु ब्रह्मचारिणाम् ॥ सव्यापसव्यं गृहिणामेवं शंभोः प्रदक्षिणा ॥ ३ ॥ तथाग्नेये ॥ प्रदक्षिणत्रयं कुर्याच्छिवस्यायतने बुधः ॥ लैंगे सव्यं व्रजेत्ततोऽसव्यं प्रनालं नैव लंघयेत् ॥ तथा ॥ उरसा शिरसा चैव मनसा वचसा तथा ॥ पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यां प्रणामोऽष्टांग उच्यते ॥ १ ॥**

आतां प्रदक्षिणा व नमस्कार घालण्याचा प्रकार सांगतो.

**बह्वृचपरिशिष्टां**त प्रदक्षिणाप्रकार सांगितला आहे तो असा कीं,—"१ गणपतीस, २ सूर्यास, ३ शंकरास, ४ विष्णूस, आणि ७ अश्वत्थास, प्रदक्षिणा कराव्या." **अन्यग्रंथां**त—"देवीस १, सूर्यास ७, गणपतीस ३, विष्णूस ४, आणि शिवास अर्ध प्रदक्षिणा करावी. अर्ध प्रदक्षिणेचा प्रकार—प्रथम नंदीपासून चंडापर्यंत जाऊन, उलट नंदीपर्यंत येऊन पुनः सोमसूत्रापर्यंत येऊन, पुनः नंदीपर्यंत यावें; मग चंडापर्यंत जाऊन सोमसूत्र, परत चंड, व नंदीपर्यंत यावें. अशा क्रमानें शिवाला प्रदक्षिणा घालाव्या. इला सोमसूत्र प्रदक्षिणा ह्मणतात. ती संन्याशांनीं अपसव्य, ब्रह्मचाऱ्यांनीं सव्य, व गृहस्थांनीं सव्यापसव्य शंभूस प्रदक्षिणा करावी," असें सांगितलें आहे. असेंच **अग्निपुराणां**त—"ज्ञात्यांनीं शिवालयांत ३ प्रदक्षिणा कराव्या," असें सांगितलें आहे. **लिंगपुराणां**त "प्रथम सव्य जाऊन मग अपसव्य फिरावें, प्रनालास ( पाणि जाण्याच्या वाटेस ) ओलांडूं नये. तसेंच ऊर, मस्तक, मन, वाणी, पाय, हात, जानु यांनीं प्रणाम करावा. यास अष्टांग नमस्कार ह्मणतात," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ निर्माल्यविनियोगः ॥

**इयं पूजा च देवतीर्थेन कार्या ॥ मार्जनार्चनबलिकर्मभोजनानि देवतीर्थेनेति हारीतोक्तेः ॥ ब्राह्मे ॥ ब्रह्मांगलग्नं विप्रेभ्यो वैष्णवं च प्रदीयते ॥ रुद्रांगलग्नमग्नौ तु दहेत्सर्वं च तत्क्षणात् ॥ १ ॥ शिष्टेभ्यस्त्वथ देवेभ्यो दत्तं दीनेषु निक्षिपेत् ॥**

यानंतर निर्माल्याचा विनियोग सांगतो.

पूजा करणें ती देवतीर्थानें करावी. कारण,—"मार्जन, पूजन, बलिकर्म, व भोजन, हीं देवतीर्थानें करावीं,"—असें **हारीत** ह्मणतो. **ब्राह्मपुराणां**त—"ब्रह्मयाच्या, व विष्णूच्या, अंगास लागलेलें ब्राह्मणांस द्यावें; शिवलिंगांस लागलेलें पूजाद्रव्य, अग्नींत तत्काळ जाळावें. अवशिष्ट देवांस दिलेलें पूजाद्रव्य भिकाऱ्यांस द्यावें," असें सांगितलें आहे.

**मदनपारिजाते गारुडे ॥ धात्रीफलेन यत्पुण्यं, जयंत्याः समुपोषणे ॥ खगेंद्र स लभेन्मर्त्यस्तुलसीपूजनेन तत् ॥ १ ॥ नृसिंहपुराणे ॥ शतपुष्पं बिल्वपत्रं चंपकं तगरं**

तथा ॥ करवीरं तथा श्वेतं पालाशकुशपुष्पकम् ॥ १ ॥ वनमालाप्यशोकं च सेवंती कुब्जमालती ॥ त्रिसंध्यं च तथा श्वेतं कुंदं च शतपत्रकम् ॥ २ ॥ मल्लिका चैव जाती च सर्वपुष्पाद्विशिष्यते ॥ पत्राण्यपि तत्रैव ॥ अपामार्गं भृंगराजं शमीपत्रं च खादिरम् ॥ दूर्वा च कुशपत्रं च दमनं गरुकं तथा ॥ ३ ॥ ततः श्रेष्ठं बिल्वपत्रं ततश्च तुलसी वरा ॥ पल्लवान्यपि चैषां स्युः शस्तान्यर्चाविधौ हरेः ॥ ४ ॥ अगस्त्यवृक्षसंभूतैः कुसुमैररसितैः सितैः ॥ येऽर्चयिष्यंति देवेशं तैः प्राप्तं वैष्णवं पदम् ॥ ५ ॥ तथा ॥ तुलसीमालया विष्णुः केतक्या वापि पूजितः ॥ समासहस्रं सुप्रीतो भवते मधुसूदनः ॥ ६ ॥ शिवे वर्ज्यानि तत्रैव ॥ जपा बंधूकसिंदूरं तथा त्रैसंधिके शुभे ॥ नदंती केतकी यूथी मालती कुटजानि वा ॥ ७ ॥ घुसृणं च कुमारं च प्रमादेनापि नार्पयेत् ॥ बर्बरीसर्जपत्राणि तथा च कुमुदद्वयम् ॥ ८ ॥ विष्णुरहस्ये ॥ जलं पर्युषितं त्याज्यं पत्राणि कुसुमानि च ॥ तुलस्यगस्त्यबिल्वानि गांगं वारि न दुष्यति ॥ १ ॥ विशेषस्तु मत्कृते निर्णयसिंधौ पूर्तकमलाकरे च ज्ञेयः ॥

**मदनपारिजातां**त **गरुडपुराणां**त—"आवळीचीं फळें अर्पण केल्यानें, व जयंतीच्या उपोषणानें जें पुण्य प्राप्त होतें तें मनुष्यांनीं तुलसीनें विष्णुपूजन केल्यानें मिळतें असें सांगितलें आहे." **नृसिंहपुराणां**त—"शतपुष्प ( शोप ), बेलाचें पान, चंपक, तगर, कण्हेर, शुभ्र पळसाचें पुष्प, शुभ्र दर्भाचें पुष्प, वनमाला, अशोक, शेवंती, बटमोगरा, त्रिसंध्य ( तिरसंगी ), पांढरा कुंद, शतपत्र, ( कमल ), व मल्लिका ( मोगरी ), जाती ( जाई ), हीं सर्व पुष्पांत पूजेला विशेष योग्य आहेत," असें सांगितलें आहे. पत्रेंहि तेथेंच सांगितलीं आहेत. तीं—"आघाडा, माका, शमीपत्र, खैरपत्र, दूर्वा, दर्भपत्र, दवणा, व गरुक हीं श्रेष्ठ आहेत. यांहून श्रेष्ठ, बेल, व त्यांतूनही तुळसीपत्र श्रेष्ठ होय. या सर्वांचीं कोमळ पानें विष्णुपूजेस अतिप्रशस्त आहेत. अगस्त्याच्या लाल किंवा शुभ्र पुष्पांनीं जे विष्णुपूजा करितील त्यांस विष्णुपद मिळेल," असें सांगितलें आहे. तसेंच,—"तुलसीमालेनें किंवा केतकीनें विष्णुपूजन केलें असतां तो १००० वर्षें संतुष्ट होतो," असें सांगितलें आहे. शिवाविषयीं वर्ज्य फुलें त्यांतच **( नृ० पु० )** सांगितलीं आहेत. तीं—"दासवंती, दुपारी, सिंदूर, २ त्रैसंधिक ( तिरसंगी ) नदंती, केतकी, यूथी ( जुई ), मालती, कुटज ( इंद्रजव ), घुसृण ( केशर ), व कुमार ( कांटेशेंवती ), यांनीं असावधपणानेंही शिवपूजा करूं नये. अर्थात् हीं वर्ज आहेत. "बर्बरी, सर्ज ( अर्जुनवृक्ष ) पत्रें, व २ कुमुदें हीं शिवास अर्पूं नयेत" असें सांगितलें आहे. **विष्णुरहस्यां**त—"उदक, पत्रें, शिळीं पुष्पें, पूजेस घेऊं नयेत. परंतु तुलसी, अगस्त्य, बेल आणि गंगोदक हीं शिळीं घेतल्यास दोष नाहीं," असें सांगितलें आहे. याचा विशेष विचार **निर्णयसिंधु** व **पूर्तकमलाकरां**त पहावा.

## ॥ अथ तीर्थमहिमा ॥

स्कांदे ॥ शालग्रामोद्भवो देवो यत्र द्वारवतीभवः ॥ उभयोः स्नानतोयेन ब्रह्महत्या

निवर्तते ॥ १ ॥ हेमाद्रौ लक्षणकांडे स्कांदे ॥ कुंकुमं चंदनं पत्रं नैवेद्यं सुसमं जलम् ॥ शालग्रामशिलालग्नं तीर्थकोटिशताधिकम् ॥ १ ॥ पाद्मे ॥ स स्नातः सर्वतीर्थेषु सर्वयज्ञेषु दीक्षितः ॥ शालग्रामशिलातोयैर्योऽभिषेकं समाचरेत् ॥ १ ॥ गंगा गोदावरी रेवा नद्यो मुक्तिप्रदास्तु याः ॥ ता वसंतीह सर्वत्र शालग्रामशिलाजले ॥ २ ॥ गौतमांबरीषसंवादे ॥ येषां धौतांघ्रिगात्राणि हरेः पादोदकेन वै ॥ अंबरीष गृहे तेषां दासोऽहं वशगः सदा ॥ १ ॥ हरेः स्नानावशेषं तु जलं यस्योदरे स्थितम् ॥ अंबरीषं प्रणम्योच्चैः पादपांसुः प्रगृह्यताम् ॥ २ ॥ गर्जंति तावदन्यानि तीर्थानि भुवनत्रये ॥ यावन्न प्राप्यते तीर्थं शालग्रामाभिषेचनम् ॥ ३ ॥ जन्मप्रभृतिपापानां प्रायश्चित्तं यदीच्छसि ॥ शालग्रामशिलावारि पापहारि निषेव्यताम् ॥ ४ ॥ नृसिंहपुराणे ॥ गंगाप्रयागगयपुष्करनैमिषाणि पुण्यानि यानि कुरुजांगलयामुनानि ॥ कालेन तीर्थसलिलं विनिहंति पापं पादोदकं भगवतस्तु पुनाति सद्यः ॥ १ ॥ ब्रह्मचारी सव्रती च आश्रमी च सदा शुचिः ॥ विष्णुपादोदकं यस्य मुखे शिरसि विग्रहे ॥ २ ॥ स्मृत्यर्थसारे ॥ देहः शुध्यति चाप्यात्मा पीत्वा पादोदकं हरेः ॥ नित्ये नैमित्तिके काम्ये पीत्वा भुक्त्वा न दुष्यति ॥ १ ॥ व्रतादौ विष्णुपादोदकं पीत्वानंतरं भुक्त्वा न दुष्यति ॥ कृत्वेति पाठे नित्ये काम्ये च एकादशीव्रतादौ नैमित्तिके सांवत्सरिकश्राद्धादौ पादोदकं पीत्वा तत्कर्म कृत्वा न दुष्यतीत्यर्थः ॥ ननु जलस्यापि नरश्रेष्ठ प्राशनाल्लेपजाद्दते ॥ नित्यक्रिया निवर्तेत काम्यनैमित्तिकैः सहेति कालिकापुराणात् ॥ न तु तत्कर्म कृत्वा न दुष्यंतीत्यर्थः ॥ अभुक्ते भुक्तवत्तोयमिति निषेधाच्च कथं कर्मार्हतेति चेन्न ॥ सामान्यस्य विशेषेण बाधात् ॥ रागप्राप्तनिषेधाच्च ॥ विष्णवर्चायां शिलार्चा गुरुषु नरमतिर्वैष्णवे जातिबुद्धिर्विष्णोर्वै वैष्णवानां कलिमलमथने पादतीर्थेषु बुद्धिः ॥ विष्णोस्तन्नाम्नि मंत्रे सकलकलुषहे शब्दसामान्यबुद्धिर्विष्णौ सर्वेश्वरेशे तदितरसमधीर्यस्य वा नारकी सः ॥ १ ॥ इति दोषदर्शनाच्च ॥ तच्च पूजांते पेयम् ॥ तदुत्तरांगत्वात् ॥ ये तु उपवासदिने प्राक् कर्मणश्च न पिबंति ते भ्रांताः ॥ अशितानशिता ह्यापो जलेनैव हि पारयेदिति दर्शनाच्चेति विष्णुवाजपेयिनः ॥ गरुडपुराणे ॥ जलं न येषां तुलसीविमिश्रं पादोदकं चक्रशिलासमुद्भवम् ॥ नित्यं त्रिसंध्यं प्लवते न गात्रं खगेंद्र ते धर्मबहिष्कृता नराः ॥ आह्निकप्रदीपे ॥ सूतके मृतके वापि आशौचं नैव विद्यते ॥ येषां पादोदकं मूर्ध्नि प्राशनं ये च कुर्वते ॥ १ ॥ अंतकालेऽपि यस्येह दीयते पादयोर्जलम् ॥ सोऽपि सद्गतिमाप्नोति पापाचारो बहिष्कृतः ॥ २ ॥ भुक्त्वा पीत्वा विशुद्धः स्यात्पीत्वा पादोदकं हरेः ॥ स्कांदे शिववचनम् ॥ दृष्टिपूतं तु यत्तोयं विष्णुना प्रभविष्णुना ॥ तद्वै पापहरं पुत्र किं पुनः पादयोर्जलम् ॥ १ ॥ विष्णुरहस्ये ॥ विष्णुपादोदकं पीत्वा पश्चादशुचिशंकया ॥ यश्चाचामति संमोहात् ब्रह्महत्यां स विंदति ॥ १ ॥ गारुडे ॥ पादोदकं पिबेन्नित्यं नैवेद्यं भक्षयेद्धरेः ॥ शेषं च मस्तके धार्यमिति वेदानुशासनम् ॥ २ ॥ शालग्रामशिलातोयमपीत्वा यस्तु मस्तके ॥ प्रक्षेपणं प्रकुर्वीत ब्रह्महा स निगद्यते ॥ ३ ॥ शालग्रामशिलातोयं पिबेत्सोमकरेण तु ॥ अज्ञानाद्दैवं

**प्रोक्तं ज्ञानादब्दं समाचरेत् ॥ ४ ॥ विष्णोः पादोदकं पीत्वा कोटिजन्माघनाशनम् ॥ तदेवाष्टगुणं पापं भूमौ बिंदुनिपातनात् ॥ ५ ॥ भक्तिचंद्रोदये ॥ आयसे च तथा कांस्ये काष्ठे वालाबुके तथा ॥ उद्धृत्य पादसलिलं मद्यतुल्यं विनिर्दिशेत् ॥ १ ॥ श्रीविष्णोः पादसलिलं करे कृत्वा मुखे क्षिपेत् ॥ अदत्त्वापि[1] व्रते तोयं रौरवे नरके वसेत् ॥ १ ॥ अदत्वा विष्वक्सेनादिभ्य इति शेषः ॥ ग्रहणमंत्रो हलायुधे ॥ अकालमृत्युहरणं[2] सर्वव्याधिनिवारणम्[3] ॥ विष्णोः[4] पादोदकं पीत्वा[5] शिरसा[6] धारयाम्यहमिति ॥**

आतां तीर्थमहिमा सांगतो.

याविषयीं **स्कंदपुराणां**त—"जेथें शालग्रामशिला, व द्वारकेंत उत्पन्न झालेला देव (चक्रांकित) हे असतील, तेथें या दोघांच्या तीर्थसेवनानें ब्रह्महत्यादि दूर होते," असें सांगितलें आहे. **हेमाद्रीं**त लक्षणकांडांत **स्कंदपुराणां**त—"कुंकू, चंदन, तुलसीपत्र, नैवेद्य, व तीर्थ हीं शालग्रामसंबंधीं असतील तर यांच्या सेवनानें कोट्यवधी जन्मांचीं पातकें निवृत्त होतात," असें सांगितलें आहे. **पद्मपुराणांत** सर्व तीर्थांचें स्नान, व सर्व यज्ञांत दीक्षा घेतली असतां यांपासून जीं फलें प्राप्त होतात तीं ज्यानें शालग्रामतीर्थानें स्नान केलें असेल त्यास मिळतात. "गंगा, गोदावरी, रेवा इ० मुक्तिप्रद ज्या नद्या, त्या सर्वही शालग्रामतीर्थीं राहतात," असें सांगितलें आहे. **येथेंच गौतम** व **अंबरीष** यांच्या संवादांत—"ज्यांचीं अंगें विष्णुपादोदकानें क्षालित झालीं असतील, त्यांच्या घरचा मी (विष्णु) दास आहें. मी निरंतर यांच्या स्वाधीन रहातों. हे अंबरीष! विष्णुस्नानोदक ज्यांच्या पोटीं रहातें; त्यांस मोठ्या आदरानें नमस्कार करून, त्यांचें पादरज त्वां वंदन करावें. तोंपर्यंत त्रिभुवनांत अन्य-तीर्थें गाजतात; जोंपर्यंत शालग्रामतीर्थ प्राप्त होत नाहीं. आजन्मकृत पापांचें प्रायश्चित्त जर इच्छितोस, तर पापहारक शालग्रामतीर्थ घे," असें सांगितलें आहे. **नृसिंहपुराणां**त "गंगा, प्रयाग, गया, पुष्कर, नैमिषारण्य, किंवा अन्य पुण्यकारक जीं कुरुक्षेत्र, व यमुनातीरगत क्षेत्रें (मथुरागोकुलवृंदावनादिक) इत्यादि हीं तीर्थें कांहीं काल त्यांचें सेवन केल्यानें पापनाश करितात; परंतु विष्णुपादोदक प्राशन केलें असतां तत्काल पवित्र करितें. ब्रह्मचारी, व्रती व आश्रमी, यांतील कोणीही असला तरी ज्याच्या मुखीं विष्णुपादोदक, मस्तकीं निर्माल्य, व कंठीं तुलसीमाला लटकत असेल तोच सर्वकाल शुद्ध होय," असें सांगितलें आहे. **स्मृत्यर्थसारां**त—"विष्णुपादोदक प्याल्यानें देह, व आत्मा हे शुद्ध होतात. नित्य, नैमित्तिक, आणि काम्य कर्में तीर्थ-प्राशन व प्रसाद भक्षण करून, केलीं तरी दोष नाहीं," असें सांगितलें आहे. व्रतादिकांत विष्णुपादोदक पिऊन, कांहीं उपाहार केल्यास दोष नाहीं, असा पूर्वोक्त वाक्याचा अभिप्राय आहे. **"कृत्वा"** असा पाठ घेतल्यास नित्य व काम्य एकादशी व्रतादिकांत

**१ ०पिबते यस्तु इत्यपि पाठः ॥ २ ०मथनमिति पाठः ॥ ३ ०विनाशनमिति पाठः ॥ ४ ०विष्णुपादोदकमिति पठ्यते ॥ ५ ०तीर्थमित्यशुद्धः पाठः ॥ ६ ०जठरेइत्यपि केश्चित्पठ्यते ॥**

व नैमित्तिक प्रतिवार्षिक श्राद्धादिकांत तीर्थप्राशन करून कर्म केल्यास दोष नाहीं, असा अभिप्राय आहे. यावर **शंका** करितात कीं,—"औषधावांचून उदकही पिऊन नित्य, नैमित्तिक व काम्य कर्मै करूं नयेत," असें **कालिकापुराण**वचन आहे. यास्तव, वरील वचनाचा तें कर्म करून तीर्थ प्राशनानंतर भोजन केल्यास दोष नाहीं असा अभिप्राय असावा. कारण, न जेवलेल्यास जेवून कर्म करूं नये असा निषेध आहे. यावरून भोजन केलेल्यास कर्माधिकार प्राप्त कसा होईल? असें ह्मणशील तर,—तें योग्य नाहीं. कारण, येथें सामान्यविधीचा विशेषविधीनें बाध झाला आहे, व रागप्राप्ताचा निषेध आहे. आणखी—"शालग्रामपूजेस शिलापूजा, गुरूस मनुष्य, वैष्णवास जातिसंबंधानें निंद्य मानणारा, व कलिमलमथन करणाऱ्या विष्णुतीर्थास उदक मानणारा, विष्णूच्या पापनाशक नाममंत्रास सामान्यशब्द मानणारा, व सर्वेश्वर विष्णूस इतर देववत् मानणारा असेल, तो मनुष्य नरकवासी समजावा," असा तीर्थास उदकत्व मानण्याचा निषेध आहे; यास्तव वरील **कालिकापुराण**वचनांत सामान्य उदकाचा निषेध आहे, त्याचा तीर्थग्रहणरूप विशेषविधीनें बाध होतो. तें तीर्थ पूजांतीं घ्यावें. कारण, प्राशनास उत्तरांगत्व आहे. जे उपवासदिनीं, व इतर कर्मापूर्वी तीर्थ प्राशन करीत नाहींत ते भ्रांत आहेत. कारण,—"उदक प्राशनानें भक्षण केलेलें न केलेंसें होतें. तेव्हां अर्थात् इतर कर्म करण्यास निषेध नाहीं," असें **विष्णुवाजपेयी** ह्मणतात. **गरुडपुराणां**त "ज्यांच्या, तुलसीमिश्र चक्रांकित व शालग्रामसंबंधी तीर्थ त्रिकाल देहावर पडत नाहीं, व पोटांत जात नाहीं; ते मनुष्य धर्मबहिष्कृत होत," असें सांगितलें आहे; **आह्निकप्रदीपां**त—"सूतक किंवा मृतकांत त्यांस आशौच नाहीं; ज्यांच्या मस्तकावर, व पोटांत तीर्थोदक असेल. मरणसमयीं ज्यास विष्णुतीर्थ प्राशन होईल; तो पापाचारी, व धर्मबहिष्कृत असला तथापि सद्गतीला पावतो. विष्णुप्रसादभक्षण, व विष्णुपादोदकप्राशन केल्यानें मनुष्य पवित्र होतो," असें सांगितलें आहे. **स्कंदपुराणां**त **शिव**वचन—"जें उदक विष्णूनें स्वदृष्टीनें पवित्र केलें असेल तें सर्व पापहारक आहे. मग, तत्पादोदक पापनाशक; असेल, कीं नाहीं याविषयीं संशय धरणें हें काय?" असें आहे. **विष्णुरहस्यां**त—"जो विष्णुपादोदक पिऊन, उच्छिष्ट झालों असें मानून आचमन करितो त्याला ब्रह्महत्या प्राप्त होते," असें सांगितलें आहे. **गरुडपुराणां**त—"हरिपादोदक नित्य घ्यावें, नैवेद्य भक्षावा, व पूजाशेष (निर्माल्य) मस्तकीं धरावा, असें वेदाचें आज्ञावचन आहे. शालग्रामतीर्थ पिण्यापूर्वी जो मस्तकीं प्रक्षेप करील, तो ब्रह्मघ्न होय. असें धर्मज्ञ ह्मणतात. शालग्रामतीर्थ सोमकरानें प्राशन केल्यास ज्ञानतः अब्दें,

१ "सोमकर" या शब्दाचा सामान्यतः सोमासारखा ह्मणजे कांहीं वांकडा केलेला हात, किंवा सोम-(एका वेलीचा रस) प्राशन करतेवेळीं जसा करतात तसा हात; असा असावा असें वाटतें.

२ तीस कृच्छ्र-(एका गायीची किंमत-उत्तमपक्षीं १५ रुपये, व सर्वांत कमी ४ आणे) यास अब्द असें ह्मणतात. याचा विशेष विचार **प्रायश्चित्तेन्दुशेखरा**दिकांत पहावा.

व अज्ञानतः ऐंदव प्रायश्चित्त घ्यावें. जें विष्णुपादोदक प्राशन केलें असतां कोटिजन्मार्जित पाप नाश करितें; तेंच बिंदुमात्र भूमीवर पडेल तर, अष्टगुण पापप्रद होतें," असें सांगितलें आहे. **भक्तिचंद्रोदयां**त—"लोखंडाचे, काष्ठाचे, किंवा भोपळ्याचे पात्रांत घातलेलें तीर्थ मद्यासारखें समजावें. जो, विष्णुतीर्थ हातांत घेऊन मुखांत टाकील, तो, रौरवनरकांत राहील. तसाच विष्वक्सेनादिकांस न देतांही घेतल्यास दोषी होतो," असें सांगितलें आहे. तीर्थग्रहणमंत्र **भट्टहलायुध** सांगतो.—"**अकालमृत्युहरणं सर्वव्याधिनिवारणम् ॥ विष्णोः पादोदकं पीत्वा शिरसा धारयाम्यहम् ॥**"

## ॥ अथ प्रसादग्रहणम् ॥

**हेमाद्रौ माधवीये च स्कांदे ॥ एकादश्यामुपोष्याथ योऽश्नाति द्वादशीदिने ॥ नैवेद्यं तुलसीमिश्रं हत्याकोटिविनाशनम् ॥ १ ॥ यत्तु श्रीदत्तीये आचारादर्शे ॥ सात्वतीमभिषुत्य हुत्वा भक्षयंतीति चेन्निवेदनसमानकर्तृकभक्षणोक्तेः ॥ परेण निवेदिते स्वत्वाभावाद्देवद्रव्यं गुरुद्रव्यं यत्नेन परिवर्जयेदिति निषेधात् ॥ स्पृष्ट्वा देवलकं चैव सवासा जलमाविशेदिति निषेधात्स्पृष्ट्वा यूपं दिवाकीर्तिं देवद्रव्योपजीविनम् ॥ सवासा जलमाविश्य घृतं प्राश्य विशुध्यतीति स्मृतेश्च ॥ विशेषो मत्कृते आचारप्रदीपे ज्ञेयः ॥**

आतां प्रसादग्रहण सांगतो.

**हेमाद्रीं**त **माधवीयां**त **स्कंदपुराणां**त असें सांगितलें आहे कीं,—"जो एकादशीस उपोषण करून, द्वादशीस तुलसीमिश्र नैवेद्य भक्षील, त्याच्या कोट्यवधि हत्या नष्ट होतील." जें **श्रीदत्तीयां**त **आचारादर्शां**त सांगितलें आहे कीं,—सात्वतीस हवन करून भक्षण करतात; असें असेल तर, तें निवेदनसमानकर्तृक भक्षण सांगितलें आहे. कारण, दुसऱ्यानें निवेदिलें असतां 'त्यावर स्वत्वाचा अभाव आहे' या हेतूस्तव; आणि "देव, व गुरु यांचें द्रव्य मोठ्या यत्नानें वर्जावें," असा निषेध आहे. तसेंच "पुजाऱ्यास स्पर्श केल्यास सवस्त्र स्नान करावें," असा निषेध असून, "यूप (यज्ञिय पशु बांधण्याचा खांब), न्हावी, व देवद्रव्यानें पोट भरणारा यांचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान करून, अभिमंत्रित घृत प्राशन केल्यानें शुद्ध होतो," असी **स्मृति** आहे ह्मणून तें असमंजस होय. यासंबंधीं विशेष विचार मत्कृत **आचारप्रदीपां**त पहावा. **इति शूद्रस्य पूजाप्रकारः ॥**

## ॥ अथ शूद्रस्य वैश्वदेवः ॥

**शंखः ॥ पंचयज्ञविधानं तु गृही नित्यं न हापयेत् ॥ यमः ॥ ब्रह्मयज्ञो देवयज्ञः पितृयज्ञस्तथैव च ॥ भूतयज्ञो नृयज्ञश्च पंच यज्ञाः प्रकीर्तिताः ॥ १ ॥ स च लौकिकाग्नौ कार्यः ॥ वैवाहिकेऽग्नाविल्याचार्य इति विज्ञानेश्वरः ॥ अतएव तंत्ररत्ने स्थपतीष्टिलौकिकेऽग्नावुक्ता ॥ ये तु लौकिकाग्नावपि शूद्रस्य न भवतील्याहुस्ते मूर्खा एव ॥ विज्ञानेश्वरापरार्कमेधातिथयोऽप्येवमाहुः ॥ तत्रापि पाकाग्नौ कार्यः ॥ गृह्याग्नौ तु पचेदन्नं लौकिके वापि नित्यशः ॥ यस्मिन्नग्नौ पचेदन्नं तस्मिन्होमो विधीयते ॥ १ ॥ इति**

मनूक्तेः ॥ असंभवे शातातपः ॥ लौकिके वैदिके वापि हुत्वोत्सृष्टे जले क्षितौ ॥ वैश्वदेवस्तु कर्तव्य! पंचसूनापनुत्तये ॥ १ ॥ स च पक्केनापि कार्यः ॥ स्थपतीष्टिवत् ॥ अन्यथा तत्राप्यामं स्यादिति केचित् ॥ पक्कमुच्छिष्टमुच्यते इत्युक्तेः स्वकर्तृक आमेनैवेति स्मार्तगौडाः ॥ तत्र वैश्वदेवे मन्वाद्यैर्नाना प्रकारा उक्ताः ॥ तेषु मनूक्तो निरग्निद्विजपरः ॥ तस्य कातीयसूत्रोक्तेर्गृह्याग्निं विनानधिकारादिति स्मृतिकौमुदीकारः ॥ तन्न । निरग्नेः शाकलमंत्रैर्होमाद्युक्तेः ॥ तदाह मदनपारिजाते च वसिष्ठः ॥ अनग्निकस्तु यो विप्रः सोऽन्नं व्याहृतिभिः स्वयम् ॥ हुत्वा शाकलमंत्रैस्तु शेषाद्भूतबलिं हरेत् ॥ १ ॥ शाकलमंत्राः देवकृतस्यैनसो इति षट् ॥ शूद्रस्यापि प्रागुक्तरीत्या कातीयकर्मोक्तेरेतद्देवतानाम्ना होमः ॥ न तु मनूक्तः ॥ शूद्रस्य श्रुतिश्रवणाभावेन तत्कर्मण्यनधिकारात् ॥ तेन येषां कठादीनां शाखायां वैश्वदेवो नोक्तस्तेषां मनूक्तः ॥ यद्वा शूद्राणां पुराणश्रवणाधिकारात्तदुक्तो वैश्वदेवस्तैः कार्यः ॥ तथा मार्कंडेयपुराणे ॥ ततः संपूजयेद्वह्निं दद्याच्चैवाहुतीः क्रमात् ॥ प्रथमां ब्रह्मणे दद्यात्प्रजानां पतये ततः ॥ १ ॥ तृतीयां चैव गृह्याभ्यः कश्यपाय तथापराम् ॥ ततोऽनुमतये दद्याद्दद्याद्गृहबलिं ततः ॥ २ ॥ पर्जन्यांभोधरित्रीणां दद्यात्तु मणिके त्रयम् ॥ वायवे प्रतिदिग्भ्यश्च दिग्भ्यः प्राच्यादितः क्रमात् ॥ ३ ॥ ब्रह्मणे चांतरिक्षाय सूर्याय च यथाक्रमम् ॥ विश्वेभ्यश्चैव देवेभ्यो विश्वभूतेभ्य एव च ॥ ४ ॥ उषसे भूतपतये दद्याच्चोत्तरतस्ततः ॥ स्वधानम इत्युक्त्वा पितृभ्यश्चापि दक्षिणे ॥ ५ ॥ कृत्वापसव्यं वायव्यां यक्ष्मै तत्रावनेजनम् ॥ ततस्तोयमुपादाय तेषां नाम्ना क्षिपेद्भुवि ॥ ६ ॥ इति ॥ विष्णुपुराणेऽप्येवं होममुक्त्वा बलौ विशेष उक्तः ॥ तच्छेषं मणिके पृथ्वीपर्जन्याभ्यः क्षिपेत्ततः ॥ द्वारे धातुर्विधातुश्च मध्ये च ब्रह्मणः क्षिपेत् ॥ १ ॥ इंद्राय धर्मराजाय वरुणाय तथेंदवे ॥ प्राच्यादिषु बुधो दद्याद्धुतशेषात्मकं बलिम् ॥ २ ॥ प्रागुत्तरे च दिग्भागे धन्वंतरिबलिं विदुः ॥ वायव्ये वायवे दिक्षु समास्तासु ततो दिशाम् ॥ ३ ॥ ब्रह्मणे चांतरिक्षाय भानवे च क्षिपेद्बलिम् ॥ विश्वेदेवान्विश्वभूतांस्ततो विश्वपतीन्पितृन् ॥ ४ ॥ यक्ष्माणं च समुद्दिश्य बलिं दद्यान्नरेश्वर ॥ कातीयसूत्रेऽपि इदमेव बलिहरणं किंचिन्न्यूनं ॥ तेन शूद्रेऽपीदमेव । तत्र । स्वाहाकारे नमस्कारो मंत्रः शूद्रे विधीयते इति भारतोक्तेर्होमे स्वाहाशब्दो बलौ नमः शब्द इति स्मृतिकौमुदी ॥ तन्न । नमस्कारेण मंत्रेणेत्येतद्विरोधात् । तच्च बलिदानं गृहदेशेषु कार्यम् । अग्नेः पश्चाद्वा ॥

यानंतर वैश्वदेव सांगतो.

याविषयीं **शंख** ह्मणतो कीं,—"गृहस्थानें प्रतिदिनीं पंचमहायज्ञ चुकवूं नयेत." पंचयज्ञांविषयीं **यम** ह्मणतो—"ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ; आणि मनुष्ययज्ञ यांस पंचमहायज्ञ ह्मणतात. सर्वांस मिळून वैश्वदेव असें ह्मणावें. तो लौकिकाग्नींत करावा. "वैवाहिकाग्नींत करावा," असें आचार्यांचें मत आहे असें **विज्ञानेश्वर**

१ "वैवाहिक अग्नि" ह्मणजे लग्नांत विवाहहोम होतो त्या वेळीं जो अग्नि सिद्ध करितात तो धर्मशास्त्रांतही आजन्मपर्यंत असावा असें सांगितलें आहे. यास गृह्याग्नि अथवा स्मार्ताग्नि असें ह्मणतात.

ह्मणतो. यासाठींच **तंत्ररत्नां**त "स्थपतीष्टि लौकिकाग्नींत करावी," असें सांगितलें आहे. जे लौकिकाग्नींतही शूद्रांस वैश्वदेव करण्याचा अधिकार नाहीं 'असें ह्मणतात; ते केवळ मूर्खच होत. हें मीच ह्मणतों असें नाहीं तर **विज्ञानेश्वर, अपरार्क, मेधातिथि** हेही असेंच ह्मणतात. लौकिकाग्नींत करणें तोही ज्यावर स्वयंपाक केला असेल त्यांत करावा; कारण, अग्निहोत्र्यांनीं श्रौताग्नींत व इतरांनीं गृह्याग्नींत तोही नसल्यास लौकिकाग्नींत नित्य वैश्वदेव करावा. परंतु "ज्यावर पाक होतो त्यांत न करितां अन्यत्र करूं नये," असी **मनूक्ति** आहे. याच्या असंभवीं **शातातप** ह्मणतो—"लौकिक किंवा वैदिकाग्नींत, उदकांत किंवा भूमीवर, पंचसूनादोषनिवारणार्थ वैश्वदेव करावा" तो पक्वान्नानेंच करावा, नाहींपेक्षां "स्थपतीष्टिवत् तेथेंहि आमान्न ग्रहण होईल," असें कित्येक ह्मणतात. पक्वान्नास उच्छिष्ट ह्मटलें आहे. (पृ० ५३ पं० २५ पहा.) ह्मणून, "शूद्रानें स्वतः आमान्नानेंच करावा," असें **स्मार्तगौड** ह्मणतात. वैश्वदेवाचे प्रकार **मन्वादिकां**नीं अनेक सांगितले आहेत. त्यांत **मनूक्त** पक्ष निरग्निद्विजपर आहे. "शूद्रास **कातीयसूत्रा**नुसार कर्म करण्यास सांगितलें आहे" ह्मणून, "गृह्याग्नीवांचून अधिकार सिद्ध होत नाहीं," असें **स्मृतिकौमुदीकर्ता** ह्मणतो, तें योग्य नाहीं. कारण, कातीयसूत्रानुसार वागणारा असून, तो निरग्नि असेल तर त्याला **शाकलमंत्रां**नीं, होमादिक करण्यास सांगितलें आहे. तेंच **मदनपारिजातां**त **वसिष्ट** सांगतो—"जो ब्राह्मण निरग्निक असेल, त्यानें स्वतः व्याहृति, व **शाकलमंत्रां**नीं हवन करून, हुतशेष अन्नांतून भूतबलि द्यावा." "**देवकृतस्यैनसो० ६**" यांस शाकलमंत्र ह्मणतात. शूद्रासही पूर्वी सांगितल्या रीतीनें **कातीयसूत्रा**नुसार कर्म करण्यास सांगितलें असून मंत्रोच्चाराचा अधिकार नाहीं ह्मणून, त्यानें या देवतांच्या नामांनीं होम करणें उचित आहे. **मनु**कथित पक्ष मात्र योग्य नाहीं. कारण, शूद्रास वेदश्रवण करण्याचा अधिकार नसल्यानें तत्संबंधी कर्माचा अधिकार नाहीं. यावरून ज्या **कठादिकां**स स्वशाखेंत वैश्वदेव उक्त नाहीं, त्यांस **मनु**प्रोक्त विहित आहे. अथवा शूद्रांस पुराणश्रवणाधिकार आहे, यास्तव त्यांनीं पुराणोक्त वैश्वदेव करावा. तसेंच **मार्कंडेयपुराणां**त—"आचमनादि केल्यावर अग्निपूजन करून, क्रमानें आहुति द्याव्या." त्यांचे मंत्र—"**ब्रह्मणे नमः १, प्रजापतये नमः २, गृह्याभ्यो नमः ३, कश्यपाय नमः ४, अनुमतये नमः** ५ या पांच अग्नींत घालाव्या. नंतर गृहबलि द्यावा. तो—**पर्जन्याय नमः। अंभोभ्यो नमः। धरित्र्यै नमः** या ३ मंत्रांनीं मणिकांत (मडक्यांत) देऊन **वायवे नमः** क्रमानें पूर्वादिक चार दिशांस आणि प्रतिदिशांस—**ब्रह्मणे नमः। अंतरिक्षाय नमः। सूर्याय नमः। विश्वेभ्यो देवेभ्यो नमः। विश्वभूतेभ्यो नमः। उषसे नमः। भूतपतये नमः। उत्तरेस पितृभ्यः स्वधा नमः।** दक्षिणेस, मग अपसव्य करून, वायव्येस यक्ष्मतर्पण करावें. मग ज्यांस आहुति दिल्या असतील, त्यांच्या नामानें भूमीवर उदक सोडावें," असा प्रयोग सांगितला आहे. **विष्णुपुराणां**तही पूर्ववत् होम सांगून, बलिहरणांत विशेष सांगितला तो—"हुतशेषांतून शेषान्नानें मणिकांत पृथ्वी, पर्जन्य, व उदक यांस

आहुति देऊन, द्वारांत धाता १, विधाता २, मध्यें ब्रह्मा, पूर्वेस इंद्र, दक्षिणेस धर्मराज, पश्चिमेस वरुण, उत्तरेस चंद्र, असा हुतशेष बलि देऊन, ईशान्येस धन्वंतरि, वायव्येस वायु, ब्रह्मा, अंतरिक्ष, सूर्य, विश्वेदेव, विश्वहुत, विश्वपति, पितर, व यक्ष्मा, यांस उद्देशून बलि द्यावा." **कातीयसूत्रां**तही हेंच बलिहरण कांहीं कर्मी सांगितलें आहे. यावरून शूद्रांसही हेंच उक्त आहे. त्यांत "स्वाहाशब्दस्थानीं शूद्रास नमःशब्दाचें विधान करितो," असें **भारत**वचन आहे. यास्तव, "होमांत स्वाहा शब्द व बलिहरणांत नमःशब्द योजावा," असें **स्मृतिकौमुदीं**त सांगितलें आहे; तें योग्य नाहीं. कारण "नमस्कारमन्त्रानें०" (पृ० ५१ पं० १६) या वचनाशीं विरोध येतो ह्मणून. तें बलिदान घरच्या एका प्रदेशांत किंवा अग्नीमागें करावें. **इति वैश्वदेवविचारः ॥**

## ॥ अथ प्रयोगः ॥

दर्भहस्तः आचम्य तूष्णीं प्राणानायम्य वा देशकालौ स्मृत्वा **पंचसूनापनुत्तये** परमेश्वरप्रीत्यर्थं वैश्वदेवं करिष्ये इति संकल्प्य । स्थंडिलं **संमृज्योपलिप्योल्लिख्यांगुष्ठानामिकाभ्यां मृदमुद्धृत्याभ्युक्ष्य** लौकिकाग्निं संस्थाप्य **अग्नये नमः । मुखं यः सर्वदेवानां** हव्यभुक्कव्यभुक् तथा ॥ पितॄणां च नमस्तस्मै विष्णवे पावकात्मने ॥ इति **संपूज्य पर्युक्ष्याग्नौ** चरुपाकं कृत्वा गृहान्नेन तंडुलैराज्यप्लुतैः फलैर्वा कुर्यात् ॥ **तद्द्रव्यमग्नौ निधायोद्वास्याभ्युक्ष्य** हस्तेन घृतप्लुतं जुहुयात् । **आहुतीर्द्वादशपर्वपूरिकाः । आमलकमात्रा वा** । यथा । **अग्नये नमः** । इदमग्नये नममेति त्यागः ॥ **एवमग्रेपि । वायवे नमः । सूर्याय नमः** । प्रजापतये नमः । **अग्नये नमः** । ब्रह्मणे नमः । इति षट् ॥ इति शाकलहोमः । अथ पौराणः ॥ ब्रह्मणे नमः । प्रजापतये नमः । गृह्याभ्यो नमः । कश्यपाय नमः । अनुमतये नमः । विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । **अग्नये स्विष्टकृते नमः** । इति । ततः पर्युक्ष्य विभूतिं धृत्वा नमस्कुर्यात् ॥ **विज्ञानेश्वरमते** । देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै **स्वधायै नित्यमेव नमो नम इत्येतेन सकृद्धोमः** ॥ नम इत्येव मंत्रेण होम इत्येके ॥ **मदनपारिजाते परिशिष्टे** ॥ शाकं वा यदि वा पत्रं मूलं वा यदि वा फलम् ॥ **संकल्पयेद्यदाहारे तेनाग्नौ जुहुयादपि** ॥ १ ॥ **व्यासः** । जुहुयात्सर्पिषाभ्यक्तं तैलक्षारविवर्जितम् ॥ **दध्यक्तं पयसाभ्यक्तं तदभावेंभसापि वा** ॥ १ ॥ **चतुर्विंशतिमते** । अलाभे येनकेनापि फलशाकोदकादिभिः ॥ पयोदधिघृतैः कुर्याद्वैश्वदेवं स्रुवेण तु ॥ १ ॥ **हस्तेनामादिभिः कुर्याद्भिरंजलिना जले** ॥ इति देवयज्ञः ॥

आतां वैश्वदेवप्रयोग सांगतो.

पवित्रहस्त असून, आचमन करून, तूष्णीं प्राणायाम करून,—**पंचसूनापनुत्तये श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं वैश्वदेवं करिष्ये** । असा संकल्प करून, स्थंडिलसंमार्जन करून, त्यावर शेणपाणी शिंपडून, उल्लेखन करून, अंगुष्ठ, व अनामिका यांनीं मृत्तिका उचलून उदकानें प्रोक्षून, तेथें लौकिकाग्नि स्थापून, "**अग्नये नमः । मुखं यः सर्वदेवानां हव्यभुक्कव्यभुक् तथा ॥ पितॄणां च नमस्तस्मै विष्णवे पावका-**

**त्मने"** ॥ १ ॥ यानें त्यांचें पूजन करून, अग्नीवर चरु करून, किंवा घरांत शिजलेल्या अन्नानें किंवा आज्ययुक्त तांदुळांनीं किंवा फळांनीं वैश्वदेव करावा. यापैकीं जें होमद्रव्य घेतलें असेल तें अग्नीवर ठेवून, खालीं घेऊन, उदकानें प्रोक्षून, त्यास तूप लावून, उजव्या हातानें हवन करावें. आहुति द्यावी ती, अंगुष्ठावांचून ४ अंगुलीवर राहील एवढ्या प्रमाणाची किंवा आवळ्याएवढी असावी. हवन करणें तें असें कीं,—"**अग्नये नमः**" या मंत्रानें हवन करून, "**इदमग्नये नमः**" ह्मणून त्याग करावा. असेंच पुढेंहि करावें. "**वायवे नमः । सूर्याय नमः । प्रजापतये नमः । अग्नये नमः । ब्रह्मणे नमः ।**" या ६ मंत्रांनीं हवन करावें. हा **शाकलमंत्रो**क्त देवताहोम होय. पुढें पौराण—"**ब्रह्मणे नमः । गृह्याभ्यो नमः । कश्यपाय नमः । अनुमतये नमः । विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । अग्नये नमः । स्विष्टकृते नमः** " । या ७ नीं हवन करून, पुनः पर्युक्षण करून, विभूतिधारण करून, अग्नीस नमस्कार करावा. **विज्ञानेश्वर**मतीं—"**देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै स्वधायै नित्यमेव नमो नमः**" यानें एकच वेळ होम करावा असें आहे. केवळ—"नमः" यानें हवन करावें असें **कित्येक** ह्मणतात. **मदनपारिजातांत परिशिष्टांत**—"शाक, पत्र, मूल, फल, अथवा जें आपण, भोजनास संकल्पित असेल, त्यानें वैश्वदेव करावा," असें सांगितलें आहे. अन्नहोमाविषयीं **व्यास** ह्मणतो,—"ज्याचें हवन करणार तें अन्न तेलकट नसावें व क्षार[1] वगैरे नसून तूप, त्याच्या अभावीं दहीं, किंवा दूध, यांच्या अभावीं उदक यांनीं युक्त असावें," **चतुर्विंशतिमतां**त "अन्न न मिळाल्यास जें मिळेल त्यानें, अथवा फल, शाक, उदक, दूध, दहीं, तूप, यांनीं वैश्वदेव करावा. प्रवाही द्रव्य असेल तर स्रुव्यानें, व अन्नादि असल्यास हस्तानें हवन करावें. पूर्वोक्त द्रव्य न मिळाल्यास उदकानें वैश्वदेव करावा. तसा कर्तव्य असल्यास पूर्वोक्त मंत्रोच्चार करून ओंजळीनें पाणी घेऊन, तें पाण्यांत सोडावें. अग्नीवर करूं नये." एथपर्यंत देवयज्ञ झाला. **इति देवयज्ञः ॥**

## ॥ अथ भूतयज्ञः ॥

**मध्ये पर्जन्याय नमः । अद्भ्यो नमः । पृथिव्यै नमः । द्वारशाखयोः धात्रे नमः । इदं धात्रे न ममेति त्यागः ॥ एवमग्रेपि । विधात्रे नमः । प्रदिशम् वायवे नमः । प्रतिदिशं दिग्भ्यो नमः । इंद्राय नमः । धर्मराजाय नमः । वरुणाय नमः । इंदवे नमः । ईशान्याम् धन्वंतरये नमः । वायव्याम् वायवे नमः । ब्रह्मणे नमः । अंतरिक्षाय नमः । सूर्याय नमः । उत्तरे विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । विश्वेभ्यो भूतेभ्यो नमः । भूतानां पतये नमः । ततः दक्षिणे । प्राचीनावीती । पितृभ्यः स्वधा नमः । इदं**

---

१ "क्षार" ह्या शब्दाचा खारट, असा अर्थ होतो. परंतु **गार्ग्यनारायणानें**—"वाटाणे, चवळ्या, उडीद, मूग, मसुरा, पावटे व तीळ इत्यादिकांस क्षारसंज्ञा आहे," असें सांगितलें आहे. याविषयीं **आश्वलायन** गृ० सू० १० कं० ८ अ० १ यावरची **वृत्ति** पहा.

पितृभ्यः । जलस्पर्शः । अयं कातीयपक्षः पौराणश्च । स्वधाशब्दो नेत्येके । पात्रं प्रक्षाल्य । वायव्ये यक्ष्मैतत्ते इति निनयेत् ॥ इदं यक्ष्मणे । अथवा । देवताभ्यः पितृभ्यश्चेत्यनेनैव भूमौ बलिः । तेनैव पितृयज्ञ इत्येके । आचार्यचूडामणौ तु । ॐ भूःस्वाहेति विप्रेणोक्ते नमोनम इति स्वयं जुहुयात् । एवं व्यस्ताः समस्ताश्च । ततो देवकृतस्यैनसोवयजनमसि स्वाहेति विप्रेणोक्ते नम इति स्वयं होमः ॥ तन्न ॥ नमस्कारेण वैदिकबाधात् ॥ अग्नय इदं एवं पट् ॥ ततो यमाय स्विष्टकृते च । भूमौ विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । सर्वेभ्यो भूतेभ्यो नमः । पितृभ्यो नम इति दक्षिणे ॥ ऐशाने यक्ष्मैतत्ते पौराणैरेकः । चांडालादिभ्यो वायसेभ्यश्च ॥ दक्षिणे धर्मराजचित्रगुप्ताभ्यां दद्यादित्युक्तम् ॥ ततः शेषमादाय गृहांगणे प्रोक्ष्य १८ धन्वंतरये नमः । १० प्राच्यै दिशे नमः । ५ विधात्रे नमः । ६ वायवे नमः । १३ उदीच्यै नमः । २२ सूर्याय नमः । १४ इंद्राय नमः । ९ वायवे नमः । २७ विश्वपतये नमः । २१ अंतरिक्षाय नमः । ४ धात्रे नमः । १७ इंदवे नमः । २६ भूपतये नमः । २० ब्रह्मणे नमः । ११ दक्षिणायै नमः । १८ वायवे नमः । २५ विश्वेभ्यो भूतेभ्यो नमः । ३ पृथिव्यै नमः । ७ वायवे नमः । २४ यक्ष्मणे नमः । २३ विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । २ अंत्यः । १५ धर्मराजाय नमः । १२ प्रतीच्यै नमः । १ पर्जन्याय नमः । २ स्वधा पितृभ्यः । ८ वायवे नमः । १५ वरुणाय नमः । द्वौ श्वानौ श्यामशबलौ वैवस्वतकुलोद्भवौ ॥ ताभ्यां पिंडं प्रदास्यामि स्यातामेतावहिंसकौ । श्वभ्यां नमः । इति दत्वा । पुनरादाय । ऐंद्रवारुणवायव्याः याम्या वै नैर्ऋतास्तथा ॥ वायसाः प्रतिगृह्णंतु भूमौ पिंडं मयार्पितमिति काकबलिं दत्वा । इदं वायसेभ्यः इत्युक्त्वा । पुनरादाय विष्णुपुराणोक्तमंत्रैर्बलीन् दद्यात् । यथा ॥ देवा मनुष्याः पशवो वयांसि सिद्धाः सयक्षोरगदैत्यसंघाः ॥ प्रेताः पिशाचास्तरवः समस्ता ये चान्नमिच्छंति मया प्रदत्तम् ॥ १ ॥ इदं देवादिभ्यः । पिपीलिकाः कीटपतंगकाद्या बुभुक्षिताः कर्मनिबंधबद्धाः ॥ प्रयांतु ते तृप्तिमिदं मयान्नं तेभ्यो विसृष्टं सुखिनो भवंतु ॥ २ ॥ इदं पिपीलिकादिभ्यः । येषां न माता न पिता न बंधुर्नैवान्नसिद्धिर्न तथान्नमस्ति ॥ तत्तृप्तयेऽन्नं भुवि दत्तमेतत्ते यांतु तृप्तिं मुदिता भवंतु ॥ ३ ॥ इदमनाथबंधुभ्यः । भूतानि सर्वाणि तथान्नमेतदहं च विष्णुर्न यतोऽन्यदस्ति ॥ तस्मादहं भूतनिकायभूतमन्नं प्रयच्छामि भवाय तेषाम् ॥ ४ ॥ इदं भूतेभ्यः । चतुर्दशो भूतगणो य एष तत्र स्थिता ये खलु भूतसंघाः ॥ तृप्त्यर्थमन्नं हि मया विसृष्टं तेषामिदं ते मुदिता भवंतु ॥ ५ ॥ इदं भूतगणादिभ्यः । इत्युच्चार्य नरो दद्यादन्नं श्रद्धासमन्वितः ॥ भुवि भूतोपकाराय गृही सर्वाश्रयो यतः ॥ ६ ॥ श्वचांडालविहंगानां भुवि दद्यात्ततो नरः ॥ ये चान्ये पतिताः केचिदपुत्रा भुवि मानवाः ॥ ७ ॥ ततो गोदोहमात्रं वै कालं तिष्ठेत् गृहांगण इति ॥ ततः कुस्यादिपतितपापरोगिश्वपचादिभ्यो दद्यादिति नागदेवाह्निके हरिहरभाष्ये च ॥ तदेतद्वैश्वदेवं द्विजानां यद्यपि सायंप्रातरुक्तं तथापि शूद्राणां दिवैव न तु सायम् ॥ पंचयज्ञोक्तेः ॥ वैश्वदेवविध्यभावात् ॥ तदाह मदनपारिजाते जमदग्निः ॥ वैश्वदेवं दिवा

**रात्रौ कुर्याद्बलिहृतिं तथा ॥ महतः पञ्चयज्ञांस्तु दिवैवेत्याह धर्मवित् ॥ २ ॥ तेन रात्रौ वैश्वदेवः पञ्चयज्ञभिन्नत्वान्न शूद्रस्येति संक्षेपः ॥ इति वैश्वदेवः ॥**

आतां भूतयज्ञ सांगतो.

तो असा कीं,—भूमीवर मंडल करून—मध्यभागीं, "**पर्जन्याय नमः । अद्भ्यो नमः । पृथिव्यै नमः**" । मंडळद्वाराच्या शेवटीं—"**धात्रे नमः । विधात्रे नमः**" । वायव्येस "**वायवे नमः** । पूर्वेस—**इंद्राय नमः** । दक्षिणेस—**धर्मराजाय नमः** । पश्चिमेस—**वरुणाय नमः** । उत्तरेस—**इंदवे नमः** । ईशान्येस—**धन्वंतरये नमः** । वायव्येस—**वायवे नमः । ब्रह्मणे नमः । अंतरिक्षाय नमः । सूर्याय नमः**" । उत्तरेस—**विश्वेभ्यो देवेभ्यो नमः । विश्वेभ्यो भूतेभ्यो नमः । भूतानां पतये नमः** । नंतर, अपसव्य करून, दक्षिणेस—"**पितृभ्यः स्वधा नमः । इदं पितृभ्यः**" ह्मणून त्याग करून, उदकस्पर्श करावा. हा **कातीय** व **पौराणपक्ष** आहे. "येथें पितृयज्ञांत स्वधाशब्द नसावा," असें **कित्येक** ह्मणतात. नंतर, होमद्रव्याचें पात्र धुवून, वायव्येस तें उदक—"**यक्ष्मैतत्ते नमः**" । ह्मणून सोडावें. "**इदं यक्ष्मणे**" असा त्याग ह्मणावा. किंवा "**देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै स्वधायै नित्यमेव नमो नमः ॥ १ ॥** या मंत्रानेंच भूमीवर बलि द्यावा; ह्मणजे त्यानेंच पितृयज्ञ होतो," असें **कित्येक** ह्मणतात. **आचार्यचूडामणींत**,—"**ॐ भूः स्वाहा**" असें ब्राह्मणानें ह्मटल्यावर, शूद्रानें "**नमो नमः**" ह्मणून आपण होम करावा. असाच व्यस्त, व समस्त व्याहृति ब्राह्मणाकरवीं ह्मणवून, आपण पूर्ववत् होम करावा. नंतर—"**देवकृतस्यैनसोवयजनमसि स्वाहा**" हा मंत्र ब्राह्मणानें ह्मटल्यावर—"**नमः** ह्मणून आपण होम करावा" असें सांगितलें आहे. तें योग्य नाहीं; कारण, शूद्रांस **नमः** मंत्रविधानानें वैदिकमंत्र बाधित आहे. नंतर "**अग्नये इदं**" असें ६ नंतर **यमाय स्विष्टकृते** व भूमीवर, **विश्वेभ्यो देवेभ्यः । सर्वेभ्यो भूतेभ्योनमः । पितृभ्यो नमः** । ह्मणून दक्षिणेस, ईशान्येस **यक्ष्मैतत्ते** ह्मणून उदकनिनयन करून, पौराणमंत्रांनीं आहुति द्यावी, व चांडालादिकांस आणि वायसांस बलि द्यावा. "दक्षिणेस धर्मराज व चित्रगुप्तास बलि द्यावे," असें सांगितलें आहे. नंतर हुतशेषान्न ग्रहण करून, गृहांगणांत भूमि प्रोक्षून, तेथें—"**धन्वंतरये १६ प्राच्यै दिशे १० विधात्रे ५ वायव्ये ६ उदीच्यै १३ सूर्याय २२ इंद्राय १४ वायवे ९ विश्वपतये २७ अंतरिक्षाय २१ धात्रे ४ इंदवे १७ भूपतये २६ ब्रह्मणे २० दक्षिणायै ११ वायवे १२ विश्वेभ्यो भूतेभ्यः २५ पृथिव्यै ३ वायवे ७ वायवे २४ यक्ष्मणे १९ विश्वेभ्यो भूतेभ्यः २३ अद्भ्यः २ धर्मराजाय १५ प्रतीच्यै १२ पर्जन्याय १ स्वधापितृभ्यः २ वायवे नमः पितृभ्यः ८ वरुणाय १५**" नंतर—"**द्वौ श्वानौ श्यामशबलौ वैवस्वतकुलोद्भवौ ॥ ताभ्यां पिंडं प्रदास्यामि स्यातामेतावहिंसकौ" ॥ १ ॥ श्वभ्यां नमः ॥** ह्मणून श्वानबलि देऊन, पुनः अन्न घेऊन, "**ऐंद्रवारुणवायव्या सौम्या**

**वै नैर्ऋतास्तथा ॥ वायसाः प्रतिगृह्णंतु भूमौ पिंडं मयार्पितम्" ॥ १ ॥** ह्मणून काकबलि देऊन, **इदं वायसेभ्यः** ह्मणून त्याग करावा. पुनः अन्न घेऊन **विष्णुपुराणोक्त**, मंत्रांनीं बलि द्यावे. ते मंत्र—**"देवा मनुष्याः पशवो वयांसि सिद्धाः सयक्षोरगदैत्यसंघाः ॥ प्रेताः पिशाचास्तरवः समस्ता ये चान्नमिच्छंति मया प्रदत्तम्" ॥ १ ॥** ह्मणून बलि देऊन, **इदं देवादिभ्यः** असा त्याग ह्मणावा. **"पिपीलिकाः कीटपतंगकाद्या बुभुक्षिताः कर्मनिबंधबद्धाः ॥ प्रयांतु ते तृप्तिमिदं मयान्नं तेभ्यो विसृष्टं सुखिनो भवंतु" ॥ २ ॥** ह्मणून, बलि देऊन, **इदं पिपीलिकादिभ्यः** ह्मणून त्याग करावा. **"येषां न माता न पिता न बंधुर्नैवान्नसिद्धिर्न तथान्नमस्ति ॥ तत्तृप्तयेऽन्नं भुवि दत्तमेतत्ते यांतु तृप्तिं मुदिता भवंतु" ॥ ३ ॥** ह्मणून, बलि देऊन, **इदमनाथबंधुभ्यः** ह्मणून त्याग करावा. **"भूतानि सर्वाणि तथान्नमेतदहं च विष्णुर्न यतोऽन्यदस्ति ॥ तस्मादहं भूतनिकायभूतमन्नं प्रयच्छामि भवाय तेषां" ॥ ४ ॥** ह्मणून बलि देऊन, **इदं भूतेभ्यः** असा त्याग ह्मणावा. **"चतुर्दशो भूतगणो य एष तत्र स्थिता ये खलु भूतसंघाः ॥ तृप्त्यर्थमन्नं हि मया विसृष्टं तेषामिदं ते मुदिता भवंतु ॥ ५ ॥** ह्मणून, बलि देऊन **इदं भूतगणादिभ्यः** असा त्याग ह्मणावा. कारण, प्राणिमात्रांवर उपकार करण्याकरितां आपण गृहस्थाश्रम घेतला आहे, व गृहस्थ सर्वांला आश्रयभूत आहे. नंतर कुत्रे, चांडाळ, पक्षी, यांस भूमीवर अन्न द्यावें, व अन्य जे अपुत्र असून मरण पावले असतील व पतित असतील त्यांसहि द्यावें. नंतर "गायीची धार काढण्याच्या वेळाइतकें अंगणांत राहून अतिथीची वाट पहावी," असें सांगितलें आहे. "नंतर कृम्यादि पतित, पापरोगी, श्वपच इत्यादिकांस अन्न द्यावें," असें **नागदेव**कृत **आह्निकांत व हरिहरभाष्यांत** सांगितलें आहे. असाच हा वैश्वदेव जरी ब्राह्मणांस सायंकालीं व प्रातःकालीं निरनिराळा करण्यास सांगितला आहे, तथापि शूद्रांस दिवसाच करण्यास विहित आहे, सायंकालीं नाहीं; कारण, शूद्रांस वैश्वदेव करण्याचा विधि नसून, केवळ पंचमहायज्ञ मात्र करण्यास अधिकार आहे, व रात्रीं पंचमहायज्ञ होत नाहींत. हेंच **मदनपारिजातां**त **जमदग्नीनें** सांगितलें आहे. तें—"रात्रीं वैश्वदेव व बलिहरण करावें. पंचमहायज्ञ दिवसासच करावे, असें धर्मवेत्ते सांगतात." यावरून, रात्रीं केवल वैश्वदेवच होतो तो पंचयज्ञांहून भिन्न असल्यावरून शूद्रास विहित नाहीं. हें संक्षेपतः वर्णिलें आहे. **इति वैश्वदेवः ॥**

## ॥ अथ नित्यश्राद्धम् ॥

तत् पृथक् कार्यं न वा । श्राद्धं वा पितृयज्ञः स्यात्पित्र्यो बलिरथापि वेति छंदोगपरिशिष्टात् ॥ मनुः ॥ एकमप्याशयेद्विप्रं गृही नित्यं समाहितः ॥ प्रचेताः ॥ नामंत्रणं न होमश्च नावाहनविसर्जने ॥ न पिंडदानं न सुरा नित्ये कुर्याद्द्विजोत्तमः ॥ २ ॥ व्यासः ॥ नावाहनं स्वधाकारः पिंडाग्नौकरणादिकम् ॥ ब्रह्मचर्यादिनियमो विश्वेदेवास्त-

**थैव च ॥ तत्तु षट्पुरुषं ज्ञेयं दक्षिणापिंडवर्जितम् ॥ दक्षिणायां विकल्पः । किंचिद्दत्वा विसर्जयेदिति प्रचेतसोक्तेः ॥**

यानंतर नित्यश्राद्धविचार सांगतो.

तें, निराळें ( पंचमहायज्ञांत पितृयज्ञ आहे तद्भिन्न ) करावें किंवा न करावें. कारण, "नित्यश्राद्ध हाच पितृयज्ञ; अथवा पंचमहायज्ञांतर्गत पितृबलीनेंच सिद्ध होतें, अथवा भिन्नही होतें" असें **छंदोगपरिशिष्टां**त सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो—"पूर्वोक्त सहांतून, १ ब्राह्मणास तरी प्रतिदिवशीं गृहस्थानें भोजन द्यावें." **प्रचेता** ह्मणतो—"नित्य श्राद्धांत ब्राह्मणांस आमंत्रण, अग्नौकरण, आवाहन, विसर्जन, पिंडदान, व देव-स्थानीय ब्राह्मण हें नसावें." **व्यास** ह्मणतो—"आवाहन, स्वधाकार, पिंड, अग्नौ-करणादि, ब्रह्मचर्यादि नियम, व विश्वेदेव हे नित्यश्राद्धांत असूं नयेत; आणि तें षट्-दैवत व दक्षिणा आणि पिंडरहित असावें." नित्यश्राद्धांत दक्षिणेविषयीं विकल्प आहे. कारण पूर्वोक्त **व्यास**वचनांत तिचा निषेध आहे, तथापि—"कांहीं द्रव्य देऊन ब्राह्मण-विसर्जन करावें," असें **प्रचेत्या**नें सांगितलें आहे. या हेतूस्तव ब्राह्मणांस अल्प द्रव्य द्यावें. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे नित्यश्राद्धविचारः ॥**

## ॥ अथ प्रयोगः ॥

**आचम्य देशकालौ स्मृत्वा नित्यश्राद्धं करिष्य इत्युक्त्वा । अस्मत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यपगोत्राणाममुकदासानां । एवं मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानां सपत्नीकानां स्थाने क्षणः कर्तव्यः । इति क्षणं दत्वा । पित्रादयो मातामहाश्च इदं वः पाद्यमिति पाद्यं दत्वाचम्योदङ्मुखं कुशासने उपविश्य पितॄणां मातामहानां चेदमासनम् । पित्र्ये क्षणः क्रियताम् । प्राप्नोतु भवान् । प्राप्नवानि इत्युक्ते पितरो मातामहाश्च एष वो गंधः । इमानि पुष्पाणि । धूपो दीप आच्छादनं चेति दत्वा पूर्णतां वाचयित्वा । द्विगुणमामान्नमुपकल्प्य प्रोक्ष्य पात्रमालभ्य तिलान्विकीर्य अन्नेऽङ्गुष्ठं दत्वा । पितरः इदं वः आमान्नं द्विगुणं समं वा सोपस्करं गयेयं भूः गदाधरो विप्रः ब्रह्मरूपमिदं पितृभ्यः काश्यपगोत्रेभ्योऽमुकदासेभ्यो वसुरुद्रादित्यस्वरूपेभ्यस्तथा मातामहादिभ्यश्चेदमामं स्वधा संपद्यतां नमः ॥ दत्तमक्षय्यमस्तु । ब्रह्मार्पणमस्तु । मधु इति त्रिवारमुक्त्वा । सुप्रोक्षितमस्तु शिवा आपः संतु । सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु । दीर्घमायुः श्रेयः पितरः स्वस्तीति ब्रूत । पितॄणां यद्दत्तं तदक्षय्यमस्तु । दक्षिणां दद्यान्न वा ॥ एतावत्यशक्तौ पित्र्यबलिनैव नित्यश्राद्धसिद्धिः ॥ इति नित्यश्राद्धम् ॥**

अनंतर नित्यश्राद्धप्रयोग सांगतो.

आचमन, व देशकालसंकीर्तन करून—**नित्यश्राद्धं करिष्ये ।** ह्मणून,—**अस्मत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यपगोत्राणां अमुकदासानां ।** असेंच—**मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानां,स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः ।** ह्मणून दर्भ द्यावा. ब्राह्मणांनीं—**सुकर्तव्यः** असें प्रतिवचन द्यावें. **पित्रादयो**

**मातामहाश्च इदं वः पाद्यं ।** म्हणून पाद्य देऊन, आचमन करून, उत्तराभिमुख दर्भासनावर बसून, **पितॄणां मातामहानां चेदमासनं ।** म्हणून आसनार्थ दर्भ देऊन, **पित्रे क्षणः क्रियतां । प्राप्नोतु भवान् ।** असें म्हणावें. **प्राप्नवानि** असें ब्राह्मणांनीं (म्हटल्यावर—**पितरो मातामहाश्च एष वो गंधः । पितरो मातामहाश्च इमानि वः पुष्पाणि । पितरो मातामहाश्च एष वो धूपः । पितरो मातामहाश्च एष वो दीपः । पितरो मातामहाश्च एतदाच्छादनं ।** हे उपचार देऊन,—**पितरः मातामहाश्च एते आसनाद्यत्र गंधपुष्पधूपदीपाच्छादनांताः पंचोपचाराः सर्वे परिपूर्णा भवंतु ।** असें म्हणून, नमस्कार करावा. ब्राह्मणांनीं—**अर्चनविधिष्वर्चितमस्तु ।** असें म्हटल्यावर; पात्रांत द्विगुणित आमान्न कल्पून, तें प्रोक्षून, पात्रालंबन करून, तीळ विखरून, अन्नावर आंगठा ठेवून,—**पितरः इदं वः आमान्नं द्विगुणं** ( अथवा समं ) **सोपस्करं गयेयं भूः गदाधरो विप्रः ब्रह्मरूपमिदं पितृभ्यः काश्यपगोत्रेभ्योमुकदासेभ्यः वसुरुद्रादित्यस्वरूपेभ्यः । तथा मातामहादिभ्यश्चेदं आमं स्वधा संपद्यतां नमः । दत्तमक्षय्यमस्तु । ब्रह्मार्पणमस्तु ।** असें म्हणून तें ब्राह्मणास देऊन, मधु असें ३ वेळ म्हणून, **सुप्रोक्षितमस्तु । शिवा आपः संतु । सौमनस्यमस्तु । अक्षतं चारिष्टं चास्तु । दीर्घमायुः श्रेयः पितरः स्वस्तीति ब्रूत ॥** असें यजमानानें म्हटल्यावर,—**पितॄणां यद्दत्तं तदक्षय्यमस्तु ।** असें ब्राह्मणांनीं म्हणावें. ह्या श्राद्धांत दक्षिणा देणें हें वैकल्पिक आहे. एवढें विस्तृत श्राद्ध करण्यास असमर्थ असल्यास, पंचमहायज्ञांतर्गत पितृबलीनेंच नित्यश्राद्धसिद्धि होते. भिन्न करण्याचें आवश्यक नाहीं.

**॥ इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे नित्यश्राद्धम् ॥**

## ॥ अथ मनुष्ययज्ञः ॥

हारीतः ॥ सर्वा अस्य देवता गृहानागच्छंति । यस्यैवं ब्राह्मणो विद्वान्गृहमभ्येति । तमभ्युपतिष्ठतः प्राणदेवता अपशमंति । बृहस्पतिः ॥ प्रीयते स्वागतेनाग्निरासनेन शतक्रतुः ॥ पितरः पादशौचेन भोजनेन प्रजापतिः ॥ याज्ञवल्क्यः ॥ १ ॥ अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः श्रोत्रियो वेदपारगः ॥ मान्यावेतौ गृहस्थस्य ब्रह्मलोकमभीप्सतः ॥ ११० ॥ अतिथिं श्रोत्रियं तृप्तमासीमांतमनुव्रजेत् [ या० स्मृ० अ० १ श्लोक ११२ ] यमः ॥ न पृच्छेद्गोत्रचरणं देशं नाम कुलं श्रुतम् ॥ अध्वनोऽभ्यागतं विप्रं भोजनार्थमुपस्थितम् ॥ १ ॥ विष्णुपुराणे ॥ दिनेऽतिथौ तु विमुखे गते यत्पातकं नृणाम् ॥ तदेवाष्टगुणं पुंसां सूर्ये च विमुखे गते ॥ १ ॥ सूर्यास्ते इत्यर्थः ॥ ततोऽतिथिं प्रतीक्ष्य पादौ प्रक्षाल्य संपूज्यामान्नं निवेद्य कस्मैचिद्विप्राय वा सनकादिमनुष्येभ्य इदं न ममेत्युक्त्वा दद्यात् ॥ इदं नित्यश्राद्धात्प्रागिति हरिहरः ॥ विष्णुपुराणे ॥ इष्टो वा यदि वा द्वेष्यो मूर्खः पंडित एव वा ॥ संप्राप्तो वैश्वदेवांते सोऽतिथिः स्वर्गसंक्रमः ॥ १ ॥ ततो गोग्रासः । मदनपारिजाते ऋष्यशृंगः ॥ गवां ग्रासं च कुर्वीत नित्यमेव समाहितः ॥ गवां कंडूयनं स्पर्शं ग्रासमाह्निकमेव च ॥ १ ॥ मंत्रस्तु ॥ सौरभेय्यः सर्वहिताः

**पवित्राः पापनाशनाः॥ प्रतिगृह्णंत्विमं ग्रासं गावस्त्रैलोक्यमातरः ॥ २ ॥ सुरभे त्वं जगन्मातर्देवि विष्णुपदे स्थिता ॥ ग्रासं गृहाण मद्दत्तं गोमातस्त्राप्तुमर्हसीति ॥ श्रीदत्तीये भविष्ये ॥ तृणोदकेन संयुक्तं प्रदद्याच्च गवाह्निकम् ॥ कपिलाशतदानस्य फलं विद्यान्न संशयः ॥ १ ॥ ( गवाह्निकमहोरात्रपर्याप्तं गोभक्ष्यम् ) मंत्रस्तु ॥ पंचभूते शिवे पुण्ये पवित्रे सूर्यसंभवे ॥ प्रतीच्छेमं मया दत्तं सौरभेयि नमोऽस्तु ते ॥ १ ॥**

आतां मनुष्ययज्ञ सांगतो.

याविषयीं **हारीत** ह्मणतो—"या गृहस्थाच्या गृहांत सर्वेही देवता येतात. ज्याच्या गृहास विद्वान् ब्राह्मण येतो. त्यास उत्थापनादिकेंकरून सत्कार केला असतां प्राणदेवता संतुष्ट होतात," **बृहस्पति** ह्मणतो—"ब्राह्मणांचें स्वागत[1] केल्यानें अग्नि, व त्यांस आसन दिल्यानें इंद्र, त्यांचे पाय धुतल्यानें पितर, आणि त्यांस भोजन दिल्यानें प्रजापति हे संतुष्ट होतात." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"मार्गस्थ जो कोणी आपल्या घरीं येईल तो अतिथि, व वेदपारंगत श्रोत्रिय हे दोघेहि ब्रह्मलोकेच्छु गृहस्थांस सर्वदा पूज्य आहेत. अतिथि, अथवा श्रोत्रिय भोजनादिकानें तृप्त झाल्यावर त्यांस गांवाच्या सीमेपर्यंत आपण पोंचवावें." **यम** ह्मणतो—"जो मार्गस्थ अतिथि भोजनास स्वगृहीं आला असेल, त्यास त्याचें गोत्र, शाखा, प्रवर, देश, नाम, व कुळ इत्यादि पुसूं[2] नये. अर्थात् इतर लक्षणांनीं तो कोण आहे तें जाणून, स्वकीय वर्णाचा अशी खात्री झाल्यास आपल्या पंक्तीस; नाहींतर अन्यत्र भोजन द्यावें. कारण, अज्ञातनामगोत्राशीं भोजन केरूं[3] नये असा निषेध आहे." **विष्णुपुराणां**त—"दिवसा अतिथि विमुख गेल्यास जें पाप लागतें त्याच्या आठपट रात्रीं विमुख गेल्यास लागतें;" असें सांगितलें आहे. नंतर, अतिथीची वाट पाहून अतिथि मिळाल्यास त्याची पादप्रक्षालनादि पूजा करून, त्यास अथवा अन्य कोणत्याहि ब्राह्मणास—**सनकादिमनुष्येभ्य इदं न मम ।** ह्मणून, आमान्न द्यावें. "हें नित्यश्राद्धापूर्वी करावें," असें **हरिहर** ह्मणतो. **विष्णुपुराणां**त—"मित्र, शत्रु, मूर्ख, पंडित किंवा अन्य जो कोणी वैश्वदेवांतीं स्वगृहीं

---

१. सुष्ठु आगत स्वागत—शब्दार्थ, चांगलें आगमन. कोणीही आपल्या घरीं आला असतां त्यास येतांच सत्कारपूर्वक, आनंदानें "तुह्मी आलां, फार चांगलें झालें," असें भाषण करणें; यासच स्वागत असें ह्मणतात.

२. याचें कारण बहुधा असें असावेंसें दिसतें कीं, जो पांथ येतो त्यास श्रम फार झालेला असतो. तशांत येतांच कुलगोत्रादि विचारल्यानें त्यास अधिक त्रास दिल्यासारिखा होतो, ह्मणून विचारूं नये असें सांगितलें आहे.

३. ज्याच्या कुल, गोत्र इत्यादिकांची आपणास पूर्ण माहिती नाहीं त्याच्या पंक्तीस बसूं नये, असेंच आहे असें नाहीं; तर पूर्वोक्त माहिती असली तथापि कोणींही कोणाच्या पंक्तीस बसूं नये; कारण, कोणाचें काय गुप्त पातक असेल तें कशानें समजावें? याकरितां पंक्तींत अग्नि, भस्म, खांब, उदक, दार अथवा जाण्यायेण्याचा रस्ता इत्यादिकानें पंक्तिभेद करावा, असें सांगितलें.

येईल तो अतिथि स्वर्गप्रद जाणावा," असें सांगितलें आहे. नंतर गोग्रास द्यावा. त्याविषयीं **मदनपारिजातांत ऋष्यशृंग** म्हणतो—"प्रतिदिवशीं स्वस्थपणानें गोग्रास द्यावा. अथवा तिला खाजवावें, नाहींपेक्षां तिला स्पर्श तरी करावा. त्याचे मंत्र,— **सौरभेय्यः सर्वहिताः पवित्राः पापनाशनाः ॥ प्रतिगृह्णंत्विमं ग्रासं गावस्त्रैलोक्यमातरः ॥ १ ॥ सुरभे त्वं जगन्मातर्देवि विष्णुपदे स्थिता ॥ ग्रासं गृहाण मद्दत्तं गोमातस्त्रातुमर्हसि" ॥ २ ॥ श्रीदत्तीयांत भविष्यपुराणांत** "पाणी, गवत, यांहीं युक्त असें गवान्हिक (रात्रदिवस तिला खाण्यास पुरे इतका चारा) प्रतिदिवशीं देणारास १०० कपिलादानाचें फल निःसंशय मिळतें," असें सांगितलें आहे. आह्निक देण्याचा मंत्र—"**पंचभूते शिवे पुण्ये पवित्रे सूर्यसंभवे ॥ प्रतीच्छेमं मया दत्तं सौरभेयि नमोऽस्तु ते" ॥ १ ॥ इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे मनुष्ययज्ञः ॥**

## ॥ अथ भोजनम् ॥

बालवृद्धगर्भिण्यातुरसखीबांधवादीन् संभोज्य पाणिपादं प्रक्षाल्य द्विराचम्य शुचौ देशे रहसि । चतुरस्रं त्रिकोणं च वर्तुलं चार्द्धचंद्रकम् ॥ कर्तव्यमानुपूर्व्येण ब्राह्मणादिषु मंडलमिति व्यासोक्तमर्धचंद्रं । शूद्रस्याभ्युक्षणं मतमिति शंखोक्तमभ्युक्षणं वा कृत्वा । पंचाशत्पलिकं कांस्यं ह्यधिकं भोजनाय वै ॥ गृहस्थैस्तु सदा कार्यमभावे हेमरूप्ययोरिति हेमाद्रावत्रिप्रोक्ते कांस्यादिपात्रे परिविष्टमन्नं प्राङ्मुखोपविष्टो मौनी घृताक्तं प्रोक्ष्य । धर्मराजाय नमः । चित्राय नमः । चित्रगुप्ताय नमः । प्रेतेभ्यो नम इति बलिं दक्षिणतो दत्वा जलं दत्वा । जलं प्राश्य देवतीर्थेन सांगुष्टेन तूष्णीं नम इत्येव वा पंचग्रासान् प्राश्य यथासुखं भुंजीयात् ॥ आदित्यपुराणे ॥ नोच्छिष्टो ग्राहयेदाज्यं जग्ध्वा शिष्टं न संत्यजेत् ॥ पुलस्त्यः ॥ भोजनं तु न निःशेषं कुर्यात्प्राज्ञः कथंचन ॥ अन्यत्र दधिक्षीराज्यक्षौद्रसक्तुभ्य एव च ॥ १ ॥ वृद्धमनुः ॥ नैकहस्तेन च जलं शूद्रेणावर्जितं पिबेदित्यादि द्विजवच्छूद्रे ज्ञेयम् ॥ देवलः ॥ भुक्तोच्छिष्टं समादाय सर्वस्मात्किंचिदाचमेत् ॥ उच्छिष्टभागधेयेभ्यः सोदकं निर्वपेद्भुवि ॥ १ ॥ भोजनांते पुनर्जलं प्राश्य शेषं सिंचेत् ॥ मंत्रस्तु ॥ रौरवे पूयनिलये पद्मार्बुदनिवासिनाम् ॥ अर्थिनामुदकं दत्तमक्षय्यमुपतिष्ठतु ॥ १ ॥ ततो मुखपाणिपादं प्रक्षाल्य द्विराचम्य जानुनी स्पृष्ट्वा पुनराचम्य ॥ अगस्तिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्वशेषम् ॥ सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छत्वरोगो मम चास्तु देहः ॥ १ ॥ अगस्त्यं कुंभकर्णं च शनिं च वडवानलम् ॥ आहारपरिपाकार्थं स्मरामि च वृकोदरं ॥ २ ॥ उदरं संस्पृश्य तांबूलं प्राश्य पुराणश्रवणादिनाऽहःशेषं नयेत् ॥ ततो रात्रौ रविपर्वसंक्रमव्यतीपातवैधृतिश्राद्धतत्पूर्वदिनभिन्नरात्रौ द्वितीयवारं भुक्त्वा यामोत्तरं ॥ अगस्त्याय नमः । माधवाय नमः । मुचकुंदाय नमः । कपिलाय नमः । आस्तिकाय नमः । इति नत्वा । प्राच्यां दक्षिणतो वा शिरः कृत्वा स्वपेत् ॥ तत्र स्त्रियां ऋतावाद्यदिनचतुष्कैकादशत्रयोदशवर्जषोडशदिनमध्ये चतुर्थीषष्ठ्यष्टमीचतुर्दशीपर्वद्वयश्राद्धतत्पूर्वदिनभिन्नायां रात्रौ

**शनिरविभौमवर्जं भरणीकृत्तिकार्द्रामघापूर्वाविशाखाज्येष्ठामूलपूर्वाषाढापूर्वाभाद्रपदात्रि-जन्मसंक्रमपातवैधृतिवर्जं समरात्रौ संगं कृत्वा मूत्राश्रिगुणं शौचं स्नानं च कुर्यात् ॥ एतच्च प्रागुक्तम् अनृतौ स्नानवर्जं कृत्वा स्वपेत् ॥ इदमाह्निकं प्रत्यहं कुर्यात् ॥ इति श्रीजग-द्गुरुनारायणभट्टसूनुरामकृष्णभट्टात्मजकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्राह्निकम् ॥**

यानंतर भोजनविधि सांगतो.

बाल, वृद्ध, गर्भिणी स्त्रिया, रोगी, मित्र, संबंधी इत्यादिकांस प्रथम भोजनास बसवून, हातपाय धुवून, शुद्ध प्रदेशांत एकांतीं "चतुष्कोण ब्राह्मणांनीं, त्रिकोण क्षत्रियांनीं, वर्तुल वैश्यांनीं आणि अर्धचंद्राकार शूद्रांनीं मंडल करावें," असें **व्यासोक्त** रीतीनें शूद्रास विहित आलेलें अर्धचंद्राकार मंडल, अथवा—"शूद्रानें केवळ उदकानें प्रोक्षण करावें," असें **शंखोक्त** अभ्युक्षण करून, त्यावर भोजनपात्र ठेवावें. तें—"५० पल (ह्मणजे २०० तोळे) वजनाचें कांसें, सोनें अथवा रुपें याचें असावें," असें **हेमाद्रींत अत्रीनें** सांगितलेल्या कांस्यादिपात्रांत वाढलेलें अन्न पूर्वेस बसून, मौन धरून, त्यावर तूप घालून, मग प्रोक्षून,—**धर्मराजाय नमः । चित्राय नमः । चित्रगुप्ताय नमः । प्रेतेभ्यो नमः ।** असे ४ बलि उजवेकडे देऊन, त्यावर उदक देऊन, उदक प्राशन करून, अंगुष्ठसहित देवतीर्थानें तूष्णीं अथवा "**नमः**" मंत्रानें ५ ग्रास मुखांत घेऊन, नंतर यथेच्छ भोजन करावें. **आदित्यपुराणां**त—"जेवीत असतां, वाम-हस्तानें तूप, दूध, व मीठ हीं घेऊं नयेत व त्यांस स्पर्शही करूं नये. केल्यास तीं उच्छिष्ट होतात. आणि कोणचाच पदार्थ कांहीं खाऊन अर्धाच टाकूं नये," असें सांगितलें आहे. **पुलस्त्य** ह्मणतो—"भोजन निःशेष करूं नये, परंतु दहीं, दूध, तूप, मध, सक्तु हीं मात्र निःशेष भक्षावीं." **वृद्धमनु** ह्मणतो—"भोजनकालीं एकाच हस्तानें उदक पिऊं नये. शूद्रानें आणलेलें पिऊं नये." इत्यादि ब्राह्मणांस जे नियम आहेत, तेच शूद्रांस आहेत, असें जाणावें. **देवल** ह्मणतो—"आपण भक्षून शेष राहिलेल्या अन्नांतून कांहीं घ्यावें व उत्तरापोशन करून, तें अन्न उदकसहित भूमीवर सोडून, उत्तरापोशनांतील अर्धे उदक पुढील मंत्रानें त्यावर द्यावें." तो-"**रौरवे पूयनि-लये पद्मार्बुदनिवासिनाम् । अर्थिनामुदकं दत्तमक्षय्यमुपतिष्ठतु**" ॥ १ ॥ नंतर तोंड, हात, व पाय, धुवून, दोन वेळ आचमन करून, गुडघ्यांस स्पर्श करून, पुनः आचमन करून, पुढील मंत्र—"**अगस्तिरग्निर्वडवानलश्च भुक्तं मयान्नं जरयत्व-शेषम् ॥ सुखं ममैतत्परिणामसंभवं यच्छत्वरोगो मम चास्तु देहः ॥ १ ॥ अगस्त्यं कुंभकर्णं च शनिं च वडवानलम् ॥ आहारपरिपाकार्थं स्मरामि च वृकोदरम्**" ॥ २ ॥ ह्मणून पोटावरून हात फिरवावा. नंतर विडा खाऊन, बाकी राहि-लेला दिवस पुराणश्रवणादिकानें घालवावा. नंतर रविवार, पौर्णिमा, अमावास्या, संक्रांति, व्यतीपात, वैधृति, श्राद्ध, व तत्पूर्वदिवस इतक्या दिवसीं भोजन करूं नये. यांवाचून इतर दिवशीं रात्रीं भोजन करून, सुमारें १ प्रहर रात्रीनंतर **अगस्त्याय नमः । माधवाय नमः । मुचकुंदाय नमः । कपिलाय नमः । आस्तिकाय**

**नमः ।** ह्मणून नमस्कार करून, पूर्वेस किंवा दक्षिणेस मस्तक करून निजावें. स्त्रीसंभोग करणें तो रजोदर्शनापासून प्रथमच्या ४ । ११ व १३ वी ह्या रात्री वर्ज्य करून सोळा दिवसांच्या आंत ४।६।८(१४।१५।३०) या तिथि, श्राद्ध व तत्पूर्व दिवस, शनि, रवि व मंगळवार, भरणी, कृत्तिका, आर्द्रा, मघा, पूर्वा, विशाखा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, आपलें जन्मनक्षत्र, तत्पूर्व व तदुत्तर असीं तीन, हीं नक्षत्रें, संक्रांति, व्यतीपात, वैधृति, इतके योग वर्ज्य करून, समरात्रींत स्त्रीसंग करावा. नंतर मूत्राच्या तिप्पट शौच करून, स्नान करावें, हें पूर्वी सांगितलें आहें. ऋतुकालावांचून ( १६ रात्रीनंतर ) स्नान न करितां मूत्रासारखें शौच करून निजावें. हें आन्हिक प्रतिदिवशीं करावें. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्राह्निकं समाप्तम् ॥**

## ॥ अथ शूद्रस्य पार्वणश्राद्धप्रयोगः ॥

### ( तत्र पूर्वदिनकृत्यम् )

**सचोपदेष्टृब्राह्मणवशादनियतशाखया कार्य इति मदनपालः ॥ तन्न ॥ अनियतस्य धर्मत्वायोगात् ॥ तेन शूद्रा वाजसनेयिन इति गौडग्रंथे दक्षोक्तेर्हरिहरभाष्यादिसंवादाच्छिष्टाचाराच्च माध्यंदिनशाखयोच्यते ॥ कर्ता पूर्वेद्युर्निरामिषं सकृत् भुक्त्वा । प्रदोषे परेद्युः प्रातर्वा द्विजगृहं गत्वा । मंडले तमुपवेश्य सव्येन दक्षिणं जान्वाच्य शूद्रः प्रणतिपूर्वकमिति वचनात्प्रणम्य देशकालौ स्मृत्वा । श्वः करिष्यमाणपार्वणश्राद्धे पित्रादित्रयमातामहादित्रयविश्वेदेवार्थं त्वामहं निमंत्रये ॥ यद्वा क्षणं दत्त्वा भवद्भिः प्रसादः कार्य इति फलं तांबूलं वा दत्वैकं द्वौ वा विप्रौ निमंत्र्य । तथा निमंत्रितोऽस्मीति वा तेनोक्ते ॥ अक्रोधनैः शौचपरैः सततं ब्रह्मचारिभिः ॥ भवितव्यं भवद्भिश्च मया च श्राद्धकर्मणि[1] ॥ १ ॥ पूर्वेदिनेतु । सर्वायासविनिर्मुक्तैः कामक्रोधविवर्जितैः ॥ भवद्भिर्भवितव्यं नः श्वोभूते श्राद्धकर्मणीति जपेच्छृणुयाद्वा ॥ ततस्तथैवापसव्येन वामं जान्वाच्य श्वः करिष्यमाणश्राद्धे पितृस्थाने त्वामहं निमंत्रये । निमंत्रितोऽस्मि ॥ एवं पितामहस्थाने प्रपितामहस्थाने च ॥ एवं मातामहादिस्थाने त्रय इति षट् वैश्वदेविके चत्वार इति दश ॥ तत्र वैश्वदेवपक्षेऽष्टौ ॥ एको दैवे तंत्रेण पित्रादावेको मातामहादावेक इति त्रयो वा ॥ यद्वा षण्णामेको दैवे चैक इति द्वौ तदामान्नं षोढा विभज्य यद्यपि दर्शे मातृमध्यं नवदैवत्यं मातामह्यंतं द्वादशदैवत्यं वा श्राद्धमुक्तमस्ति ॥ तथापि देशाचाराद्व्यवस्था ॥ षड्दैवतमेव तु बहुसंमतम् ॥ सर्वथा विप्रालाभे दर्भबटून्निधायापि श्राद्धं प्रेषप्रत्युक्तिपूर्वं कृत्वा तदामान्नं विप्राय दद्यादग्नौ वा क्षिपेत् ॥ सर्वत्रामंत्रितोऽस्मीति प्रत्युक्तिरक्रोधनैरिति च ॥**

यानंतर शूद्राचा पार्वणश्राद्धप्रयोग सांगतो.

तो, "याज्ञिक चालविणाऱ्या पुरोहिताची जी शाखा असेल, त्या शाखेनें करावा," असें **मदनपाल** ह्मणतो, तें योग्य नाहीं; कारण, जें अनियमित असेल त्यास धर्मत्वाचा

---

१ श्राद्धकारिणा इति पाठान्तरम् ॥

असंभव आहे. याकरितां—"शूद्र, वाजसनेयी होत," असें **गौडग्रंथांत** **दक्ष**वचन असून **हरिहरभाष्या**दिकांचाही तसाच अभिप्राय असून, शिष्टाचारि तदनुसारच आहे ह्मणून, हा प्रयोग, **माध्यंदिनीयशाखेनें** चालवावा. तो असा कीं,—श्राद्ध-कर्त्यानें पूर्व दिवशीं मांसरहित, एक वेळ दिवसाच जेवून, त्याच दिवसीं प्रदोषकालीं, किंवा श्राद्धदिवसीं प्रातःकाळीं ब्राह्मणांच्या घरीं जाऊन, मंडलावर त्यांस बसवून, डाव्या बाजूस उजवा हात गुडघ्यांतून घेऊन,—"शूद्रानें नमस्कारपूर्वक आमंत्रण द्यावें." असें **वचन** असल्यामुळें ब्राह्मणांस नमस्कार करून, देशकाल स्मरून—**श्वः करिष्य-माण**—(श्राद्धदिनीं आमंत्रण करायाचें असेल तर, **श्वः** येथें **अद्य** ह्मणावें) **पार्व-णश्राद्धे पितृत्रयमातामहादित्रयविश्वेदेवार्थं त्वामहं निमंत्रये।** असें ह्मणावें. अथवा हें ह्मणून क्षण देऊन,—**भवद्भिः प्रसादः कार्यः** ह्मणून फल किंवा तांबूल देऊन, एक किंवा दोन ब्राह्मणांस आमंत्रण देऊन, बहुत घरें (**अथवा निमंत्रि-तोस्मि**) असें त्यानें ह्मटल्यावर,—"**अक्रोधनैः शौचपरैः सततं ब्रह्मचारिभिः ॥ भवितव्यं भवद्भिश्च मया च श्राद्धकारिणा**" ॥ १ ॥ हा मंत्र ह्मणावा. पूर्व दिवसीं आमंत्रण करायाचें असेल तर, "**सर्वायासविनिर्मुक्तैः कामक्रोधविव-र्जितैः ॥ भवद्भिर्भवितव्यं नः श्वोभूते श्राद्धकर्मणि**" ॥ १ ॥ ह्मणून प्रार्थना करावी. नंतर तसेंच अपसव्यानें डाव्या गुडघ्याच्या आंत घेऊन,—**श्वः करिष्यमा-णश्राद्धे पितृस्थाने त्वामहं निमंत्रये।** असें ह्मटल्यावर ब्राह्मणानें **निमंत्रितो-ऽस्मि** असें ह्मणावें. असेंच—**पितामहप्रपितामहमातामहादि ३ स्थाने०** ह्मणून पूर्ववत् निमंत्रण द्यावें. हे ब्राह्मण पितृस्थानीं ६ व वैश्वदेविक ४ मिळून १०, अथवा वैश्वदेवपक्षीं पित्रादि ६ व दैव २ मिळून ८, देवस्थानीं १ पित्रादि १ मातामहा-दिस्थानीं १ मिळून ३, किंवा पित्रादि ६ च्या स्थानीं १ व देवस्थानीं १ असे दोनच ब्राह्मण असावे. यांतून पाहिजे त्या पक्षानें सांगावें. आमान्नाचे ६ भाग करावे. जरी दर्शश्राद्धांत, मातृमध्य ९ दैवत्य व मातामह्यंत १२ दैवत्य श्राद्ध सांगितलें आहे तरी, त्यांची देशाचारानुसार व्यवस्था जाणावी. षड्दैवत हेंच बहुत शिष्टांस मान्य आहे. सर्वथा विप्र न मिळाल्यास दर्भबटु ठेवून, प्रेष व प्रतिवचनयुक्त श्राद्ध करून, विप्रांस आमान्नें द्यावीं. किंवा अग्नींत घालावीं. सर्वत्र ब्राह्मणांनीं—**आमंत्रितोऽस्मि** असें प्रतिवचन दिल्यावर "**अक्रोधनैः०**" १ अथवा "**सर्वायासवि०**" २ या मंत्रांनीं प्रार्थना करावी.

ततः परेद्युः प्रातः स्थानोपलेपनं कृत्वा सचैलं स्नातः श्राद्धसामग्रीं संपाद्य दिनस्य षण्मुहूर्तानंतरं द्विजानाहूय तेषामनिषिद्धदिने श्मश्रुकर्म कारयित्वा स्नानीयजलतैला-मलकोद्वर्तनानि प्रेषयित्वा मध्याह्ने स्नातागतान्प्राञ्जलिस्तिष्ठंस्तान् स्वागतं पृष्ट्वा सुस्वा-गतमिति तैरुक्ते द्विराचम्य देशकालौ स्मृत्वाऽस्मत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यप-गोत्राणां अमुकदासानां वसुरुद्रादित्यस्वरूपाणां पार्वणश्राद्धं सदैवं सपिंडं पार्वणवि-धिनामान्नेन हविषा सद्यः करिष्ये। इति संकल्प्य। गोमूत्रगोमयाभ्यां द्वारे प्रादेश-

मात्रमुत्तरदक्षिणयोश्चतुरस्रं वृत्तं च मंडलं कृत्वा तत्र । कुशान्दैवे यवान्पित्र्ये तिलान् क्षिपेदिति मदनपालः ॥ तत्त्वं तु शूद्रस्याभ्युक्षणं मतमिति वचनादभ्युक्षणं कृत्वोत्तरे उदङ्मुखः सव्येन पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः स्वागतमिति पृष्ट्वा सुस्वागतमिति तेनोक्ते गंधपुष्पैः सव्यं शूद्रायेति वचनादादौ सव्यं ततो दक्षिणमिति पादौ संपूज्य पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवा इदं वः पाद्यमर्घ्यं च नम इति पादयोर्जलं दत्वा । एवं दैवद्वितीये विप्रे दत्वा पित्र्यविप्रे कृतापसव्योऽस्मत्पितः काश्यपगोत्रामुकदास वसुरूपेदं ते पाद्यमर्घ्यं च नमः । एवं पितामहे प्रपितामहे च रुद्ररूपादित्यरूपेति ज्ञेयं ॥ एवं मातामहादित्रये च ॥ ततो द्विराचांतस्तानाचम्य दैवे द्वौ प्राङ्मुखौ देवेभ्यो नमः इदमासनमास्यतामिति वामेनासनं स्पृष्ट्वा दक्षिणेन विप्रानुपवेश्यैव पित्र्येऽपसव्येनोदङ्मुखान् ॥ ततः, प्राच्यां मातामहानां । श्राद्धारंभेऽवसाने च पादशौचे तथार्चने ॥ विकिरे पिंडदाने च द्विराचमनमिष्यते ॥ १ ॥ ततः सव्येन कर्मपात्रं प्रपूर्य गंधपुष्पकुशान् क्षिप्त्वा तज्जलेन । अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यः स्मरेत् पुंडरीकाक्षं स बाह्याभ्यंतरः शुचिः ॥ १ ॥ पुंडरीकाक्षाय नम इति श्राद्धीयद्रव्यं प्रोक्ष्य । तिला रक्षंत्वसुरतो दर्भा रक्षंतु राक्षसान् ॥ पंक्तिं वै श्रोत्रियो रक्षेदतिथिः सर्वरक्षकः ॥ १ ॥ इति तिलान् विकीर्य प्रतिद्विजं दीपान् दद्यात् ॥ आमान्नादीनां पवित्रतास्तु ॥ केचित्तु सप्तव्याधा दशारण्ये[1] मृगाः कालंजरे गिरौ ॥ चक्रवाकाः शरद्वीपे हंसाः सरसि मानसे ॥ १ ॥ तेऽपि जाताः कुरुक्षेत्रे ब्राह्मणा वेदपारगाः ॥ प्रस्थिता दीर्घमध्वानं यूयं किमवसीदथ ॥ २ ॥ अमूर्तानां च मूर्तानां पितॄणां दीप्ततेजसाम् ॥ नमस्यामि सदा तेषां ध्यायिनां योगचक्षुषाम् ॥ ३ ॥ श्राद्धभूमौ गयां ध्यात्वा ध्यात्वा देवं जनार्दनम् ॥ वस्वादींश्च पितॄन् ध्यात्वा ततः श्राद्धं प्रवर्तये ॥ ४ ॥ इति जपंति ॥ ततो नीवीं बध्वापसव्येन च । देवताभ्यः पितृभ्यश्च महायोगिभ्य एव च ॥ नमः स्वाहायै स्वधायै नित्यमेव नमो नमः ॥ १ ॥ इति त्रिर्जप्त्वा देशकालौ स्मृत्वा काश्यपगोत्राणामस्मत्पितृपितामहप्रपितामहानाममुकदासानाम् ॥ तथा काश्यपगोत्राणामस्मन्मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानाममुकदासानां सदैवमुपक्रांतं पार्वणश्राद्धमहं करिष्ये ॥ कुरुष्वेति तैरुक्ते दक्षिणं जान्वाच्य पित्रादित्रयमातामहादित्रयसंबंधिनः पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवा इदमासनं वो नम इत्यृजुप्रागग्रकुशपत्रद्वयमासने दद्यादिति ढोंडुपद्धतौ ॥ षष्ठी तु युक्ता ॥ दैवे क्षणः क्रियतामिति कुशं दत्वा तथेति तेनोक्ते प्राप्नोतु भवानित्याह ॥ प्राप्नवानीति विप्रः ॥ एवं द्वितीयदैवे ॥ ततोऽपसव्येन वामं जान्वाच्य काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास वसुरूपेदमासनं ते स्वधानम इति वा सतिलद्विभुग्नकुशान् दत्वा पित्र्ये क्षणः क्रियतामित्यादि प्राग्वत् ॥ एवं पितामहादौ मातामहादौ च सव्येन विश्वान् देवानावाहयिष्ये इति पृष्ट्वावाहयेत्यनुज्ञातः देवद्विजकरमंगुष्ठे गृहीत्वा । आगच्छंतु माहाभागा विश्वेदेवा महाबलाः ॥ ये अत्र विहिताः श्राद्धे सावधाना भवंतु ते ॥ १ ॥ इति

---

१ दशार्णेषु इत्यपि पाठः क्वचित् दृश्यते ॥

श्रुत्वा ॥ पुरूरवार्द्रवसंज्ञकविश्वेदेवाः आगच्छतेत्युक्त्वा पादादिमूर्धांतं तिलान्विकिरे-दिति कर्कः ॥ यवैरन्ववकीर्येति स्मृतेर्यवानित्यन्ये ॥ ततो हस्तोदकम् ॥ एवं प्रतिपदार्थं ततोऽपसव्येन काश्यपगोत्रानस्मत्पित्रादीनमुकदासान् एवं मातामहादींश्च आवाहये इति पृष्टे आवाहयेति अनुज्ञातः मूर्धादिपादांतं तिलान्विकीर्यास्मत्पितरमुकदास काश्यपगोत्र वसुरूपागच्छ एवं पितामह रुद्ररूप प्रपितामहादित्यरूप एवं मातामहेषु । ततः देवाग्रे सव्येनैकपात्रे द्वे कुशपत्रे कृत्वा देवतीर्थेन देवेभ्यो नम इति जलं नम इति यवान् गंधपुष्पे च क्षिपेत् ॥ ततोऽपसव्येन पित्र्ये षट्सु राजतताम्रखड्गपलाश-पात्रादिमृन्मयपात्रेऽप्येकद्रव्येषु वा द्वे द्वे दक्षिणाग्रे पवित्रे कृत्वाद्भ्यो नम इति जलम् । तिलेभ्यो नम इति तिलान् । गंधपुष्पाणि च क्षिप्त्वार्घ्यपात्राणि संपन्नानीत्युक्त्वा सुसंपन्नानीत्युक्ते सव्येन देवकरे पवित्रे दत्वा दक्षिणहस्तस्थेन प्रात्रेण पित्रादित्रयमाता-महादित्रयसंबंधिपुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवा एष वोऽर्घो नमः इदं वोऽर्घ्यं नम इति वा दत्वाऽद्भ्यो नम इति स्रवदभिमंत्र्यैवं द्वितीये दत्वा पात्रे पवित्रादि कृत्वा देवेभ्यः स्थानमसीत्युत्तरतो न्युब्जं कुर्यात् ॥ केचिदेतद्दैवे नेच्छंति ॥ न्युब्जता नेति ढोंढुः ॥ ततोऽपसव्येन पित्र्ये करे दक्षिणाग्रं पवित्रं दत्वा काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एष तेऽर्घः स्वधा नमः इति पितृतीर्थेन दत्वाऽद्भ्यो नम इति संस्रवाननुमंत्र्य तत्र पात्रादि धृत्वैवं पितामहप्रपितामहाभ्यां मातामहादिभ्यश्च दद्यात् ॥ ततः प्रथमे पात्रे संस्रवानेकीकृत्य पितृवामे कर्तुर्दक्षिणे पितृभ्यः स्थानमसीति न्युब्जं कृत्वा दक्षि-णांतं न चालयेत् ॥ ततः सव्येन जलं दत्वा विश्वेदेवा एष गंधो वो नमः । इमानि पुष्पाणि वो नमः । एवं धूपदीपाच्छादनयज्ञोपवीतालंकारतांबूलानि दत्वा जलं दत्वा-पसव्येन काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एष ते गंधो नमः । एवं पुष्पधूपदीपाच्छादना-लंकारान्दत्वैवं पितामहप्रपितामहाभ्यां दद्यात् ॥ एवं मातामहादिभ्यः ॥ ततोऽर्चन-पूर्णतां वाचयित्वा द्विजाग्रे भुवं संमृज्य पलाशादिपत्रावलीर्न्यस्य गौरमृद्भस्मादिना मंडलं कृत्वा श्राद्धीयादामान्नादग्रं गृहीत्वाग्नौकरिष्ये इति पंक्तिमूर्धन्यं पृष्ट्वा कुरुष्वे-त्युक्ते सव्येनाद्यद्विजकरे पर्युक्ष्य दर्भानास्तीर्यावदानधर्मेण द्विरादायाऽग्नये कव्यवाह-नाय नमः । इति हुत्वेदमग्नये कव्यवाहनायेति त्यक्त्वा । पुनरादय सोमाय पितृमते नमः । इदं सोमाय पितृमते । अपसव्यपक्षे सोमाहुतिः पूर्वा अग्न्याहुतिरुत्तरा ॥ इति हुत्वा हुतशेषं पिंडार्थमवशेष्य पितामहादिमातामहादिपात्रेषु तूष्णीं दद्यात् ॥ ततो दैवेऽन्यदामं दत्वा पात्राण्यभिघार्य दैवपूर्वमामं चतुर्गुणं द्विगुणं समं वा दत्वा प्रोक्ष्य दैवे दक्षिणं जान्वाच्योपवीती दक्षिणोत्तानसव्यनीचाभ्यां पात्रमालभ्य विष्णवे नम इति विष्णो हव्यं रक्षस्वेति वा द्विजांगुष्ठं निवेश्यैवं पित्र्येऽपसव्येन पात्रमालभ्यांगुष्ठे दत्वा तिलान् विकीर्योदकं स्पृष्ट्वा एवं प्रतिपात्रं कृत्वा वामेन दैवपात्रं धृत्वा दक्षिणे कुशयव-जलान्यादाय पित्रादित्रयमातामहादित्रयश्राद्धसंबंधिपुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः इदं वः आमान्नं सपरिकरं गयेयं भूः गदाधरो भोक्ता अहं ब्रह्म ग्रहीता ब्रह्म ब्रह्मरूपमामं मनःकल्पितसुवर्णपात्रस्थमक्षय्यवटच्छायास्थं पुरूरवार्द्रवसंज्ञकेभ्यो विश्वेभ्यो देवेभ्यः अक्षय्यतृप्त्यर्थं संप्रददे स्वाहा न मम ॥ इदमामं सोपस्करममृतरूपेण संपद्यतां ।

हव्यं नमः । काश्यां विश्वेश्वरपादे दत्तमक्षय्यमस्तु । गयागदाधरः प्रीतो भवतु ॥ ततोऽपसव्येन द्विगुणभुग्नकुशतिलानादाय वामेन पात्रं धृत्वा वामं जान्वाच्य काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदासैतत्ते आमान्नं सपरिकरं गयेयं भूरित्यादि रजतपात्रस्थमक्षय्यवटच्छायास्थं काश्यपगोत्रायास्मत्पित्रेऽमुकदासाय वसुरूपायेदमामं सोपस्करमक्षय्यतृप्त्यर्थं संप्रददे स्वधा नमः । अमृतरूपेण स्वधा संपद्यतां । कव्यं नमः । काश्यामित्यादि प्राग्वत् ॥ एवं पितामहप्रपितामहयोर्मातामहादिभ्यश्च दद्यात् ॥ असंस्कृतप्रमीतेभ्य एष पिंड इति विकिरं दत्वा आममादाय अग्निदग्धेभ्योनग्निदग्धेभ्यश्च एष उच्छिष्टपिंडो न मम इति सोदकमामं पिंडं दत्वा तिलोदकं दत्वा मधुमध्विति त्रिर्जपेत् ॥

नंतर दुसरे दिवशीं सकाळीं उठून, घरांत सारवणादिक करवून, सचैल स्नान करून, श्राद्धसाहित्य मिळवून १२ घटिका दिवस आल्यावर विप्रांस बोलावून त्या दिवसीं ४।९।१४ शी इत्यादि तिथि, शनिवार इत्यादि योग नसल्यास त्या विप्रांची हजामत करवून, ऊन पाणी, सुगंधी तेल, उटणें, इत्यादि त्यांस देऊन मध्याह्नीं स्नान करून आलेल्या विप्रांच्या सम्मुख हात जोडून उभा राहून त्यांस स्वागत प्रश्न करावा. "**सुस्वागतं**" असें त्यांनीं ह्मटल्यावर त्यांस आसनावर बसवून, २ वेळ आचमन करून, देशकाल स्मरून,—**अस्मत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यपगोत्राणां अमुकदासानां वसुरुद्रादित्यस्वरूपाणां पार्वणश्राद्धं सदैवं सपिंडं पार्वणविधिना आमान्नेन हविषा सद्यः करिष्ये** । असा संकल्प करून, "गोमूत्र व गायीच्या शेणानें गृहद्वारांत प्रादेशमात्र उत्तरेस व दक्षिणेस चतुष्कोण आणि वर्तुळ मंडलें करून, तेथें दर्भ, सव्यानें यव, व अपसव्यानें तीळ टाकावे." असें **मदनपाल** ह्मणतो. यांतलें तत्त्व तर—"शूद्रास अभ्युक्षण संमत आहे." या वचनावरून, अभ्युक्षण करून उत्तरेस किंवा उत्तराभिमुख बसून सव्यानें—**पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः स्वागतं** ह्मटल्यावर **सुस्वागतं** असें विप्रानें ह्मणावें. नंतर गंधपुष्पांनीं—"शूद्रानें डावा पाय प्रथम पूजावा." या **वचना**वरून, प्रथम डावा, नंतर उजवा पाय पुजून, **पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः इदं वः पाद्यं चार्घ्यं च नमः** । ह्मणून पायांवर उदक द्यावें. असेंच देवस्थानीय २ ब्राह्मणांस देऊन, अपसव्यानें पितृस्थानीय विप्रांस—**अस्मत्पितः काश्यपगोत्र अमुकदास वसुरूप इदं ते पाद्यमर्घ्यं च नमः** । ह्मणून पूर्ववत् द्यावें. असेंच **पितामह रुद्ररूप प्रपितामह आदित्यरूप** इत्यादि ह्मणून पितृत्रयीस, व असेंच मातामहादित्रयीस देऊन, आपण २ वेळ आचमन करून व विप्रांस करवून, देवांकडे पूर्वाभिमुख २ विप्रांस, **देवेभ्यो नमः इदमासनमास्यतां** ह्मणून डाव्या हातानें आसन धरून उजव्या हातानें विप्रांस त्यांवर बसवावें. असेंच पितृस्थानीं उत्तराभिमुख ब्राह्मणांस बसवावें. त्यांच्या पूर्वेस मातामहस्थानीयांस बसवावें. "श्राद्धाच्या आरंभीं, शेवटीं, पाय धुतेवेळीं, पूजेंत, विकिर व पिंडदान यांत २ वेळ आचमन करावें." हा साधारण नियम होय. नंतर सव्यानें कर्मपात्र (ताह्मण) उदकानें भरून, त्यांत, गंध,

पुष्प, व दर्भ टाकून त्या उदकानें, **"अपवित्रः पवित्रो वा सर्वावस्थां गतोऽपि वा ॥ यः स्मरेत्पुंडरीकाक्षं स बाह्याभ्यंतरः शुचिः ॥ १ ॥ पुंडरीकाक्षाय नमः"** यानें श्राद्धीय द्रव्य प्रोक्षून—**"तिला रक्षंत्वसुरतो दर्भा रक्षंतु राक्षसात् ॥ पंक्तिं वै श्रोत्रियो रक्षेदतिथिः सर्वरक्षकः"** ॥ १ ॥ ह्मणून, तिळ विखरून प्रत्येक विप्रास दीप द्यावे. **आमान्नादीनां पवित्रतास्तु**—ह्मटल्यावर **कित्येकांच्या** मतीं—**"सप्त व्याधा दशारण्ये मृगाः कालंजरे गिरौ ॥ चक्रवाकाः शरद्वीपे हंसाः सरसि मानसे ॥ १ ॥ तेऽपि[1] जाताः कुरुक्षेत्रे ब्राह्मणा वेदपारगाः ॥ प्रस्थिता दीर्घमध्वानं यूयं किमवसीदथ[2]" ॥ २ ॥** हे २, व **"अमूर्तानां च मूर्तानां पितृणां दीप्ततेजसाम् ॥ नमस्यामि सदा तेषां ध्यायिनां योगचक्षुषाम् ॥ १ ॥ श्राद्धभूमौ गयां ध्यात्वा ध्यात्वा देवं जनार्दनं ॥ वस्वादींश्च पितॄन्ध्यात्वा ततः श्राद्धं प्रवर्तये" ॥ २ ॥** हे जपावे असें आहे. नंतर, नीवीबंधन करून, अपसव्यानें,—**"देवताभ्यः पितृ०"** १ असें ३ वेळ जपून देशकाल स्मरून,—**काश्यपगोत्राणामस्मत्पितृपितामहप्रपितामहानां अमुकदासानां तथा मातामहप्रमातामहवृद्धप्रमातामहानां अमुकदासानां सदैवमुपक्रांतं पार्वणश्राद्धमहं करिष्ये ।** नंतर—**कुरुष्व** असें त्यांनीं ह्मटल्यावर, उजवेंकडून हस्त घेऊन **पित्रादित्रयमातामहादिसंबंधिनः पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः इदमासनं वो नमः ।** ह्मणून "पूर्वेस अग्र करून, सरळ दर्भाच्या २ काड्या आसनार्थ द्याव्या." असें—**धोंडु (धोंडु) पद्धतींत** सांगितलें आहे. येथें षष्ठी विभक्ति असणें युक्त आहे. **दैवे क्षणः क्रियतां** ह्मणून दर्भ देऊन, **तथा,** असें ह्मटल्यावर—**प्राप्नोतु भवान्** असें आपण, व **प्राप्नवानि** असें विप्रांनीं ह्मणावें. असेंच दुसऱ्या देवस्थानीय ब्राह्मणाची पूजा करून, अपसव्यानें डाव्या गुडघ्यांतून हात घेऊन,—**काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास वसुरूपेदमासनं ते स्वधा ।** अथवा **ते नमः** ह्मणून तिलसहित दर्भ घेऊन, **पित्र्ये क्षणः क्रियतां** ह्मणून १ दर्भ देऊन, **तथा** असें विप्रानें ह्मटल्यावर—**प्राप्नोतु भवान्** असें कर्त्यानें, व **प्राप्नवानि** असें विप्रांनीं ह्मणावें. अशीच **पितामहप्रपितामहमातामहप्रमातामहवृद्धप्रमातामह**स्थानीं असणाऱ्या ब्राह्मणांची पूजा करावी. यांत प्रायः देवांकडेस सव्य, पितरांकडे अपसव्य, असण्याचा नियम आहे, नंतर, सव्यानें—**विश्वान्देवानावाहयिष्ये** असा प्रश्न करून **आवाहय** ह्मणून पितृस्थानीयविप्राज्ञा मिळाल्यावर देवस्थानीय ब्राह्मणाचा हात आपल्या

१ **तेऽभिजाता इति हरिवंशे पठ्यते ।** २ हे श्लोक **हरिवंश** प० १ अ० २४ यांत २०।२१ चे आहेत. वास्तविक पाहतां यांचा एथें कांहीं संबंध नाहीं, परंतु त्यांत **कौशिकाचे** पुत्र—**वाग्दुष्ट, क्रोधन, हिंस्र, पिशुन, कवि, खसृम** व **पितृवर्तीनामक ७** होते. यांनीं आपला गुरु जो **गार्ग्य** याची गाय मारून खाल्ल्याची कथा सांगितली आहे. तीवरून असले तर समजत नाहीं.

आंगठ्यावर घेऊन, **"आगच्छंतु महाभागा विश्वेदेवा महाबलाः ॥ ये अत्र विहिताः श्राद्धे सावधाना भवंतु ते"** ॥ १ ॥ असें ऐकवून, **पुरूरवा० देवाः आगच्छत**, असें ह्मणून विप्रांच्या पायांपासून मस्तकापर्यंत तीळ विखरावे असें **कर्काचार्य**मत आहे. "यव विखरावे." अशी **स्मृति** आहे ह्मणून, येथें अक्षता घ्याव्या, असें अन्य **कित्येक** ह्मणतात. मग हस्तोदक द्यावें असेंच प्रतिपदार्थास तो पदार्थ दिल्यावर, उदक द्यावें. नंतर अपसव्यानें—**काश्यपगोत्रानस्मत्पित्रादीनमुकदासान् काश्यपगोत्रान् मातामहादीनमुकदासान् आवाहये** असें विचारून **आवाहय** असी देवस्थानीयविप्राज्ञा घेऊन, पूर्ववत् एकेकाच्या पायांपासून मस्तकापर्यंत तीळ विखरून, अनुक्रमानें, **अस्मत्पितरमुकदास काश्यपगोत्र वसुरूपागच्छ १** असेंच **. पितामह रुद्ररूप २ प्रपितामह आदित्यरूप ३** असेंच मातामहादित्रयीस आवाहन करून, देवांपुढें सव्यानें एका द्रोणावर २ दर्भ ठेवून, देवतीर्थानें—**"देवेभ्यो नमः"** ह्मणून पाणी, **"नमः"** ह्मणून यव व गंधपुष्पेंहि त्यांत घालून;अपसव्यानें पितरांकडे रुपें ताम्र अथवा लोह यांचीं किंवा पलाशपत्रांचीं किंवा मातीचीं ६ पात्रें ठेवून, प्रत्येकावर दक्षिणाग्र २।२ दर्भ ठेवून, **"अद्भ्यो नमः"** ह्मणून उदक, **"तिलेभ्यो नमः"** ह्मणून तीळ, **"नमः"** ह्मणून गंध पुष्पें घालून, **अर्घ्यपात्राणि संपन्नानि** ह्मणून **सुसंपन्नानि** असें सर्व विप्रांनीं ह्मटल्यावर सव्यानें देवांपुढील अर्घ्यपात्रावरचीं पवित्रें उजव्या हस्तावर देऊन, तें पात्र आपल्या उजव्या हस्तांत घेऊन, **पित्रादित्रय मातामहादित्रयसंबंधि पुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः एष वोऽर्घो नमः ।** अथवा **इदं वोर्घ्यं नमः ।** ह्मणून देऊन, **"अद्भ्यो नमः"** ह्मणून ओतीत असतां अभिमंत्रण करावें असें देवस्थानीय द्वितीय विप्रास देऊन, तीं पवित्रें पुनः पात्रावर ठेवून, **देवेभ्यः स्थानमसि** ह्मणून पात्रें उत्तरेस एकावर एक ठेवावीं. **कित्येक** "देवांकडेस, अर्घ्यदान करूं नये" असें ह्मणतात. "न्युब्जता नसावी." असें **ढोंडु** (धोंडु) ह्मणतो. नंतर, अपसव्यानें, पितृस्थानीय विप्राचा पूर्ववत् हस्त घेऊन—**काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एष तेऽर्घः स्वधा नमः** ह्मणून पितृतीर्थानें अर्घ्य देऊन,—**"अद्भ्यो नमः"**। यानें संस्रवानुमंत्रण करून पवित्रादि पूर्ववत् ठेवावीं. असेंच पितामहमातामहादिकांस अर्घ्य देऊन, सर्व पात्रें एकत्र करून, पितरांच्या वामभागीं अथवा आपल्या दक्षिणभागीं, —**पितृभ्यः स्थानमसि** ह्मणून एकावर एक असीं झांकून ठेवावीं, तीं विप्रांस दक्षिणा देईपर्यंत हालवूं नयेत. नंतर सव्यानें उदक देऊन,—**विश्वेदेवा एष गंधो वो नमः । इमानि पुष्पाणि वो नमः । एष धूपो वो नमः । एष दीपो वो नमः । इदमासनं वो नमः । इदं यज्ञोपवीतं वो नमः । इमेऽलंकारा वो नमः । इदं तांबूलं वो नमः ॥** हे उपचार देऊन प्रत्येकवेळीं उदक द्यावें. अपसव्यानें—**काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एष ते गंधो नमः** असेच तांबूलापर्यंत उपचार देऊन, उदक देऊन, पितामहमातामहादिकांसही असेंच देऊन, **पुरूर-**

**वार्द्रवसंज्ञका विश्वेदेवा एते धूपदीपाच्छादनतांबूलांताः सर्वे उपचाराः परिपूर्णा भवन्तु ।** असेंच पित्रादि सर्व पितरांस ह्मणावें. विप्रांनीं—**अर्चनविधेष्वर्चितमस्तु ।** नंतर विप्रांपुढें मंडळें काढून, त्यांवर पळसाच्या पत्रावळी ठेवून, शुभ्र मातीनें किंवा भस्मानें मंडळ करून, श्राद्धसंबंधी आमान्नांतील थोडें घेऊन—**अग्नौ करिष्ये** ह्मणून, प्रथमच्या विप्रास प्रश्न करून त्यानें **कुरुष्व** ह्मटल्यावर सव्यानें पहिल्याच्या हातावर प्रोक्षून, दर्भ ठेवून, अवदानधर्मानें २ वेळ घेऊन, **"अग्नये कव्यवाहनाय नमः"** ह्मणून आहुति देऊन, **इदमग्नये कव्यवाहनाय** असा त्याग करून, पुनः घेऊन, **"सोमाय पितृमते नमः"** हवन व **इदं सोमाय पितृमते** ह्मणून त्याग करावा. अपसव्यपक्षीं सोमाहुति प्रथम व अग्न्याहुति नंतर, असावी. असें हवन करून, हुतशेष पिंडांकरितां ठेवून, पितामहादि मातामहादिपात्रांत तूष्णीं द्यावीं. नंतर, देवांस अन्य आमान्नें देऊन, पात्रांस तूप लावून चौपट, दुप्पट अथवा सम आमान्नें देवांस पूर्वी, नंतर पितरांस देऊन, प्रोक्षून, देवांकडे उजव्या गुडघ्यांतून हात घेऊन, सव्यानें उताणा डावा हात पात्राखालीं व उजवा वर लावून, **विष्णवे नमः ।** किंवा **विष्णो हव्यं रक्षस्व** ह्मणून विप्राचा आंगठा त्यावर ठेवून, असेंच पितरांस अपसव्यानें पात्रालंभन करून, अंगुष्ठ देऊन, तीळ विखरून, उदकस्पर्श करावा; असें प्रत्येक पात्रास करून, डाव्या हातानें दैवपात्र धरून, उजव्या हातांत दर्भ, यव, व उदक घेऊन,—**पित्रादित्रयमातामहादित्रयश्राद्धसंबंधिपुरूरवार्द्रवसंज्ञका विश्वेदेवाः इदं वः आमान्नं सपरिकरं गयेयं भूः गदाधरो भोक्ता अहं ब्रह्म ग्रहीता ब्रह्म ब्रह्मरूपमामं मनःकल्पितसुवर्णपात्रस्थं अक्षय्यवटच्छायास्थं पुरूरवार्द्रवसंज्ञकेभ्यो विश्वेभ्यो देवेभ्यः अक्षय्यतृप्त्यर्थं संप्रददे स्वाहा । न मम ।** ह्मणून उदक देऊन,—**इदमामं सोपस्करममृतरूपेण संपद्यतां हव्यं नमः । काश्यां विश्वेश्वरपादे दत्तमक्षय्यमस्तु । गयागदाधरः प्रीतो भवतु ।** नंतर अपसव्यानें दुप्पट वक्रदर्भ, तीळ, व उदक घेऊन डाव्या हातानें पात्र धरून, डाव्या गुडघ्यांतून हात घेऊन, **काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदासैतत्ते आमान्नं सपरिकरं०** ( येथपासून **ब्रह्मरूपं आमं** ) **मनःकल्पितरजतपात्रस्थं अक्षय्यवटच्छायास्थं काश्यपगोत्रास्मत्पित्रेऽमुकदासाय वसुरूपायेदमामं सोपस्करमक्षय्यतृप्त्यर्थं संप्रददे स्वधा नमः । अमृतरूपेण स्वधा संपद्यतां । कव्यं नमः । काश्यां विश्वेश्वरपादे दत्तमक्षय्यमस्तु । गयागदाधरः प्रीतो भवतु ।** असें ह्मणावें. असेंच पितामह, व प्रपितामह, मातामहादि ३ यांस द्यावें. **असंस्कृतप्रमीतेभ्य एष पिंडः** ह्मणून, विकिर देऊन, आमान्न घेऊन **अग्निदग्धेभ्योनग्निदग्धेभ्यश्च एष उच्छिष्टपिंडो न मम ।** ह्मणून उदकसहित पिंड व तिलोदक देऊन, मधु ३ वेळ जपावें.

## ॥ अथ पिंडदानम् ॥

**तच्च पाकेन पायसेन सक्तुभिर्मूलेन फलेन वा कार्यं ॥ पिंडार्थं वेदिं कृत्वा वामं**

जान्वाच्य अपसव्येन दर्भमूलेन दक्षिणाग्रां रेखां कृत्वैवं द्वितीयां कृत्वापः स्पृष्ट्वा रेखाग्रे उल्मुके॰ निधायोदपात्रेणाद्यरेखामूलमध्याग्रेषु काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास वसुरूपावनेनिंक्ष्वेवं पितामहप्रपितामहयोर्दत्वा द्वितीयरेखायां मातामहादिभ्यस्त्रिभ्यो दत्वा सकृदाच्छिन्नकुशान्दक्षिणाग्रान् रेखाद्वये निक्षिप्य मध्वाज्यसर्वव्यंजनोपेतमन्नमग्नौकरणशेषसहितं पात्रे कृत्वा षट् पिंडान्कृत्वा पितृतीर्थेन काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एतत्तेऽन्नं स्वधा एष ते पिंडो न मम इति वा दत्वा इदं पित्रे ॥ ततः कुशानंतर्धाय काश्यपगोत्रास्मत्पितामहेत्यादिना त्रिभ्यो दत्वा । लेपभुग्भ्यो दर्भमूलेषु करं मार्जयित्वैवं मातामहादित्रिभ्यो दत्वा करौ प्रक्षाल्याचम्योदङ्डावृत्यामंत्र प्राणानायम्य । वसंताय नमः । ग्रीष्माय नम इत्येवं षट् ऋतून्नमस्कृत्यापसव्येन पितृभ्यो नम इत्यंजलिं बध्वेवं मातामहेभ्यो नम इति ॥ ततो वामावर्तेनोदङ्मुखः श्वासं नियम्य पुनरावृत्य पितृभ्यो नमः । मातामहेभ्यो नम इति नत्वा । काश्यपगोत्रास्मत्पिरमुकदास प्रत्यवनेनिंक्ष्वेति प्राग्वत् षट्सु पिंडेषु प्रत्यवनेजनं दत्वा नीवीं विसृज्य । पितृभ्यो नमः । मातामहेभ्यो नमः । इति नत्वा । पितृभ्यो नमः मातामहेभ्यो नम इति प्रतिपिंडं सूत्राणि दत्वा । पितृभ्यो नम इत्यवनेजनशेषं पिंडपात्रक्षालनजलं वा पितृपिंडेषु प्रदक्षिणं निषिच्यैवं मातामहेभ्यो नमः । ततो देवताभ्यः पितृभ्यश्चेति त्रिर्जप्त्वा पिंडेषु पित्रादिनाम्ना गंधपुष्पधूपदीपनैवेद्यफलतांबूलदक्षिणा निवेद्य कर्मपात्रजलं सुप्रोक्षितमस्तु । शिवा आपः संतु इति दैवे दत्वा सौमनस्यमस्तु पुष्पाणि । अक्षतं चारिष्टं चास्तु अक्षताः । अपसव्येन पितृभ्यो मातामहेभ्यश्च दत्वा स्वमूर्ध्नि दीर्घमायुरस्तु । पुष्टिरस्तु । वृद्धिरस्तु । यच्छ्रेयस्तदस्तु । यत्पापं तत्प्रतिहतमस्तु ॥ भूमौ द्विपदचतुष्पदेभ्यः शांतिरस्तु । अस्त्विति द्विजाः । ततः पुरूरवार्द्रवसंज्ञकेभ्यो विश्वेभ्यो देवेभ्यः यद्दत्तमामान्नादि तदक्षय्यमस्तु । एवं काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकदासस्य यद्दत्तमित्यादि । एवं पितामहादौ मातामहादौ च अस्त्वक्षय्यमिति विप्राः ॥ अघोराः पितरः संतु । एवं मातामहाः गोत्रं नो वर्धतां । दातारो नोभिवर्धतां । संततिश्च नो वर्धताम् ॥ श्रद्धा च नो मा व्यगमत् । बहुदेयं च नोस्तु । अन्नं च नो बहु भवेत् । अतिथींश्च लभेमहि । याचितारश्च नः संतु । मा च याचिष्म कंचन । तथास्त्विति विप्राः ॥ ततः पित्रादिभ्यो मातामहादिभ्यश्च स्वधोच्यताम् अस्तु स्वधेति विप्राः कुशान्पिंडेषु न्यस्यार्घ्यपात्रमुत्तानं कृत्वा देवानां सुवर्णं पितॄणां रजतं दक्षिणां दत्वा नानानामगोत्रेभ्यः आमान्नं हिरण्यं च दत्वा पिंडानुद्वास्याघ्राय विश्वेदेवाः प्रीयंतामिति ब्रूहीत्युक्त्वा वाचयित्वा । एवं पित्र्ये कृत्वा सव्येन॰ स्वस्ति भवंतो ब्रुवंतु । स्वस्तीत्युक्ते संपूर्णतां वाचयित्वा॰ कुशैरुत्तिष्ठंतु पितरः विश्वेदेवैः सहेत्युद्वास्य मंडले प्रदक्षिणीकृत्य नमस्कृत्य विसर्जयेत् ॥ इति श्रीकमलाकरभट्टकृतौ शूद्राणां पार्वणश्राद्धप्रयोगः ॥

आतां पिंडदान सांगतो.

तें पक्कान्नानें, पायस, सातूचें पीठ, मूळें, अथवा फळें यांनीं करावें. पिंडांस वेदि

करून, डावी मांडी घालून, अपसव्यानें दर्भमूळानें उत्तरेपासून दक्षिणेस २ रेषा ओढून, उदक स्पर्शून रेखाग्रीं पेटते दर्भ ठेवून, उदकपात्रानें प्रथम रेषेचें मूल, मध्य व अग्र यांवर—**काश्यप० अमुक० वसूनां० अवनेनिंक्ष्व** असेंच **पितामहप्रपितामहांस** मध्यें व शेवटीं देऊन, द्वितीय रेषेवर असेंच मातामहादि तिघांस देऊन, १ वेळ तोडलेले दर्भ दक्षिणाग्र दोनी रेषांवर ठेवून, मध, तूप, व सर्व व्यंजनें ( भाजीपाला वगैरे ) यांनीं युक्त अग्नौकरणशेष अन्नसहित अन्न पात्रांत घालून, ६ पिंड करून, पितृतीर्थानें **काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास एतत्तेऽन्नं स्वधा** अथवा—**एष ते पिंडो न मम** ह्मणून पिंड देऊन **"इदं पित्रे"** ह्मणावें. असें सर्वांस द्यावें. नंतर दर्भमूलांवर—**लेपभुग्भ्यः** ह्मणून हात धुवून, मातामहादि तिघांस देऊन, हात धुवून, आचमन करून, अमंत्रक प्राणायाम करून, **"वसंताय नमः । ग्रीष्माय नमः । वर्षाभ्यो नमः । शरदे नमः । हेमंताय नमः । शिशिराय नमः"** । असा ऋतूंस नमस्कार करून, सव्यानें **"पितृभ्यो नमः । मातामहेभ्यो नमः"** । ह्मणून हात जोडून, डाव्या अंगानें उत्तराभिमुख श्वास कोंडून पुनः **पितृभ्यो नमः । मातामहेभ्यो नमः** । असा नमस्कार करून, **काश्यपगोत्रास्मत्पितरमुकदास प्रत्यवनेनिंक्ष्व** ह्मणून क्रमानें पूर्ववत् ६ पिंडांवर प्रत्यवनेजन देऊन, नीवी विसर्जन करून, **पितृभ्यो नमः । मातामहेभ्यो नमः** । नमस्कार करून, याच मंत्रांनीं प्रतिपिंडास सूत्रें देऊन, **"पितृभ्यो नमः"** । यानें अवनेजनशेष अथवा पिंडपात्रक्षालनोदक पितृपिंडावर उजवेकडून शिंपडावें. नंतर, **"देवताभ्यः०"** १ हा मंत्र तीन वेळ जपून पिंडांवर पित्रादिकांच्या नांवांनीं गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, फल, तांबूल, दक्षिणा देऊन, ताह्मणांतील उदक देवस्थानीय विप्रांस—**सुप्रोक्षितमस्तु । शिवा आपः संतु** । ह्मणून उदक—**सौमनस्यमस्तु**—पुष्पें—**अक्षतं चारिष्टं चास्तु**—अक्षता देऊन, अपसव्यानें पितरांस देऊन आपल्या मस्तकावर—**दीर्घमायुरस्तु । पुष्टिरस्तु । वृद्धिरस्तु । यच्छ्रेयस्तदस्तु । यत्पापं तत्प्रतिहतमस्तु** । ह्मणून अक्षतादि देऊन, भुईवर, **द्विपदचतुष्पदेभ्यः शांतिरस्तु** ह्मणून प्रत्येकास द्यावें. विप्रांनीं **अस्तु** ह्मणावें. **पुरूरवार्द्रवसंज्ञकेभ्यो विश्वेभ्यो देवेभ्यः यद्दत्तमामान्नादि तदक्षय्यमस्तु** । विप्रांनीं—**अस्त्वक्षय्यं** । असेंच **का० यद्दत्तमामान्नादि तदक्षय्यमस्तु** असें प्रत्येकास ह्मणावें. **अघोराः पितरः संतु । एवं मातामहाः । गोत्रं नो वर्धतां । दातारो नोभिवर्धंतां । संततिश्च नो वर्धतां । श्रद्धा च नो माव्यगमत् । बहुदेयं च नोस्तु । अन्नं च नो बहु भवेत् । अतिथींश्च लभेमहि । याचितारश्च नः संतु । माच याचिष्म कंचन** । ह्मणावें. **तथास्तु** विप्रांनीं ह्मणून, नंतर—**पित्रादिभ्यो मातामहादिभ्यश्च स्वधोच्यतां** विप्रांनीं—**अस्तु स्वधा** असें ह्मणावें. दर्भ पिंडांवर ठेवून पूर्वस्थापित अर्घ्यपात्रें उताणीं करून, देवांस सुवर्ण, पितरांस रौप्य दक्षिणा देऊन इतरांस आमान्नें सुवर्ण दक्षिणा देऊन, पिंड

ढळवून, हुंगून, **विश्वेदेवाः प्रीयंतामिति ब्रूहि** असें ह्मणावें. **प्रीताः** असें विप्रांकरवीं ह्मणवावें; असेंच **पित्रादिसर्वपितरः प्रीयंतां** ह्मणून पूर्ववत् ह्मणवून, सव्यानें **स्वस्ति भवंतो ब्रुवंतु** असें ह्मणून **स्वस्ति** असें ह्मटल्यावर, श्राद्धपूर्णता ह्मणवून दर्भांनीं—**उत्तिष्ठंतु पितरः विश्वेदेवैः सह** ह्मणून ढळवून, प्रदक्षिणा करून, नमस्कार करून विसर्जन करावें आपण इष्टमित्रांसह भोजन करून, तो दिवस ब्रह्मचर्यानें घालवावा. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य पार्वणश्राद्धप्रयोगः**

## ॥ अथाशौचम् ॥

**रामकृष्णतनूजेन कमलाकरशर्मणा ॥ शूद्रधर्मान्निरूप्याथ तदाशौचं निरूप्यते ॥१॥**

आशौचनिर्णयप्रकरणम्.

**रामकृष्ण**भट्टाचा पुत्र मी **कमलाकर**भट्ट शूद्रधर्म निरूपण करून, सांप्रत त्यांचें आशौच निरूपण करितों.

## ॥ तत्रादौ गर्भाशौचम् ॥

**तत्र यद्यप्यस्मत्कृते निर्णयसिंधौ सर्वमुक्तमस्ति तथापि तत्रत्यमेव संक्षेपेण शूद्राणां किंचिदुच्यते । मूलं तु तत्रैव ज्ञेयम् ॥ आचतुर्थमासांतं स्रावः । पंचमषष्ठयोः पातः । सप्तममासादि पूर्णप्रसवः ॥ मनुः ॥ रात्रिभिर्मासतुल्याभिर्गर्भस्रावे विशुध्यति [ म० स्मृ० अ० ५ श्लो० ६६ ] ॥ इदं चतुर्थपरं त्रिमासमध्ये रजस्वलात्वेनैव त्रिरात्रं सिद्धं ॥ मरीचिः ॥ गर्भस्रुत्या यथा माससमचिरे तूत्तमे त्रयः ॥ राजन्ये तु चतूरात्रं वैश्ये पंचाहमेव च ॥ १ ॥ अष्टाहेन तु शूद्रस्य शुद्धिरेषा प्रकीर्तिता ॥ ( अचिरे त्रिमासमध्ये । उत्तमे ब्राह्मणे ) अस्यार्थः स्मृतिकौमुद्यां ॥ गर्भस्रावे त्रिमासोर्ध्वं चतुर्थमाससमं दिनचतुष्टयं सर्ववर्णसमं ॥ मासत्रयमध्ये त्रिदिनमपि सर्ववर्णसमं ॥ ब्राह्मणे त्रिमासमध्ये त्रिदिनांते त्रयो दिवसा अधिकाः ॥ त्रय इत्यस्यावृत्तिरेकशेषश्च तेन त्रिमासमध्ये त्रिरात्रांते विप्रे त्रिदिनं क्षत्रियादौ चतुरहादि ॥ केचित्तु ॥ प्रथमादिमासेष्वपि एकरात्राद्यनंतरं वर्णेषु त्रिरात्राद्याहुः ॥ अन्यथा पंचमादिमासेषु वैश्यादेः पंचाहादि । त्रिमासमध्ये च चतुरहादीत्यनौचित्यं स्यात् ॥ स्रावे सपिंडानां स्नानं पितुर्मातुर्यथा मासं पित्रादीनां च त्रिदिनं ॥ इदं निर्गुणानां । सगुणानां त्वेकाहमिति मदनपालः ॥ इदं सर्ववर्णसमम् ॥ तुल्ये वयसि सर्वेषामतिक्रांते तथैव चेति व्याघ्रोक्तेः ॥**

त्यांत प्रथम गर्भाशौच सांगतो.

यद्यपि मी केलेल्या **निर्णयसिंधूं**त हें सर्व सांगितलें आहे, तथापि त्यांतलेंच शूद्रांस आवश्यक असें कांहीं संक्षेपानें सांगतों. याचें मूल त्यांतच पहावें. गर्भास ४ महिने होण्यापूर्वीं त्याचें पतन झाल्यास स्राव, ५।६ महिन्यांत पतन झाल्यास पात, व ७ पासून पूर्ण प्रसव, असें ह्मणतात. **मनु** ह्मणतो—"गर्भस्राव झाला तर ३० दिवसांनीं स्त्री शुद्ध होते." हें वाक्य ४ महिन्यांत स्राव झाल्यास लागू आहे; कारण, ३ मासांच्या आंत विटाळशीपणानें ३ दिवसांनीं स्त्री शुद्ध होते. याविषयीं **मरीचि**

ह्मणतो—"चवथ्या मासीं गर्भस्राव झाल्यास १ मास, व तत्पूर्वी वर्णक्रमानें विप्रांस ३, क्षत्रियांस ४, वैश्यांस ५ आणि शूद्रांस ८ दिवसांनीं शुद्धि होती." याचा अर्थ **स्मृतिकौमुदीं**त सांगितला आहे. तो—"गर्भस्रावीं ३ महिन्यांवर ४ मासांस ४ दिवस सर्व वर्णांस समान, ३ मासांत त्रिदिन. हेंही सर्व वर्णसम. ब्राह्मणांस ३ मासांत ३ दिवसांनीं अधिक झाल्यास ३ दिवस अधिक धरावें लागतें. यावरून, ३।४।५।८ दिवस वर्णक्रमानें आशौच धरावें," असें सांगितलें आहे. **कित्येक** तर,—"प्रथम मासापासून वर्णक्रमानें त्रिरात्रादिपक्ष घ्यावे," असें ह्मणतात. नाहींतर पंचमादिमासांत वैश्यादिकांस ५ दिवसादि, व ३ मासांमध्यें ४ इत्यादि पक्ष अयोग्य होतील. असा स्राव झाल्यास सपिंडांस स्नान. मातापितरांस महिन्यानुसार त्रिदिन. "हें निर्गुणास, सगुणास तर १ दिवस," असें **मदनपाल** ह्मणतो. हें सर्व वर्णांस सम आहे. कारण, "अतिक्रांत व स्रावाशौच सर्व वर्णांस समान," असें **व्याघ्र**-वचन आहे.

## ॥ अथ प्रसवाशौचं ॥

**संवर्तः** । जाते पुत्रे पितुः स्नानं सचैलं तु विधीयते ॥ पुत्रपदात्कन्यापि ॥ यत्तु । **हारलतायां** ॥ सूतके तु मुखं दृष्ट्वा जातस्य जनकस्ततः ॥ कृत्वा सचैलं स्नानं तु शुद्धो भवति तत्क्षणादिति ब्राह्मोक्तेर्मुखदर्शनोत्तरं पुनः स्नानपरत्वमुक्तं तत्परास्तं ॥ मूलैक्येन दर्शेर्ज्ञानपरत्वात् ॥ गौडास्तु सापत्नमातुः प्राक् स्नानादस्पृश्यत्वं । अन्याश्च मातरस्तद्वत्तद्गृहं न व्रजंति चेदिति ब्राह्मादित्याहुः ॥ अंगिराः ॥ नाशौचं सूतके पुंसः संसर्गं चेन्न गच्छति ॥ रजस्तत्राशुचि ज्ञेयं तच्च पुंसि न विद्यते ॥ १ ॥ संसर्गो मैथुनं शयनासनादिकमिति माधवः स्पर्श इति गौडाः । तन्न ॥ संस्पर्शे सूतिकायास्तु स्नानमेव विधीयते इत्यांगिरसोक्तेः ॥ एवकाराद्बालस्पर्शे न दोषः ॥ व्यासः ॥ प्रथमे दिवसे षष्ठे दशमे चैव सर्वदा ॥ त्रिष्वेतेषु न कुर्वीत सूतकं पुत्रजन्मनि ॥ १ ॥ अत्र विशेषः षष्ठीपूजादि च प्रागुक्तं ॥ प्रयोगपारिजाते तु पुंप्रसवे दशाहः कन्याप्रसवे तु त्र्यहः ॥ स्त्रीजन्मनि सपिंडश्च सोदकश्च त्र्यहाच्छुचिः ॥ स्त्रीषु त्रिपुरुषं ज्ञेयं सपिंडत्वं द्विजोत्तमाः ॥ १ ॥ इत्यग्निस्मृतेरित्याह ॥ गौडास्तु ॥ वाग्दानोत्तरं कानीनकन्याविषयं चैतदित्याहुः ॥

यानंतर जननाशौच सांगतो.

याविषयीं **संवर्त** ह्मणतो—"पुत्र झाल्यास पित्यास सचैल स्नान." येथें पुत्रपद आहे ह्मणून, कन्येचेंही ग्रहण होतें. जें **हारलतें**त सांगितलें आहे कीं, "सूतकांत जन्मलेल्या पुत्राचें मुख बापानें पाहून, सचैल स्नान केल्यावर, तत्क्षणीं तो शुद्ध होतो," असें **ब्राह्मपुराण**वचन आहे ह्मणून, पुत्रमुखदर्शनानंतर पुनः स्नानपरत्व होतें तें खंडित केलें. कारण, मूलवाक्याचें ऐक्य करून पाहतां दर्शन शब्द पुत्रजन्मज्ञानपर आहे, अवलोकनपर नाहीं, असें सिद्ध होतें. याविषयीं **गौड** तर—"सापत्न मातेस स्नानापूर्वी अस्पृश्यत्व आहे कारण 'अन्यमाता तद्वत् त्याच्या गृहास न जातील

तर, अस्पृश्य होतात,' या **ब्राह्मवचनावरून**, सिद्ध होतें" असें ह्मणतात. **अंगिरा** ह्मणतो—"जर, स्त्रियांचा संसर्ग न करील, तर पुरुषास सूतकांत आशौच नाहीं. कारण, अशुचित्व तें रजास (रक्तास) आहे, व तें पुरुषास नाहीं." येथें संसर्गशब्दानें, मैथुनाचें ग्रहण करावें. "एकत्र शयन व बसणें हा संसर्ग." असें **माधव** ह्मणतो. "जें संसर्ग ह्मणजे स्पर्श," असें **गौड** ह्मणतात तें योग्य नाहीं. कारण— "बाळंतिणीचा स्पर्श झाल्यास स्नानच करावें," असी **आंगिरसोक्ति** आहे. ह्मणून, स्पर्शदोष स्नानानें मुक्त होतो. तेथें आशौचसंबंध नाहीं. पूर्वोक्त वचनांत, "स्नानमेव" असा एवकार आहे; ह्मणून, बाळंतिणीच्या स्पर्शाचाच दोष, बालस्पर्शदोष नाहीं; असें सिद्ध होतें. **व्यास** ह्मणतात—"सूतकांत पुत्र झाल्यास, प्रथम ६।१० व्या दिवशीं आशौचदोष नाहीं." एतत्संबंधीं विशेष व षष्ठीपूजादि पूर्वीं सांगितलें आहे. **प्रयोगपारिजातां**त "मुलगा झाल्यास १०, कन्या झाल्यास ३ दिवस आशौच आहे." कारण, "कन्या झाल्यास सपिंड व सोदक ३ दिवसांनीं, शुद्ध होतात. हें स्त्रीविषयक सपिंडत्व ३ पुरुषपर्यंत जाणावें," असी **अग्निस्मृति** आहे, ह्मणून, पूर्ववत् धरावें असें ह्मणतात. **गौड** तर, "हें वचन, वाग्दानानंतर, विवाहापूर्वी प्रसूत होऊन, कन्या झाल्यास, त्रिदिनाशौचविषयक आहे," असें ह्मणतात.

## ॥ अथ मृताशौचम् ॥

हारीतः ॥ जाते मृते मृते जाते वा सपिंडानां दशाहं नालच्छेदोर्ध्वं मृतइत्यर्थः। नाड्यां छिन्नायामाशौचमिति तेनैवोक्तेः ॥ नालच्छेदात्पूर्वं मातुर्नास्पृश्यतेति शुद्धितत्त्वे। नालच्छेदात्पूर्वं मृतौ तु बृहन्मनुः ॥ जीवन् जातो यदि ततो मृतः सूतक एव तु ॥ सूतकं सकलं मातुः पित्रादीनां त्रिरात्रकम् ॥ १ ॥ शावनिमित्तं स्नानमात्रं। प्राङ्नामकरणात्सद्यः शौचमिति शंखोक्तेः ॥ नामकरणं चौलकालोपलक्षणमिति मेधातिथिहरदत्तगौडादयः ॥ नेति माधवादयः ॥ नामोत्तरं दंतोत्पत्तेः प्राक् दाहे सति सपिंडानामहः ॥ दाहाभावे स्नानमात्रं ॥ आदंतजन्मनः सद्य इति याज्ञवल्क्योक्तेः दंतोर्ध्वं त्रिवर्षात्प्राक् चूडाभावेऽहः । अत्राग्निदाने त्र्यह इति माधवः। त्रिवर्षात्प्रागूर्ध्वं वा सचूडे त्र्यह एव। अब्दोर्ध्वं त्वचूडेपि त्र्यहः ॥ इदं सपिंडानां पित्रोस्तु दशाहोर्ध्वं मृते बाले सर्वत्र त्रिरात्रं ॥ बालानामजातदंतानां त्रिरात्रेण शुद्धिरिति कश्यपोक्तेः ॥ बैजिकादभिसंबंधादनुरुंध्यादघं त्र्यहमिति मनूक्ते–[ म० स्मृ० अ० ५ श्लो० ६३ ] श्चेति मिताक्षरामाधवादयः । शुद्धितत्त्वादयो गौडास्त्वेतत्त्रिरात्रं शूद्रपरं। द्विजानां त्वजातदंते एकाहः। जातदंते त्रिरात्रम्। अजातदंतमरणे पित्रोरेकाहमिष्यते ॥ दंतजाते त्रिरात्रं स्याद्यदि स्यातां तु निर्गुणौ ॥ १ ॥ इति कौर्मात्। अनूढानां तु कन्यानां तथा वै शूद्रजन्मनामिति त्र्यहानुवृत्तौ शंखोक्तेः। त्रिरात्रं तु भवेच्छूद्रे षण्मासेऽपि शिशौ मृते इति मत्स्यसूक्ताच्च। जातदंते शूद्रे तु पंचाहः। यथाहांगिराः ॥ शूद्रे त्रिवर्षमूने तु मृते शुद्धिस्तु पंचभिः ॥ अत ऊर्ध्वं मृते शूद्रे द्वादशाहो विधीयते ॥ १ ॥ षड्वर्षांतमतीतो यः शूद्रः संम्रियते यदि ॥ मासिकं

**तु भवेच्छौचमित्यांगिरसभाषितम् ॥ २ ॥ तेनानूढभार्ये निर्गुणे शूद्रे मृते त्रिवर्षोर्ध्वं द्वादशाहः । षडब्दोर्ध्वं मासः । यत्तु । अनूढभार्यः शूद्रस्त्विति शंखोक्तं षोडशाब्दोर्ध्वं मासाशौचं तत्सगुणसच्छूद्रपरम् ॥ कृतोद्वाहे तु सर्वत्र षडब्दात्प्रागपि मासः । यत्तु । तुल्यं वयसि सर्वेषामिति व्याघ्रोक्तेः शूद्रे न्यूनाशौचं तद्दाक्षिणात्यपरम् । अन्यदेशे प्रागुक्तकौर्मोक्ता व्यवस्थेत्याहुः । तत्तुल्यं वयसि सर्वेषामित्येतद्विरोधाच्छिष्टविगानाच्चांगिरसादीनि नादर्तव्यानीति विज्ञानेश्वरमदनपारिजातादयः ॥ षोडशाब्दमध्ये विवाहाभावे त्रिरात्रं । तत्सत्त्वे मासः । ऊर्ध्वं विवाहाभावेऽपि मास इत्यपरार्कमदनपालादयः । कन्यानां तु चौलात्प्राक् मृतौ स्नानम् । अचूडायां तु कन्यायां सद्यः शौचं विधीयतइत्यापस्तंबोक्तेः । इदं त्रिपुरुषमध्ये । चौलोत्तरं वाग्दानात्प्रागेकाहः । अविशेषेण वर्णानामर्वाक्संस्कारकर्मणः ॥ त्रिरात्रात्तु भवेच्छुद्धिः कन्यास्वह्ना विधीयत इत्यंगिरसा त्रिरात्रविषये अहोविधानात् ॥ अस्त्वदत्तकन्यास्वित्युक्तेश्चेदं त्रिपुरुषमध्ये । अप्रत्तानां स्त्रीणां त्रिपुरुषी विज्ञायते इति वसिष्ठोक्तेः । गौडास्त्विदं वाग्दानोत्तरं । अप्रत्तानां तथा स्त्रीणां सापिंड्यं साप्तपौरुषमिति कौर्मोक्तेरित्याहुः ॥ वाग्दानोत्तरं प्राक् विवाहान्मृतौ भर्तृकुले पितृकुले च सप्तपुरुषावधि त्रिरात्रं । अवारिपूर्वं प्रत्ता तु या नैव प्रतिपादिता ॥ असंस्कृता तु सा ज्ञेया त्रिरात्रमुभयोः स्मृतमिति मरीच्युक्तेः ॥**

यानंतर मृताशौच सांगतो.

याविषयीं **हारीत** ह्मणतो—"अपत्य जन्मून मेलें अथवा पोटांत मरून, जन्मलें तर, सपिंडांस १० दिवस अशौच. प्रथम पक्षीं नालच्छेदानंतर मेल्यास दहा दिवस; कारण, नालच्छेदापूर्वी अशौच नाहीं." असें त्यानेंच ह्मटलें आहे. "नालच्छेदापूर्वी मातेस अस्पृश्यता नाहीं," असें **शुद्धितत्त्वां**त सांगितलें आहे. नालच्छेदापूर्वी मेल्यास **बृहन्मनु** ह्मणतो—"मूल जीवंत जन्मून, नालच्छेदापूर्वी मेल्यास तत्संबंधी सुतक, मातेस सर्व ( १० दिवस ), व पित्रादिकांस त्रिरात्र, व मृतकनिमित्तक केवल स्नानच करावें." कारण "नामकरणापूर्वी मूल मेल्यास सद्यः स्नानानें शुद्ध होतात," असें **शंख**वचन आहे ह्मणून. "नामकरण हें चौलकालाचें उपलक्षण आहे," असें **मेधातिथि हरदत्त गौड** इत्यादि ह्मणतात. "हें बरोबर नाहीं," असें **माधवादि** ह्मणतात. नामकरणोत्तर दांत येण्यापूर्वी मृतमुलाचा दाह केल्यास सपिंडांस १ दिवस आशौच, दाह न केल्यास स्नान; कारण, "दांत येण्यापूर्वी सद्यः शुद्धि होते," असी **याज्ञवल्क्या**ची उक्ति आहे. दांत आल्यावर ३ वर्षांपूर्वी चौल न केल्यास १ दिवस. येथें—"अग्निदान केल्यास त्रिदिन," असें **माधव** ह्मणतो. तीन वर्षांपूर्वी किंवा नंतर चौल केलेल्याचें ३ दिवस. ३ वर्षांनंतर चौल न केलेल्याचेंही ३ दिवस हें सपिंडांस मात्र. मातापितरांस तर दहा दिवसांनंतर दांत येण्यापूर्वी मूल मेल्यास सर्वत्र

१ याविषयीं—**यावन्न छिद्यते नालं तावन्नाप्नोति सूतकम् ॥ छिन्ने नाले ततः पश्चात्सूतकं तु विधीयते ॥ १ ॥** [ भा० स्कं० १ अ० १२ श्लो० १४ टीका पहा. ]

३ दिवस. "दंत न आलेल्यांचें त्रिरात्रानें निवृत्त होतें," असी **कश्यपो**क्ति आहे, व "बैजिक संबंधास्तव ३ दिवस आशौच धरावें," असी **मनू**क्ति आहे ह्मणून **मिताक्षरामाधवादिक** पूर्वोक्त सिद्ध करितात. **शुद्धितत्त्वादि गौड** तर, "हें त्रिरात्राशौच शूद्रपर आहे. द्विजांस दांत न आलेल्याचें एकाह व आलेल्याचें त्रिरात्र; कारण, अजातदंत अपत्यमरणीं मातापितरांस १ दिवस, व जातदंतमरणीं त्रिरात्र आहे. हे जर निर्गुण असतील तर" असें **कूर्मपुराण**वचन आहे; व "अविवाहित मुलीचें शूद्रांस ३ दिवस," असें त्र्यहाच्या अनुवृत्तीविषयीं **शंख**वचन आहे. "६ महिन्यांचेंही अपत्य मेल्यास शूद्रास त्रिरात्र आहे," असें **मत्स्यपुराण**वचन आहे. ह्मणून दंतोत्पत्तीनंतर ५ दिवस याविषयीं **अंगिरा** ह्मणतो—"शूद्रास ३ वर्षांपूर्वी मेल्यास ५ दिवसांनीं, व नंतर ६ वर्षेपर्यंत १२ दिवसांनीं शुद्धि होते. यानंतर मेल्यास १ मास आशौच आहे." यावरून, अविवाहित स्त्री, निर्गुण शूद्र ३ वर्षांवर मेल्यास १२ दिवस, ६ वर्षांवर १ महिना जाणावें. जें "अविवाहित शूद्र" असें **शंखानें** ह्मटल्यावरून १६ वर्षांनंतर मेल्यास १ मास सांगितलें; तें सगुण व सच्छूद्रपर आहे. लग्न झालेला ६ वर्षांपूर्वी मेल्यास, १ मास जें "वयोनिमिक आशौच" सर्वांस समान आहे. असें **व्याघ्र**वचन असल्यावरून, शूद्रास, १ मासाहून कमी आशौच सांगितलें आहे. तें दक्षिण देशापुरतें, अन्य देशांत पूर्वोक्त **कूर्म**वचनांत सांगितलेली व्यवस्था जाणावी," असें ह्मणतात. तें "**तुल्यं वयसि**" यांसीं विरोध आहे व शिष्टविचारावर अवलंबून आहे ह्मणून—**आंगिरसा**दिक वचनाचा आदर करूं नये," असें **विज्ञानेश्वर मदनपारिजाता**दि ह्मणतात. "१६ वर्षांत लग्न न झाल्यास ३ रात्र व झाल्यास १ मास व सोळा वर्षांनंतर विवाह न झाला तरी १ मास आशौच धरावें," असें **अपरार्कमदनपालादि** ह्मणतात. मुलीचें त्या चौलापूर्वी मेल्यास स्नान मात्र आहे. कारण, "चौल न झालेली कन्या मेल्यास सद्यःशुद्धि" असी **आपस्तंबो**क्ति आहे. हें त्रिपुरुष सपिंडांत जाणावें. मुलीचें चौलानंतर वाग्दानापूर्वी १ दिवस धरावें. कारण, "वर्णविशेषावाचून विवाहापूर्वी पुत्राची ३ दिवसांनीं व कन्यामरणीं १ दिवसानें शुद्धि होते," असें **अंगिरानें** त्रिरात्रस्थानीं कन्येविषयीं एकाहाचें विधान केलें आहे. व "न दिलेल्या ( विवाह न झालेल्या ) कन्येचें १ दिवस," असें वचन आहे ह्मणून हें त्रिपुरुषांत जाणावें. कारण "अविवाहित स्त्रियांस त्रिपुरुषीं संबंध आहे," असें **वसिष्ठ**वचन आहे. **गौड** तर, हें वाग्दानानंतर घेण्यास योग्य आहे, कारण—"अदत्त स्त्रियांचें सापिंड्य सप्तपुरुषपर्यंत आहे," असें **कूर्मपुराण**वचन आहे. ह्मणून एकाह असें ह्मणतात. वाग्दानानंतर, विवाहापूर्वी कन्या मेल्यास भर्तृपितृकुलीं ७ पुरुषपर्यंत त्रिरात्र आहे. कारण "जी वाचेनें देऊन. विधिपूर्वक दिली नाहीं ती असंस्कृत तन्मरणीं उभयकुलीं त्रिरात्र," असें **मरीचि**वचन आहे.

## ॥ अथासंस्कृते शूद्रे मृते विशेषः ॥

**माधवीये ब्राह्मे ॥ स्त्रीणां तु पतितो गर्भः सद्यो जातो मृतोऽथ वा ॥ अजातदंतो**

मासैर्वा मृतः षड्भिर्गतैर्बहिः ॥ १ ॥ वस्त्राद्यैर्भूषितं कृत्वा निक्षिपेत्तं तु काष्ठवत् ॥ खनित्वा शनकैर्भूमौ सद्यः शौचं विधीयते ॥ २ ॥ विष्णुः ॥ अनिवृत्ते दशाहे तु पंचत्वं यदि गच्छति ॥ सद्य एव विशुद्धिः स्यान्न प्रेतं नोदकक्रिया ॥ १ ॥ यमः ॥ ऊनद्विवार्षिकं प्रेतं घृताक्तं निखनेद्बहिः ॥ तेन नाम्नः पूर्वं खननमेव । तदूर्ध्वं वर्षत्रयात्पूर्वं चौलाभावेऽग्न्युदकयोर्विकल्पः । जातदंतस्य वा कुर्युर्नाम्नि वापि कृते सतीति मनूक्तेः [ म० स्मृ० अ० ५ श्लो० ७० ] चूडोत्तरं त्वग्निदानं त्रिवर्षात्प्रागूर्ध्वं वा नियतमेव । तूष्णीमेवोदकं कुर्यात्तूष्णीं संस्कारमेव च ॥ सर्वेषां कृतचूडानामन्यत्रापीच्छया द्वयमिति. लौगाक्षिस्मृतेः ॥ अन्यथा कृतचूडे इच्छयेति विकल्प उक्तः चूडोत्तरं दशपिंडा अपि कार्याः । असंस्कृतानां भूमौ पिंडं दद्यात् । संस्कृतानां कुशेषु इति प्रचेतसोक्तेः । द्वादशाद्वत्सरादर्वाक्पौगंडमरणे, सति ॥ सपिंडीकरणं न स्यादेकोद्दिष्टानि कारयेदिति हरदत्तधृतदेवलोक्तेश्च ॥ द्वादशादित्यनूढशूद्रपरं । मरीचिः ॥ प्रेतपिंडं बहिर्दद्याद्दर्भमंत्रविवर्जितः । एतदसंस्कृतपरमिति विज्ञानेश्वरः ॥ त्रिरात्रे दश पिंडानाह पारस्करः ॥ प्रथमे दिवसे देयास्त्रयः पिंडाः समाहितैः ॥ द्वितीये चतुरो दद्यादस्थिसंचयनं तथा ॥ १ ॥ त्रींस्तु दद्यात्तृतीयेपि वस्त्रादि क्षालयेत्ततः ॥ अस्थिसंचयनं संस्कृते एव । नान्यत्र । अत्र देवयाज्ञिककृते क्रियानिबंधे विशेषः । गारुडे ॥ शिशुरादंतजननाद्बालः स्याद्यावदाशिखः । कथ्यते सर्वशास्त्रेषु कुमारो मौंजिबंधनात् ॥ १ ॥ तथा गर्भे नष्टे क्रिया नास्ति दुग्धं देयं शिशौ मृते ॥ परं च पायसं क्षीरं दद्याद्बालविपत्तितः ॥ १ ॥ एकादशद्वादशाहे वृषोत्सर्गं विधिं विना ॥ तथा ॥ यत्र प्रम्रियते बालस्तत्र प्रायः प्रदीयते ॥ किंचित्समानवयसां सत्कृत्यान्नं यथाविधि ॥ १ ॥ भक्ष्यं भोज्यं च दातव्यं तथा च सुखभक्षिका ॥ तद्वस्त्राणि प्रदेयानि सोपानत्कानि तत्सभे ॥ २ ॥ कुमाराणां च बालानां भोजनं वस्त्रवेष्टनम् ॥ यच्चोपजीवते बालस्तत्तद्विप्राय दीयते ॥ ३ ॥ तथा ॥ भूमिनिक्षेपणं बाल आवर्षद्वयमाशिखं ॥ ततः परं खगश्रेष्ठ देहदाहो यथाविधि ॥ ४ ॥ अचूडेप्यूर्ध्वं खननाभावार्थमावर्षद्वयमिति । प्रागपि कृतचूडस्य तन्निवृत्त्यर्थमाशिखमिति । चूडाकर्मणि संजाते विपत्तिस्तु यदा भवेत् ॥ सूतकांते प्रकर्तव्यं वृषस्योत्सर्जनं तदा ॥ १ ॥ तत्र दाहः प्रकर्तव्य उदकं तत्र निश्चितम् ॥ श्राद्धानि षोडशापि स्युः सपिंडीकरणं विना ॥ २ ॥ इदं पंचवर्षोत्तरं । जन्मतः पंचवर्षाणि भुंक्ते दत्तमसंस्कृतम् ॥ पंचवर्षाधिके बाले विपत्तिर्यदि जायते ॥ १ ॥ वृषोत्सर्गादिकं कर्म कर्तव्यमुदकं ततः । अहन्यहनि संप्राप्ते कुर्याच्छ्राद्धानि षोडश ॥ २ ॥ पायसेन गुडेनैव पिंडं दद्याद्यथाक्रमम् ॥ उदकुंभप्रदानं च पददानानि यानि च ॥ ३ ॥ दीपदानानि यत्किंचित्पंचवर्षाधिके सदा ॥ कर्तव्यं तु खगश्रेष्ठ व्रतावार्क् प्रेततृप्तये ॥ ४ ॥ ऋजुदर्भैस्तिलैः शुक्लैः प्राचीनावीतिना तथा ॥ वार्षिकं तु न भवत्येव ॥ सपिंडनाभावे पितृत्वाभावात् । दिवोदासीये अव्रते निधनं प्राप्ते विप्रादौ शूद्रजातिवत् ॥ क्रियाः सर्वाः समुद्दिष्टाः सपिंडीकरणं विना ॥ १ ॥ उदकं पिंडदानं च कृतचूडे विधीयते ॥ अनूढकन्यानां पिंडे विकल्पः । स्त्रीणां चैके प्रत्तानामिति गौतमोक्तेः ॥

यानंतर असंस्कृत शूद्र मेल्यास विशेष सांगतो.

याविषयीं **माधवीयां**त **ब्रह्मपुराणां**त—"स्त्रियांचा गर्भपात झाला, किंवा प्रसूत होतांच मेला, किंवा ६ मासांनीं, किंवा दांत येण्यापूर्वी मेला तर त्यास वस्त्रादिकांनीं भूषित करून, खाड्यांत पुरावा, व स्नान करून शुद्ध व्हावें," असें सांगितलें आहे. **विष्णु** ह्मणतो—" १० दिवसांपूर्वी मूल मेल्यास इतरांची तत्काल शुद्धि. त्याचें आशौच किंवा उदकदानादिक नको." **यम** ह्मणतो " २ वर्षे पूर्ण न होतां मेल्यास त्याचें प्रेत तूप लावून घराबाहेर पुरावें." यावरून, नामकरणापूर्वी पुरणें हेंच मुख्य आहे. नंतर ३ वर्षांपूर्वी चौल न होतां मेल्यास दाह व उदकदान करण्याचा विकल्प आहे, कारण,–"दांत आलेला व नामकरण झालेल्यास दाह व उदकदान वैकल्पिक आहे." असें **मनु**वचन आहे. चौलानंतर ३ वर्षांवर किंवा पूर्वी अग्निदान नित्य आहे. "उदकदान व अग्निसंस्कार, कृतचौल मरण पावल्यास तूष्णीं करावीं. हीं २ अन्यत्रही इच्छानुसार होतात," अशी **लौगाक्षिस्मृति** आहे. चौलानंतर दशपिंडही करावे. कारण,–"असंस्कृतांस भूमीवर व संस्कृतांस दर्भावर पिंड द्यावा," अशी **प्रचेत्या**ची उक्ति आहे. " १२ वर्षांपूर्वी पौगंडवयांत मेल्यास सपिंडी करूं नये, परंतु एकोद्दिष्टें करावीं," असें **हरदत्तानें** घेतलेलें **देवल**वचन आहे. येथें १२ वर्षांपासून, असें ह्मटलें तें अविवाहित शूद्रपर समजावें. **मरीचि** ह्मणतो–"प्रेत-पिंड गांवाबाहेर द्यावा. त्यास दर्भ व मंत्र असूं नयेत," हें वचन "असंस्कृत शूद्रपर" असें **विज्ञानेश्वर** ह्मणतो. त्रिरात्राशौचांत दशपिंड कसे घालावे तें **पारस्कर** सांगतो—"प्रथम दिवसीं ३, द्वितीय दिवसीं ४ पिंड देऊन, अस्थिसंचयन ( राख भरणें ) करावें. तृतीय दिवसीं ३ पिंड देऊन वस्त्रादिक धुवावीं." येथें अस्थिसंचयन सांगितलें आहे तें संस्कार झालेल्याचें, इतरांचें होत नाहीं. या प्रकरणीं **देवयाज्ञिक**कृत **क्रियानिबंधां**त विशेष सांगितला आहे तो—"**गरुडपुराणां**त—दांत येण्या-पूर्वी शिशु, चौल होईपर्यंत बाल, मुंजीपर्यंत कुमार असें सर्वशास्त्रांत ह्मणतात." तसेंच गर्भ नष्ट झाल्यास क्रिया नाहीं. शिशु मेल्यास बरोबरीच्यांस दूध द्यावें. बाल मेल्यास पायस व दूध मुलांस देऊन, वृषोत्सर्गावांचून ११।१२ व्या दिवसाचें कर्म करावें. तसेंच—जर बाल मरण पावेल तर, त्याच्या बरोबरीच्यांस सत्कारपूर्वक यथाविधि कांहीं अन्न द्यावें व भक्ष्य भोज्य लाडू वगैरे, उत्तम वस्त्रें, चर्मी जोडे, कुमारांस व बालांस भोजन, पागोटें अथवा जें जें मेलेल्यास उपभोग्य तें सर्वही ब्राह्म-णांच्या मुलांस द्यावें. तसेंच—बालास २ वर्षांच्या पूर्वी किंवा चौलापूर्वी पुरावा. नंतर यथाविधि अग्नि द्यावा. येथें—चौल न झाल्यास पुढें खनन होऊं नये ह्मणून, " २ वर्षेपर्यंत व पूर्वीहि चौल केल्यास, तें होऊं नये ह्मणून, "शेंडी राखीपर्यंत" असें ह्मटलें आहे. चौलकर्म झाल्यावर, जर मरेल तर, आशौचांतीं वृषोत्सर्ग करावा, व त्याचा दाह आणि उदकदान षोडशश्राद्धें सपिंडीवांचून सर्व अवश्य करावें." हें पांच वर्षांनंतर; कारण,—"जन्मापासून ५ वर्षेपर्यंत प्रेत असंस्कृत भक्षण करितें.

वृद्धः शौचस्मृतेर्लुप्तः प्रत्याख्यातभिषक्क्रियः ॥ आत्मानं घातयेद्यस्तु भृग्वग्न्यनशनांबुभिः ॥ १ ॥ तस्य त्रिरात्रमाशौचं । द्वितीये तूदकं कृत्वा चतुर्थे श्राद्धमाचरेदिति वृद्धगार्ग्योक्तम् । अपरार्के ब्रह्मगर्गः ॥ यो जीवितुं न शक्नोति महाव्याध्युपपीडितः ॥ सोऽग्न्युदकं महायात्रां कुर्वन्नामुत्र दुष्यति ॥ १ ॥ तच्च प्रयागभिन्ने देशे रोगिणामेव । तदपि जीर्णवानप्रस्थस्यैवेति विज्ञानेश्वरादयः । प्रयागे त्वरोगिणामपि । विशेषतः शूद्रस्यान्यत्रापि ॥ अब्राह्मणो वा स्वर्गादिमहाफलजिगीषया ॥ प्रविशेज्ज्वलनं दीप्तं करोत्यनशनं तथेत्यादिपुराणात् । इदं वृद्धादिमरणं यद्यपि भृग्वग्निपतनैश्चैव वृद्धादिमरणं तथा ॥ इति माधवीये आदिपुराणोक्तेः कलौ निषिद्धम् • ॥ तथापि प्रयागे भवत्येव । ये वै तन्वां विसृजंति० ॥ इति श्रुतेः । न लोकवचनात्तात न वेदवचनादपि ॥ मतिरुत्क्रमणीया ते प्रयागमरणं प्रति ॥ १ ॥ इति भारतमात्स्योक्तेः । तत्र यो मुंचति प्राणान्वटमूलेषु सुंदरि ॥ सर्वलोकानतिक्रम्य मम लोकं प्रपद्यते ॥ १ ॥ इति वाराहोक्तेः । अत्र दशाहादि पूर्णाशौचमिति भट्टाः । युक्तं तु त्रिरात्रम् । अनशनमृतोक्तेः । दिवोदासोऽप्येवम् । यच्च पूर्वोक्तानाभशनिहतानामग्निजलप्रविष्टानां भृगुसङ्ग्रामदेशांतरमृतानां जातदंतानां च त्रिरात्रमिति शुद्धितत्त्वे काश्यपोक्तेः । आत्मघातिनो दाहाशौचादिनिषेधः स तदानीमेव । वर्षांते तु सर्वं कुर्यात् । गोब्राह्मणहतानां च पतितानां तथैव च ॥ ऊर्ध्वं संवत्सरात्कुर्यात्सर्वमेवौर्ध्वदैहिकम् ॥ १ ॥ इति हेमाद्रौ षट्त्रिंशन्मतात् । तत्रात्मवधप्रायश्चित्तं नारायणबलिश्चोक्तः । तत्रैव । कृत्वा चांद्रायणं पूर्वं क्रिया कार्या यथाविधि ॥ नारायणबलिः कार्यो लोकगर्हाभयान्नरैः ॥ १ ॥ पिंडोदकक्रियाः पश्चाद्वृषोत्सर्गादिकं च यत् ॥ एकोद्दिष्टानि कुर्वीत सपिंडीकरणं तथा ॥ २ ॥ मदनरत्ने ब्राह्मे तु ॥ प्रमादादपि निःशंकस्त्वकस्माद्विधिचोदितः ॥ चंडालैर्ब्राह्मणैश्चौरैर्निहतो यत्र कुत्रचित् ॥ १ ॥ तस्य दाहादिकं कार्यं यस्मान्न पतितस्तु सः ॥ चांद्रायणं ततः कृच्छ्रद्वयं तस्य विशुद्धये ॥ २ ॥ यद्वा कृच्छ्रान् पंचदश कृत्वा तु विधिना दहेत् ॥ बुद्धिपूर्वकृतानां तु त्रिंशत्कृच्छ्रं समाचरेदित्युक्तं । स्मृतिरत्नावल्याम् । तद्विगुणं प्रायश्चित्तं कृत्वार्वागप्यब्दात्सर्वं कार्यमित्युक्तम् । नारायणबलिस्तु मिताक्षरायां मत्कृते निर्णयसिंधौ ज्ञेयः । विदेशमृते त्वस्थ्नामेव संभवे दाहः । तदभावे पलाशवृंतैः । तदभावे कुशैः । विदेशमरणेऽस्थीनि आहृत्याभ्यज्य सर्पिषा ॥ अस्थ्नामलाभे पर्णानि शकलान्युक्तया वृता ॥ १ ॥ दाहयेदस्थिसंख्यानि ततःप्रभृति सूतकम् ॥ हेमाद्रौ षट्त्रिंशन्मते ॥ कुर्याद्दर्भमयं प्रेतं कुशैस्त्रिशतषष्टिभिः ॥ पालाशीभिः समिद्भिर्वा संख्या चैवं प्रकीर्तिता ॥ १ ॥ मदनरत्ने यज्ञपार्श्वः ॥ शिरस्यशीत्यर्धं दद्याद्ग्रीवायां तु दशैव तु ॥ बाह्वोश्चैकशतं दद्याद्दश चैवांगुलीषु च ॥ १ ॥ उरसि त्रिंशतं दद्याद्विंशतिं जठरोदरे ॥ द्वादशार्धं वृषणयोरष्टार्धं शिश्न एव तु ॥ २ ॥ ऊर्वोश्चैकशतं दद्यात्त्रिंशतं जंघयोर्द्वयोः ॥ पादांगुलीषु दश दद्यादेतत्प्रेतस्य कल्पनम् ॥ ३ ॥ मस्तके नारिकेलं तु अलाबुं तालुके तथा ॥ पंचरत्नं मुखे न्यस्य जिह्वायां कदलीफलम् ॥ ४ ॥ चक्षुषोस्तु कपर्दौ द्वौ

**नासिकायां तु कालकम् ॥ कर्णयोर्ब्रह्मपत्राणि केशे वटप्ररोहकाः ॥ ५ ॥ नालकं कमलानां तु आंत्रस्थाने विनिक्षिपेत् ॥ मृत्तिका तु वसा धातुर्हरितालकगंधकौ ॥ ६ ॥ शुक्रे तु पारदं दद्यात्पुरीषे पित्तलं तथा ॥ संधिषु तिलपिष्टं तु मांसे स्याद्यवपिष्टकम् ॥ ७ ॥ मधु स्याल्लोहितस्थाने त्वचःस्थाने मृगत्वचा ॥ स्तनयोर्गुंजके देये नासायां शतपत्रकम् ॥ ८ ॥ कमलं नाभिदेशे स्याद्वृंताकं वृषणाश्रिते ॥ लिंगे च रक्तमूलं तु परिधानं दुकूलकम् ॥ ९ ॥ गोमूत्रं गोमयं गंधं सर्वौषध्यादि सर्वतः ॥ क्रियानिबंधे गारुडे त्वेतदंते ॥ घृतं नाभ्यां प्रदेयं स्यात्कौपीने च त्रपु स्मृतम् ॥ मौक्तिके स्तनयोर्मूर्ध्नि कुंकुमेन विलेपनम् ॥ १ ॥ प्रोषितस्य वार्ताश्रवणाभावे तु पितुः पंचदशाब्दानि प्रतीक्षा । तदन्यस्य द्वादशाब्दानीति मदनरत्ने उक्तम् । तत्र पत्नीपुत्रयोः पूर्वमगृहीताशौचयोः पूर्णाशौचम् । गृहीताशौचयोस्त्रिरात्रम् । द्वादशवर्षप्रतीक्षोत्तरं दाहे तु पुत्रादीनां सर्वेषां त्रिरात्रमिति कल्पतरुः । पर्णशरदाहोत्तरमस्थ्युपलंभे तु मदनरत्ने ब्राह्मे ॥ अथ पार्णनरे दग्धे पत्रन्यासे कृते सति ॥ गतेष्वग्निषु तद्देहो यदूर्ध्वं लभ्यते क्वचित् ॥ १ ॥ तदार्धदग्धकाष्ठानि तानि निर्मथ्य तं दहेत् ॥ यद्यर्द्धदग्धकाष्ठं तु तदीयं नैव लभ्यते ॥ २ ॥ तदा तदस्थिखंडं तु निक्षेप्तव्यं महाजले ॥**

यानंतर मृतदोषतः आशौचापवाद सांगतो.

याविषयीं **हेमाद्रीं**त **षट्त्रिंशन्मतां**त व **कूर्मपुराणां**त सांगितलें आहे कीं,—"जो आपणच अग्नि किंवा उदकादिकांनीं आपला नाश करील, त्याचें तद्वर्णविहित आशौच व उदकक्रिया करूं नये." **भविष्यपुराणां**त—"स्वेच्छेनें मरणारा किंवा शृंगी ( बैल रेडा इत्यादिक ), दंष्ट्री ( वाघ, सिंह इत्यादि ) व सरीसृप ( सर्प विंचू इत्यादिक ) यांनीं मारलेला, तसाच म्लेंच्छ व चांडालांनीं मारलेला, आपणच विष खाऊन किंवा गळफांस लावून मेलेला, यांवांचून अन्य कोणत्याही प्रकारें मेलेला, व पाखंडाचा आश्रय करणारा, तसाच महापातकी असे पुरुष व व्यभिचारिणी, आरूढपतिता स्त्रिया हे मेले तर, तन्निमित्तक स्नानाग्निदानादिक संस्कार व श्राद्ध, सपिंडी इत्यादि करूं नये," असें सांगितलें आहे. **ब्रह्मपुराणां**त—"पूर्वोक्त स्नानादिक, पतितांच्या उद्देशानें जो करील, त्यास २ तप्तकृच्छ्र प्रायश्चित्ताविना शुद्धि होत नाहीं," असें सांगितलें आहे. हें प्रायश्चित्त जाणून केल्यास. तद्विरुद्ध ह्मणजे न जाणून केल्यास १ तप्तकृच्छ्रानें शुद्धि होते. जाणून पूर्वोक्त दोषी यांच्या प्रेताचा स्पर्श व तन्निमित्त अश्रुपात केल्यास त्रिरात्र, न जाणून केल्यास १ रात्र उपोषण करावें; इत्यादि विशेष प्रकार **निर्णयसिंधूं**त पहावा. हें पूर्वोक्त प्रायश्चित्तादि बुद्धिपूर्वक मेलेल्याविषयीं जाणावें. तसें नसून अपघातानें व गाफलपणानें मेल्यास त्याचें उदकदानादि करावें; कारण,—"कोणीहि अग्नींत किंवा उदकांत प्रमादानें मेल्यास तदाशौच व उदकदानादि करावें," अशी **आंगिरसो**क्ति आहे. "प्रमादमरणीं त्रिरात्र धरावें," असें **शुद्धितत्त्वादि गौड** ह्मणतात. "दशाह आशौच धरावें," असें **दाक्षिणात्य**

ह्मणतात. याचा अपवाद **हेमाद्रींत भविष्यपुराणां**त सांगितला आहे कीं, "प्रमादानें किंवा स्वेच्छेनें पूर्वोक्तरीत्या जो मेला असेल त्याची नागपूजा केल्यावांचून उदकदानादि क्रिया करूं नये." त्यांत प्रमादानें मेल्यास दुर्मरणनिमित्तक दानादि **शातातपा**नें सांगितलें आहे तें"—ब्राह्मणास वाघानें मारला असेल तर तन्निमित्त ब्राह्मणकन्येचा विवाह करावा. सर्पदंशानें मेल्यास नागबलि करून सौवर्णसर्पदान करावें, ह्मणजे निर्दोष होतो," इत्यादि प्रकार **निर्णयसिंधूं**त पहावा. सर्पदंशानें मृताविषयीं **व्यास** ह्मणतो—"१ भार किंवा यथाशक्ति सुवर्णाचा नाग व अलंकृत गाय व्यासरूपी ब्राह्मणास दान दिल्यानें पितृऋणापासून मुक्त होतो." **हेमाद्रीं**त **भविष्यपुराणां**त—"पंचमी तिथीस १ सुवर्णपरिमित सुवर्णाचा नाग करून दूध व तुपानें भरलेल्या पात्रांत घालून पूजा करून विप्रास द्यावा. सर्पदंशानें मृतास महादेवानें हें प्रायश्चित्त सांगितलें आहे," असें सांगितलें आहे. गर्वानें मुद्दाम सर्पदंश करवून मेल्यास पूर्वोक्त कर्म व नारायणबलि केल्यानें शुद्धि होते. तसाच वैद्यानें भलतेंच औषध देऊन मेल्यास दोष नाहीं. "अति थकलेला, शौचादिकाची स्मृति नष्ट झालेला, वैद्यानें आपला उपाय चालत नाहीं ह्मणून सोडलेला व दुःखपीडित होऊन, जो कड्यावरून व अग्नींत उडी टाकून, अनशनानें, उदकांत बुडून, मेल्यास त्याचें त्रिरात्र आशौच धरून, द्वितीय दिवशीं उदकदान करून, ४ थ्या दिवशीं श्राद्ध करावें," असें **वृद्धगार्ग्य** ह्मणतो. **अपरार्कां**त **ब्रह्मगर्ग** ह्मणतो कीं,—"महारोगानें जीवितास कंटाळलेला असून त्यानें अग्नि व उदकादिकानें प्राणत्याग केल्यास परलोकीं तो दोषी होत नाहीं." असा देहत्याग प्रयागाहून इतर ठिकाणीं महारोग्यासच शास्त्रविहित आहे; परंतु प्रयागांत सर्वांस काम्य देहत्यागविधि शास्त्रोक्त आहे. "तेंही वृद्ध वानप्रस्थ यांसच योग्य आहे," असें **विज्ञानेश्वरादि** ह्मणतात. प्रयागांत तर सर्व निरोग्यांस व विशेषतः शूद्रांस देहत्याग योग्य आहे. "विप्रभिन्न जो स्वर्गादिप्राप्तीच्या इच्छेनें प्रदीप्त खाईत प्रवेश करील, किंवा अनशनानें देहत्याग करील, त्यास दोष नाहीं," असें **आदित्यपुराणां**त सांगितलें आहे. हें वृद्धादिकांचें मरण जरी—"भृगु व अग्निपतनांनीं वृद्धादिकांचें मरण हें कलींत योग्य नाहीं," अशी **माधवीयां**त **आदित्यपुराणो**क्ति असल्यावरून, कलींत वर्ज्य आहे तथापि प्रयागांत होतेंच; कारण,—"प्रयागांत जे देहत्याग करतील, त्यांस मोक्षप्राप्ति होते," अशी **श्रुति** आहे, व "लोकांच्या किंवा वेदाच्या निषेधवचनावरून हे **युधिष्ठिरा**, प्रयाग-

१ इहपरलोकांत कांहीं उत्तमफलेच्छेनें प्रयागांत देहत्याग करण्याचा संप्रदाय पूर्वी होता. याविषयीं पुराणादिकांत बरींच उदाहरणें मिळतात, व हें **श्रुति**प्रमाणसिद्ध आहे । " **सितासिते सरिते यत्र संगथे तत्राप्लुतासो दिवमुत्पतंति ॥ ये वै तन्वं विसृजंति धीरास्ते जनासो अमृतत्वं भजंते ॥** अर्थ—सिता ह्मणजे भागीरथी आणि असिता ह्मणजे यमुना ह्या दोन नद्या जेथें मिळाल्या आहेत, तेथें ह्मणजे प्रयागांत जे स्नान करतात ते स्वर्गाला जातात; व जे धैर्यानें देहत्याग करतात ते मोक्षाला जातात.

मरणाविषयीं तुझी बुद्धि अन्यथा होऊं नये," असें **भारतां**त व **मत्स्यपुराणां**त सांगितलें आहे, व "जो अक्षय्यवटमूलीं गंगायमुनासंगमीं प्राणत्याग करितो तो सर्व लोकांला अतिक्रमण करून, माझ्या (विष्णूच्या) लोकास येतो." असें **वराहपुराण**-वचन आहे. याप्रमाणें मरणाराचें—"दशाहादि पूर्णाशौच धरावें," असें **भट्ट** ह्मणतात. परंतु, येथें त्रिरात्र युक्त आहे. कारण, अनशनमरणीं त्रिरात्रच उक्त आहे. **दिवोदास**ही असेंच ह्मणतो. "जो पूर्वोक्त विद्युल्लतेनें मृत झाला असेल, व अग्नि उदक यांनीं व भृगुपात, युद्ध, इत्यादिकानें मृत, देशांतरमृत, आणि जातदंत यांचें त्रिरात्र धरावें," अशी **शुद्धितत्त्वां**त **काश्यपो**क्ति आहे. ह्मणून आत्मघातकाचें दाह व आशौचादि करण्याचा जो निषेध आहे तो पूर्वोक्त रीतीनें मरतांच तत्काल आशौच न धरण्याविषयीं आहे. १ वर्षानंतर इतरवत् सर्व कर्म करणें आवश्यक आहे; कारण,—"गायी व ब्राह्मणांकरितां मृत, तसेंच पतित, यांचें १ वर्षानंतर सर्व और्ध्वदेहिक करावें," असें **हेमाद्रीं**त **षट्त्रिंशन्मतां**त सांगितलें आहे. तसें आत्मघातनिमित्तक प्रायश्चित्त व नारायणबलीही तेथें सांगितला आहे. तो—"पूर्वी चांद्रायण करून यथाविधि क्रिया करावी. लोकनिंदेच्या भीतीस्तव नारायणबलि करून पिंड व उदकक्रिया, नंतर वृषोत्सर्गादि, एकोद्दिष्ट व सपिंडी, इत्यादि अनुक्रमें करावीं." **मदनरत्नां**त **ब्रह्मपुराणां**त तर—"प्रमादानेंही निःशंक होऊन, दैवप्रेरणेनें जो अकस्मात् चांडाल, ब्राह्मण व चोर इत्यादिकांनीं कोठेंही मरण पावेल; तर त्याचें दाहोदकदानादि सर्व करावें. ज्या हेतूस्तव तो पतित नाहीं. त्याच्या शुद्धीकरितां चांद्रायण व २ किंवा १५ कृच्छ्र करून त्यास यथाविधि जाळावें. बुद्धिपूर्वक मेल्यास ३० कृच्छ्र करावें," असें सांगितलें आहे. **स्मृतिरत्नावलीं**त—"दुप्पट प्रायश्चित्त करून, वर्षाच्या पूर्वींही सर्व कर्म करावें," असें सांगितलें आहे. नारायणबलीचा विधि **मिताक्षरा** किंवा **निर्णयसिंधू**वरून जाणावा. परदेशीं मेला तर मिळाल्यास त्याच्या अस्थींचाच दाह करावा. तदभावीं पालाशविधि करावा. तसेंही न झाल्यास दर्भांनीं तो विधि करावा. "परदेशीं मेल्यास अस्थि आणून त्या तुपानें भिजवून दाह करावा. अभावीं पानें किंवा शकलें अस्थिसंख्याक दाह करून किंवा तितक्याच पलाशसमिधांचा दाह करून आशौच धरावें," असें सांगितलें आहे. **हेमाद्रीं**त **षट्त्रिंशन्मतां**त—"३६० दर्भांनीं प्रेताची आकृति करावी," असें सांगितलें आहे. **मदनरत्नां**त **यज्ञपार्श्व** ह्मणतो—"मस्तकास ४०, मानेस १०, प्रत्येक हातास ५०, दहा बोटांस १०, उरावर ३०, पोटास २०, वृषणास ६, शिश्नास ४, मांड्यांस प्रत्येकीं ५०, दोन गुडघ्यांस ३० व पायांच्या बोटांस १०, मिळून ३६० दर्भांनीं प्रेत कल्पून, त्याच्या मस्तकीं नारळ, ताळव्यावर भोंपळा, मुखांत पंचरत्नें, जिव्हेवर केळें, २ डोळ्यांवर २ कवड्या, नाकावर कालक, कानांवर पिंपळाचीं पानें, केशांवर वडाच्या पारंब्या, आंत्रस्थानीं कमळाचे देंठ, वसास्थानीं माती, तालुस्थानीं हरताळ व गंधक, वीर्यस्थानीं पारा, पुरीषस्थानीं पितळ, संधिस्थानीं तिळांचें पीठ,

मांसस्थानीं यवांचें पीठ, रक्तस्थानीं मध, त्वचास्थानीं हरिणचर्म, स्तनस्थानीं गुंजा, नासिकेवर शतपत्र, नाभिस्थानीं कमल, २ वृषणस्थानीं २ वांगीं, शिश्नस्थानीं तांबडा मुळा, परिधानार्थ १ पट्टवस्त्र, गोमूत्र, गोमय व गंध आणि सर्वौषधि इत्यादि सर्वांगास लावाव्या." असा प्रेतकल्पनेचा प्रकार सांगितला आहे. **क्रियानिबंधां**त **गरुडपुराणां**त पूर्वोक्त रीतीनें प्रेत कल्पिल्यावर "नाभिस्थानीं तूप, कौपीनस्थानीं त्रपु (कथिल), स्तनस्थानीं २ मोत्यें, आणि मस्तकीं कुंकुमलेप करावा," असें सांगितलें आहे. "कोणी मनुष्य दूर देशास गेला असून, तो जिवंत आहे किंवा नाहीं हें समजत नसल्यास, मातापितरांनीं १५ व इतरांनीं १२ वर्षे वाट पाहून त्याचें आशौचादि धरून उत्तरविधि करावा," असें **मदनरत्नां**त सांगितलें आहे. अशा स्थळीं पत्नी-पुत्रांस त्यांनीं पूर्वी आशौच धरलें नसल्यास पूर्ण आशौच धरावें लागतें; ग्रहण केल्यास आणखी त्रिरात्र धरावें. "१२ वर्षे वाट पाहून दाहादि कर्तव्य असल्यास पुत्रादि सर्व संबंध्यांस त्रिरात्र," असें **कल्पतरु** ह्मणतो. असा पर्णशरदाह केल्यावर, कदाचित् मृताच्या अस्थी मिळतील तर, त्यांविषयीं **मदनरत्नां**त **ब्राह्मपुराण**वचन असें आहे कीं,— "पर्णमय प्रेतदाह केल्यावर किंवा पत्रें पूर्वोक्तरीतीनें देहाकृति रचल्यावर अग्नि देऊन, तो विझला तर, अथवा त्याचाच देह कदाचित् मिळाल्यास पहिल्यांतील अर्धदग्ध काष्ठाचें मंथन करून तदुत्पन्न अग्नीनें तें शरीर जाळावें. तीं काष्ठें न मिळतील तर, त्याचीं अस्थि वगैरे खोल पाण्यांत टाकावीं; परंतु १ वेळ समंत्रक पर्णशरदाह झाल्यावर प्रेत मिळालें तरी पुनः संमत्रक दाह होत नाहीं," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ प्रेतदाहकालः ॥

**प्रत्यक्षशवदाहे न शोधनम् । आशौचमध्ये संस्कारे सति संभवे शोध्यं । तदंते शोध्यमेव । अब्दांते उत्तरायणं श्रेष्ठं । तत्रापि कृष्णपक्षः । भरणीकृत्तिकारोहिण्यार्द्रामघाश्लेषामूलत्रिपादज्येष्ठाधनिष्ठादिपंच च जन्मदशमैकोनविंशताराः चतुर्थाष्टमद्वादशचंद्रदिनक्षयवैधृतिव्यतीपातपरिघविष्टिकरणनंदाभद्रात्रयोदशीचतुर्दशीतिथिशुक्रभौमशनिवारगुरुशुक्रास्तपौषमलमासाः सर्वथा वर्ज्याः । मन्वादियुगादिसंक्रांतिदर्शेषु किमपि न शोध्यं । मूलं विशेषश्च निर्णयसिंधौ ज्ञेयः ॥ इति नारायणभट्टसूनुरामकृष्णभट्टसूनुकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे आशौचनिर्णयः ॥ .**

आतां प्रेतदाहकाल सांगतो.

प्रत्यक्ष प्रेतदाहाविषयीं कालविचार करण्यास नको. परंतु आशौचांत प्रेतसंस्कार कर्तव्य असून, संभव असल्यास त्याचा शोध करावा, व आशौचांतीं तर, विहित काल शोधलाच पाहिजे. त्याविषयीं १ वर्षानंतर दाह कर्तव्य असल्यास उत्तरायणांत करावा. त्यांत विशेषतः कृष्णपक्षांत—भरणी, कृत्तिका, रोहिणी, आर्द्रा, मघा, आश्लेषा, मूल, त्रिपाद, ज्येष्ठा, धनिष्ठापंचक व जन्मनक्षत्रापासून १० वें व १९ वें, ४ । ८ । १२ चंद्र, दिनक्षय, वैधृति, व्यतीपात, परिघयोग, विष्टि, करण, नंदा ३ (१ । ६ । ११), भद्रा ३ (२ । ७ । १२), १३ । १४ या तिथि, शुक्र, मंगळ, शनि

हे वार, गुरुशुक्रांचें अस्त, पौष व अधिक हे मास, हे दाहकर्मास सर्वथा वर्ज्य आहेत. मन्वादि, युगादि, संक्रांति व अमावास्या या दिवसीं विशेष विचार मुळींच करूं नये. याचा मूलवचनादि विशेष **निर्णयसिंधूं**त पहावा. **इति श्रीशूद्रधर्मतत्त्वप्रकाशे आशौचनिर्णयः समाप्तः ॥**

## ॥ अथ शूद्रस्यौर्ध्वदेहिकप्रयोगः ॥

**तत्राधिकारिणो निर्णयसिंधौ ज्ञेयाः । सर्वाभावे धर्मपुत्रो वा कार्यः । अपुत्रेण सुतः कार्यो यादृक् तादृक् प्रयत्नतः ॥ पिंडदानक्रियाहेतोर्धर्मसंस्थापनाय च ॥ १ ॥ इति व्यासोक्तेः । दिवोदासीये ॥ दृष्ट्वा स्थानस्थमासन्नमर्धोन्मीलितलोचनम् ॥ भूमिस्थं पितरं पुत्रो यद्धि दानं प्रदापयेत् ॥ १ ॥ तद्विशिष्टं गयाश्राद्धादश्वमेधशतादपि ॥ भारते ॥ शुक्लपक्षे दिवा भूमौ गङ्गायां चोत्तरायणे ॥ धन्यास्तात मरिष्यंति हृदयस्थे जनार्दने ॥ १ ॥ हेमाद्रौ वाराहे ॥ व्यतीपातोथ संक्रांतिस्तथैव ग्रहणं रवेः ॥ पुण्यकालास्तदा सर्वे यदा मृत्युरुपस्थितः ॥ १ ॥ तत्रैव व्यासः ॥ आसन्नमृत्युना देया गौः सवत्सा तु पूर्ववत् ॥ तदभावे तु गौरेव नरकोत्तारणाय वै ॥ १ ॥ मदनरत्ने जातूकर्ण्यः ॥ उत्क्रान्त्यादीनि दानानि दश दद्यान्मृतस्य तु ॥ गोभूतिलहिरण्याज्यवासोधान्यगुडानि च ॥ १ ॥ रूप्यं लवणमित्याहुर्दश दानान्यनुक्रमात् ॥ एतानि दश दानानि नराणां मृत्युजन्मनोः ॥ २ ॥ कुर्यादभ्युदयार्थं तु प्रेतेऽपि हि परत्र वै ॥ ब्राह्मे ॥ ताम्रपात्रं तिलैः पूर्णं प्रस्थमात्रं द्विजाय तु ॥ सहिरण्यं च यो दद्याच्छ्रद्धावित्तानुसारतः ॥ १ ॥ सर्वपापविशुद्धात्मा लभते गतिमुत्तमाम् ॥ उत्क्रांतिवैतरण्यौ च दश दानानि चैव हि ॥ १ ॥ प्रेतेऽपि कृत्वा तं प्रेतं शवधर्मेण दाहयेत् ॥ क्रियानिबंधे गारुडे त्वष्टौ दानान्युक्तानि ॥ तुलसीं संनिधौ कृत्वा शालग्रामशिलां तथा ॥ तिला लोहं हिरण्यं च कार्पासं लवणं तथा ॥ १ ॥ सप्तधान्यं क्षितिर्गाव एकैकं पावनं स्मृतम् ॥ तिलपात्रं यथाशक्ति शय्यादानं च कारयेत् ॥ २ ॥ इति । परिशिष्टे ॥ म्रियमाणस्य कर्णे तु पुण्यमंत्रान् जपेत्ततः ॥ मुमूर्षोर्मधुपर्कदानमुक्तं वाराहे ॥ दृष्ट्वा सुविह्वलं ह्येनं यममार्गानुसारिणम् ॥ प्रयाणकाले तु नरो मंत्रेण विधिपूर्वकम् ॥ १ ॥ मधुपर्कं त्वरन् गृह्य इमं मंत्रमुदीरयेत् ॥ गृहाण चेमं मधुपर्कमाद्यं संसारनाशनकरं त्वमृतेन तुल्यम् ॥ नारायणेन रचितं भगवत्प्रियाणां दाहेन, शांतिकरणं सुरलोकपूज्यम् ॥ २ ॥ अनेनैव तु मंत्रेण दद्याच्च मधुपर्ककम् ॥ नरस्य मृत्युकाले तु परलोकसुखावहम् ॥ ३ ॥ दैवजानीयेऽप्येवम् ॥**

आतां शूद्राचा और्ध्वदेहिकप्रयोग सांगतो.

त्यांत प्रथम और्ध्वदेहिक करण्याचे अधिकारी कोण, हा निर्णय **निर्णयसिंधूं**त पहावा. त्यांत सांगितल्यांपैकीं कोणताहि अधिकारी नसल्यास, धर्मपुत्र करावा. याविषयीं—"जसा निपुत्रिकानें स्ववंशरक्षणार्थ दत्तक पुत्र घ्यावा; तसाच प्रयत्नतः पिंडदान, उत्तरकर्म व धर्मस्थापनेस्तव धर्मपुत्र करावा," असें **व्यासा**नें सांगितलें आहे. **दिवोदासीयां**त, मरतेवेळीं पित्याचें पुत्रानें काय करावें, त्याविषयीं सांगितलें आहे

कीं,—"स्वस्थानावर निश्चेष्ट पडलेला असून लवकरच मरेल असा दिसणारा व ज्याचे नेत्र अर्धे मिटलेले आहेत अशा भूमिस्थ पित्यास उद्देशून तन्निमित्त पुत्र, जें दानादि करील तें सर्व गयाश्राद्ध व १०० अश्वमेध केल्यापेक्षांहि अधिक आहे." मरण्याच्या उत्तम कालाविषयीं **भारतांत**—"शुक्लपक्षीं, दिवसा, भूमीवर, गंगेसन्निध, उत्तरायणांत, हृदयांत जनार्दनाचें स्मरण करून, त्याचें चिंतन करीत असतां जे देहत्याग करितील, ते परम धन्य होत," असें सांगितलें आहे. **हेमाद्रींत वराहपुराणांत**—"व्यतीपात, संक्रांति आणि सूर्यग्रहण हे ज्या वेळीं मृत्यु येईल त्या वेळीं पुण्यकालच होत," असें सांगितलें आहे. मरणोन्मुखानें काय करावें? त्याविषयीं **हेमाद्रींत** व्यास ह्मणतो—"मरणोन्मुखानें यथाविधि सवत्स गाय द्यावी. नाहींतर, नरकोत्तारणार्थ एकटी गायच दान करावी." **मदनरत्नांत जातूकर्ण्य** ह्मणतो—"मृताच्या उद्देशानें उत्क्रांत्यादि १० दानें द्यावीं. तीं—उत्क्रांतिधेनु, भूमि, तीळ, सुवर्ण, आज्य, वस्त्र, धान्य, गूळ, रुपें व मीठ हीं १० अनुक्रमें द्यावीं. आणखी हीं प्रत्येक मनुष्याच्या जन्मकालीं व मरणकालीं इहलोकीं अभ्युदयार्थ व परलोकीं सौख्यार्थ अवश्य द्यावीं." **ब्रह्मपुराणांत** "प्रस्थप्रमाण (प्रस्थ= १ शेर वजनाचें) ताम्रपात्र तिळांनीं भरून सुवर्णदक्षिणासहित शक्त्यनुसार जो देईल, तो सर्व पापमुक्त होऊन उत्तम गतीला पावेल. उत्क्रांति व वैतरणी असीं २ गोप्रदानें जो देईल, तो सर्वपापमुक्त होऊन उत्तम गतीला पावेल. उत्क्रांति व वैतरणी असीं २ गोप्रदानें व पूर्वोक्त १० कोणी मेल्यावरही तदुद्देशानें देऊन शवधर्मानें प्रेतदाह करावा." **क्रियानिबंधांत गरुडपुराणांत** तर—"८ च दानें सांगितलीं आहेत. तसेंच—'प्रेताजवळ तुलसी व शालिग्राम ठेवून, तीळ, लोखंड, सुवर्ण, कापूस, मीठ, सप्तधान्यें, भूमि, गायी,' हीं ८ द्यावीं. यांत एकेक विशेष पुण्यप्रद आहे. असीं दानें करून ११ वे दिवसीं यथाशक्ति तिलपात्र व शय्यादानादि करावें," असें सांगितलें आहे. **परिशिष्टांत**—"मरणोन्मुखाच्या दक्षिणकर्णांत पुण्यमंत्र (राम) जप करावा," असें सांगितलें आहे. मुमूर्षूनें मधुपर्कदान करावें, असें **वराहपुराणांत** सांगितलें आहे. तें—"यमपंथास जाणारा व अति व्याकुळ झालेला अशा मरणोन्मुखास पाहून, पुत्रादिकांनीं विधीनें मधुपर्क सत्वर घेऊन पुढील मंत्रानें दान करावा.—**गृहाण चेमं मधुपर्कमाद्यं संसारनाशनकरं त्वमृतेन तुल्यम् ॥ नारायणेन रचितं भगवत्प्रियाणां दाहेन शांतिकरणं सुरलोकपूज्यम् ॥ १ ॥** हा दिल्यानें परलोकीं प्रेतास सुख होतें," असें सांगितलें आहे. **दैवजानीय**नामक ग्रंथांत हेंच सांगितलें आहे.

## ॥ अथ प्रयोगः ॥

**पुत्रादिरासन्नमृत्युं पित्रादिं ज्ञात्वा षडब्दं त्र्यब्दं सार्धाब्दं वा प्रायश्चित्तं कारयेत्। यथा सप्त पंच त्रीनेकं वा द्विजपर्षदमुपवेश्यार्द्रवासाः सुवर्णरूप्ययोर्निष्कं तदर्धं वा गोस्तच्चतुर्गुणं वृषस्येत्येवं गोवृषमूल्यं निधाय साष्टांगं प्रणम्य तैः किं ते कार्यमिति पृष्टे मम जन्मप्रभृत्यद्ययावत् ज्ञानाज्ञानकामाकामसकृदसकृत् कायिकवाचिकमानसिकसांस-**

गिकस्पृष्टास्पृष्टभुक्ताभुक्तपीतापीतज्ञाताज्ञातसकलपातकातिपातकोपपातकसंकलीकरणापात्रीकरणजातिभ्रंशकरप्रकीर्णपातकानां निरासार्थमनुग्रहं कृत्वा प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतः इत्युक्त्वा । सर्वे धर्मविवेक्तारो गोप्तारः सकला द्विजाः ॥ मम देहस्य संशुद्धिं कुर्वंतु द्विजसत्तमाः ॥ १ ॥ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषम् ॥ प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छथ ॥ २ ॥ पूज्यैः कृतः पवित्रोऽहं भवेयं द्विजसत्तमैः ॥ इति पठेच्छृणुयाद्वा । निष्कस्तु चतुःसुवर्णः । पुत्रादिस्स्वस्येत्यादि वदेत् । ततः सभ्यास्तस्य शक्त्यनुसारेण प्रायश्चित्तमनुवादकाग्रे वदेयुः । तदा शोध्यो गंधादिना पुस्तकस्य सभ्यानामनुवादकस्य च पूजां कृत्वा-तस्मै दक्षिणां पापानुसारेण दद्यात् । गोमूल्यं निबंधपूजात्वेन पुस्तके निवेदयेदित्याचारः । ततः सभ्याः अमुकप्रायश्चित्तेन पूर्वोत्तरांगयुतेन यथाशक्ति प्रत्याम्नायद्वारा चीर्णेन त्वं शुद्धो भविष्यसीत्यनुवादकाग्रे निर्वदेयुः ॥ शोध्यस्त्वनुग्रह इत्युक्त्वा रिक्तायां नद्यादौ गत्वाचम्य देशकालौ स्मृत्वा मम जन्मप्रभृति० इत्यादि निरासार्थमित्यंतमुक्त्वा सभ्योपदिष्टममुकप्रायश्चित्तं पूर्वोत्तरांगयुतममुकप्रत्याम्नायद्वारा यथाकालं करिष्ये इत्युक्त्वा ॥ यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च ॥ केशानाश्रित्य तिष्ठंति तस्मात्केशान्वपाम्यहम् ॥ १ ॥ इति कक्षोपस्थवर्जं केशश्मश्रुनखानि वापयित्वा । आयुर्बलं यशो वर्चः प्रजाः पशुवसूनि च ॥ ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वन्नो देहि वनस्पते ॥ १ ॥ इति दंतधावनं कृत्वा तूष्णीं स्नात्वा प्रायश्चित्तांगत्वेन भस्मस्नानं करिष्ये । रुद्राय नम इत्युक्त्वा भस्मना स्नात्वैवं गोमयमृद्वारिगोक्षीरदधिसर्पिःकुशोदकैः स्नात्वा धौतं वासः परिधाय तिलकं धृत्वा । गवामंगेषु तिष्ठंति भुवनानि चतुर्दश ॥ यस्मात्तस्माच्छिवं मे स्यादिह लोके परत्र च ॥ १ ॥ इत्यादि गोदानं कृत्वा । पापापहमहाविष्णुप्रीत्यर्थं चतुरादियुग्माम्नानानामानामाम्नानि दत्वा पंचगव्यं प्राश्नीयान्न वा । आज्यहोमस्तु न शूद्रस्य । आज्येनैव हि शालाग्नौ जुहुयाद्व्याहृतीः पृथक् । इति जाबालिना गृह्याग्निनियमात् । अग्नेः प्रतिनिध्यभावाच्च । तस्माच्छूद्रं समासाद्य सदा धर्मपथे स्थितम् ॥ प्रायश्चितं प्रदातव्यं जपहोमविवर्जितम् ॥ १ ॥ इति पराशरोक्तेश्च । तेन विप्रद्वारा होमः परास्तः । ततस्तद्दिने उपवासी मौनी निशामतिवाह्य तीर्थयात्राद्वादशामाम्नगोदानद्वादशस्नानादिप्रत्याम्नायैः प्रायश्चित्तं कृत्वा विष्णुश्राद्धांते गोदानानि प्राग्वत्कृत्वा पूर्वोक्तदशदानानि दद्यात् । दानमंत्रास्तु मत्कृते दानकमलाकरे ज्ञेयाः ॥

आतां प्रयोग सांगतो.

पुत्र व अन्य जो और्ध्वदेहिककर्ता असेल, त्याणें पित्रादिकांस देहशुद्ध्यर्थ मरणापूर्वी षडब्द, त्र्यब्द अथवा सार्धाब्द प्रायश्चित्त द्यावें. त्याचा प्रकार पुढें लिहिल्याप्रमाणें.— ७ । ५ । ३ । १ किंवा विद्वान् ब्राह्मणांची सभा करून आर्द्र वस्त्र घेऊन सोन्याचा व रुप्याचा १ किंवा अर्ध निष्क व गायीचें व तिच्या चौपट बैलाचें मूल्यद्रव्य घेऊन, तें सभेपुढें ठेवून, साष्टांग नमस्कार करावा. सभासदांनी—"**किं ते कार्यं**" असें विचारल्यावर—**मम जन्मप्रभृत्यद्ययावत् ज्ञानाज्ञानकामाकामसकृदसकृत्कायि-**

**कवाचिकमानसिकसांसर्गिकस्पृष्टास्पृष्टभुक्ताभुक्तपीतापीतज्ञाताज्ञातसकलपातकातिपातकोपपातकसंकलीकरणापात्रीकरणजातिभ्रंशकरप्रकीर्णपातकानां निरासार्थं अनुग्रहं कृत्वा प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतः ।** असें ह्मणून,—"**सर्वे धर्मविविक्तारो गोप्तारः सकला द्विजाः ॥ मम देहस्य संशुद्धिं कुर्वंतु द्विजसत्तमाः ॥ १ ॥ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषं ॥ प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छथ ॥ २ ॥ पूज्यैः कृतः पवित्रोऽहं भवेयं द्विजसत्तमैः**" ॥ हे मंत्र आपण ह्मणावे. पुत्रादिक अन्य कर्ता असेल तर पूर्वींच्या प्रार्थनेंत "मम" या ठिकाणीं "अस्य मुमूर्षोः" असें ह्मणून हे मंत्र ह्मणून मुमूर्षूस ऐकवावे. मग सभ्यांनीं तच्छक्त्यनुसार व दोषतारतम्यानें अनुवादकाजवळ प्रायश्चित्त सांगावें. शुद्ध होणाऱ्यानें गंधाद्युपचारांनीं प्रायश्चित्तप्रयोग पुस्तक, सभ्य व अनुवादक यांची पूजा करून, त्यांस पाप व शक्ति यांच्या तारतम्यानें दक्षिणा द्यावी. गोनिष्क्रयद्रव्य निबंधपूजेकरितां निवेदन करावें, असा शिष्टाचार आहे. नंतर सभ्यांनीं पूर्वोक्त ३ पक्षांपैकीं कोणत्या तरी एका पक्षाचा उल्लेख करून—"**प्रायश्चित्तेन पूर्वोत्तरांगयुतेन यथाशक्ति प्रत्याम्नायद्वारा चीर्णेन त्वं शुद्धो भविष्यसि**" असें अनुवादकापुढें ३ वेळ ह्मणावें. घेणाऱ्यानें "**अनुग्रहः**" असें ह्मणून, रिक्तातिथि असल्यास नद्यादिकांवर जाऊन आचमन व देशकालसंकीर्तन करून—**मम जन्मप्रभृति** येथून—**निरासार्थं** येथपावेतों ह्मणून, पुनः **सभ्योपदिष्टं अमुकप्रायश्चित्तं पूर्वोत्तरांगयुतं अमुकप्रत्याम्नायद्वारा यथाकालं करिष्ये** असें ह्मणून—"**यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च ॥ केशानाश्रित्य तिष्ठन्ति तस्मात्केशान्वपाम्यहम्**" ॥ १ ॥ यानें कक्षोपस्थ वर्जून केश, मिशा, नखें वगैरे काढवून—"**आयुर्बलं यशो वर्चः प्रजाः पशुवसूनि च ॥ ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो देहि वनस्पते**" ॥ १ ॥ यानें आघाड्याच्या काड्यांनीं दंतधावन करून, स्नानसंबंधी मंत्रादिक न ह्मणतां स्नान करून,—**प्रायश्चित्तांगत्वेन भस्मस्नानं करिष्ये ।** असें ह्मणून—"**रुद्राय नमः**" यानें भस्मस्नान करून, असेंच—गोमय, मृत्तिका, उदक, गोमूत्र, गोक्षीर, दहीं, तूप व कुशोदकांनीं स्नान करून, धौत वस्त्र नेसून, तिलक लावून, गोदान करावें. त्याचा मंत्र—"**गवामंगेषु तिष्ठंति भुवनानि चतुर्दश ॥ यस्मात्तस्माच्छिवं मे स्यादिह लोके परत्र च**" ॥ १ ॥ या मंत्रांनीं गोदान करून,—पापापहमहाविष्णुप्रीत्यर्थं २ । ४ । ६ इ० युग्म अनेकनामगोत्रब्राह्मणांस आमान्नें देऊन पंचगव्य प्राशन करावें. अथवा न करावें. प्रायश्चित्तांग आज्यहोम तर, शूद्रांस वर्ज्य आहे; कारण, "प्रायश्चित्त घेणाऱ्यांनीं आज्यानेंच गृह्याग्नीचे ठायीं व्याहृतींनीं निरनिराळा होम करावा," असा **जाबालीनें** त्याविषयीं गृह्याग्नि नियमित आहे, व शूद्रास त्याचा अधिकार नाहीं. इतरांप्रमाणें प्रतिनिधि करावा तर,—अग्नीस प्रतिनिधि नाहीं ह्मणूनच—"यास्तव स्वधर्मनिष्ठ शूद्रांस जपहोमावांचून प्रायश्चित्त द्यावें," असें **पराशरही**

सांगतो. यावरून विप्रद्वारा होम करण्याचा पक्षही खंडित आहे. असा प्रायश्चित्तविधि करून, तद्दिनीं उपवास करून, मौन धरून, रात्र सरल्यावर तीर्थयात्रा, १२ आमान्नें, १ भूदान व १२ स्नानें यांचे प्रत्याम्नाय ( तन्निमित्तक कांहीं द्रव्य ) यांनीं प्रायश्चित्त करून विष्णुश्राद्ध ( पूर्ववत् आमदान ) करून, शेवटीं गोदानें व पूर्वोक्त १० दानें द्यावीं. त्यांचे मंत्र मत्कृत **दानकमलाकरां**त पहावे.

## ॥ अथ वैतरणीदानम् ॥

**ततो वैतरणीदानम् ॥ यथा देशकालौ स्मृत्वा मम यमद्वारस्थनद्याः सुखोत्तरणार्थं दिव्यमानुष्यसर्वसुखप्राप्त्यर्थं वैतरणीदानं करिष्ये इत्युक्त्वा द्रोणप्रमाणकार्पासशिखरोपरि ताम्रपात्रे हैमं महिषारूढं दक्षिणे लोहदंडं वामे पाशं च दधानं यमं संपूज्य तत्रेक्षुदंडमयीं नौकां पट्टसूत्रेण बद्ध्वा तत्रस्थां कृष्णधेनुं सवत्सां स्वर्णशृंगरौप्यखुरकांस्यदोहनकृष्णवस्त्रयुगसप्तधान्यछत्रोपानद्युतां संपूज्याधिवास्यापरदिने पात्रं वृत्वा संपूज्य प्राङ्मुख्याः घृतदुग्धकुशहेमतिलयुतं पुच्छं गृहीत्वा देशकालौ स्मृत्वा पूर्वोक्तफलोल्लेखांते इमां कृष्णां गां द्रोणप्रमाणकार्पासशिखरोपरिस्थहेममययममूर्तिसहितां सुवर्णशृंगरौप्यखुरकांस्यदोहनकृष्णवस्त्रयुगसप्तधान्यछत्रोपानहाद्युपस्करयुतामशक्तौ गामेवामुकगोत्राय तुभ्यमहं संप्रददे न ममेत्युक्त्वा मंत्रं पठेत् ॥ यमद्वारे महाघोरे कष्टां वैतरणीं नदीम् ॥ तर्तुकामो ददाम्येतां तुभ्यं वैतरणीं च गाम् ॥ १ ॥ अधिवासनेऽयं मंत्र इत्येके । विष्णुरूप द्विजश्रेष्ठ भूदेव पंक्तिपावन ॥ सदक्षिणा मया तुभ्यं दत्ता वैतरणी च गौः ॥ १ ॥ यमद्वारे महाघोरे या सा वैतरणी नदी ॥ तां तर्तुं गां ददाम्येनां तुभ्यं वैतरणीमहम् ॥ २ ॥ इति दत्त्वा दक्षिणां दत्वा धेनुं यमं विप्रं च प्रदक्षिणीकृत्य सर्वं निवेद्य ॥ धेनुके त्वं प्रतीक्षस्व यमद्वारे महाभये ॥ उत्तितीर्षुरहं देवि वैतरण्यै नमो नम इत्यनुगच्छेत् । इति वैतरणीदानम् ॥**

आतां वैतरणीदानप्रयोग सांगतो.

नंतर वैतरणीदान करावें. तें असें कीं,—आचमन व देशकाल स्मरून—**मम यमद्वारस्थनद्याः सुखोत्तरणार्थं दिव्यमानुष्यसर्वसुखप्राप्त्यर्थं वैतरणीदानं करिष्ये ।** असा संकल्प करून, १ द्रोणपरिमित कापसाचा ढीग करून, त्यावर ताम्रपात्रांत रेड्यावर आरूढ, व दक्षिणहस्तीं लोहदंड व वामहस्तांत पाश धारण करणारा सुवर्णाचा यम करून, तो त्यांत ठेवून, गंधादिकांनीं त्याचें पूजन करून, तेथें उंसाची नौका करून, रेशमानें बांधून, तत्रस्थ सवत्स सुवर्णशृंगांची व रौप्यखुरांची आणि जिची धार काढण्यास कांस्यपात्र आहे अशी गाय, काळीं वस्त्रें २, सप्तधान्यें, छत्री, व चर्मजोडा यांसहित असावी. आणि त्या गायीचें पूजन करून, पूर्व दिवशीं अधिवासन करून, दुसऱ्या दिवशीं दान घेणाऱ्या विप्रास वरून, त्याचें पूजन करून, पूर्वाभिमुख गायीचें तूप, दूध, दर्भ, सुवर्ण व तीळ यांसहित तिचें पुच्छ हातानें धरून, देशकालादि स्मरण करून—**यमद्वारस्थ**—येथपासून **सुखप्राप्त्यर्थं**—येथपर्यंत

ह्मणून पुढें—**इमां कृष्णां गां द्रोणप्रमाणकार्पासशिखरोपरिस्थसुवर्णमयय-ममूर्तिसहितां हेममयशृंगरौप्यखुरकांस्यदोहनकृष्णवस्त्रयुगसप्तधान्यछत्रोपानहाद्युपस्करयुतां** असें ह्मणावें. इतकें देण्यास असमर्थ असल्यास फक्त गायीचाच उल्लेख करावा. आणि—**अमुकगोत्राय तुभ्यमहं संप्रददे न मम** असें ह्मणून विप्रहस्तीं उदक देऊन, पुढील मंत्र ह्मणावे—"**यमद्वारे महाघोरे कष्टां वैतरणीं नदीं ॥ तर्तुकामो ददाम्येतां तुभ्यं वैतरणीं च गां**" ॥ १ ॥ "हा मंत्र अधिवासनांत ह्मणावा," असें **कित्येकांचें** मत आहे. "**विष्णुरूप द्विजश्रेष्ठ भूदेव पंक्तिपावन ॥ सदक्षिणा मया तुभ्यं दत्ता वैतरणी च गौः ॥ १ ॥ यमद्वारे महाघोरे यम सा वैतरणी नदी ॥ तां तर्तुं गां ददाम्येनां तुभ्यं वैतरणीमहम्**" ॥ २ ॥ ह्मणून गाय देऊन दक्षिणा दिल्यावर, धेनु, यम, व दान घेणारा ब्राह्मण, यांस प्रदक्षिणा करून, सर्व निवेदन करून, "**धेनुके त्वं प्रतीक्षस्व यमद्वारे महाभये ॥ उत्तितीर्षुरहं देवि वैतरण्यै नमो नमः ॥ १ ॥** या मंत्रानें गाय जात असतां तिला मागून पोंहचवावी. कर्म ईश्वरार्पण करावें. **इति वैतरणीदानप्रयोगः ॥**

## ॥ अथ अन्यदानानि ॥

दिवोदासीयेऽन्यान्यपि दानान्युक्तानि । तथा ॥ मोक्षं देहि हृषीकेश मोक्षं देहि जनार्दन ॥ मोक्षधेनुप्रदानेन मुकुंदः प्रीयतां मम ॥ १ ॥ इति मोक्षधेनुम् । ऐहिकामुष्मिकं यच्च सप्तजन्मार्जितं ऋणम् ॥ तत्सर्वं शुद्धिमायातु गामेतां ददतो मम ॥ १ ॥ इति ऋणधेनुम् । आजन्मोपार्जितं पापं मनोवाक्कायकर्मभिः ॥ तत्सर्वं नाशमायातु गोप्रदानेन केशव ॥ १ ॥ इति पापधेनुं दद्यात् ॥

यानंतर अन्यदानें सांगतो.

ह्यांविषयीं **दिवोदासी**यांत अन्य दानें सांगितलीं आहेत तीं,—"**मोक्षं देहि हृषीकेश मोक्षं देहि जनार्दन ॥ मोक्षधेनुप्रदानेन मुकुंदः प्रीयतां मम**" ॥ १ ॥ या मंत्रानें मोक्षधेनुदान—"**ऐहिकामुष्मिकं यच्च सप्तजन्मार्जितं ऋणम् ॥ तत्सर्वं सिद्धिमायातु गामेतां ददतो मम**" ॥ १ ॥ यानें ऋणधेनुदान—"**आजन्मोपार्जितं पापं मनोवाक्कायकर्मभिः ॥ तत्सर्वं नाशमायातु गोप्रदानेन केशव**" ॥ १ ॥ यानें पापधेनुदान करावें," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ दुर्मरणे प्रायश्चित्तम् ॥

**तत्र चांडालादिहतेऽतरिक्षमृते कृच्छ्रातिकृच्छ्रचांद्रायणानि वा । रजस्वलासूतिकांत्यजस्पर्शे म्लेच्छहते च कृच्छ्राब्दम् ॥ ऊर्ध्वोच्छिष्टाधरोच्छिष्टोभयोच्छिष्टचण्डालक्रव्यादस्पर्शे खट्वामरणे शवे कृमिकीटोद्भवे त्रीन् । षट् पंचदश वा कृच्छ्रान् चांद्रायणत्रयं वा कृत्वा दहेत् । अंत्यजस्पर्शे कृच्छ्राब्दं वा । प्रपाते विषे वा नव कृच्छ्रान् । शृंगि-**

१ हें धान्याचें माप आहे; द्रोण ह्मणजे सुमारें १ पायली होते.

विप्रशस्त्रचौराद्यैरात्मघातेऽब्दम् । शवे पर्युषिते कृच्छ्रत्रयं । आशौचमरणेऽप्येवं । मूलं तु मत्कृते निर्णयसिंधौ ज्ञेयम् ॥ ततः पुण्यस्तोत्रं रामकृष्णादिनामजपं कुर्यात्कारयेद्वा । ततः प्राणोत्क्रमणे जाते पुत्रो वपनं कृत्वा स्नात्वा नववस्त्रैकदेशं परिधाय तदेकदेशमुत्तरीयं कृत्वा प्रेतस्य वपनं कृत्वा स्नापयित्वा वाससाच्छाद्य पुष्पमालाद्यैरलंकुर्यात् । मदनरत्ने गालवः ॥ प्रथमेहनि कर्त्तव्यं वपनं चानुभाविनां ॥ प्रेतस्य केशश्मश्र्वादि वापयित्वाथ दाहयेत् ॥ १ ॥ मनुः ॥ दक्षिणेन मृतं शूद्रं पुरद्वारेण निर्हरेत् ॥ अत्र क्रियानिबंधे गारुडे षट् पिंडा उक्ताः । मृतस्योत्क्रांतिसमये षट् पिंडान् क्रमशो दहेत् ॥ मृतिस्थाने तथा द्वारि चत्वरे तार्क्ष्य कारणात् ॥ १ ॥ विश्रामे काष्ठचयने तथा संचयने च षट् ॥ तथा ॥ आदौ देयास्तु षट् पिंडा दश पिंडा दशाह्निकाः ॥ स्थाने चार्धपथेऽतीते चितायां शवहस्तके ॥ १ ॥ श्मशानवासिभूतेभ्यः षष्ठं संचयने तथा ॥ छंदोगपरिशिष्टे ॥ दुर्बलं स्नापयित्वा तु शुद्धचैलाभिसंभृतं ॥ दक्षिणाशिरसं भूमौ बर्हिष्मत्यां निधापयेत् ॥ २ ॥ घृतेनाभ्यक्तमाप्लाव्य शुद्धवस्त्रोपवीतिना ॥ चंदनोक्षितसर्वांगं सुमनोभिर्विभूषयेत् ॥ २ ॥ हिरण्यशकलान्यस्य क्षिप्त्वा छिद्रेषु सप्तसु ॥ मुखेष्वथापिधायैनं निर्हरेयुः सुतादयः ॥ ३ ॥ सप्तच्छिद्राणि तत्रैव ॥ कर्णे नेत्रे मुखे घ्राणे हिरण्यशकलं न्यसेदित्यन्यत्रोक्तं ॥ आमपात्रेऽन्नमादाय प्रेतमग्निपुरःसरं ॥ १ ॥ एकोनुगच्छेत्तस्यार्द्धमर्धपथ्युत्सृजेद्भुवि ॥ ऊर्द्ध्वमादहनं कार्यमासीनो दक्षिणामुखः ॥ २ ॥ सव्यं जान्वाच्य शनकैः सतिलं पिंडदानवत् । अथ पुत्रादिराप्लुत्य कुर्याद्दारुचयं महत् ॥ ३ ॥ तत्रोत्तानं निपात्यैनं दक्षिणाशिरसं मुखे ॥ एतदग्नेः पात्रन्यासोक्तेरुत्तानत्वं साग्निपरं । शूद्रः पुमानधोमुखः स्त्रीतूत्ताना दाह्या । तदुक्तं शुद्धितत्त्वे हारलतायां चादिपुराणे ॥ स्वगोत्रजैर्गृहीत्वा तु चितामारोप्यते शवः ॥ अधोमुखो दक्षिणदिक्चरणस्तु पुमानपि ॥ १ ॥ उत्तानदेहा नारी तु सपिंडैरपि बंधुभिरिति ॥ इदमन्यैर्ब्राह्ममुक्तं । इदं निरग्निद्विजपरमपीति गौडाः । स्मृतिकौमुद्यां मदनपालस्तु ॥ स दग्धव्य उपेतश्चेदाहिताग्न्यावृतार्थवदिति निरग्नेरप्याहिताग्निवद्दाहोक्तेस्तस्य च कात्यायनेन । तत्रोत्तानं निपात्यैनं दक्षिणाशिरसं मुखे इत्युत्तानत्वोक्तेर्निरग्नेरपि तदेवेत्याह ॥ तत्त्वतिदेशेन कथमुपदेशस्य बाध इति चिंत्यं । केचित्तु वाचनिकातिदेशस्योपदेशतुल्यत्वाधुपेतश्चेदित्यस्य द्विजपरत्वाद्ब्राह्मे तु तत्पदाभावाच्छूद्रपरमेवेति न द्विजानामुत्तानत्वमेवेत्याहुः ॥ अन्ये तु छंदोगद्विजानामुत्तानत्वमन्येषामधोमुखत्वमित्याहुः ॥ आस्तां निरग्निद्विजवार्ता । अनुपनीतद्विजशूद्राणां त्वधोमुखत्वमुदक्शिरस्त्वं चेत्यविवादं । दाहस्तु शूद्रस्यामंत्रकः । निषेकादिश्मशानांतो मंत्रैर्यस्योदितो विधिरिति मदनपालः ॥ तत्त्वं तु वैदिकस्यैव निषेधः पौराणस्तु भवत्येव । स च प्रयोगे वक्ष्यते । अतएव वाराहे ॥ चतुर्वर्णेषु संस्थानमेवं भवति पुत्रिके इत्युक्तं । प्रचेताः ॥ नग्नदेहं दहेन्नैव किंचिद्देयं परित्यजेत् ॥ यमः ॥ प्रेतं दहेच्छुभैर्गंधैः स्नापितं स्रग्विभूषितं ॥ क्रियानिबंधे गारुडे ॥ उदधारामविच्छिन्नां सिंचेत्कर्ता प्रदक्षिणं ॥ स्कंधावसक्तकुंभेन पादतः परितश्चितेः ॥ १ ॥ दंपत्योरेकदा

**मृतौ तु बौधायनः ॥ दाहांतमेकतंत्रत्वं संचयनं चैकं उदकपिंडदानादि पृथगेव अन्वारोहणे चैवं उदकदानं प्राह्ये ॥ आदौ तु वस्त्रं प्रक्षाल्य तेनैवाच्छादितैस्ततः ॥ कर्तव्यं तैः सचैलं तु स्नानं सर्वमलापहं ॥ १ ॥ ततः पाषाणपृष्ठे तु सर्वैर्देयं तिलोदकम् ॥ त्रिंशच्छूद्राय देयास्तु प्रेतभूमिगताय च ॥ २ ॥ विशेषो निर्णयसिंधौ ज्ञेयः ॥**

यानंतर दुर्मरणनिमित्तक प्रायश्चित्त सांगतो.

त्यांत, चांडालादिकांनीं मारला व अंतरिक्षांत ( माडीवर किंवा पलंगावर भूमिस्पर्श न होतां ) मेला तर, तच्छुद्ध्यर्थ कृच्छ्र, अतिकृच्छ्र, व चांद्रायण, यांतून दोषतारतम्यानें १ प्रायश्चित्त करावें. प्रेतास रजस्वला, बाळंतीण, म्लेंच्छ यांचा, स्पर्श झाल्यास व म्लेंच्छांनीं मारल्यास, कृच्छ्राब्द, प्रायश्चित्त करावें. ऊर्ध्वोच्छिष्ट[1], अधरोच्छिष्ट[2] व उभयोच्छिष्ट[3], चांडाल, व हिंसक पशु, यांचा स्पर्श झाल्यास, व बाजल्यावर मेल्यास, प्रेतास किडे मुंग्या इत्यादि झाल्यास, ३ । ६ । १५ कृच्छ्र किंवा ३ चांद्रायणें करून प्रेतदाह करावा. केवळ अंत्यजस्पर्शच झाला असेल तर, कृच्छ्र किंवा १ अब्द, खालीं पडून व विषानें मेल्यास ९ कृच्छ्र, शृंगी पशु, ब्राह्मण, शस्त्र व चोरादिकांनीं मारल्यास आणि आत्मघात केल्यास १ अब्द—प्रायश्चित्त करावें. प्रेत १ । २ किंवा अधिक दिवस राहिल्यास, व आशौचांत मेल्यास ३ कृच्छ्र प्रायश्चित्त करून दाह करावा. याचीं मूलवचनें मत्कृत **निर्णयसिंधूंत** पहावीं. नंतर पुण्यकारक स्तोत्रें व **रामकृष्णादि** नामें आपण जपावीं, किंवा दुसऱ्याकडून जप करवून, आपण ऐकावीं. नंतर प्राणोत्क्रमण झाल्यावर, पुत्रादि अंत्यकर्माधिकाऱ्यानें, क्षौर करून, स्नान केल्यावर, नव्या वस्त्राचें अर्ध नेसून, त्याच्या भागाचें उत्तरीय करून, प्रेताचें वपन करून त्यास स्नान घालून, वस्त्रानें गुंडाळून, पुष्पमालादि घालून, अलंकार करावे. **मदनरत्नांत गालव** ह्मणतो कीं,—"पहिल्या दिवशीं पुत्रादिकांनीं वपन करून, प्रेताचें केशादि वपन करवून त्याचा दाह करावा." प्रेत स्मशानांत कोणच्या मार्गानें न्यावें त्याविषयीं **मनु** ह्मणतो—"शूद्राचें प्रेत नगराच्या दक्षिण द्वारानें स्मशानांत न्यावें." येथें **क्रियानिबंधांत गरुडपुराणोक्त** ६ पिंड सांगितले आहेत. ते असे कीं, "मृताच्या उत्क्रांतिकाळीं अनुक्रमानें ६ पिंड द्यावे. त्यांचा क्रम, मेलेल्या स्थानीं १, द्वारीं १, अंगणांत १, हा **गरुडास** उद्देशून द्यावा; स्मशानांत प्रेत ठेवण्याच्या जागीं १, काष्ठें रचल्यावर १, व प्रेत ठेविल्यावर त्याच्या हातांत १ मिळून ६ पिंड द्यावे." तसेंच प्रथम पूर्वोक्त ६ पिंड देऊन, आशौचांत प्रतिदिवशीं एक एक असे १० द्यावे. त्यांचा प्रकार—"प्रेतस्थानीं, अर्धमार्गावर, चितेवर, प्रेतहस्तीं, स्मशानवासी भूतांस, व संचयनप्रसंगीं, असे ६ द्यावे. हा प्रकार पूर्वोक्ताहून भिन्न आहे." **छंदोगपरिशिष्टांत**—"प्रेतास स्मशानांत स्नान घालून, शुद्ध वस्त्रें वेष्टून, दक्षिणेस मस्तक करून,

---

१ पाणी इत्यादि पिणें यास ऊर्ध्वोच्छिष्ट ह्मणतात.

२ भोजन करणें हें अधरोच्छिष्ट होय.

३ दोनी प्रकार झाले ह्मणजे त्यास उभयोच्छिष्ट ह्मणतात.

तें चितेवर ठेवावें. त्याच्या अंगास तूप लावून, स्नान घालून, शुद्ध वस्त्रें व उपवीत घालून, सर्वांगीं चंदन लावून, पुष्पांनीं भूषित करावें. व सोन्याचे तुकडे सर्व द्वारांतून ह्मणजे शिश्न व गुद वर्ज करून इतर सप्त द्वारांत घालावे. त्याचें मुख वस्त्रानें झांकून, पुत्रादिकांनीं स्मशानांत न्यावें." सुवर्ण घालण्याचीं सप्त द्वारें त्यांतच सांगितलीं आहेत तीं—"२ कर्ण, २ नासिका, २ नेत्र व मुख मिळून, ७," असें सांगितलें आहे. "पात्रांत आमान्न घेऊन, पुढें अग्नि करून, प्रेत स्मशानांत न्यावें. त्याच्या मागून आमान्न घेणारानें जाऊन अर्धमार्गीं तें भूमीवर टाकावें. कर्त्यानें दक्षिणेस मुख करून दाहादि करावें. डाव्या गुडघ्यांतून हात घेऊन, सतिल पिंड द्यावा." "नंतर पुत्रादिकांनीं स्नान करून, चिता रचून तीवर उताणें मस्तक दक्षिणेस करून प्रेत निजवून, जाळावें." येथें उताणें निजवावें, असें सांगण्याचा हेतु इतकाच कीं,—"अग्निहोत्री मृत झाल्यास त्याच्या प्रेतावर २ अरणी ठेवाव्या," असें सांगितलें आहे. ह्मणून प्रेत उताणें निजवावें. परंतु तें साग्निकाविषयीं आहे. शूद्रास त्याचा अधिकार नाहीं ह्मणून, शूद्रपुरुषास खालीं मुख करून, व सर्व वर्णांतल्या स्त्रियांस उताण्या दहन कराव्या. तेंच **शुद्धितत्त्व** व **हारलतें**त **आदिपुराणां**त सांगितलें आहे. जसें—"मृताच्या गोत्रजांनीं त्याचें प्रेत स्मशानांत नेऊन, दक्षिणेस उसें करून अधोमुख चितेवर निजवावें. स्त्रीस उताणी ठेवावी." येथें पुरुषास उत्तान निजवावा असें आहे तें शूद्रविषयक होय. "हेंच ब्राह्मणपर," असें अन्य ग्रंथकारांचें मत आहे. तसेंच हें "निरग्निद्विजपर," असें **गौड** ह्मणतात. **स्मृतिकौमुदीं**त **मदनपाल** तर,—"जरी आहिताग्नि नसेल तरी आहिताग्नीचेपरी यथाविधि त्याचा दाह करावा असें निरग्निकाचाहि आहिताग्निवत् दाह सांगितला आहे व **कात्यायनानें** चितेवर प्रेत उताणें दक्षिणेस मस्तक ठेवून, दहन करावें, असें सांगितलें आहे ह्मणून, निरग्निकासही हाच विधि आवश्यक आहे," असें ह्मणतो. तें त्याचें मत अतिदेशानें उपदेशाचा बाध कसा होतो? याविषयीं विचार्य आहे. **कित्येक** तर—"वाचनिक अतिदेश उपदेशतुल्य आहे, व 'उपेतश्चेत्,' याचें द्विजपरत्व आहे, व **ब्राह्म**-वचनांत तें पद नाहीं ह्मणून, हें वचन शूद्रपरच आहे. केवळ ब्राह्मणांसच उत्तानत्व नाहीं," असें ह्मणतात. अन्य **कित्येक** तर—"**छंदोग**—ब्राह्मणांस उत्तानत्व व इतरांस अधोमुखत्व सांगितलें आहे," असें ह्मणतात. आतां निरग्निद्विजाची वार्ता असो. अनुपनीत द्विज व शूद्रांस तर अधोमुखत्व व उत्तरेस शिर करून ठेवणें हीं निर्विवाद आहेत. शूद्राचा दाह तर अमंत्रक करावा. कारण, "गर्भाधानादि विधि स्मशानांत मंत्रांनीं करावा असें ज्याविषयीं विधिवचन आहे त्यांचा समंत्रक दाह होतो, इतरांचा होत नाहीं," असें **मदनपाल** ह्मणतो. यांतील तत्त्व तर असें कीं, पूर्वोक्त वचनानें वैदिकमंत्राचाच निषेध होतो, पुराणोक्ताचा होत नाहीं ह्मणून, शूद्रांचा पौराणमंत्रांनीं दाहादि विधि करावा. तो दाहादिकांचा प्रकार पुढें प्रयोगांत सांगेन. पौराणविधि होतो अतएव **वराहपुराणां**त—"चारहि वर्णांत पूर्वोक्त रीतीनें (ब्राह्म-

णादि त्रिवर्णांस वैदिक व शूद्रांस पुराणोक्त मंत्रांनीं) और्ध्वदेहिकविधि करतां येतो," असें सांगितलें आहे. **प्रचेता** ह्मणतो—"प्रेत नग्न जाळूं नये. तर कांहीं वस्त्र त्यावर असावें, व कांहीं स्मशानस्थांस द्यावें." **यम** ह्मणतो—"प्रेतास स्नान घालून माळा गंध इत्यादिकांनीं भूषित करून जाळावें." **क्रियानिबंधांत गरुडपुराणांत**—"दाहकर्त्यानें खांद्यावर उदकपूर्ण मातीचा कलश घेऊन, चितेच्या प्रदक्षिण संतत उदकधारा करावी," असें सांगितलें आहे. स्त्री व पुरुष जर, एककालींच मरतील तर त्यांच्या उत्तरकर्माविषयीं **बौधायन** ह्मणतो—"शव नेल्यापासून दोघांचा दाह होईपर्यंत सर्व विधि एकतंत्रानें करावा. तसेंच अस्थिसंचयन एकच करावें. उदक व पिंडदानादि भिन्न करावें. कोणी स्त्रीनें अन्वारोहण केल्यास पूर्वोक्त रीतीनेंच सर्व कर्म करावें, असें ह्मणतात." उदकदान कसें करावें त्याविषयीं **ब्राह्मपुराणांत**—"प्रथम वस्त्र धुवून तेंच नेसून, सर्व मल जातील असें सचैल स्नान करावें. नंतर सर्वांनीं पाषाणावर तिलोदक द्यावें. तें शूद्रानें ३० अंजलि द्यावें," असें सांगितलें आहे. एतत्संबंधी विशेष **निर्णयसिंधूं**त पाहावा.

## ॥ अथ प्रयोगः ॥

**पुत्रादिरपसव्येन देशकालौ स्मृत्वा काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थमौर्ध्वदैहिकं करिष्ये इत्युक्त्वा । मृतिस्थाने दर्भे काश्यपगोत्रामुकदास प्रेतेदं तेऽवनेजनं । एष ते पिंडः प्रत्यवनेजनं च । एवं उत्थापनपिंडं दत्वा प्रेतवस्त्रे पिंडं बध्वा दक्षिणद्वारा नयेत् ॥ द्वारे चतुष्पथे विश्रांतौ चितायां चैव पिण्डा देयाः । ततः शुचिदेशे पंचभूसंस्कृते क्रव्यादसंज्ञकाग्निं प्रज्वाल्य गंधमाल्यैः संपूज्य प्रेतस्य वपनं कारयित्वा गंधमाल्यैरलंकृत्य मुखसप्तच्छिद्रेषु हेमशकलान्यभावे आज्यं वा क्षिप्त्वा नववस्त्रवेष्टितं घृताक्तं कृत्वा चितौ उत्तरशीर्षमधोमुखं पुरुषमुत्तानां स्त्रियं निनाय असौ संस्कार्यलोकाय स्वाहेति तूष्णीं वाज्याहुतिं दत्वा शिरःस्थानेऽग्निं दद्यात् । मंत्रस्तु वाराहे ॥ कृत्वा तु दुष्कृतं कर्म जानता वाप्यजानता ॥ मृत्युकालवशं प्राप्य नरं पंचत्वमागतं ॥ १ ॥ धर्माधर्मसमायुक्तं लोभमोहसमावृतं ॥ दहेयं सर्वगात्राणि दिव्यान् लोकान् स गच्छतु ॥ २ ॥ ज्वलमानं महावह्निं शिरःस्थाने प्रदापयेत् ॥ चतुर्वर्णेषु संस्थानमेवं भवति पुत्रिके ॥ ३ ॥ चतुर्वर्णोक्तिरनुपनीतद्विजपरा । क्रियानिबंधे गारुडे त्वन्यो मंत्र उक्तः ॥ त्वं भूतकृज्जगद्योने त्वं लोकपरिपालकः ॥ उक्तः संहारकस्तस्मादेनं स्वर्गं मृतं नयेति । ततः किंचिच्छवे दग्धे कुंभमादाय पादतोप्रदक्षिणं त्रिःपरिक्रम्य त्रिरश्मना कुंभं भित्त्वा कुंभं क्षिप्त्वानवेक्षमाणाः बालपुरःसरा जलं गत्वा पूर्वधृतं वस्त्रं प्रक्षाल्य पुनः परिधाय वामनासिकया जलमालोड्य वृद्धाद्याः स्नात्वा तीरे दर्भे पाषाणं निधाय ऋजुदर्भतिलपूर्णांजलिं काश्यपगोत्र अमुकदासप्रेत एष ते तिलांजलिरुपतिष्ठतु । उपतिष्ठतामिति वा । सर्वे दक्षिणामुखाः सकृत्त्रिर्वा दत्वा पुनः स्नायुः । मित्रोढानूढकन्याभागिनेयश्वश्रूश्वशुरमातामहतत्स्त्रीमातुलराश्च उदकदानं कृताकृतं क्लीबभर्तृगर्भस्त्रीपतितैरुदकं न कार्यं ।**

**तेभ्योऽप्यन्यैः । एवं त्रिंशत्पंचदश दश वा दिनानि प्रत्यहं दद्यात् । प्रत्यहमेकवृद्धिर्द्विकवृद्धिस्त्रिकवृद्धिर्वा कार्या । ततो बालपुरःसरा जलादुत्तीर्याधोदशं वस्त्रं निष्पीड्य गृहद्वारि स्थित्वा त्रीणि निंबपत्राणि विदश्याचम्य गोमयसर्षपवृषांबुदूर्वाग्नीनालभ्याश्मनि पदं निधाय गृहं प्रविशेयुः । वृद्धाः शोकापनोदनं कुर्युः । ततो मृन्मये पात्रद्वये एकाहं त्र्यहं वा प्रेतात्र स्नाहीति जलं पिबेदमिति क्षीरं निदध्यात् । दशरात्रमिति हेमाद्रौ । प्रत्यहं भूमौ कर्ता भोजनसमयेऽन्नं संकल्पयेत् । ततस्त्र्यहमुपवासः । क्रीतलब्धाशनं वा । अधःशय्यासनं सर्वेषां यावदाशौचं । प्रथमतृतीयसप्तमदशमेषु वा ज्ञातिना सह भोजनं । तच्च दिवैव । बहिः दीपो देय इत्यादि निर्णयसिंधौ ज्ञेयं ॥**

आतां प्रयोग सांगतो.

पुत्रादि कर्मकर्त्यानें अपसव्यानें देशकाल स्मरून,—**काश्यपगोत्रस्य अस्मत्पितुः** ( येथें मृताचा संस्कार अन्य करणारा असल्यास, त्यानें आपल्या संबंधानुसार ऊह करावा ) **अमुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थं और्ध्वदैहिकं करिष्ये** असें ह्मणून, मृतस्थानीं दर्भावर—**काश्यपगोत्रामुकदास प्रेतेदं तेऽवनेजनं** ह्मणून अवनेजन देऊन—**एष ते पिंडः** ह्मणून पिंड देऊन, **इदं ते प्रत्यवनेजनं** असें प्रत्यवनेजन द्यावें. असेंच प्रेत उचलतेवेळीं उत्थापनपिंड देऊन, तो प्रेताच्या अंगावरच्या वस्त्रांत बांधून, प्रेत दक्षिणद्वारानें स्मशानांत न्यावें, व गृहद्वारांत, चतुष्पथांत व प्रेतविश्रांतिस्थानीं पिंड द्यावे. नंतर शुद्ध भूमीवर पंचभूसंस्कार करून, क्रव्यादनामक अग्नि स्थापन करून, तो पेटल्यावर गंधपुष्पादिकांनीं पूजून, प्रेतवपन करून, गंधपुष्पादिकांनीं अलंकृत करून, पूर्वोक्त सप्तछिद्रांत सुवर्ण, त्याच्या अभावीं तूप घालून, नूतन वस्त्रानें वेष्टून, तूप लावून उत्तरेस मस्तक करून, पुरुष असल्यास अधोमुख, स्त्रीस उताणी निजवून चिता प्रज्वलित करावी. अग्नींत **"असौ संस्कार्यैलोकाय स्वाहा"** ह्मणून किंवा तूष्णीं आज्यहवन करून, मस्तकस्थानीं पुढील मंत्रानें अग्नि द्यावा. तो मंत्र **वराहपुराणां**त कथित आहे. जसें—**कृत्वा तु दुष्कृतं कर्म जानता वाप्यजानता ॥ मृत्युकालवशं प्राप्य नरं पंचत्वमागतम् ॥ १ ॥ धर्माधर्मसमायुक्तं लोभमोहसमावृतं ॥ दहेयं सर्वगात्राणि दिव्यान्लोकान्स गच्छतु ॥ २ ॥** यानें प्रदीप्त अग्नि शिरःस्थानीं द्यावा. "चार वर्णांस हाच विधि उक्त आहे." येथें चारहि वर्णांस हाच विधि उक्त आहे, असें ह्मटलें तें द्विजांविषयीं अनुपनीतद्विजपर आहे; कारण, उपनीत द्विजांस वैदिकमंत्रांनीं दाह उक्त आहे त्याशीं विरोध येईल ह्मणून वरील व्यवस्था आहे. याविषयीं **क्रियानिबंधां**त **गरुडपुराणां**त अन्य मंत्र सांगितला आहे. तो—**"त्वं भूतकृज्जगद्योने त्वं लोकपरिपालकः ॥ उक्तः संहारकस्तस्मादेनं स्वर्गं मृतं नय" ॥ १ ॥** असा अग्नि देऊन, प्रेत किंचित् जळल्यावर पूर्वोक्त कुंभ घेऊन, प्रेताच्या पायांपासून प्रारंभ करून, ३ प्रदक्षिणा करून दगडानें ३ वेळ तो कुंभ

फोडून टाकून, तो न पाहातां बालकांस पुढें करून, उदकसमीप जाऊन, प्रथम नेसलेलें वस्त्र धुवून, तें पुनः नेसून कमरेइतक्या पाण्यांत जाऊन, डाव्या नाकपुडीनें उदक आलोडन करून ( ३ वेळ फिरवून ), वृद्धक्रमानें स्नान करून, उदकतीरीं दर्भावर पाषाण ठेवून, ऋजुदर्भ व तिळांनीं पूर्ण उदकांजलि—**काश्यपगोत्रामुकदास प्रेत एष ते तिलांजलिरुपतिष्ठतु**—किंवा—**उपतिष्ठतां** ह्मणून सर्वांनीं दक्षिणाभिमुख असून १ किंवा ३ अंजलि देऊन, पुनः स्नान करावें. मित्र, त्याची स्त्री, विवाहित व अविवाहित कन्या, भाचा, सासू, सासरा, आईचा बाप व त्याची स्त्री, मातुल, व स्वदेशीय राजा, यांस प्रेमानें उदक देणार तर द्यावें, न दिल्यास दोष नाहीं. नपुंसक जीचा पति आहे ती व गर्भिणी स्त्री, तसेच पतित यांनीं स्वसंबंध्यांस उदक देऊं नये, व यांसहि इतरांनीं देऊं नये. असें ३० । १५ किंवा १० दिवसपर्यंत प्रतिदिवसीं उदक द्यावें. प्रतिदिनीं १ । २ । ३ असे क्रमानें उदकांजलि वाढवावे असाहि प्रकार आहे. असें उदकदान झाल्यावर, बालकांस पुढें करून, उदकांतून बाहेर येऊन, खालीं दशा करून वस्त्र धुवून, स्वगृहीं जाऊन, द्वारीं उभें रहावें. नंतर लिंबाचीं ३ पानें भक्षून विदिशा—( आग्नेयादिक ४ ) भिमुख आचमन करून, गोमय, मोहऱ्या, बैल, उदक, दूर्वा व अग्नि यांचा स्पर्श करून, दगडावर पाय ठेवून घरांत जावें. वृद्धांनीं आपण शोक न करितां इतरांस बोध करून त्यांचा शोक दूर करावा. नंतर २ दिवसीं मातीच्या २ भांड्यांत १ किंवा ३ दिवसपर्यंत—**प्रेताऽत्र स्नाहि** ह्मणून एकांत उदक, व **प्रेत पिबेदं** ह्मणून दुसऱ्या पात्रीं दूध ठेवीत असावें. "असें दहा दिवस करावें," असें **हेमाद्रीं**त सांगितलें आहे. कर्मकर्त्यानें प्रतिदिनीं भोजनसमयीं भूमीवर संकल्प करून अन्न ठेवावें. नंतर ३ दिवस उपवास करावा, किंवा अन्न विकत घ्यावें, अथवा मिळालेलें अन्न सेवन करावें, स्वयंपाक करून जेवूं नये. आशौचांत भूमीवर निजावें व बसावें. १ । ३ । ७ । १० व्या दिवशीं स्वज्ञातीसह दिवसा भोजन करावें. रात्रौ करूं नये. प्रेतास घराबाहेर १ वर्ष किंवा १० दिवस दीप द्यावा. इत्यादि प्रकार **निर्णयसिंधूं**त पहावे.

## ॥ अथ संचयनम् ॥

**तच्च प्रथमद्वितीयतृतीयचतुर्थसप्तमनवमेषु शूद्राणां । विशेषतो दशमेऽह्नि । तदुत्तरं भौमार्कमंदतिथियुग्मैकपादद्विपादत्रिपादकर्तृनक्षत्रवर्जदिने कार्यं ॥ कर्ता देशकालौ स्मृत्वा॰ स्वपितुः काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थमस्थिसंचयनश्राद्धं॰करिष्ये इत्युक्त्वा । कुशबटुं निधाय ॥ इह लोकं परित्यज्य गतोऽसि परमां गतिम् ॥ मनसा वायुरूपेण विप्रे त्वाहं नियोजये ॥ १ ॥ अमुकप्रेतेदं त आसनं उपतिष्ठतां । एवमर्घः । गंधः पुष्पं धूपदीपआच्छादनमुपतिष्ठतां । एवं क्रव्याद्देवताभ्यः प्रेताय तत्सखिभ्यश्च त्रीण्यामान्नानि दत्वा घृतक्षीरोदकैश्चितिं प्रोक्ष्य पलाशशाखया चितेर्भस्मापोह्यांगुष्ठकनिष्ठाभ्यां शिरस उरसः पाण्योः पार्श्वयोः पादयोरस्थीन्यादाय**

पंचगव्येन गंगोदकेन प्रक्षाल्य गंधाद्यर्चितानि क्षौमेणावेष्ट्य नवकुंभे निधाय शरावेण पिधाय वने वृक्षमूले वा भूमौ निखाय भस्म नद्यां क्षिप्त्वा चितिदेशे वेदिं कृत्वा तत्राचकाशमीपत्रछत्रपताकायुतं कुंभत्रयं संस्थाप्य क्रव्याददेवताभ्यः प्रेताय तत्सखिभ्यश्च निवेद्य कुंभेषु पिंडान् दद्यात्। मंत्रस्तु ॥ नमः क्रव्यादमुख्येभ्यो देवेभ्य इह सर्वदा ॥ श्मशानवासिनो देवाः शवानां परिकीर्तिताः ॥ १ ॥ तेभ्योऽन्नमुदकं कुंभमक्षय्यमुपतिष्ठतु ॥ येऽत्र स्मशाने देवाः स्युर्भगवंतः सनातनाः ॥ २ ॥ तेस्मत्सकाशाद्गृह्णन्तु बलिमष्टांगमक्षयं ॥ प्रेतस्यास्य शुभान् लोकान् प्रयच्छंतु च शाश्वतान् ॥ ३ ॥ अस्माकमायुरारोग्यं सुखं च ददताच्चिरं ॥ इति प्रथमं स्मशानवासिभ्यो मध्यमं प्रेताय तद्दक्षिणे तत्सखिभ्यश्च दत्वा स्नायात्। शिष्टान्यस्थीनि गंगायां क्षिपेत्। तद्विधिस्तु। हेमश्राद्धं तर्पणं च कृत्वास्थीनि पंचगव्येन प्रक्षाल्य हेममुक्तारूप्यप्रवालकान्यस्थिमध्ये क्षिप्त्वा तीर्थं गत्वा स्नात्वा पंचगव्येन प्रोक्ष्य हिरण्यमध्वाज्यतिलैः संपूज्य मृत्पिंडे निधाय दक्षिणामुखो नमोऽस्तु धर्मायेति जलं प्रविश्य स मे प्रीतोऽस्तु इति क्षिप्त्वा विप्रेभ्यो दक्षिणां दत्वा पुनः श्राद्धं तर्पणं च कुर्यात्। अत्र दशदानगोदानादि कुर्वंति। इदमधिमासशुक्रास्तादौ न कार्यं। दशाहमध्ये तु न दोषः ॥

यानंतर अस्थिसंचयन सांगतो.

तें १।२।३।४।७ अथवा ९ व्या दिवसीं व शूद्रास विशेषतः १० वे दिवसीं विहित आहे. तदनंतर—मंगळ, रवि, शनि हे वार; तिथियुग्म; एकपाद, द्विपाद, त्रिपाद, व कर्त्याचें जन्मनक्षत्र या दिवसीं करूं नये. कर्त्यानें देशकालादि [illegible]न, न,— **अस्मत्पितुः काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्त[illegible]कप्राप्त्यर्थं अस्थिसंचयनश्राद्धं करिष्ये।** असें ह्मणून पात्रांवर दर्भबटु ठेवून,—"**इहलोकं परित्यज्य गतोऽसि परमां गतिं ॥ मनसा वायुरूपेण विप्रे त्वाहं नियोजये**" ॥ १ ॥ **अमुकप्रेतेदं त आसनमुपतिष्ठताम्** ह्मणून आसन, व असेंच अर्घ्य, गंध, पुष्प, धूप, दीप, आणि आच्छादनादि देऊन, असेंच क्रव्याद देवता, प्रेत व त्याचे मित्र यांस एकेक आमान्न देऊन, तूप, दूध व उदकांनीं चितेवर प्रोक्षून, पळसाच्या ढापीनें वस्त्र दूर करून आंगठा, व करंगळी, या २ बोटांनीं मस्तक, उर, २ हात, २ पार्श्व, २ पाय यांचीं अस्थि घेऊन, तीं पंचगव्यानें व गंधोदकानें धुवून, गंधाद्युपचारांनीं पूजून रेशमी वस्त्रांत गुंडाळून नव्या कुंभांत ठेवून, शरावानें (मालटी) झांकून, वृक्षमूलीं किंवा अन्यत्र भूमींत पुरावीं, चिताभस्म नदींत टाकून, तेथें वेदि करून, शमीपत्र, छत्री व पताका यांनीं युक्त ३ कुंभ ठेवून, क्रव्याद देवता, प्रेत व त्याचे सखे यांस एकेक कुंभ देऊन, त्यांवर पुढील मंत्रांनीं पिंड द्यावे. ते मंत्र— **"नमः क्रव्यादमुख्येभ्यो देवेभ्य इह सर्वदा ॥ स्मशानवासिनो देवाः शवानां परिकीर्तिताः ॥ १ ॥ तेभ्योन्नमुदकं कुंभमक्षय्यमुपतिष्ठतु ॥ येत्र स्मशाने देवाः स्युर्भगवंतः सनातनाः ॥ २ ॥ तेऽस्मत्सकाशाद्गृह्णंतु बलिमष्टांगमक्षयम् ॥ प्रेतस्यास्य शुभान्लोकान्प्रयच्छंतु च शाश्वतान् ॥ ३ ॥**

**अस्माकमायुरारोग्यं सुखं च ददताश्चिरं"** ॥ यांनीं स्मशानस्थ देवतांस पहिला व प्रेतास २ रा, त्याच्या दक्षिणेस प्रेतसख्यांस ३ रा देऊन, स्नान करावें. पुरलेलीं अस्थि गंगेंत टाकावीं. त्याचा विधि पुढें लिहितो. तो असा कीं—आधीं हेमश्राद्ध व तर्पण करून, तीं पंचगव्यानें धुवून, त्यांत—सोनें, मोती, रुपें व पोवळें हीं घालून, मोठ्या नियमानें तीर्थावर जाऊन, तीं पंचगव्यानें प्रोक्षून, सोनें, मध, तूप व तीळ यांनीं संयुक्त करून, मातीच्या गोळ्यांत घालून हातांत घेऊन दक्षिणाभिमुख—"**नमोऽस्तु धर्माय**" ह्मणून उदकांत प्रवेश करून,—"**स मे प्रीतोस्तु**" ह्मणून तो गोळा तीर्थांत टाकावा. मग विप्रांस दक्षिणा देऊन तर्पण व श्राद्ध करावें. येथें दशदानादि व गोदानादि करितात. हें अधिकमास व गुरुशुक्रास्तादिकांत करूं नये. पहिल्या १० दिवसांत त्यांचा दोष नाहीं.

## ॥ अथ पाथेयश्राद्धम् ॥

**काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य मनुष्यलोकात्प्रेतलोकं गच्छतः पाथेयसिध्यर्थं पाथेयश्राद्धं करिष्ये इत्युक्त्वा कुशबटौ इहलोकं परित्यज्येति प्रागुक्तमंत्रांते इदं ते आसनमुपतिष्ठतां । एवमर्घो गंधः पुष्पं धूपो दीप आच्छादनमामान्नं चोपतिष्ठतामिति सर्वत्र वदेत् । ततः इदं ते पिंडासनं । अवनेजनं पिंडः प्रत्यवनेजनं पिंडपूजा दक्षिणा च । अयमेव सर्वप्रेतश्राद्धानां प्रयोगः । एवं नग्नप्रच्छादनं श्राद्धं कुर्यात् । अत्र वस्त्रदानम् ॥**

यानंतर पाथेयश्राद्ध सांगतो.

कर्त्यानें आचमन व देशकालादिकांचें स्मरण करून,—**काश्यपगोत्रामुकदासप्रेतस्य मनुष्यलोकात्प्रेतलोकं गच्छतः पाथेयसिध्यर्थं पाथेयश्राद्धमहं करिष्ये ।** ह्मणून कुशबटूवर,—"**इहलोकं परित्यज्य गतोऽसि परमां गतिं ॥ मनसा वायुरूपेण विप्रे त्वाहं नियोजये**" ॥ १ ॥ यानें—**इदं ते आसनमुपतिष्ठतां** ह्मणून आसन, व असेंच अर्घ्य, गंध, पुष्प, धूप, दीप, आच्छादन व आमान्न हीं—**उपतिष्ठतां** ह्मणून द्यावीं. मग—**इदं ते पिंडासनं** ह्मणून दर्भ, **इदं ते अवनेजनं** ह्मणून उदक, **एष ते पिंडः** ह्मणून पिंड, **इदं ते प्रत्यवनेजनं** ह्मणून पुनः उदक देऊन,–पिंडपूजा दक्षिणा देऊन, कर्म समाप्त करावें. सर्व प्रेतश्राद्धांत हाच प्रयोग घ्यावा. असेंच नग्नप्रच्छादननामक श्राद्ध करावें. यांत वस्त्रदान करावें.

## ॥ अथ नवश्राद्धम् ॥

**तच्च विषमदिनेषु प्रथमतृतीयपंचमसप्तमनवमैकादशेषु कार्यं । अमुकप्रेतस्य प्रेतत्वविमुक्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थमाद्येऽह्नि विषमश्राद्धं करिष्ये । अत्र विप्रनिमंत्रणे मंत्रो वाराहे ॥ गतोऽसि दिव्यलोकं त्वं कृतांतविहितात्पथः ॥ मनसा वायुभूतेन विप्रे त्वाहं नियोजये ॥ १ ॥ पूजयिष्यामि भोगैस्त्वामेवं विप्रं निमंत्रयेत् ॥ अन्यत्प्राग्वत् । भविष्ये ॥ नवसप्तविशां राज्ञां नवश्राद्धान्यनुक्रमात् ॥ आद्यंतयोर्वर्णयोस्तु षडित्याहुर्महर्षयः ॥ १ ॥**

आतां नवश्राद्धें सांगतो.

तीं विषमदिनीं ह्मणजे—१ । ३ । ५ । ७ । ९ व ११ व्या **दिवशीं** करावीं. त्यांचा संकल्प—**अमुकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या उत्तमलोकप्राप्त्यर्थं आद्ये**—( येथें ज्या **दिवशीं** कर्तव्य असेल त्याचा ऊह करावा ) **अन्हि विषमश्राद्धं करिष्ये** असा संकल्प करून, विप्रनिमंत्रण करावें. त्याचा मंत्र **वराहपुराणां**त—"**गतोऽसि दिव्यलोकं त्वं कृतांतविहितात्पथः ॥ मनसा वायुभूतेन विप्रे त्वाहं नियोजये ॥ १ ॥ पूजयिष्यामि भोगैस्त्वामेवं विप्रं निमंत्रयेत्**" असा सांगितला आहे. अन्य सर्व प्रकार पूर्ववत् करावा. हीं श्राद्धें किती करावीं तें **भविष्यपुराणां**त सांगितलें आहे. जसें—ब्राह्मणांस ६, क्षत्रियांस ७, वैश्यांस ९, शूद्रांस ६ विहित आहेत. असें **महर्षि** ह्मणतात.

## ॥ अथ प्रेतपिंडाः ॥

**ते चामान्नेनैवेति** हलायुधः । चरुणेत्यन्ये । यद्यपि हेमाद्रौ पारस्करेण **शूद्रे** त्रिंशत्प्रकीर्तिता इत्युक्तम् । तथापि प्रेतेभ्यः सर्ववर्णभ्यः पिंडान्दद्याद्दशैव चेति तेनैवोक्तेर्दशैव । अन्ये तु यावदाशौचं प्रेतस्योदकं पिंडं च दद्युरिति विष्णूक्तेस्त्रिंशद्विंशतिपंचदशरात्रपक्षेषु तत्संख्यया पिंडा इत्याहुः । हेमाद्रौ ब्राह्मे तु विप्रान्येषु दशपिंडपक्षेंत्यपिंडोत्कर्षउक्तः । देयस्तु दशमः पिंडो राज्ञां वै द्वादशेऽहनि ॥ वैश्यानां वै पंचदशे मासे शूद्रेषु दीयते ॥ १ ॥ सद्यः शौचे । त्र्यहादौ तु तत्रैव हि ॥ सद्यः शौचे प्रदातव्याः सर्वेऽपि युगपत्तया ॥ त्र्यहाशौचे प्रदातव्याः प्रथमे ह्येक एव हि ॥ १ ॥ द्वितीयेऽहनि चत्वारस्तृतीये पंच चैव हि ॥ शातातपः ॥ आशौचस्य च ह्रासेऽपि पिंडान्दद्याद्दशैव तु ॥ आशौचोत्तरं दाहे पर्णशरे चाशौचह्रासः ॥ अत्र देशकर्तृद्रव्यैक्यं ज्ञेयं । प्रथमेऽहनि यद् द्रव्यं तदेव स्याद्दशाहिकं ॥ यत्राद्ये दीयते पिंडस्तत्र सर्वं समापयेदिति क्रियानिबंधे व्यासोक्तेः । ब्राह्मे ॥ प्रथमेऽहनि योदद्यात्प्रेतायान्नं समाहितः ॥ अन्नं नवसु चान्येषु स एव प्रददात्यपि ॥ १ ॥ दाहकर्तैव दशाहं कुर्यादिति मिताक्षरायां । शुद्धितत्त्वे वायवीयेऽपि ॥ असगोत्रः सगोत्रो वा यदि स्त्री यदि वा पुमान् ॥ यश्चाग्निदाता प्रेतस्य पिंडं दद्यात्स एव हि ॥ १ ॥ कर्तृमृतौ तु तत्रैव बृहस्पतिः ॥ एवं क्रियाप्रवृत्तानां यदि कश्चिद्विपद्यते ॥ तद्बंधुना क्रिया कार्या सर्वैर्वा सहकारिभिः ॥ १ ॥ अन्येन शेषः कार्य इति गौडाः । आदितः सर्वमित्यन्ये । आदिपुराणे ॥ उपतिष्ठतामयं पिंडः प्रेतायेति समुच्चरेदिति ॥

आतां प्रेतपिंड सांगतो.

ते—"आमान्नानेंच करावे," असें **भट्टहलायुध** ह्मणतो. "चरूनें करावे," असें **अन्य** ह्मणतात. जरी **हेमाद्रींत पारस्करानें** "शूद्रानें ३० पिंड द्यावे," असें सांगितलें आहे; तरी "सर्व वर्णांतील प्रेतांस १० पिंड द्यावे," असें अन्यत्र त्यानेंच सांगितलें आहे ह्मणूनच १० द्यावे. **अन्य कित्येक**—"जोंपर्यंत आशौच असेल तोंपर्यंत प्रेतास पिंड व उदक द्यावें, असें **विष्णु**वचन आहे ह्मणून, ३० । २० । १५ रात्र

आशौचपक्षांत आशौचरात्रिसंख्याक पिंड द्यावे," असें ह्मणतात. **हेमाद्रींत ब्रह्मपुराणांत**—"विप्रांहून अन्य वर्णांनीं दशपिंडपक्ष घेतल्यास, शेवटील पिंडाचा उत्कर्ष (त्या दिनीं न देतां कालांतरीं देणें) करावा," असें सांगितलें आहे. तो असा कीं क्षत्रियांनीं १२, वैश्यांनीं १५, शूद्रांनीं ३० सावे दिवसीं १० वा पिंड द्यावा." तत्काल शुद्धि व त्रिरात्र आशौच असल्यास कसे पिंड द्यावे, तें तेथेंच सांगितलें आहे. "तत्काल शुद्ध झाल्यास सर्वेहि पिंड एक वेळ, व त्रिरात्रपक्षीं प्रथम दिवसीं १, दुसऱ्या दिवसीं ४, तिसऱ्या दिवसीं ५, असे १० द्यावे." **शातातप** ह्मणतो—"आशौचक्षय झाल्यास १० पिंड द्यावे." आशौचानंतर पर्णशरदाह केल्यास आशौचाचा ह्रास होतो. येथें "देश, कर्ता व द्रव्य यांचें ऐक्य असावें, ह्मणजे प्रथमपासून १२ दिवसपर्यंत एकानें एकस्थानीं, एकद्रव्यानें सर्व कर्म करावें," असें **क्रियानिबंधांत व्यासानें** ह्मटलें आहे. **ब्राह्मपुराणां**त "जो पहिल्या दिवसीं प्रेतास अन्न देईल, त्यानेंच पुढील ९ दिवस द्यावें," असें सांगितलें आहे. "दाह करणारानेंच दशाहांत कर्म करावें," असें **मिताक्षरें**त सांगितलें आहे. याविषयीं **शुद्धितत्त्वांत वायुपुराणांत**ही "सगोत्र अथवा असगोत्र, स्त्री किंवा पुरुष जो कोणी प्रेतास अग्नि देईल त्यानेंच पिंडदान करावें," असें सांगितलें आहे. कदाचित् तो अग्निदाता मेला तर, **शुद्धितत्त्वांत बृहस्पति** ह्मणतो "असी प्रेतक्रिया करीत असतां जर तो मरण पावेल, तर त्याच्या बंधूनें व सर्व साह्य करणारांनीं राहिलेली क्रिया करावी." "दुसऱ्यानें क्रिया करावी ती, **कर्त्यानें** पहिल्यानें केल्याच्या पुढली करावी," असें **गौड** ह्मणतात. "प्रथमपासून सर्व करावी," असें **कित्येक** ह्मणतात. **आदिपुराणांत—"उपतिष्ठतामयं पिंडः प्रेताय** असें ह्मणून पिंड द्यावा," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ प्रयोगः ॥

**ऐशान्यां वेदिं कृत्वा तैजसे मृन्मये वा चरुं श्रपयित्वा सक्तुना वा तिलमधुघृतयुतं कपित्थमात्रं पिंडं कृत्वा तिथ्याद्युक्त्वा काश्यपगोत्रस्यामुकप्रेतस्य मूर्धाक्षिदंतावयवसंभूत्यै प्रथमाह्निकदेहपूरकपिंडदानं च करिष्ये । द्वितीयाहादौ द्वितीयाहादिकेत्यादि । ततः पाषाणाग्रे विष्णुं संपूज्य दर्भासनमवनेजनं च कृत्वामुकप्रेतेत्यादि मूर्धावयवसंभूत्यै देहपूरकः प्रथमाह्निक एष ते पिंड उपतिष्ठतां । प्रत्यवनेजनं भृंगराजतुलसीदलानि । पिंडं जले क्षिपेत् । अंजलिदानं तूक्तमेव । एवं दशाहं । तत्र संकल्पे विशेषः । चक्षुःश्रोत्रनासामुखावयवनिष्पत्त्यर्थमिति द्वितीये । गलांसभुजवक्षोनिष्पत्त्यर्थमिति तृतीये विषमश्राद्धं च । नाभिलिंगगुदनिष्पत्त्यर्थमिति चतुर्थे । जानुजंघापादावयवसिद्ध्यर्थमिति पंचमे विषमश्राद्धं च । सर्वमर्मावयवनिष्पत्त्यर्थमिति षष्ठे । मज्जामेदोमांसस्नायुनाडीरूपावयवसंभूत्यै इति सप्तमे विषमश्राद्धं च । दंतलोमनखावयवसिद्ध्यर्थमित्यष्टमे । वीर्यावयवसिद्ध्यर्थमिति नवमे विषमश्राद्धं च । देहपूर्णत्वतृप्तताक्षुद्विपर्ययसिद्ध्यर्थमिति दशमे । प्रत्यहमंजलिसंख्ययोदकुंभाश्च देयाः । अत्यशक्तौ तु पिंडयज्ञावृता देयं प्रेतायान्नं दिनत्रयमिति ज्ञेयं । अपरार्के व्यासः ॥ आशौचांत्यदिने क्षौरं जनन्यां च गुरौ**

मृते ॥ आपस्तंबः ॥ अनुभाविनां च परिवापनं । अनुभाविनः कनिष्ठा इति मिताक्षरा-रत्नाकरादयः ॥ आशौचमनुभवतां सर्वेषां वपनमिति शुद्धितत्त्वादयो गौडाः । तदुक्तं रत्नमालायां ॥ आज्ञया नरपतेर्द्विजन्मनां दारकर्ममृतसूतकेषु च ॥ बंधमोक्षमखदीक्षणेष्वपि क्षौरमिष्टमखिलेषु चोडुषु ॥ १ ॥ अपरार्के व्यासः ॥ पुत्रः पत्नी च वपनं कुर्यादंते यथाविधि ॥ पिंडदानोचितोन्योऽपि कुर्यादित्थं समाहितः ॥ १ ॥ पुत्राणामाद्यंतयोः समुच्चयश्च ज्ञेयः । दशमदिने त्ववयवपिंडं दत्वा त्रिकोणां वेदीं कृत्वा प्रेतसखिभ्यः प्रेताय यमाय च पिंडत्रयं दत्वा अपूपध्वजछत्रोदकुंभान् निवेद्य काकबलिं दत्वा अश्मानं तैलेनाभ्यज्य जले क्षिप्त्वा प्रेतस्पृष्टवाससी त्यक्त्वा पुत्रः पत्नी सर्वे प्रेताल्पवयसश्च वपनं कुर्युः । ततः स्नात्वा सर्वैः त्रिर्धर्मोदकांजलिं दत्वा सर्षपकल्केन तिलामलकैर्वा स्नात्वा गृहं व्रजेयुः । दशाहमध्ये दर्शे तु माधवीये ऋष्यशृंगः ॥ आशौचमंतरा दर्शो यदि स्यात्सर्ववर्णिनां ॥ समाप्तिं प्रेततंत्रस्य कुर्यादित्याह गौतमः ॥ १ ॥ श्लोकगौतमः ॥ अंतर्दशाहे दर्शश्चेत्तत्र सर्वं समापयेत् ॥ पित्रोस्तु यावदाशौचं दद्यात्पिंडान् जलांजलीन् ॥ १ ॥ इदमपि त्र्यहमध्ये दर्शे । तदूर्ध्वं दर्शे तु पित्रोरपि तंत्रं समाप्यमेव । पित्रोराशौचमध्ये तु यदि दर्शः समापतेत् । तावदेवोत्तरं तंत्रं पर्यवस्येत्त्र्यहात्परमिति गालवोक्तेः ॥ अन्येषां तु त्र्यहमध्येऽपि समाप्यं । कालामृते निर्णयामृते चैवं । मदनरत्नपारिजातयोस्तु गालवीयमापदनौरसपुत्रादिपरं । पित्रोस्त्र्यहोर्ध्वमपि नापकर्ष इत्युक्तं तत्र मूलं चिंत्यं । इति श्रीकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मे शूद्राशौचं तत्कृत्यं च ॥

यानंतर प्रयोग सांगतो.

ईशान्येस वेदि करून, तैजस व मृत्पात्रांत चरु श्रपण करून, सक्तु, तीळ, मध, व तूप यांनीं युक्त अन्नाचा कवठाएवढा पिंड करून, देशकाल स्मरून—**काश्यपगोत्रस्यामुकप्रेतस्य मूर्धाक्षिदंतावयवसंभूत्यै प्रथमाह्निकदेहपूरकपिंडदानं च करिष्ये** असा १ त्या दिवशीं संकल्प करावा. पुढील दिवशीं—**द्वितीयाह्निक तृतीयाह्निक** इत्यादि ऊह करून संकल्प करावा. नंतर पाषाणावर विष्णुपूजन करून, दर्भासन व अवनेजन करून,—**काश्य० स्यामुकप्रेतस्य मूर्धाव० देहपूरकः प्रथमाह्निक एष ते पिंड उपतिष्ठतां** म्हणून पिंड व—**प्रत्यवनेजनं** म्हणून उदक देऊन, भृंगिराज व तुलसीपत्रें देऊन, पिंड उदकांत टाकावा. उदकदान पूर्वीं सांगितलें आहे. हीं दोन्हीं १० दिवसपर्यंत असींच करावीं. प्रत्येक दिवसास केवल संकल्प मात्र विशेष आहे. तो—**चक्षुःश्रोत्रनासामुखावयवनिष्पत्त्यर्थं०** २ ऱ्या दिवसीं; **गलांसभुजवक्षोनिष्पत्त्यर्थं** ३, येथें विषमश्राद्धहि करावें; **नाभिलिंगगुदनिष्पत्त्यर्थं** ४, **जानुजंघापादावयवसिद्ध्यर्थं** ५, येथें विषमश्राद्ध करावें; **सर्वमर्मावयवनिष्पत्त्यर्थं** ६, **मज्जामेदोमांसस्नायुनाडीरूपावयवसंभूत्यै** ७, येथें विषमश्राद्ध करावें; **दंतलोमनखावयवसिद्ध्यर्थं** ८, **वीर्यावयवसिद्ध्यर्थं** ९, येथें विषमश्राद्ध करावें; **देहपूर्णत्वतृप्तताक्षुद्विपर्ययसिद्ध्यर्थं** १० व्या दिवशीं. असे सं-

कल्प करावे. प्रतिदिनीं जितके उदकांजलि तितकेच कुंभ द्यावे. अति अशक्त असल्यास पिंडयज्ञाची आहुति करून, प्रेतास त्रिदिन अन्न द्यावें. **अपरार्कांत व्यास** ह्मणतो—"मातापितर मेले असतां आशौचांतीं पुत्रानें क्षौर करावें." **आपस्तंब** ह्मणतो—"मृताच्या आशौचांत त्या दिवसीं अनुभावींनीं क्षौर करावें." "अनुभावी ह्मणजे—मृताहून कनिष्ठ," असें **मिताक्षरा** व **रत्नाकरादि** ह्मणतात. "आशौच धरणाऱ्या सर्वांनीं क्षौर करावें" असें **शुद्धितत्त्वादि गौड** ह्मणतात. तेंच **रत्नमालेंत** सांगितलें आहे. जसें—"राजा व ब्राह्मण यांच्या आज्ञा झाल्या असतां, दारकर्म, मृताशौच, कारागृहमोक्ष व यज्ञदीक्षा या वेळीं सर्व नक्षत्रांवर क्षौर करावें; अर्थात् नक्षत्रादि विचार करण्याचें प्रयोजन नाहीं." **अपरार्कांत व्यास** ह्मणतो—"पुत्र व पत्नी यांनीं आशौचांत्यदिनीं यथाविधि क्षौर करावें, व पिंडदान करण्यास योग्य अशा इतरांनींही करावें." यांत पुत्रांस आशौचाच्या आद्यंतीं क्षौर विहित आहे, असें जाणावें. १० व्या दिनीं अवयवपिंड देऊन, त्रिकोणवेदीवर प्रेतसखे, प्रेत व यम, या तिघांस एक एक पिंड देऊन, अपूप, ध्वज, छत्र व उदकुंभ हे निवेदन करून; काकबलि देऊन, पूर्वोक्त पाषाणास तेल लावून, तो उदकांत टाकून,—प्रेतस्पर्श झालेलीं वस्त्रें टाकून पुत्र, पत्नी व प्रेतापेक्षां सर्व लहान वयाच्यांनीं वपन करावें. यानंतर स्नान करून, सर्वांनीं यमधर्मास ३ वेळ उदकांजलि देऊन, वाटलेल्या मोहऱ्या, तीळ व आंवळे अंगास लावून, पुनः स्नान करून, घरीं जावें.—कदाचित् १० दिवसांत दर्श आल्यास, त्याविषयीं **माधवीयांत ऋष्यशृंगानें** ह्मटलें आहे कीं,—"आशौचांत दर्श (अमावास्या) आल्यास सर्व वर्णांनीं प्रेतकर्माची त्या दिनीं समाप्ति करावी, असें **गौतमानें** ह्मटलें आहे." **श्लोकगौतम** ह्मणतो—"दशाहांत दर्श आल्यास इतर सर्वांचें प्रेतकर्म त्या दिनीं संपूर्ण करावें; परंतु, मातापितरांस आशौच सरेपर्यंत पिंड व उदकांजलि द्यावे," हेंही पहिल्या ३ दिवसांत दर्श आल्यास करावें. त्यानंतर आल्यास मातापितरांचेंहि कर्म त्या दिनींच समाप्त करावें; कारण,—"मातापितरांच्या आशौचांत ३ दिवसांपुढें जर दर्श येईल तर, पुढील कर्मांचा अपकर्ष करून, दर्शदिवसीं सर्व समाप्त करावें, अशी **गालवोक्ति** आहे. इतरांचे, ३ दिवसांत दर्श आल्यास त्याच दिनीं समाप्त करावें. **कालामृत** व **निर्णयामृतां**तहि असेंच आहे. **मदनरत्न** व **पारिजातां**त तर—"पूर्वोक्त **गालववचन** आपत्कालपर व औरसभिन्न पुत्रविषयक आहे, मातापितरांचें कर्म असल्यास ३ दिवसांपुढेंहि दर्श आल्यास कर्मांचा अपकर्ष होत नाहीं," असें सांगितलें आहे. पण त्याचें मूळ पाहावें. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रस्य आशौचं तत्कृत्यं समाप्तम् ॥**

## ॥ अथैकादशाहः ॥

**मनुः ॥** विप्रः शुद्ध्यत्यपः स्पृष्ट्वा क्षत्रियो वाहनायुधे ॥ वैश्यः प्रतोदं रश्मीन्वा

१ गुर्जर लोकांत अशी चाल अद्यापि आहे.

यष्टिं शूद्रः कृतक्रियः ॥ १ ॥ शुद्धितत्त्वे देवलः ॥ आद्याहःसु निवृत्तेषु सुस्नाताः कृतमंगलाः ॥ आशौचाद्विप्रमुच्यंते ब्राह्मणान्स्वस्तिवाच्य च ॥ १ ॥ इदं सपिंडनोत्तरमिति शिष्टाः । हेमाद्रौ शंखः ॥ आद्यं श्राद्धमशुद्धोऽपि कुर्यादेकादशेऽहनि ॥ कर्तुस्तात्कालिकी शुद्धिरशुद्धः पुनरेव सः ॥ १ ॥ शूद्रेऽप्येवं । तदाह पैठीनसिः ॥ एकादशेऽह्नि यच्छ्राद्धं तत्सामान्यमुदाहृतं ॥ चतुर्णामपि वर्णानां सूतकं तु पृथक् पृथक् ॥ १ ॥ यत्तु मरीचिः ॥ आशौचांते ततः सम्यक् पिंडदानं समाप्यते ॥ सर्वश्राद्धं प्रदातव्यं सर्ववर्णेष्वयं विधिरिति तत्सर्वेषां दशाहपरं । यत्तु मात्स्ये ॥ एकादशेऽहनि तथा विप्रानेकादशैव तु ॥ क्षत्रादिः सूतकांते तु भोजयेदयुजो द्विजानिति तद्रुद्रगणश्राद्धपरं । रुद्रमुद्दिश्य कर्तव्यं प्रेतप्रीतिकरं हि तदिति वचनादिति मदनपारिजातः । कल्पतरौ शूलपाणिवाचस्पत्यादयस्त्वस्माद्वचनादप्याशौचापगम इति विष्णूक्तेः प्रागुक्तशंखादिवचनानां चानाकरत्वाच्छूद्रादीनामप्याशौचांत एवाहुः । अन्ये तु द्विविधवाक्यवशाद्देशाचारतो विकल्पमाहुः । सत्यव्रतः ॥ सद्यःशौचेऽपि दातव्यं प्रेतस्यैकादशेऽहनि ॥ उशनाः ॥ त्र्यहाशौचेऽपि कर्तव्यमाद्यमेकादशेऽहनि ॥ अतीतविषये सद्यस्त्र्यहोर्ध्वं वा तदिष्यते ॥ १ ॥ हेमाद्रौ बौधायनः ॥ एकोद्दिष्टं श्व एव स्याद्द्वादशेऽहनि वा पुनः ॥ अत ऊर्ध्वमयुग्मेषु कुर्वीताहःसु शक्तितः ॥ १ ॥ अर्धमासेऽथ वा मासि ऋतौ संवत्सरेऽपि वा ॥

आतां एकादशाह्निक कृत्य सांगतो.

याविषयीं **मनु** ह्मणतो—"आशौचानंतर विप्रानें उदकास, क्षत्रियानें वाहनास व आयुधास, वैश्यानें चाबुक अथवा रश्मि ( काढण्या ) यांस आणि शूद्रानें काठीस स्पर्श केल्यानें, ते शुद्ध होतात." **शुद्धितत्त्वां**त **देवल** ह्मणतो—"पहिले १० किंवा अधिक आशौचाचे दिवस सरल्यावर उत्तम स्नान करून, पुण्याहवाचन व मंगल धारण केलें ह्मणजे आशौचमुक्त होतात." "हें सपिंडी झाल्यावर केलें असतां मुक्त होतात," असें **शिष्टांचें** मत आहे. **हेमाद्रीं**त **शंख** ह्मणतो—"अशुद्ध असतांही ११ व्या दिनीं आद्यश्राद्ध करावें; कारण, कर्त्यास तें करण्यापुरती शुद्धि असून नंतर तो अशुद्ध होतो." शूद्राविषयींही असेंच. **पैठीनसी**नेंही सांगितलें आहे कीं,—"जें ११ व्या दिवसीं करण्याचें श्राद्ध तें, सर्व वर्णांस सम आहे. आशौच मात्र निरनिराळें आहे." आतां जें **मरीचि** ह्मणतो कीं,—"नंतर आशौचांतीं उत्तमप्रकारें पिंडदान समाप्त करून, सर्व श्राद्ध द्यावें. हा विधि सर्व वर्णांस सम आहे." ह्मणून,—तें सर्वांस दशाहपर आहे. यावरून, क्षत्रियादिकांस अधिक आशौच सांगितलें आहे, त्याविषयीं हें ग्राह्य नाहीं. आणखी जें **मत्स्यपुराणां**त—"११ व्या दिनीं ११ ब्राह्मणांस, व क्षत्रियादिकांनीं आपल्या आशौचांतीं विषमसंख्याक ब्राह्मणांस भोजन घालावें," असें सांगितलें आहे; तें रुद्रगणश्राद्धपर आहे; कारण,—"रुद्राचा उद्देश करून प्रेतास प्रिय असें श्राद्ध करावें," असें **वचन** आहे ह्मणून **मदनपारिजा**त ह्मणतो. **कल्पतरूंत शूलपाणि व वाचस्पति** इत्यादिक तर "या वचनावरून आशौच निवृत्त होतें,' अशी **विष्णूक्ति**

आहे; व पूर्वोक्त—**शंखादि**वचनें **आकरग्रंथां**त नसल्यावरून शूद्रादिकांसहि आशौचांतींच आद्यश्राद्ध विहित आहे," असें ह्मणतात. **अन्य** कित्येक तर—"दोन प्रकारचीं वाक्यें आहेत याकरितां देश व आचारभेदानें त्याचा विकल्प आहे," असें ह्मणतात. **सत्यव्रत** ह्मणतो—"तत्काल आशौचनिवृत्ति असली तथापि ११ व्या दिनीं श्राद्ध करावें." **उशना** ह्मणतो—"त्रिदिनाशौच असतांहि आद्यश्राद्ध ११ व्या दिवसीं करावें. तेंच जर अतिक्रांत असेल तर, तत्काल किंवा ४ थ्या दिवसीं करावें." **हेमाद्रीं**त **बौधायन** ह्मणतो—"एकोद्दिष्टश्राद्ध ११ व्या किंवा १२ व्या दिवसीं करावें. कदाचित् त्या दिनीं न झाल्यास पुढें विषमदिनीं यथाशक्ति, अर्धमासीं अथवा महिना, ऋतु, किंवा वर्षांतीं करावें."

## ॥ अथ वृषोत्सर्गः ॥

**हेमाद्रौ मात्स्ये कौर्मे ॥ न करोति वृषोत्सर्गं सुतीर्थे वा जलांजलिं ॥ न ददाति सुतो यस्तु पितुरुच्चार एव सः ॥ १ ॥ लिखितोऽपि ॥ एष्टव्या बहवः पुत्रा यद्येकोऽपि गयां व्रजेत् ॥ यजेत वाश्वमेधेन नीलं वा वृषमुत्सृजेत् ॥ [ लि० स्मृ० श्लो० १० ] षट्त्रिंशन्मते ॥ पतिपुत्रवती नारी भर्त्तुरग्रे मृता यदि ॥ वृषोत्सर्गं न कुर्वीत गां दद्याच्च पयस्विनीम् ॥ १ ॥ एकादशेऽह्नि प्रेतस्य यस्य नोत्सृज्यते वृषः ॥ प्रेतत्वं सुस्थिरं तस्य दत्तैः श्राद्धशतैरपि ॥ २ ॥ यत्तु हेमाद्रौ भविष्ये ॥ चैत्र्यां वापि तृतीयायां वैशाख्यां द्वादशेऽह्नि वा ॥ यच्च विष्णुधर्मे ॥ विषुवद्वितये चैव मृताहे बांधवस्य चेति तत्पूर्वासंभवे ज्ञेयं । ब्राह्मे ॥ लोहितो यस्तु वर्णेन मुखे पुच्छे च पांडुरः ॥ श्वेतः खुरविषाणाभ्यां स नीलो वृष उच्यते ॥ १ ॥ देवीपुराणे ॥ चतस्रो वत्सिका भद्रे द्वे ह्यसंभवतोऽपि वा ॥**

यानंतर वृषोत्सर्ग सांगतो.

याविषयीं **हेमाद्रीं**त **मत्स्य** व **कूर्मपुराणां**त—"जो पुत्र वृषोत्सर्ग किंवा पवित्र तीर्थीं उदकदान करीत नाहीं, तो त्या पित्याचा पुत्रच नव्हे, तर, केवळ मल होय," असें सांगितलें आहे. **लिखित** ह्मणतो—"आपल्यास पुत्र बहुत व्हावे असी इच्छा करावी. कां कीं, त्यांतून एखादा तरी गयेस जाईल, अश्वमेध करील, किंवा नीलवृषोत्सर्ग करील." **षट्त्रिंशन्मतां**त—"सुवासिनी पुत्रवती स्त्री जर, नवऱ्याच्या आदीं मरण पावेल तर तिच्या प्रीत्यर्थ वृषोत्सर्ग न करितां दुभती गाय दान करावी. ज्या प्रेताच्या ११ व्या दिनीं वृषोत्सर्ग होत नाहीं; त्याचें शेंकडों श्राद्धें केलीं तथापि प्रेतत्व जात नाहीं. असें सांगितलें आहे. जें **हेमाद्रीं**त **भविष्यपुराणां**त—"चैत्री अथवा वैशाखी तृतीया व प्रेताचा १२ वा दिवस या कालीं —व जें **विष्णुधर्मोत्तरां**त—"२ विषुवसंक्रांति व बांधवांच्या मृतदिनीं वृषोत्सर्ग करावा," असें सांगितलें आहे तें पूर्वोक्त वृषोत्सर्गाचा असंभव असतां असें समजावें. **ब्राह्मपुराणां**त,—"ज्याचा वर्ण लाल असून मुख व पुच्छ शुभ्र ( गौर ) व खुर आणि शिंगें सफेत असतात तो नी-

लवृष असें धर्मशास्त्रवेत्ते म्हणतात, असें सांगितलें आहे. **देवीपुराणांत**—"वृषाबरोबर ४, २, अथवा १ पाड्या असाव्या," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ प्रयोगः ॥

तत्र पूर्वं विष्णुरूपिणे तर्पणमुक्तं देवजानीये । तत्र मूलं चिंत्यं । उपवीती देशकालौ स्मृत्वा काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या रुद्रलोकप्राप्त्यर्थं वस्त्रादिलोकप्राप्त्यर्थं वा वृषोत्सर्गं करिष्ये इत्युक्त्वा । नंदा च सुमनाश्चैव सुशीला च पयस्विनी ॥ सुरभिः पंचमी प्रोक्तेति वृषमातृः पूजयेन्न वा । तत ऐशाने कुंभे रुद्रं संपूज्याग्निं प्रतिष्ठाप्य ब्रह्मासनं कृत्वा प्रणीतापात्रे द्वयोर्भागयोर्जलक्षीरे प्रणीय पायसं पिष्टचरुं च कृत्वा ॥ आदौ अग्न्याहुतीः षट् च आज्यभागावतः परमिति स्मृतेरग्नये स्वाहेति षट् । तत आघारावाज्यभागौ च । ततः प्रजापतये इंद्रायाग्नये सोमाय चाज्यं हुत्वाग्नये रुद्राय शर्वाय पशुपतये उग्रायाशनये भगाय महादेवायेशानाय च पायसं हुत्वा पूष्णे स्वाहेति पिष्टं चरुं हुत्वा द्वयोः स्विष्टकृतं हुत्वाज्येन प्राजापत्यंता नवाहुतीर्हुत्वा वृषं चतस्रो द्वे एकां वा वत्सतरीमलंकुर्यात् । अत्र होमस्य वेदमंत्रैरुक्तेः शूद्रस्य होमो नेति मदनपालः । अन्ये तु नाम्नाहुः । ततो वृषमग्निं चतुः परिक्रम्य रुद्रकुंभोदकेनाभिषिच्य वृषं गाश्च गंधस्रक्वस्त्राद्यैरलंकृत्य रुद्ररूपविप्रायैतत्पाद्यमासनं गंधं च चतुर्भ्यो दत्वा रुद्ररूपप्रेतरूपिविप्रेभ्यश्चत्वार्यामान्नानि दत्वा वृषोत्सर्गश्राद्धप्रतिष्ठार्थं दक्षिणां दत्वा वृषपदे पिंडान् दद्यादिति केचित् । ततो वामांगे त्रिशूलेन दक्षिणे चक्रेण व्यत्ययेन वा वृषं गाश्चांकयित्वा कुशतिलहेमजलयुतं पुच्छमादाय देशकालावुक्त्वा काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वविमुक्तिद्वारा रुद्रलोकप्राप्त्यर्थं इमं वृषं वत्सतरीसहितं रुद्रदैवतममुकगोत्रायामुकप्रेतायोत्सृजामि । युष्मभ्यः पतिं ददाम्येतेन पतिना स्वच्छंदं चरत तेन श्रीरुद्रः प्रीयतामित्युक्त्वापसव्येन सतिलं पुच्छोदकमादायामुकप्रेत इदं ते वृषवत्सतर्योः पुच्छोदकमुपतिष्ठतामित्युक्त्वा पठेत् । धर्म त्वं वृषरूपेण जगदानंदकारक ॥ अष्टमूर्तेरधिष्ठानमतः पाहि सनातन ॥ १ ॥ वृषो हि भगवान् धर्मश्चतुष्पादः प्रकीर्तितः ॥ वृणोमि तमहं भक्त्या प्रेतं स्वर्गं नयत्वसौ ॥ २ ॥ अयं हि वो मया दत्तः सर्वासां पतिरुत्तमः ॥ तुभ्यं चैता मता दत्ताः पत्न्यः सर्वा मनोरमाः ॥ ३ ॥ वृष एष मया दत्तस्त्वं तारयतु सर्वदा ॥ इति । ब्रह्मणे पूर्णपात्रमाचार्याय सहिरण्यं गोमिथुनं दत्वा विसृज्येश्वरार्पणं कुर्यात् ॥ इति वृषोत्सर्गः ॥

यानंतर प्रयोग सांगतो.

"त्यांत प्रथम वृष हा विष्णुरूपी असें उद्देशून तर्पण करावें," असें **देवजानीयांत** सांगितलें आहे. त्याच्या मूलवचनांविषयीं विचार करावा. कर्त्यानें उपवीती असून, देशकाल स्मरून,—**काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या रुद्रलोकप्राप्त्यर्थं अथवा वस्त्रादिलोकावाप्त्यर्थं वृषोत्सर्गं करिष्ये।** असा संकल्प करून, नंदा, सुमना, सुशीला, पयस्विनी आणि सुरभि या ५ वृषमातांचें, संभव अस-

त्यास पूजन करावें. नंतर ईशान्येस यथाविधि कुंभ स्थापून, त्यांवर रुद्रप्रतिमा स्थापून, त्याचें यथोक्त उपचारांनीं पूजन करून, अग्निप्रतिष्ठापन केल्यावर ब्रह्मासन देऊन, प्रणीतापात्रांत २ भागांत उदक व दुग्ध घालून, पिष्टचरु किंवा पायस करून,—"या कर्मांत प्रथम ६ आज्याहुति व मग आज्यभाग करावे," अशी **स्मृति** आहे ह्मणून,—"**अग्नये स्वाहा**" यानें ६ आहुति देऊन, आघारहोम व आज्यभाग केल्यावर,—"**प्रजापतये स्वाहा । इंद्राय स्वाहा । अग्नये स्वाहा । सोमाय स्वाहा**" या मत्रांनीं आज्यहोम करून,—**अग्नये स्वाहा । रुद्राय स्वाहा । शर्वाय स्वाहा । पशुपतये स्वाहा । उग्राय स्वाहा । अशनये स्वाहा । भगाय स्वाहा । महादेवाय स्वाहा । ईशानाय स्वाहा**" या मंत्रानीं पायसहवन करून, "**पूष्णे स्वाहा**" मंत्रानें पिष्ट व चरु हवन करून, दोहोंचें स्विष्टकृत् करून, आज्यानें प्रजापतीपर्यंत ९ आहुति देऊन, वृषास ४, २ किंवा १ पाड्यांसह, अलंकृत करावा. येथें—"हा पूर्वोक्त होम वैदिकमंत्रोक्त आहे ह्मणून, शूद्रांस होम नाहीं," असें **मदनपाल** ह्मणतो. अन्य **कित्येक**—"नाममंत्रांनीं होम करावा," असें ह्मणतात. नंतर वृषास व अग्नीस ४ प्रदक्षिणा करून, पूर्वस्थापित कलशोदकानें अभिषेक करून, वृषास व गायींस गंध, पुष्पमाला, वस्त्रादिकांनीं अलंकार करून—**रुद्ररूपविप्रायैतत्पाद्यं** ह्मणून पाद्य, असेंच आसन, गंध इत्यादिक उपचार चौघांस देऊन, रुद्ररूपप्रेतरूपी ४ ब्राह्मणांस २ आमान्नें देऊन, वृषोत्सर्गश्राद्धप्रतिष्ठेकरितां दक्षिणा देऊन, "वृषाच्या पायांवर पिंड द्यावे," असें **कित्येक** ह्मणतात. नंतर वामभागीं त्रिशूलानें व दक्षिणभागीं चक्रानें किंवा विपर्यय करून—ह्मणजे त्रिशूलानें वृषास व चक्रानें गायीस डागून—दर्भ, तीळ, सुवर्ण व उदकांनीं युक्त वृषपुच्छ हातांत घेऊन, देशकालादि स्मरून—**काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वविमुक्तिद्वारा रुद्रलोकप्राप्त्यर्थं इमं वृषं वत्सतरीसहितं रुद्रदैवत्यं अमुकगोत्रायामुकप्रेतायोत्सृजामि** । असें ह्मणून, **युष्मभ्यः पतिं ददाम्येतेन पतिना स्वच्छंदं चरत । तेन श्रीरुद्रः प्रीयतां** । असें ह्मणून, अपसव्यानें सतिल पुच्छोदक घेऊन,—"**काश्यपगोत्रामुकप्रेतेदं ते वृषवत्सतर्योः पुच्छोदकमुपतिष्ठतां**" ह्मणून तें सोडून, पुढील मंत्र ह्मणावे. ते—"**धर्म त्वं वृषरूपेण जगदानंदकारक ॥ अष्टमूर्तेरधिष्ठानमतः पाहि सनातन ॥ १ ॥ वृषो हि भगवान्धर्मश्चतुष्पादः प्रकीर्तितः ॥ वृणोमि तमहं भक्त्या प्रेतं स्वर्गं नयत्वसौ ॥ २ ॥ अयं हि वो मया दत्तः सर्वासां पतिरुत्तमः ॥ तुभ्यं चैता मया दत्ताः पत्न्यः सर्वा मनोरमाः ॥ ३ ॥ वृष एव मया दत्तस्तं तारयतु सर्वदा**" ॥ नंतर, ब्रह्म्यास पूर्णपात्र, व आचार्यास सहिरण्य गोमिथुन देऊन, त्याचें विसर्जन करून, कर्म ईश्वरार्पण करावें. इति **शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे वृषोत्सर्गप्रयोगः** ॥

## ॥ अथ वसुगणश्राद्धादीनि ॥

**ततो नवश्राद्धवत् धरध्रुवाद्यष्टवसूद्देशेनाष्टावेकं वा विप्रमित्येवं वसुश्राद्धमेकादशभ्य**

एकस्मै वा रुद्रगणश्राद्धं च कृत्वाचम्य देशकालौ स्मृत्वा काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या वस्वादिरूपप्राप्त्यर्थमाद्यं श्राद्धमेकादशेऽह्न्येकोद्दिष्टविधिना करिष्ये इत्युक्त्वाद्यश्राद्धेऽमुकप्रेतस्थाने क्षणः कर्तव्यः। तथा प्राप्नोतु भवान्प्राप्नुवानि। इत्येकादशैकं वा विप्रं निमंत्र्याक्रोधनैः शौचपरैरित्युक्त्वा दर्भबटुं वा निमंत्र्य सर्वं नवश्राद्धं तु पार्वणवच्च कार्यं। तत्र द्वारि वृत्तं मंडलं कृत्वाचम्याभ्यर्च्यामुकप्रेतैतत्ते पाद्यमुपतिष्ठतामित्येवं पाद्यं दत्वाचम्योदङ्मुखमुपविश्यामुकगोत्रैष ते गंधः पुष्पाणि धूपो दीप आच्छादनं छत्रालंकारादि वोपतिष्ठतां। संपूर्णतां वाचयित्वाग्नौकरणं नेति बहवः। गृह्यभाष्यमते त्वस्ति। तदामुकप्रेताय स्वाहेत्यामेनैकाहुतिः। ततः सोदकुंभमामान्नं सोपस्करममुकप्रेतायाद्यश्राद्धे उपतिष्ठतां। विकिरे विकल्पः। ततो वेद्यां रेखां कृत्वा उच्छिष्टपिंडे च। इदं पिंडासनं अवनेजनं अयं पिंडः प्रत्यवनेजनं पिंडपूजा सूत्रं च। ततः सुप्रोक्षितादि कृत्वा गोत्रं नो वर्द्धतामित्युक्त्वाक्षय्योदकं दत्वा दक्षिणां दत्वैकादशपक्षे आद्याय प्रेतालंकारवाहनादि दद्यात्। बृहस्पतिः॥ प्रेतालंकारवस्त्रादि पितुर्यद्वाहनादिकं॥ संपूज्य गंधमाल्यैस्तु श्राद्धभोक्त्रे तदर्पयेत्॥ १॥ ततोभिरम्यतामिति विसर्जयेत्। शेषं नवश्राद्धवत्। तत आद्यमासिकं कुर्यात्। तत्समानतंत्राणि षोडशश्राद्धानि वा। आद्याब्दिकमपीत्येके। अत्र पददानमुक्तं देवजानीये गारुडे एकादशाहं प्रक्रम्य॥ तदह्नि दीयते सर्वं द्वादशाहे विशेषतः॥ पदानि सर्ववस्तूनि वरिष्ठानि त्रयोदश॥ १॥ यो ददाति मृतस्येह जीवन्नप्यात्महेतवे॥ सुखी भूत्वा महामार्गे वैनतेय स गच्छति॥ २॥ आसनोपानहौ छत्रं मुद्रिका च कमंडलुः॥ भोजनं भाजनाधारो वस्त्राण्यष्टविधं पदं॥ ३॥ तथा॥ भाजनासनदानेन मुद्रिकाभोजनेन च॥ आज्ययज्ञोपवीतेन पदं संपूर्णतां व्रजेत्॥ ४॥ महिषीरथगोदानात्सुखी भवति निश्चितम्॥ सर्वोपस्करयुक्तानि पदान्यत्र त्रयोदश॥ ५॥ यो ददाति मृतस्येह जीवन्नप्यात्महेतवे॥ स गच्छति परं स्थानं महाकष्टविवर्जितः॥ ६॥ त्रयोदश पदानीत्थं प्रेतायैकादशेऽहनि॥ दातव्यानि यथाशक्ति तेनासौ प्रीणितो भवेत्॥ ७॥ अन्नं चैवोदकं चैवोपानहौ च कमंडलुः॥ छत्रं वस्त्रं तथा यष्टिं लोडदंडं तथाष्टमम्॥ ८॥ अग्नीष्टिकां च दीपं च तिलान् तांबूलमेव च॥ चंदनं पुष्पदानं चोपदानानि चतुर्दश॥ ९॥ योऽश्वं रथं गजं वापि ब्रह्मणे प्रतिपादयेत्॥ स्वमहिम्नानुसारेण तत्तत्सुखमवाप्नुयात्॥ १०॥ अत्र तत्तद्दानमंत्रा मत्कृते दानकमलाकरे ज्ञेयाः। अत्र मूलं तु चिंत्यम्॥

आतां वसुगणश्राद्धादिप्रयोग सांगतो.

यानंतर नवश्राद्धवत् धर, ध्रुव, प्राण, अर्क, अग्नि, दोष, वसु विभावसु, या अष्टवसूंच्या उद्देशानें ८ अथवा १ ब्राह्मणाचें पूजन करून, आमान्न द्यावीं. यास वसुगणश्राद्ध असें ह्मणतात. नंतर—मन्यु १, मनु २, महिनस ३, महान् ४, शिव ५, क्रतुध्वज ६, उग्ररेता ७, भव ८, काल ९, वामदेव १०, धृतव्रत ११, या एकादशरुद्रोद्देशानें ११ अथवा १ ब्राह्मणास—सदक्षिणाक आमान्नें द्यावीं. यास रुद्रगणश्राद्ध ह्मणतात.

हें झाल्यावर आचमन करून देशकाल स्मरून—**काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्यावस्वादिरूपप्राप्त्यर्थं आद्यं श्राद्धमेकादशेऽह्नि एकोद्दिष्टविधिना करिष्ये।** असा संकल्प करून,—**अमुकप्रेतस्थाने त्वया क्षणः कर्तव्यः।** तसेंच—**प्राप्नोतु भवान्** विप्रानें **प्राप्नुवानि।** असें ह्मणावें. असें ११ किंवा १ विप्रास अथवा दर्भबटूंस निमंत्रण करून—"**अक्रोधनैः शौचपरैः सततं ब्रह्मचारिभिः॥ भवितव्यं भवद्भिश्च मया च श्राद्धकारिणा**" ॥१॥ हा मंत्र ह्मणून, पार्वणश्राद्धवत् सर्व नवश्राद्ध करावें. त्यांत विशेष—गृहद्वारांत मंडल करून, आचमन करून त्याचें पूजन केल्यावर,—**अमुकप्रेतैतत्ते पाद्यमुपतिष्ठतां ।** ह्मणून पाद्य देऊन, आचमन करून उत्तराभिमुख बसून—**काश्यपगोत्रामुकप्रेत एष ते गंधः** ह्मणून गंध, **का० प्रेत एतानि ते पुष्पाणि** ह्मणून फुलें, **का० एष ते धूपः** ह्मणून धूप, **का० प्रेत एष ते दीपः** ह्मणून दिवा, **का० प्रेतेदं ते आच्छादनं** ह्मणून कांहीं द्रव्य, **का० प्रेतेदं ते छत्रं** ह्मणून छत्री, **का० प्रेतैते तेऽलंकाराः उपतिष्ठंतु** ह्मणून अलंकार, असे उपचार देऊन, **का० प्रेत एते गंधपुष्पधूपदीपाच्छादनछत्रालंकाराः सर्वे उपचाराः परिपूर्णा भवंतु ।** ब्राह्मणांनीं **अर्चनविधेर्स्वर्चितमस्तु** असें ह्मणावें. "येथें अग्नौकरण करूं नये," असें बहुत **ग्रंथकर्ते** ह्मणतात. **गृह्यसूत्रभाष्य** कर्त्याच्या मतें—" अग्नौकरण करावें" असें आहे. हें मत घेतल्यास—**अमुकप्रेताय स्वाहा** ह्मणून आमान्नानें १ आहुति द्यावी. नंतर उदकुंभ व उपसाहित्यासह आमान्न—**अमुकप्रेताय आद्यश्राद्धे उपतिष्ठतां** ह्मणून द्यावें. येथें विकिरदानाविषयींचा विकल्प आहे. नंतर वेदीवर रेषा काढून उच्छिष्टपिंडावर—**इदं पिंडासनं** ह्मणून दर्भ, **इदमवनेजनं** ह्मणून उदक, **अयं पिंडः** ह्मणून पिंड, **प्रत्यवनेजनं** ह्मणून उदक देऊन, पिंडपूजा करून सूत्र द्यावें. नंतर **सुप्रोक्षितमस्तु** इ० करून, **गोत्रं नो वर्धतां** असें ह्मणून, अक्षय्योदक व दक्षिणा देऊन, ११ ब्राह्मण सांगितले असतील तर पहिल्यास प्रेताचे अलंकार वाहन इ० द्यावें. याविषयीं **बृहस्पति** ह्मणतो—"प्रेताचे अलंकार वस्त्रें व अन्य वाहनादि जें असेल तें; श्राद्धभोजन करणाऱ्या विप्राचें गंधादिकांनीं पूजन करून त्यांस द्यावें." **अभिरम्यतां** ह्मणून ब्राह्मणांचें विसर्जन करावें. हा विशेष सांगितला आहे. बाकी सर्व प्रयोग नवश्राद्धवत् करावा. नंतर आद्यमासिक किंवा एकतंत्रानें १६ मासिकश्राद्धें करावीं. "आद्याब्दिकश्राद्धहि करावें," असें **कित्येक** ह्मणतात. येथें पददान करावें असें **देवजानीयांत गरुडपुराणांत** एकादशाहास आरंभ करून सांगितलें आहे. तें असें कीं,—"११ व्या व विशेषतः १२ व्या दिनीं पदसंज्ञक श्रेष्ठ वस्तु, जो विप्रास मृतोद्देशानें अथवा आपण जीवंत असतां आत्मार्थ देईल, तो मोठ्या[१] यममार्गांत सुखानें जाईल. पदसंज्ञक वस्तु सांगतो—आसन, चर्मी जोडा, छत्री, आंगठी, तांब्या, भोजन व पात्र

१ भूमीपासून यमाच्या नगरीचा मार्ग ९९ हजार योजनें लांब आहे असें भा० स्कं० ५ अ० २६ त सांगितलें आहे.

आणि वस्त्रें असें ८ प्रकारचें पद आहे. हें—पात्र, आसन, मुद्रिका, भोजन, आज्य व यज्ञोपवीत यांच्या दानानें संपूर्ण होतें. महिषी, रथ व गाय दान केल्लें असतां निश्चयानें प्रेत सुखी होतो. सर्व उपसाहित्यांसह १३ पदें जो जिवंत असतां स्वार्थ देतो तो किंवा मृतास अन्यानें दिल्यास तो सहज उत्तमलोकास जातो. असीं १३ पदें ११ व्या दिनीं यथाशक्ति द्यावीं. त्यानें हा संतुष्ट होतो. "अन्न, उदक, उपानह, कमंडलु, छत्र, वस्त्र, काठी, लोहदंड, अग्नीची वीट, दीप, तीळ, तांदूळ, चंदन व पुष्पें हीं १४ उपदानें, आणि घोडा, रथ व हत्ती हीं विप्रांस यथाशक्ति जो देईल त्यास जें पाहिजे तें सुख मिळेल," असें सांगितलें आहे. येथें सांगितलेल्या दानांचे मंत्र **दानकमलाकरां**त पहावे. येथें मूलवचनांचा विचार करावा.

## ॥ अथ शय्यादानम् ॥

हेमाद्रौ भविष्ये ॥ तस्माच्छय्यां समासाद्य सारदारुमयीं दृढां ॥ दंतपत्रचितां रम्यां हेमपट्टैरलंकृताम् ॥ १ ॥ हंसतूलीप्रतिच्छन्नां शुभगंडोपधानिकां ॥ प्रच्छादनपटीयुक्तां गंधधूपाधिवासितां ॥ २ ॥ तस्यां संस्थापयेद्धैमं हरिं लक्ष्म्या समन्वितं ॥ अत्र हरिस्थाने प्रेतं । उच्छीर्षके घृतभृतं कलशं परिकल्पयेत् ॥ ३ ॥ विज्ञेयः पांडवश्रेष्ठ स निद्राकलशो बुधैः ॥ तांबूलं कुंकुमक्षोदकर्पूरागरुचंदनं ॥ ४ ॥ दीपिकोपानहच्छत्रचामरासनभाजनं ॥ पार्श्वेषु स्थापयेद्भक्त्या सप्त धान्यानि चैव हि ॥ ५ ॥ शयनस्थस्य भवति यदन्यदुपकारकम् ॥ भृंगारकरकाद्यं तु पंचवर्णवितानकं ॥ ६ ॥ मंत्रस्तु ॥ यथा न कृष्णशयनं शून्यं सागरजातया ॥ शय्या ममाप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि ॥ १ ॥ यस्मादशून्यं शयनं केशवस्य शिवस्य च ॥ अर्द्धं तदेव ॥ २ ॥ दत्वैवं तस्य सकलं प्रणिपत्य विसर्जयेत् ॥ एकादशाहेऽपि तथा विधिरेषः प्रकीर्तितः ॥ ३ ॥ विशेषं चात्र राजेंद्र कथ्यमानं निशामय ॥ तेनोपभुक्तं यत्किंचिद्वस्त्रवाहनभाजनम् ॥४॥ यद्यदिष्टं च तस्यासीत्तत्सर्वं परिकल्पयेत् । तमेव पुरुषं हैमं तस्यां संस्थापयेत्सदा ॥ ५ ॥ पूजयित्वा प्रदातव्या मृतशय्या यथोदिता ॥ तत्रैव पाद्मे ॥ मृतकांते द्वितीयेऽह्नि शय्यां दद्यात्सुलक्षणाम् ॥ कांचनं पुरुषं तद्वत्फलं वस्त्रसमन्वितम् ॥ १ ॥ संपूज्य द्विजदांपत्यं नानाभरणभूषितं ॥ उपवेश्य तु शय्यायां मधुपर्कं ततो वदेत् ॥ २ ॥ रजतस्य तु पात्रेण दधिदुग्धसमन्वितम् ॥ अस्थि लालाटिकं गृह्य सूक्ष्मं कृत्वा तु पायसं ॥ ३ ॥ भोजयेद्द्विजदांपत्यं विधिरेष सनातनः ॥ ४ ॥ एष एव विधिर्दृष्टः पार्वतीयैर्द्विजोत्तमैः ॥ एतत्प्रतिग्रहे तत्रैव ॥ गृहीतायां तु तस्यां वै पुनः संस्कारमर्हति ॥ भविष्ये ॥ स्वर्गे पुरंदरपुरे सूर्यपुत्रालये तथा ॥ सुखं वसत्यसौ जंतुः शय्यादानप्रभावतः ॥ १ ॥ आभूतसंप्लवं यावत्तिष्ठत्यातंकवर्जितः ॥ इतिशय्यादानं ॥ क्रियानिबंधे स्मृत्यंतरे ॥ सूतके मृतके चैव द्वितीयं मृतकं यदि ॥ पिंडदानं प्रकुर्वीत वृषोत्सर्गं तथैव च ॥ १ ॥ न हन्यात्सूतकं कर्म द्वादशैकादशाहिकम् ॥ शुद्धो वा यदि वाऽशुद्धः कुर्यादेवाविचारयन् ॥ २ ॥

आतां शय्यादान सांगतो.

तें **हेमाद्रीं**त **भविष्यपुराणां**त सांगितलें आहे.—"प्रेतास सुख व्हावें ह्मणून शय्या द्यावी, ती उत्तम काष्टाचा पलंग असावा, त्यावर हस्तिदंती कोरींव काम केलेलें व वर सोन्याच्या पट्टया लावलेला असा असून, वर कापसाची मोठी गादी, गिरद्या, उशा व पलंगपोस असून; गंधतैलादिकांनीं सुगंधित केली असून, तिजवर सुवर्णाची लक्ष्मीसह विष्णूची प्रतिमा स्थापन करावी." येथें विष्णुस्थानीं प्रेताची कल्पना करावी. "नंतर, उशाजवळ तुपानें भरलेला कलश स्थापन करावा. यास निद्राकलश ह्मणतात. तांबूल, कुंकुमचूर्ण, कापूर, अगुरु, चंदन, दीप, जोडा, छत्र, चामर, आसन, पात्र हीं व सप्तधान्यें पलंगाच्या बाजूस ठेवावीं. शयनरथास उपयोगी असे अन्य पदार्थही असावे. झारी, तांब्या, पंचरंगी छत वगैरे सर्व असावें." शय्यादानमंत्र—**यथा न कृष्ण शयनं शून्यं सागरजातया ॥ शय्या ममाप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि ॥ १ ॥ यस्मादशून्यं शयनं केशवस्य शिवस्य च ॥ शय्या म०" ॥ २ ॥** असें दान करून त्या ब्राह्मणास नमस्कार करून विसर्जन करावें. ११ व्या दिवसीं हाच विधि करावा. त्या दिवसी कांहीं विशेष आहे तो सांगतों. "मृतानें जें वाहनपात्रादि उपभुक्त व जें त्याला प्रिय असेल, तें सर्वहि शय्येसन्निध असावें. आणि त्याच पुरुषाची सुवर्णप्रतिमा वर ठेवून, यथाविधि शय्या द्यावी." **हेमाद्रीं**त **पद्मपुराणां**त—"आशौचांतीं द्वितीयदिनीं, उत्तम शय्या—सुवर्णपुरुष, फल वस्त्र इत्यादिकांसहित विप्राची दंपत्यपूजा करून, त्यास वस्त्रादि देऊन, शय्येवर बसवून, मधुपर्क द्यावा. प्रेताच्या ललाटाचें हाड घेऊन त्याच्या चूर्णाचा पायस करून, विप्रदंपत्यास भोजन घालावें. हा अनादिसिद्ध विधि आहे. पार्वतीय (डोंगरांत रहाणारे) विप्रांनीं हाच विधि दृष्ट आहे," असें सांगितलें आहे. हें शय्यादान घेणारास दोष त्याच **पद्मपुराणां**त—सांगितला आहे. जसें—"पूर्वोक्त शय्या जर कोणी घेतली तर त्याचें पुनः उपनयन करावें." **भविष्यपुराणां**त—"स्वर्गलोकीं इंद्रनगरींत संयमिनींत किंवा जेथें हा प्राणी जाईल तेथें शय्यादानाच्या प्रभावानें तो एक कल्पपर्यंत निश्चिंत व सुखी असतो," असें सांगितलें आहे. **इति शू० शय्यादानविधिः ॥**

**क्रियानिबंधां**त **स्मृत्यंतरां**त—"सूतक व मृतकांत जर दुसरें सूतक अथवा मृतक येईल तर पिंडदान व वृषोत्सर्ग करावा. आशौचनिमित्तानें ११ । १२ व्या दिनाचें कर्म सोडूं नये. याविषयीं विशेष विचार करावयास नको."—असें सांगितलें आहे.

---

१ ह्या वचनांत सांगितल्याप्रमाणें प्रेताच्या हाडाचा पायस ब्राह्मणास घालण्याचा प्रघात सांप्रत निदान दक्षिण हिंदुस्थानांत तरी चालू नसेल असें वाटतें. कदाचित् अन्यत्र कोठें चालू असल्यास तो फारच अमंगळ आहे यांत संशय नाहीं. ज्या वेळीं हा चालू होता त्या वेळीं देखील रानटी लोकांतच असावा—अथवा ब्राह्मणांनींच अज्ञानी लोकांच्या संतोषार्थ हाडें खाण्याचें पतकरून चालू केला असावा—हें "पार्वतीयैः" या विशेषणावरून स्पष्ट ध्वनित होतें.

## ॥ अथोदकुंभः ॥

**हेमाद्रौ स्मृतिसमुच्चये ॥ एकादशाहात्प्रभृति घटस्तोयान्नसंयुतः ॥ दिने दिने प्रदातव्यो यावत्संवत्सरं सुतैः ॥ १ ॥ मदनरत्ने गौतमः ॥ अदैवं पार्वणश्राद्धं सोदकुंभमधर्मकं ॥ कुर्यात्प्रत्याब्दिकाच्छ्राद्धात्संकल्पविधिना त्वहं ॥ १ ॥ अत्र पिंडे विकल्पः ॥ अहरहरन्नमस्मै ब्राह्मणायोदकुंभं च दद्यात् । पिंडमप्येके निगृह्णंतीति । हेमाद्रौ पारस्करोक्तेः ॥ विशेषो निर्णयसिंधौ ज्ञेयः ॥ देवजानीये गारुडे ॥ प्रत्यहं दीपको देयो मार्गे तु विषमे नरे ॥ यावत्संवत्सरं वापि प्रेतस्य सुखलिप्सया ॥ १ ॥ कुर्याद्याम्यमुखं पित्र्यमद्भिः संकल्प्य सुस्थितम् ॥**

सांप्रत उदकुंभदान सांगतो.

याविषयीं **हेमाद्रीं**त **श्रुतिसमुच्चयां**त—"११ व्या दिवसापासून १ वर्षपर्यंत प्रतिदिवसीं उदकपूर्ण व आमान्नसहित कुंभ द्यावा," असें सांगितलें आहे. **मदनरत्नां**त **गौतम** ह्मणतो—"१ वर्षपर्यंत अदैव व उदकुंभसहित प्रत्याब्दिक श्राद्धाहून भिन्न पार्वणश्राद्ध प्रतिदिवसीं करावें." येथें पिंडदानाचा विकल्प आहे. कारण, "प्रतिदिनीं विप्रास उदकुंभ द्यावा, व पिंडहि द्यावा, असें **कित्येक** ऋषि ह्मणतात." असी **हेमाद्रीं**त **पारस्करो**क्ति आहे. एतत्संबंधी विशेष विचार **निर्णयसिंधूं**त पहावा. **देवजानीयां**त **गरुडपुराणां**त—"प्रतिदिनीं १ वर्षपर्यंत प्रेतास सुख व्हावें ह्मणून दीप द्यावा. तो उदकपूर्वक संकल्प करून, दक्षिणाभिमुख द्यावा," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ मासिकानि ॥

**तानि कृत्वैव सपिंडनं कार्यं । श्राद्धानि षोडशादत्वा नैव कुर्यात्सपिंडनमिति लौगाक्षिस्मृतेः । सपिंडीकरणोत्तरं पुनः कार्याणि । यस्य संवत्सरादर्वाक् सपिंडीकरणं कृतम् ॥ मासिकं चोदकुंभं च देयं तस्यापि वत्सरमिति तेनैवोक्तेः । सपिंडीकरणादर्वागपकृष्य कृतान्यपि ॥ पुनरप्यपकृष्यंते वृद्ध्युत्तरनिषेधनादिति गालवोक्तेश्च । तानि सपिंडनात्प्रागेकोद्दिष्टविधिनोर्ध्वं तु पार्वणेन कार्याणीत्यादि निर्णयसिंधौ ज्ञेयम् । तान्याह कात्यायनः ॥ द्वादश प्रतिमास्यानि आद्यषाण्मासिके तथा ॥ सपिंडीकरणं चैव इत्येतच्छ्राद्धषोडशं ॥ १ ॥ त्रिपक्षिकाब्दिके चेति श्राद्धान्येतानि षोडशेति जातूकर्ण्यपाठः ॥ आद्यमूनमासिकं । षाण्मासिकं ऊनषष्ठं । आब्दिकमूनाब्दिकं । तेनामुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या पितृलोकप्राप्त्यर्थमाद्यमासिकद्वितीयत्रैपक्षिकतृतीयचतुर्थ० पंचम० षष्ठ० ऊनषष्ठ० सप्तम० नवम० दशम० एकादश० द्वादश० ऊनाब्दिकानि श्राद्धानि स्वकालकर्तव्यानि सपिंडीकरणाधिकारसिद्ध्यर्थमेकादशे द्वादशे वाहन्यपकृष्य करिष्ये । इत्युक्त्वाद्यमासिकेऽयं ते क्षण उपतिष्ठतामित्येवं षोडश विप्रान् कुशबटून्वा निधायाद्यमासिके इदं ते पाद्यमित्येवं सर्वं नवश्राद्धवत्कृत्वा षोडशामान्नानि पिंडांश्च दद्यात् ॥**

यानंतर मासिकें सांगतो.

हीं मासिकें करून सपिंडी करावी. कारण "१६ मासिकश्राद्धें झाल्यावांचून सपिंडी

करूं नये," असी **लौगाक्षिस्मृति** आहे. कदाचित् सपिंडी त्वरित करणें असल्यास, अपकर्षानें १६ मासिकें करून, सपिंडी झाल्यावर पुनः यथाकालीं मासिकें करावीं. कारण, "ज्याचें वर्षापूर्वी सपिंडीकरण केलें असेल त्याचीं मासिकें व उदकुंभदान हीं वर्षपर्यंत यथाकालीं करावीं," असें तोच **लौगाक्षि** ह्मणतो. "कदाचित् अपकर्षानें प्रथम मासिकें केलीं असून, नंतर विवाहादि कर्तव्य असल्यास नांदीश्राद्धानंतर मासिकें करूं नये असा निषेध आहे ह्मणून, राहिलेलीं मासिकें पुनः विवाहापूर्वी अपकर्षानें करावीं," असें **गालव**वचनही आहे. तीं सपिंडीपूर्वी एकोद्दिष्टविधीनें, व नंतर पार्वणविधीनें करावीं, इत्यादि प्रकार **निर्णयसिंधूंत** पहावा. तीं मासिकें **कात्यायन** सांगतो—"प्रतिमहिन्याचीं १२, ऊनमासिक १, ऊनषाण्मासिक १, त्रैपक्षिक १, ऊनाब्दिक १, मिळून सोळा." यांत संकल्प पुढें लिहिल्याप्रमाणें करावे. "**अमुकदासप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या पितृलोकप्राप्त्यर्थं आद्यमासिक द्वितीयमासिक त्रैपक्षिक तृतीयमासिक चतुर्थमासिक पंचममासिक षष्ठमासिक ऊनषष्ठमासिक सप्तममासिक अष्टममासिक नवममासिक दशममासिक एकादशमासिक द्वादशमासिक ऊनाब्दिकश्राद्धानि स्वकालकर्तव्यानि सपिंडीकरणाधिकारसिद्ध्यर्थं एकादशे द्वादशे वा अहन्यपकृष्य करिष्ये** । असा संकल्प करून,—**आद्यमासिके अयं ते क्षण उपतिष्ठतां** ह्मणून, ब्राह्मण किंवा दर्भबटूस क्षण द्यावा. असेंच दुसऱ्यास—**द्वितीयमासिके क्षण उपतिष्ठतां**—असा पूर्वोक्त श्राद्धाच्या नांवांचा ऊह करून १६ ब्राह्मणांस क्षण द्यावे. असेंच **आद्यमासिके इदं ते पाद्यं** ह्मणून पाद्य, गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादि उपचार देऊन, बाकी सर्व नवश्राद्धवत् करून, १६ आमान्नें व पिंड द्यावे. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे षोडशमासिकविधिः ॥**

## ॥ अथ सपिंडनम् ॥

भविष्ये ॥ द्वादशेऽहनि षण्मासे त्रिपक्षे वा त्रिमासि वा ॥ एकादशेऽथ पूर्णेऽब्दे मंगलस्याप्युपस्थितौ ॥ १ ॥ विष्णुः ॥ मासिकार्थवद्द्वादशाहं श्राद्धं कृत्वा त्रयोदशेऽह्नि वा कुर्यात् । मंत्रवर्जं हि शूद्राणां द्वादशेऽहनि कीर्तितं ॥ इति स्मृत्यंतरं च । एतद्दर्शश्राद्धकारिशूद्रपरमित्यपरार्के कल्पतरौ च। आशौचोत्तरं द्वादशस्वहःसु द्वादश मासिकानि कृत्वा द्वादशे सपिंडनं । अधिकमासे तु त्रयोदश इत्यर्थः । विस्तरो निर्णयसिंधौ ज्ञेयः ॥

यानंतर सपिंडी सांगतो.

**भविष्यपुराणांत**—"१२ व्या दिवसीं, त्रिपक्षीं, ३ मासांनीं किंवा ६ मासांनीं, ११ व्या मासीं अथवा वर्ष पुरें झाल्यावर सपिंडी करावी. कदाचित् मध्यें मंगलकार्य करण्याचें प्राप्त झाल्यास मध्यंेच करावी," असें सांगितलें आहे. **विष्णु** ह्मणतो—"मासिक शब्दाच्या अर्थाप्रमाणें प्रतिमासीं किंवा द्वादशाहश्राद्धें करून, तेरावे दिवसीं सपिंडी करावी," "अमंत्रक १२ वे दिनीं शूद्रांनीं सपिंडी करावी," असें स्मृत्यंतरही

आहे. "हें दर्शश्राद्धकर्त्या शूद्राविषयीं आहे" असें **अपरार्कांत** व **कल्पतरूंत** सांगितलें आहे. आशौचानंतर प्रतिदिनीं एक एक असें १२ दिवसपर्यंत १२ मासिकें करून, त्याच दिवसीं सपिंडी करावी. अधिक मास असल्यास मासिकें १३ करावीं. एतत्संबंधी विस्तार **निर्णयसिंधूंत** पहावा.

## ॥ अथ प्रयोगः ॥

देशकालौ स्मृत्वा काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या वस्वादिपितृलोकप्राप्त्यर्थमेकोद्दिष्टपार्वणोभयात्मकं सपिंडीकरणश्राद्धं करिष्ये। इत्युक्त्वास्मत्पितुरमुकप्रेतस्य स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्य इत्येकं। ततः सव्येन कामकालसंज्ञकविश्वेदेवस्थाने क्षणं दत्वेत्यादि। द्वौ दैवे। देवानंतरं वा प्रेतक्षणः। ततोऽपसव्येनास्मत्पितुःपितुरमुकदासस्य वसुरूपस्य स्थाने क्षणं दत्वेत्यादि। एवमस्मत्पितुःपितामहस्यामुकदासस्य रुद्ररूपस्य स्थाने इत्यादि। एवमस्मत्पितुःप्रपितामहस्यामुकदासस्यादित्यरूपस्य। एवं षट् विप्राः कुशबटवो वा। अक्रोधनैः शौचपरैरिति जपः सर्वत्र। प्रेतस्थाने नवश्राद्धवत्। पित्र्ये पार्वणवत्। ततः परेद्युः संकल्प्य पुनः क्षणं दत्वा दैवे चतुरस्रं मंडलं कृत्वा तद्दक्षिणे प्रेताय वर्तुलं त्रिकोणं वा कृत्वा क्रमेण पाद्यं दत्वाचम्य। कामकालसंज्ञकविश्वेदेवाः समाध्वं। समास्व। प्रेतस्य पितृपितामहप्रपितामहाः समाध्वमित्यासनेषूपवेश्य नीवीबंधं कृत्वोपक्रांतं श्राद्धकर्म करिष्ये। कुरुष्वेत्युक्ते। कामकालसंज्ञकानां विश्वेषां देवानामिदमासनं। सुखा (आ)सनं। अत्रास्यतां धर्मोसि। दैवे क्षणः क्रियतां। तथा प्राप्नुवानि। एवं द्वितीयदैवे। ततो द्वे अर्घपात्रे संपन्ने इत्युक्त्वा कामकालसंज्ञकान्विश्वान्देवान् भवत्सु आवाहयिष्ये। आवाहयेत्युक्ते। कामकालेभ्यो नमः। आगच्छंतु महाभागा इति वाऽऽवाह्य कामकालसंज्ञका विश्वेदेवा इदं वोऽर्घ्यमिति विप्रद्वये दत्वा पात्रं न्युब्जं कृत्वा गंधं पुष्पं धूपं दीपाच्छादनानि दत्वा संपूर्णतां वाचयित्वा। अपसव्येनास्मत्पितुः काश्यपगोत्रस्यामुकप्रेतस्येदमासनमुपतिष्ठतां। स्वासनं। प्राप्नोतु भवानित्यादि। ततः पितुः पित्रादीनां पार्वणवदासनानि चत्वार्यर्घपात्राणि। तत्राद्ये चत्वारि पवित्राणि। त्रिषु त्रीणि। ततः काश्यपगोत्रामुकप्रेत एष तेऽर्घ उपतिष्ठतामिति दत्वाद्येत्यादि काश्यपगोत्रस्यामुकप्रेतस्यार्घ्यं तत्पितृपितामहप्रपितामहार्घैः संयोजयिष्ये। संयोजयेत्युक्ते। एकं पवित्रं पितृपात्रे दत्वा। काश्यपगोत्रामुकप्रेत स्वपित्राऽमुकदासेन वसुरूपेण सह संसृज्य स्वसायुज्यं गच्छेति तदर्घ्ये निनीयैवं तत्पितामहेन रुद्ररूपेणेति द्वितीये। स्वप्रपितामहेनादित्यरूपेण सहेति तृतीये। ततः॥ एष वोऽनुगतः प्रेतः पितरस्तं ददामि वः॥ शुभं भवतु शेषाणां जायंतां चिरजीविनः॥ १॥ इत्यभिमृशेत्। संसर्जनोत्तरं प्रेतायार्घ्यदानमिति मदनपालः। ततः प्रेतपित्रादिभ्यः पार्वणवदर्घ्यत्रयं दत्वा न्युब्जं पात्रं कृत्वा गंधपुष्पधूपदीपाच्छादनालंकारान् प्रेताय तत्पित्रादिभ्यश्च दत्वा पूर्णतां वाचयित्वा प्रेते प्रेताय यमाय चेयमाहुतिरुपतिष्ठतामिति पाणौ हुत्वा वा तत्पित्रादिषु चाग्नौकरणं कृत्वा दैवे प्रेते तत्पित्रादिषु चामान्नानि संकल्प्योच्छिष्टपिंडं विकिरं च दत्वा गृहपाकात्पायसेन सक्तुभिर्वा प्रेताय तत्पित्रादिभ्यः

पिंडान्दत्वाद्येत्यादि काश्यपगोत्रस्यामुकदासप्रेतस्य प्रेतत्वविमुक्त्या वस्वादिपितृलोकप्राप्त्यर्थं तत्पिंडं तत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यपगोत्राणाममुकदासानां वसुरुद्रादित्यस्वरूपाणां पिंडैः सह संयोजयिष्ये । संयोजयेत्युक्ते । प्रेतपिंडं त्रेधा कृत्वैकभागं मधु चादाय काश्यपगोत्रामुकप्रेत त्वत्पिंडं त्वत्पित्रामुकगोत्रेणामुकदासेन वसुरूपेण संयुनज्मि । एष ते पिंडः । तस्मै ते स्वधा नमः । एवं द्वितीयं भागं पितामहेन रुद्ररूपेण । तृतीयं भागं प्रपितामहेनादित्यरूपेण । ततः एष वोऽनुगतः प्रेतः इति प्रागुक्तं मंत्रमुक्त्वा प्रत्यवनेजनं पिंडपूजादि कृत्वा दक्षिणां दत्वा दशदानवैतरणीदानानि कृत्वा शेषं समापयेत् । ततः पाथेयश्राद्धं कृत्वा वर्षांतं यावत् प्रत्यहमुदकुंभश्राद्धं स्वकाले पुनर्मासिकानि च कुर्यात् ॥ इति श्रीकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे और्ध्वदेहिकप्रयोगः ॥

आतां प्रयोग सांगतो.

कर्त्यानें देश काल स्मरून, **काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्या वस्वादिपितृलोकप्राप्त्यर्थं एकोद्दिष्टपार्वणोभयात्मकं सपिंडीकरणश्राद्धं करिष्ये ।** असें ह्मणून, ब्राह्मणांस—**काश्यपगोत्रस्यास्मत्पितुरमुकप्रेतस्य स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः** ह्मणून एका विप्रास १ दर्भ द्यावा. त्यानें—**सुकर्तव्यः** असें ह्मटल्यावर—**कामकालसंज्ञकविश्वेदेवस्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः ।** ह्मणून देवस्थानीय २ विप्रांस निरनिराळा क्षण द्यावा. त्यांनीं पूर्ववत् प्रतिवचन द्यावें. नंतर अपसव्य करून,—**अस्मत्पितुरमुकदासस्य वसुरूपस्य स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः ।** असेंच—**अस्मत्पितुः पितामहस्य अ०स्य रुद्ररूपस्य स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः । अस्मत्पितुःप्रपितामहस्य अमु० आदित्यरूपस्य स्थाने क्षणं दत्वा भवद्भिः प्रसादः कर्तव्यः ।** ह्मणून एकेक विप्रास पूर्ववत् क्षण द्यावा. त्यांनीं प्रतिवचन द्यावें येथें ६ ब्राह्मण किंवा दर्भबटु असावे. नंतर—**"अक्रोधनैः०"** ॥ १ ॥ याचा सर्वत्र जप करावा. प्रेतस्थानीय ब्राह्मणपूजा नवश्राद्धवत् करावी. पित्र्यस्थानीयांची पार्वणश्राद्धवत् करावी. नंतर द्वितीयदिनीं पूर्ववत् संकल्प करून, पुनः क्षण देऊन, सव्यानें देवांकडे. चतुष्कोण मंडल करून, त्याच्या दक्षिणेस प्रेतार्थ त्रिकोण किंवा वर्तुळ करावें. अनुक्रमें पाद्य देऊन, आपण आचमन केल्यावर—**कामकालसंज्ञका विश्वेदेवाः समाध्वं** ह्मणून देवस्थानीय व **प्रेत समास्व** ह्मणून प्रेतस्थानीय, **प्रेतस्य पितृपितामहप्रपितामहाः समाध्वं**—ह्मणून पितरस्थानीय विप्रांच्या हातांस हात लावून, त्यांस आसनीं बसवून, आपण कंबर बांधून,—**उपक्रांतं श्राद्धकर्म करिष्ये** असें ह्मणावें. ब्राह्मणांनीं—**कुरुष्व** ह्मटल्यावर—**कामकालसंज्ञकानां विश्वेषां देवानां इदमासनं ।** ब्राह्मणांनीं **स्वासनं** ह्मणावें. **अत्रास्यतां धर्मोऽसि ।** ब्राह्मणांनीं—**अत्रास्यामः । दैवे क्षणः क्रियतां । प्राप्नोतु भवान् ।** ब्राह्मणानें **प्राप्नुवानि** ह्मणावें. असेंच देवस्थानीय द्वितीय ब्राह्मणास

देऊन, २ अर्घ्यपात्रें करून, आपण—**अर्घ्यपात्रे संपन्ने** ह्मणावें. ब्राह्मणानें—**सुसंपन्ने** ह्मणावें. **कामकालसंज्ञकान् विश्वान् देवान् भवत्स्वावाहयिष्ये।** प्रतिवचन—**आवाहय** ह्मटल्यावर—"**कामकालेभ्यो नमः**" किंवा—"**आगच्छंतु महा०**" ॥ १ ॥ हा मंत्र ह्मणून आवाहन करावें. **काम० विश्वेदेवाः इदं वोऽर्घ्यं** ह्मणून दोघांस एकेक पूर्वोक्त पात्रांतील अर्घ्यें देऊन, तीं पात्रें एकमेकांवर झांकून ठेवून, पूर्ववत् गंध, पुष्प, धूप, दीप, आच्छादनादि देऊन, **काम० देवा एते गंधादिआच्छादनान्ता उपचाराः सर्वे परिपूर्णा भवंतु।** ब्राह्मणानें **अर्चनविधौ स्वर्चितमस्तु।** ह्मणावें कर्त्यानें **यन्न्यूनं तद्विधिवदस्तु।** विप्रानें—**अस्तु विधिवत्** असें ह्मटल्यावर अपसव्यानें—**अस्मत्पितुः काश्यपगोत्रस्यामुकप्रेतस्येदमासनमुपतिष्ठतां** ह्मणून आसनार्थ दर्भ द्यावे. प्रतिवचन—**स्वासनं** ह्मटल्यावर **प्राप्नोतु भवान्।** विप्रानें—**प्राप्नुवानि** ह्मणावें. **अस्मत्पितुःपितुः काश्यपगोत्रस्यामुकदासस्य वसुरूपस्येदमासनमुपतिष्ठतां** ह्मणून आसनार्थ दर्भ द्यावे. विप्रांनीं **स्वासनं** ह्मणावें. **प्राप्नोतु भवान्।** प्रतिवचन—**प्राप्नुवानि।** नंतर **अस्मत्पितुः पितामहस्य का० अमु० स्य व० रु० स्येदमासनमुपतिष्ठतां। अस्मत्पितुःप्रपितामहस्य का० अमु० स्य० आ० स्येदमासनमुपतिष्ठतां।** ह्मणून आसनें देऊन १४ अर्घ्यपात्रें करावीं. त्यांत पहिल्यावर ४, व पुढल्यांवर ३। ३ दर्भ ठेवावे. **का० अमुकप्रेत एष तेऽर्घ उपतिष्ठतां,** ह्मणून प्रेतस्थानीय ब्राह्मणास अर्घ्य देऊन, **अद्येत्यादि** संकल्प ह्मणून—**का० अ० प्रेतस्यार्घ्यं तत्पितृपितामहप्रपितामहार्घैः संयोजयिष्ये।** प्रतिवचन—**संयोजय** ह्मटल्यावर, प्रेताच्या अर्घ्यपात्रावरचें १ पवित्र त्याच्या पित्याच्या अर्घ्यपात्रावर ठेवून, **का० प्रेत स्वपित्रामुकदासेन वसुरूपेण सह संसृज्य स्वसायुज्यं गच्छ।** ह्मणून त्या अर्घ्यांत ठेवावें. असेंच दुसरें पवित्र पितामहाच्या अर्घ्यपात्रांत ठेवून,—**का० प्रेत स्वपितामहेन रुद्ररूपेण सह संसृज्य स्वसायुज्यं गच्छ।** असेंच ३ रें पवित्र प्रपितामहाच्या अर्घ्यपात्रावर ठेवून,—**का० प्रेत स्वप्रपितामहेन आदित्यरूपेण सह संसृज्य स्वसायुज्यं गच्छ।** असें संसर्जन ( मिळवणें ) केल्यावर "**एष वोऽनुगतः प्रेतः पितरस्तं ददामि वः॥ शुभं भवतु शेषाणां जायंतां चिरजीविनः**" ॥ १ ॥ ह्मणून स्पर्श करावा. "संसर्जनानंतर प्रेतास अर्घ्य द्यावें," असें **मदनपाल** ह्मणतो.

नंतर प्रेताच्या पित्रादि ३ घांस पार्वणवत् ३ अर्घ्यें देऊन, पात्रें एकमेकांवर झांकून ठेवून; गंध, पुष्पें, धूप, दीप, आच्छादन व अलंकार हे आधीं प्रेतास व नंतर त्याच्या पितरादिकांस देऊन, पूर्णतावाचन करून, प्रेतस्थानीय ब्राह्मणहस्तीं—**प्रेतायाहुतिरुपतिष्ठतां। यमायाहुतिरुपतिष्ठतां।** ह्मणून हवन करून तत्पितृस्थानीं विप्रहस्तीं **अग्नौकरण करावें.** देव, प्रेत व तत्पित्रादिकांस आमान्नें संकल्पून, **उच्छिष्टपिंड व विकिर देऊन, गृहसिद्ध** पायसानें किंवा **सक्तूंनीं,** प्रेत व तत्पित्रादि तिघांला पिंड **देऊन. अद्येत्यादि** संकल्प करून,—**काश्य० स्यामुकप्रेतस्य प्रेतत्वविमुक्त्या**

**वस्वादिपितृलोकप्राप्त्यर्थं तत्पिंडं तत्पितृपितामहप्रपितामहानां काश्यपगोत्राणाममुकदासानां वसुरुद्रादित्यस्वरूपाणां पिंडैः सह संयोजयिष्ये ।** प्रतिवचन—**संयोजय** ह्मटल्यावर, प्रेतपिंडाचे ३ भाग करून त्यांतला १ व मध घेऊन, **का० अमुकप्रेत त्वत्पिंडं त्वत्पित्रामुकगोत्रेणामुकदासेन वसुरूपेण संयुनज्मि । एष ते पिंडः । तस्मै ते स्वधा नमः ।** ह्मणून तो भाग पितृपिंडांत मिळवावा. असेंच द्वितीय भाग व मध घेऊन,—**का० गोत्रामुकप्रेत त्वत्पिंडं त्वत्पितामहेनामुकदासेन रुद्ररूपेण संयुनज्मि । एष ते पिंडः । तस्मै ते स्वधा नमः ।** ह्मणून पितामहपिंडांत मिळवावा. तृतीय भाग व मध घेऊन,—**का० त्वत्पिंडं त्वत्प्रपितामहेनादित्यरूपेण सह संयुनज्मि । एष ते पिंडः । तस्मै ते स्वधा नमः ।** ह्मणून प्रपितामहापिंडांत मिळवावा. नंतर—**"एष वोऽनुगतः०" ॥ १ ॥** हा पूर्वोक्त मंत्र ह्मणून, अवनेजन, प्रत्यवनेजन व पिंडपूजादि करून, ब्राह्मणांस दक्षिणा देऊन, दशदानें व वैतरणीदान करून, शेष समाप्त करावें. नंतर पाथेयश्राद्ध करून, १ वर्षपर्यंत प्रतिदिवसीं उदकुंभदान व श्राद्ध व त्या त्या कालीं पुनः मासिकें करावीं. **इति शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे और्ध्वदेहिकप्रयोगः ॥**



## ॥ जातिनिर्णयप्रकरणम् ॥

### ॥ अथ शूद्रधर्माः ॥

**तत्रानुपनीतद्विजाः शूद्रसमाः । शूद्रेण हि समस्तावद्यावद्वेदे न युज्यते ॥ [ म० स्मृ० अ० २ श्लो० १७२ ] इति मनूक्तेः । साम्यं च कर्मानधिकारमात्रेण । न तु स्नानपंचयज्ञाद्यस्ति । प्रागुपनयनात्कामचारवादभक्षाः [ गौ० स्मृ० प्र० १ अ० २ वा० १] इति गौतमोक्तेः । श्राद्धं तु मंत्रवद्भवत्येव । नाभिव्याहारयेद्ब्रह्म स्वधानिनयनादृते ॥ [ म० स्मृ० अ० २ श्लो० १७२ ] इति मनूक्तेः । ब्रह्म वेदः । पाद्मे सृष्टिखंडेऽपि ॥ अमावास्याष्टकाकृष्णपक्षपंचदशीषु च ॥ एतच्चानुपनीतोऽपि कुर्यात्सर्वेषु पर्वसु ॥ १ ॥ श्राद्धं साधारणं नाम सर्वकामफलप्रदम् ॥ भार्याविरहितोऽप्येतत्प्रवासस्थोऽपि नित्यशः ॥ २ ॥ शूद्रोऽप्यमंत्रवत्कुर्यादनेन विधिना बुधः ॥ एवं तीर्थे । विशेषस्तु निर्णयसिंधौ श्राद्धाधिकारे ज्ञेयः ॥**

आतां शूद्रधर्म सांगतो.

त्यांत अनुपनीत द्विज शूद्रतुल्य आहेत. कारण, "जोंपर्यंत उपनयन होऊन, वेदयुक्त झाला नाहीं तोंपर्यंत ब्राह्मणगोत्रज असूनही, शूद्रतुल्य आहे," असी **मनू**क्ति आहे. हें अनुपनीत द्विजांचें शूद्रांशीं साम्य केवल कर्माच्या अनधिकारापुरतें आहे. अनुपनीतास समंत्रक स्नान, व पंचमहायज्ञादिक करण्याचा अधिकार नाहीं; कारण, "उपनयनापूर्वी यथेच्छ वागणें; बोलणें व अभक्ष्य ( कांदा लसूण इत्यादि ) भक्षण करणें हीं असतात," अशी **गौतमोक्ति** आहे. अनुपनीतांस जर श्राद्ध करण्याचा प्रसंग येईल तर तें समंत्रक होतें, कारण, "उपनयनापूर्वी श्राद्धावांचून इतरत्र वेदमंत्र ह्मणूं नये," असी **मनू**क्ति आहे. **पद्मपुराणां**त **सृष्टिखंडां**त—"अमावास्या, तीन अष्टका, भाद्रपदकृष्णपक्ष, व पौर्णिमा या दिवशीं व इतर पर्वकालीं अनुपनीतांनींही श्राद्ध करावें. हें साधारण असून, सर्व इच्छित फल देणारें आहे. उपनयनानंतर प्रवासांत किंवा स्त्रीरहित असेल तथापि हें नित्य करावें. ज्ञाता शूद्रानेंहि याच विधीनें अमंत्रक श्राद्ध करावें," असें सांगितलें आहे. ह्याच विधि तीर्थश्राद्धासहि लागू आहे. विशेष विचार **निर्णयसिंधूं**त श्राद्धाधिकारांत पहावा.

### ॥ अथ स्त्रीधर्माः ॥

**एवं द्विजस्त्रियोऽपि । तासामपि तस्या यावदुक्तमाशीर्ब्रह्मचर्यमतुल्यत्वादिति पाष्ठन्यायेनानधिकारात् । श्रौतस्मार्तकर्मण्यग्निसाध्येऽधिकारोऽस्त्येव । कामश्रुतिगतस्य पुंस्त्वस्योद्देश्यविशेषणस्य पाष्ठन्यायेनाविवक्षितत्वात् । पाणिग्रहणाद्धि सहत्वं कर्मसु तथा पुण्यफलेषु चेत्यापस्तंबोक्तेश्च । सूतसंहितायामपि ॥ द्विजस्त्रीणामपि श्रौतज्ञानाभ्यासेऽधिकारितां । वदंति केचिद्विद्वांसः स्त्रीणां शूद्रसमानतामिति । स्त्रीशूद्राश्च सधर्माण इति स्मृतेश्च । संस्कारा अपि शूद्रवत्तूष्णीं । अमंत्रिका तु कार्येयं स्त्रीणामा-**

वृदशेषत इति मनूक्तेः। तेनाधिकारी भवेच्छूद्रः पूर्तधर्मे न वैदिके इति जातूकर्ण्योक्तेर्बहिर्वेदि च यद्दानं तत्पौर्तिकमुदाहृतमिति व्यासोक्तेश्च शूद्रवत्तुलादिषोडशमहादानप्रासादजलाशयोत्सर्गादावप्यधिकारः। फले वाक्यगतस्य पुंस्त्वस्य षाष्ठनीत्याविवक्षितत्वात्। ततः सधवानां पत्यनुमत्या पृथगप्यधिकारः। अग्निसाध्यत्वाभावात्। विधवानां तु स्वातंत्र्यादस्त्येवाधिकारः। एतच्च विज्ञानेश्वरेण व्यवहाराध्याये सविस्तरमुक्तम्। अत एव तुलादौ ॥ पुमान्प्रद्युम्नवत्स स्यान्नारी स्यात्पार्वतीसमेति स्त्रीणां फलश्रवणम्। नचैवं शूद्रधर्मत्वात्पंचयज्ञा अपि स्त्रीणां स्युरिति चेत्। शृणु। पंचयज्ञविधानं तु गृही नित्यं न हापयेदिति शंखाद्युक्तेर्यजेतेत्यादौ कर्त्रैकत्ववत्पुंस्त्वस्य विवक्षितत्वान्न स्त्रियाः प्रसक्तिः। न च नित्ये कार्ये श्रुतिरस्ति। येन तद्गतपुंस्त्वाविवक्षया स्त्रिया अप्यधिकारः स्यात्। नित्यत्वानुपपत्त्या प्रत्यवायाभावस्य कल्प्यत्वात्। वचनात्परं नित्येऽधिकारः। यथा मदनरत्ने स्कांदे ॥ प्रत्यहं तर्पणं कार्यं भर्तुः कुशतिलोदकैरिति। श्राद्धेष्वपि नित्यनैमित्तिककाम्येष्वपुत्राया भवत्येवाधिकारः। भार्यापिंडं पतिर्दद्यात् भर्त्रे भार्या तथैव चेति शंखोक्तेः। अपुत्रानाशनं भर्तुः पालयंती व्रते स्थिता ॥ पत्न्येव दद्यात्तत्पिंडं कृत्स्नमंशं लभेत चेति वृद्धमनूक्तेश्च। एतत्सविस्तरं निर्णयसिंधावुक्तम्। यत्र फलश्रवणं विष्णुशिवपूजनादौ तत्राधिकारोऽस्त्येव। एवं व्रतादावपि। तस्माच्छूद्रसमत्वेऽपि स्त्रीणां न पंचयज्ञाः। किंतु भोजनकाले ग्रासमात्रं घृतप्लुतमग्नौ क्षिपेत्। यस्य तेषामग्रतोऽन्नं सिद्धेत्स वह्नौ कृत्वाश्नीयादिति पृथ्वीचंद्रोदये गोभिलोक्तेरिति दिक्। विस्तरापत्तेर्बहु नोच्यते ॥

आतां स्त्रीधर्म सांगतो.

विप्रस्त्रियांसहि शूद्रासारखाच वेदोक्त कर्माचा अधिकार नाहीं. त्यांसहि-"तीस जेवढें सांगितलें आहे; तें कर्म व ब्रह्मचर्य विहित आहे." या **पूर्वमीमांसे**च्या सहाव्या अध्यायस्थ न्यायानें पतिसह अग्निसाध्य श्रौतकर्माविषयीं व स्मृत्युक्त कर्माविषयीं अधिकार आहेच. कारण कामश्रुतिगत[1] पुंस्त्वाचें व उद्देश्यविशेषणाचें पूर्वोक्त न्यायानें अविवक्षितत्व आहे. व "पाणिग्रहणात्तव इतर कर्म व पुण्यफलाविषयीं पतीशीं तिची बरोबरी आहे," असी **आपस्तंबो**क्ति आहे. **सूतसंहिते**तही-"द्विजस्त्रियांस वेदार्थज्ञान व त्याच्या अभ्यासाविषयीं अधिकार आहे. व कित्येक विद्वान्, स्त्रियांस त्या शूद्रसम असें ह्मणतात," असें सांगितलें आहे. "स्त्रिया व शूद्र हे समानधर्म होत," असी **स्मृति**हि आहे. अतएव तिचे संस्कारही शूद्रवत तूष्णीं करावे.-"हे पूर्वोक्त संस्कार स्त्रियांस सर्व अमंत्रक करावे," असी **मनू**क्ति आहे. यावरून,-"शूद्र पूर्त-(धर्मार्थ वापीकूपतडागादि करणें) धर्माविषयीं अधिकारी आहे. वैदिकाविषयीं नाहीं," असी **जातूकर्ण्यो**क्ति आहे. व "वेदीच्या बाहेर जें दान देतात त्यास पौर्तिक ह्मणावें,"

---

१ "सायंकाळीं व प्रातःकाळीं 'अग्निहोत्र' हवन करावें. ज्याला स्वर्गप्राप्तीची इच्छा असेल त्यानें 'ज्योतिष्टोम' यज्ञ करावा," इत्यादिकांस कामश्रुति ह्मणतात. याचें कारण कीं फलकामनापूर्वक कर्माची प्रवृत्ति सांगितली आहे.

असी **व्यासोक्ति** आहे. ह्मणून, शूद्रवत् अमंत्रक तुलादि १६ महादानें, धर्मार्थ–घरें, विहिरी, तळीं इत्यादिकांविषयीं स्त्रियांला अधिकार आहे; कारण, फलाविषयीं कामश्रुतींतील पुरुषत्वाचें 'षाष्ठन्यायानें विवक्षितत्व नाहीं. त्यावरून सुवासिनी स्त्रियांस पतिसंमतानें स्वतः कर्माधिकार आहे. कारण, पूर्वोक्त कर्मे अग्निसाध्य नाहींत ह्मणून. विधवांस तर स्वतंत्रतेनें अधिकार आहेच, हें **विज्ञानेश्वरानें** व्यवहाराध्यायांत सविस्तर सांगितलें आहे. अतएव तुलादानादिकांत–"तें देणारा पुरुष प्रद्युम्नसम व स्त्री पार्वतीसम होते," असें फल स्त्रियांसही सांगितलें आहे. असें असतां शूद्रसमानधर्मत्वास्तव, स्त्रियांस पंचमहायज्ञादिकहि करितां येतील? असें ह्मणशील तर श्रवण कर,–"गृहस्थाश्रम्यानें नेहेमीं पंचयज्ञ करणें सोडूं नये," असी **शंखा**दिकांची उक्ति आहे. व '**यजेत**' इत्यादि विध्यर्थक क्रियावचनांत, कर्त्याच्या एकत्वाप्रमाणेंच पुरुषत्वहि विवक्षित आहे. तसी स्त्रीत्वाची विवक्षा नाहीं. ह्मणून, त्या कर्माविषयीं स्त्रियांस अधिकारप्राप्ति नाहीं, व या नित्य कार्याविषयीं तसी श्रुतिहि नाहीं, कीं—ज्या श्रुतीनें तद्गत पुंस्त्वाच्या अविवक्षेनें या कर्माचें स्त्रीपुरुषसाधारणत्व ग्रहण केल्यास स्त्रीलाहि अधिकार सिद्ध होईल. कदाचित् या कर्माच्या नित्यत्वाची अप्राप्ति मानल्यास, दोषाभावाचें समर्थत्व होईल. ह्मणून वचनास्तव पुढील नित्यकर्माधिकार आहे. तेंच **मदनरत्नां**त **स्कंदपुराणां**त सांगितलें आहे कीं;—"विधवास्त्रीनें भर्त्याच्या उद्देशानें दर्भयुक्त तिलोदकानें नित्य तर्पण करावें." श्राद्धांतही नित्य, नैमित्तिक व काम्य या कर्माविषयीं अपुत्रा स्त्रीस अधिकार आहे; कारण "जसें विधुर पुरुषानें पुत्र नसल्यास स्त्रीस पिंड द्यावा (श्राद्ध करावें), तसेंच विधवेनें पुत्राभावीं भर्त्यास पिंड द्यावा," असी **शंखोक्ति** आहे, व "अपुत्रा विधवा वैधव्यधर्मपालन करीत असून, स्वधर्मस्थ असल्यास तिनेंच पतीस पिंड द्यावा, व त्याचें स्थावरजंगम द्रव्य तिलाच मिळावें," असी **मनूक्ति** आहे. हें सविस्तर **निर्णयसिंधूं**त सांगितलें आहे. जेथें विष्णुशिवादिकांची पूजादि केल्यास फल सांगितलें आहे, तेथें स्त्रीस अधिकार आहेच. असाच व्रतादिकांविषयीं आहे. तस्मात् शूद्रसमत्व असतांहि स्त्रीस पंचमहायज्ञाधिकार नाहीं; तर, त्यांनीं भोजनकालीं तूप लावलेलें थोडें अन्न अग्नींत घालावें. कारण,—"ज्याचें जें त्याच्या पुढें अन्न शिजून तयार होईल, त्यानें त्यांतील अन्न थोडें अग्नींत घालून, आपण भोजन करावें," असें **पृथ्वीचंद्रोदयांत गोभिल**वचन आहे. असो, हें येथें केवळ दिग्दर्शन मात्र आहे. बाकीचें ग्रंथविस्तरभयास्तव येथें सांगत नाहीं.

## ॥ अथ स्त्रीधर्माः ॥

**मनुः ॥ उत्पादनमपत्यस्य जातस्य परिपालनम् ॥ प्रत्यहं लोकयात्रा च प्रत्यक्षं स्त्रीनिबंधनं ॥ १ ॥ अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा ॥ दाराधीनस्तथा स्वर्गः पितॄणामात्मनश्च ह ॥ २ ॥ तस्माद्यत्नेन रक्ष्यास्ता भर्तव्या मनुरब्रवीत् ॥ अस्वतंत्राः स्त्रियः कार्याः पुरुषैश्च दिवानिशं ॥ ३ ॥ विषयेषु च सज्जंत्यः संस्थाप्या ह्यात्मनो वशे ॥ पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने ॥ ४ ॥ पुत्रास्तु स्थाविरे भावे न स्वातंत्र्यं क्वचि-**

त्स्त्रियाः ॥ सूक्ष्मेभ्योऽपि प्रमादेभ्यः स्त्रियो रक्ष्या विशेषतः ॥ ५ ॥ द्वयोर्हि कुलयोः शोकमावहेयुररक्षिताः ॥ कालेऽदाता पिता वाच्यो वाच्यश्चानुपयन् पतिः ॥ ६ ॥ अगच्छन्नित्यर्थः । मृते भर्तरि पुत्रस्तु वाच्यो मातुररक्षिताः ॥ कल्पतरौ पैठीनसिः ॥ अप्रमत्ता रक्षत तंतुमेनं मा परक्षेत्रे परबीजानि वाप्सुः ॥ भार्या रक्षत कौमारे बिभ्यंतः पररेतसः ॥ १ ॥ स्त्रियो गृहदेवतास्तासां न शौचं । न व्रतं । नोपवासः । पतिशुश्रूषया गच्छंति परमां गतिं ॥ ब्राह्मे ॥ अमीमांस्यानि शौचानि स्त्रीषु बालातुरेषु च ॥ मनुः ॥ पानं दुर्जनसंसर्गः पत्या च विरहोऽटनम् ॥ स्वापोऽन्यगेहे वासश्च स्त्रीणां वै दूषणानि षट् ॥ १ ॥ नैता रूपं परीक्षंते नासां वयसि संस्थितिः ॥ सुरूपं वा कुरूपं वा पुमानित्येव भुंजते ॥ २ ॥ शय्यासनमलंकारं कामं क्रोधमनार्जवं ॥ द्रोहभावं कुकार्यं च स्त्रीभ्यो मनुरकल्पयत् ॥ ३ ॥ नास्ति स्त्रीणां क्रिया मंत्रैरिति धर्मो व्यवस्थितः ॥ निरिंद्रिया ह्यमंत्राश्च स्त्रियो नित्यमिति स्थितिः ॥ ४ ॥ न कश्चिद्योषितः शक्तः प्रसह्य परिरक्षितुं ॥ अर्थस्य संग्रहे चैनां व्यये च विनियोजयेत् ॥ ५ ॥ ग्राम्यधर्मे च पत्न्यां च परिग्राहस्य रक्षणे ॥ मनुः ॥ बालया वा युवत्या वा वृद्धया वापि योषिता ॥ न स्वातंत्र्येण कर्तव्यं किंचित्कार्यं गृहेष्वपि ॥ १ ॥ पित्रा भर्त्रा सुतेनापि नेच्छेद्विरहमात्मनः ॥ एषां हि विरहेण स्त्री गर्हिता स्यात्कुलद्वये ॥ २ ॥ विष्णुः ॥ भर्तरि प्रोषिते न प्रतिकर्मक्रिया । परगृहेषु नाभिगमनं । द्वारदेशगवाक्षेष्वनवस्थानं ॥ याज्ञवल्क्यः ॥ यत्रानुकूल्यं दंपत्योस्त्रिवर्गस्तत्र वर्धते ॥ रक्षेत्कन्यां पिता विन्नां पतिः पुत्रास्तु वार्धके ॥ १ ॥ अभावे ज्ञातयस्तेषां न स्वातंत्र्यं क्वचित्स्त्रियाः ॥ भर्तृभ्रातृपितृज्ञातिश्वश्रूश्वशुरदेवरैः ॥ २ ॥ बंधुभिश्च स्त्रियः पूज्या भूषणाच्छादनाशनैः ॥ संयतोपस्करा दक्षा हृष्टा व्ययपराङ्मुखी ॥ ३ ॥ कुर्याच्छ्वशुरयोः पादवंदनं भर्तृतत्परा ॥ ४ ॥ स्त्रीभिर्भर्तृवचः कार्यमेष धर्मः परः स्त्रियाः ॥ ५ ॥ आशुद्धेः संप्रतीक्ष्यो हि महापातकदूषितः ॥ क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् ॥ ६ ॥ हास्यं परगृहे यानं त्यजेत्प्रोषितभर्तृका ॥ बृहस्पतिः ॥ प्रसाधनं नृत्यगीते समाजोत्सवदर्शनं ॥ मांसमद्याभियोगं च न कुर्यात्प्रोषिते प्रभौ ॥ १ ॥ कल्पतरौ शंखलिखितौ ॥ प्रोषिते भर्तरि प्रेंखातांडवविहारचित्रदर्शनवनोद्यानयानविकृतशयनोत्कृष्टपानभोजनकंदुकक्रीडागंधमाल्यालंकारदंतधावनांजनादर्शप्रसाधनादीनामनारंभः ॥ तत्रैव भारते कल्पतरौ ॥ एताः श्रियः स्त्रियो नाम सत्कार्या भूतिमिच्छता ॥ लालिता निगृहीता च स्त्रीः श्रीर्भवति भारत ॥ १ ॥ मनुः ॥ यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः ॥ यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ १ ॥ शोचंति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलं ॥ न शोचंति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ॥ [ म० स्मृ० अ०३ श्लो० ५६।५७ ] तस्मादेताः समभ्यर्च्या भूषणाच्छादनाशनैः ॥ [ म० अ० ३ श्लो० ६९ ] जामयः स्नुषाभगिन्यादयः । कल्पतरौ दक्षः ॥ जलौकेव च सर्वा स्त्री भूषणाच्छादनाशनैः ॥ सुभृतापि कृता नित्यं पुरुषं ह्यपकर्षति ॥ १ ॥ जलौका रक्तमादत्ते केवलं सा तपस्विनी ॥ इतरा तु धनं वित्तं मांसं वीर्यं बलं सुखं ॥ २ ॥ साशंका बालभावे तु यौवनेऽभिमुखी भवेत् ॥ तृणव-

**र्के पृथ्वीं प्रति श्रीवाक्यं ॥ नारीषु नित्यं शुचिभूतिकासु स्वभर्तृभक्तप्रियवादिनीषु ॥ अमुक्तहस्तासु सुतान्वितासु सुगुप्तभांडासु बलिप्रियासु ॥ १ ॥ सुमृष्टवेश्मासु जितेंद्रियासु कलिव्यपेतासु विलोलुपासु ॥ धर्मव्यपेक्षासु दयान्वितासु स्थिता सदाहं जगतां विधात्री ॥ २ ॥ व्यासः ॥ द्वारोपवेशनं नित्यं गवाक्षेण निरीक्षणं ॥ असत्प्रलापो हास्यं च दूषणं कुलयोषिताम् ॥ १ ॥ भारते ॥ अट्टशूला जनपदाः शिवशूलाश्चतुष्पथाः ॥ वनिताः केशशूलिन्यो भविष्यंति कलौ युगे ॥ १ ॥ अस्यार्थमाह परशुरामः ॥ अट्टमन्नं शिवो वेदः शूलं विक्रय एव च ॥ केशश्च भगमित्याहुर्वेदतत्त्वार्थदर्शिनः ॥ १ ॥ मनुः ॥ भर्ता देवो गुरुर्भर्ता धर्मतीर्थव्रतानि च ॥ तस्मात्सर्वं परित्यज्य पतिमेकं समर्चयेत् ॥ १ ॥ भुक्ते भुंक्ते पतौ या तु स्वासीना वापि चासिते ॥ विनिद्रिते विनिद्राति सा स्त्री ज्ञेया पतिव्रता ॥ १ ॥ अंगिराः ॥ आर्तार्ते मुदिते हृष्टा प्रोषिते मलिना कृशा ॥ मृते म्रियेत या पत्यौ सा स्त्री ज्ञेया पतिव्रता ॥ १ ॥ रजोवतीगर्भिणीधर्माः सहगमनान्वारोहणादौ निर्णयो विधिश्च निर्णयसिंधावुक्तोऽस्माभिः ॥**

आतां स्त्रीधर्म सांगतो.

याविषयीं **मनु** ह्मणतो—"मूल होणें व झालेल्याचें संरक्षण करणें आणि प्रतिदिनीं आल्यागेल्याचा सत्कार करणें हें, स्त्रियांस मुख्य बंधन आहे. अपत्य, श्रौत किंवा स्मार्त अग्नीची सेवा इत्यादि धर्मकार्यें, श्वशुरादि गुरूंची सेवा, व नवऱ्यावर अत्यंत प्रीति ठेवणें हें स्त्रियांस आवश्यक आहे. आपल्या पितरांचा स्वर्ग ( उत्तमगति ) ज्या हेतूस्तव स्त्रियांच्या आधीन आहे, त्या हेतूस्तव पुरुषानें यत्नानें त्यांचें रक्षण व पोषण करावें, असें **मनु** ह्मणतो. पुरुषांनीं नित्य स्त्रियांस स्वतंत्र ठेवूं नये. तसें न केल्यास चापल्यास्तव त्या विषयांत आसक्त होऊन, कुलदूषण करितील. ह्मणूनच त्यांला स्वाधीन ठेवाव्या. कुमारदशेंत बाप, तारुण्यांत पति व वृद्धपणीं पुत्र; हे स्त्रीचे रक्षक आहेत. ह्मणून तिला कधींच कोणत्याच वयांत स्वातंत्र्य नाहीं. लहानशा प्रसंगांतही स्त्रीचें रक्षण करावें. कारण, अरक्षित स्त्रिया अधर्माचरणानें बापाच्या व नवऱ्याच्या कुलास शोकप्रद होतील. कन्येस विवाहयोग्यकालीं योग्यवरास न देणारा बाप व ऋतुमती असून अदुष्ट स्त्रीशीं गमन न करणारा पति आणि भर्ता मेल्यावर तिचें रक्षण न करणारा पुत्र हे लोकांत निंद्य आहेत. राजानें यांस योग्य दंड करावा, व त्यांच्या (स्त्रियांच्या) हातून कदाचित् अयोग्य कर्म घडल्यास त्याचा दोष पूर्वोक्त तिघांवर येतो." **कल्पतरूंत पैठीनसि** ह्मणतो—"हे पुरुषांनो ! सावधपणानें स्वस्त्रियांचें रक्षण करा. परकीय शेतांत बीज पेरल्यासारखे परस्त्रीरत होऊं नका. अन्याच्या रेतास भिऊन तरी कौमारवयांतच स्वस्त्रीचें रक्षण करा. स्त्रिया केवळ गृहांतील देवता होत. यांस शौच, व्रतें, उपवास इत्यादि कांहीं करणें नको. त्या पतिसेवेनेंच उत्तमलोकास जातात." **ब्रह्मपुराणां**त—"स्त्री, बाल व आतुर यांच्या शुद्धतेचा विचार करूं नये," असें सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो—"सुरापान, दुर्जनाचा संसर्ग, नवऱ्यास सोडून राहणें, एकटीनें फिरणें व एकटीनें निजणें हीं ६ कर्में स्त्रियांस दोषप्रद आहेत. त्या

उत्तम रूप व बरोबरीचें वय इत्यादि पहात नाहींत,—तर सुरूप अथवा कुरूप कसलाहि पुरुष मिळाला तरी केवळ त्याच्या उत्तम पुंस्त्वास पाहून त्यासीं रत होतात. शय्या, आसन, अलंकार, काम, क्रोध, उद्धतपणा, दुष्टत्व, कुत्सित कर्म, हीं स्त्रियांस स्वभावसिद्ध असतात. स्त्रियांस वैदिक मंत्रांनीं कर्म करण्यास अधिकार नाहीं. त्या नित्य इंद्रियाधीन असणाऱ्या व वैदिक मंत्ररहित आहेत. कोणीहि बलात्कारानें त्यांस रक्षण करण्यास समर्थ होत नाहीं. याकरितां त्यांस धर्मोपदेशादि केल्यानें रक्षण करण्यास त्या शक्य होत. स्त्रीला, पतीनें द्रव्यसंग्रह व त्याचा खर्च याविषयीं योजावी. ग्राम्य धर्म, स्वयंपाक, व परिवाररक्षणाविषयीं योजावी. बाल, तरुण व वृद्ध स्त्रीनें स्वतंत्रपणानें स्वगृहांतहि कांहीं कार्य करूं नये. लहानपणीं पिता, तारुण्यांत व सर्वकाळ पति आणि वृद्धपणीं पुत्र यांशीं आपला वियोग इच्छूं नये. तो झाल्यास दोनीही कुळांस निंद्य होईल." **विष्णु** ह्मणतो—"पति परदेशीं गेल्यास स्त्रीनें अलंकार, मंगलस्नान, अन्याच्या घरीं जाणें, द्वारांत व बारींत उभें राहणें इत्यादि करूं नये." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"जेथें नवराबायकांचें परस्पर अनुकूलत्व असेल तेथें—धर्म, अर्थ, काम, हे ३ पुरुषार्थ वाढतात. विवाहापूर्वी पित्यानें, तारुण्यांत पतीनें, आणि ह्मातारपणीं पुत्रांनीं, अथवा ते नसल्यास बांधवांनीं स्त्रीचें रक्षण करावें. कधींच तिला स्वातंत्र्य नाहीं. पति, बंधु, बाप, आई, पितृव्यादिक, सासू, सासरा, दीर व आप्त यांनीं अलंकार, वस्त्रें, भोजन इत्यादि देऊन स्त्रियांचें पालन करावें. नित्य अति खर्च न करणारी, गृहरक्षण करणारी, सर्वदा संतुष्ट, गृहकृत्यांत हुशार, पतीस श्रेष्ठ मानून त्यावर प्रीति ठेवणारी अशी असून, तिनें सासूसासऱ्यांस नित्य वंदन करावें. पतीच्या आज्ञेंत वागावें. हा स्त्रियांचा मुख्य धर्म होय. कदाचित् पति महापातकी असल्यास तो शुद्ध होईपर्यंत त्याची वाट पाहावी. तो परदेशीं गेल्यास—क्रीडा, मंगलस्नान, वेणीफणी, शरीरसंस्कार, जनसमुदाय व उत्साह पहाणें, हंसणें, परगृहीं जाणें, हीं तो येईपर्यंत सोडावीं." **बृहस्पति** ह्मणतो—"वेणी घालणें, नृत्य व गायन करणें, समुदाय व उत्सव पहाणें, मांस आणि मद्याचें सेवन हीं पति प्रवासीं गेल्यास स्त्रीनें वर्जावीं." **कल्पतरूं**त **शंख** व **लिखित** ह्मणतात कीं,—"पति परदेशीं गेल्यावर—हिंदळ्यावर बसणें, तांडव, नृत्य व क्रीडा करणें, अनेक प्रकारचीं चित्रें पहाणें, बागेंत फिरणें, मनांत कांहीं विकार आणून निजणें, चांगल्या पदार्थांचें सेवन व मिष्ट भोजन करणें, चेंडू खेळणें—सुगंधी तेल, पुष्पें, अलंकार, उटणें इत्यादिकांचें धारण हीं करूं नयेत. दंतधावन करूं नये. नेत्रांत काजळ घालूं नये, आरशांत पहाणें, वेणीफणी करणें, इत्यादि वर्जावीं." त्याच **कल्पतरूं**त **महाभारतां**त—"स्त्रिया केवळ लक्ष्मीरूपिणी आहेत. ऐश्वर्य इच्छिणाऱ्यांनीं त्यांचा सत्कार करावा. स्त्रीचें लालन व प्र-

१ येथें 'दांत घांसूं नयेत,' असें सांगितलें आहे तें सामान्यतः आहे. एकंदरींत पति प्रवासांत असतां ज्यानें अंतःकरणांत कामवासना उत्पन्न होईल तें वर्ज करावें, इतकाच याचा हेतू आहे. दांत घाणेरडे ठेवावे असें नाहीं.

संगीं निग्रह केल्यास ती लक्ष्मीच होते," असें सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो—"जेथें स्त्रीचा सत्कार होतो तेथें देवता रममाण होतात. जेथें तो होत नाहीं तेथें सर्व कर्में निष्फळ होतात. जेथें मुलीचें दुःख पाहून मातापितरादिक शोक करितात, तेथें तें भर्तृकुल नाश पावतें. जेथें तसें होत नाहीं तें कुल नेहमीं वृद्धि पावतें. ह्मणून स्त्रिया वस्त्रालंकारांनीं सत्कार करून पुजाव्या." **कल्पतरूं**त—**दक्ष** ह्मणतो—"सर्व स्त्रिया जळूसारख्या आहेत. अलंकार, वस्त्रें व भक्ष्य पदार्थ इत्यादिकांनीं पूर्ण असल्या तरी त्या पुरुषास ओढतात. जळूपेक्षां त्या अधिक आहेत ह्मटलें तरी चालेल, कारण, ती केवळ रक्त ओढून घेते, आणि ही तर द्रव्य, वस्त्रालंकारादिक, मांस, वीर्य, बल, सुख, अर्थात् सर्वस्व हरण करते. ही बालपणीं पतीपासीं साशंक वागते, तारुण्यांत बरोबरीनें वागते, आणि वृद्धपणीं तर त्यास तृणवत् मानते. कदाचित् जर ही अनपत्या (वांजोटी) असली तर, उपेक्षा केलेल्या रोगासारखी दुःखदायक होते." **मनु** ह्मणतो—"आपल्यास परदेशीं जाणें असल्यास स्त्रीच्या पोटगीची व्यवस्था करून जावें; कारण,—उत्तमस्थितीचीही स्त्री पोट भरण्याकरितां हीनकर्मानें दूषित होईल." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—समानवर्ण स्त्री असल्यास अन्यवर्ण स्त्रीसह, व सवर्ण स्त्रियांत ती निंद्य नसेल तर ज्येष्ठेवांचून धर्मकार्यें करूं नयेत." **छंदोगपरिशिष्टां**त—"अग्नि व शिष्ट यांची सेवा बहुत स्त्रिया असलेल्यानें सवर्णस्त्रीकडून करवावी. सवर्णस्त्रिया बहुत असल्यास त्यांत वडील (प्रथम विवाहित) स्त्री निंद्य नसल्यास तिजकडून, किंवा जी पुत्रवती व आज्ञा पाळणारी, स्वकार्यदक्ष व सत्य आणि प्रिय बोलणारी व शुद्ध असेल तिजकडून करवावी." **कल्पतरूं**त **दक्ष** ह्मणतो—"जर ती निर्दोष असेल तर धर्मपत्नी होय. सदोष असेल तर अन्य स्त्री गुणवती व शुद्ध अशी पाहून करावी. याविषयीं त्याला दोष नाहीं." **मनु** ह्मणतो—"आपल्याशीं द्वेष करणाऱ्या स्त्रीची १ वर्ष वाट पहावी. तेवढ्यांत ती नीट न वागल्यास दुसरी करून तिचा सहवास करूं नये. असावध, उन्मत्त किंवा रोगग्रस्त पतीचा अतिक्रम करणारी असल्यास ३ मासांनीं तिचे अलंकारादिक सर्व घेऊन, तिला बाहेर दवडावी. उन्मत्त, पतित, नपुंसक, निर्बीज व महारोगी अशा पतीचा द्वेष करणाऱ्या स्त्रीचा त्याग करतां येत नाहीं, व तिला दायभागही नाहीं." **मनु** व **कात्यायन** ह्मणतात—"पति दुष्ट, स्वच्छंदसंचारी व गुणहीन कसाही असला तरी स्त्रियांनीं त्याची देववत् सेवा करावी. पतिसेवेवांचून स्त्रियांस, यज्ञ, व्रतें, उपोषणें वगैरे कांहीं नाहीं. ती केवल नवऱ्याची जी सेवा करील तिनेंच स्वर्गीं पूज्य होईल. जी पति जीवंत असतां उपोषणें व व्रतादि आचरण करते, ती त्या आचरणानें भर्त्याचें आयुष्य हरण करिते, व आपण नरकास जाते." **कल्पत-**

---

१ ह्या वचनांत व्रतादिकांचा निषेध केला आहे. व "हरितालिका" इत्यादि व्रतें सुवासिनी स्त्रियांस नित्य आहेत, तेव्हां तीं करावीं किंवा नाहीं असा संशय येईल तर, त्याविषयीं असें आहे कीं—ज्या व्रतादिकांविषयीं विशेष विधि असेल तेथें या वचनाची प्रवृत्ति होत नाहीं. "विशेष वाक्यानें सामान्याचा बाध होतो," असा न्याय आहे. आणखी वरील वचनाचें—नव-

रूत—**हारीत** ह्मणतो—"पति प्रवासीं गेला असतां अलंकार धारण करूं नये, व तो जाण्यापूर्वी वेणी घातलेली असेल ती सोडून पुनः घालूं नये, व केश मोकळेही ठेवूं नयेत." **मदनरत्नां**त **स्कंदपुराणां**त—"पति निजला असतां व सुखानें बसला असतां व स्वेच्छेनें रममाण असतां संकटकालीं कदापि त्यास उठवूं नये. रजस्वला झाल्यावर त्रिरात्रपर्यंत पतीच्या दृष्टीं पडूं नये, व आपलें भाषण देखील त्यास ऐकवूं नये.[१] ४ थ्या दिवसीं स्नान करून शुद्ध झाल्यावर पतीचें मुख पहावें. दुसऱ्या कोणाचेंहि पाहूं नये. कदाचित् तो जवळ नसल्यास मनांत पतीचें रूप चिंतून सूर्याचें दर्शन करावें. हळद, कुंकू, सेंदूर, काजळ, चोळी, तांबूल, व मंगलकारक आभरणें (मंगळसूत्र, जोडवीं, नथ इ०), केशसंस्कार (सुगंधिक तैलादिक लावणें), वेणी, हातांतील व कर्णांतील अलंकार, हे पतीची आयुष्यवृद्धि इच्छिणाऱ्या स्त्रीनें कदापि वर्ज करूं नयेत. दुर्भगस्त्रीशीं मैत्री करूं नये. तसेंच नवऱ्याशीं द्वेष करणाऱ्या स्त्रीशीं कधींही भाषण करूं नये. कदापि एकटें राहूं नये, व नग्न होऊन स्नान करूं नये. उखळ, मुसळ, वर्धिनी (विळी), दगड, यंत्र, उंबरा व रवी यांजवर कधीं बसूं नये. जी नवऱ्यानें कांहीं बोललें असतां रागानें उत्तर देते ती गांवांत कुत्री अथवा निर्जन वनांत भालू होते. पतीच्या मतास अपवादरूप बोलूं नये, कलह करूं नये. तसेंच सासूसासऱ्यांच्या सन्निध मोठ्यानें भाषण व हास्य करूं नये. कदाचित् अविचारानें अथवा रागानें किंवा स्वकीय अपराधास्तव पतीनें मारलें असतां त्याला उलट मारण्याची जी इच्छा करील ती केवळ वाघीण होय. जी पतीस न घालतां आपणच मिष्टान्न भक्षण करिते ती—गांवांत डुकरी अथवा गाढवी किंवा विष्टा भक्षिणारी कुत्री होते," असें सांगितलें आहे. **कल्पतरूं**त—**यम** ह्मणतो—"जी ऋतुस्नात असून, एकांतीं पतीजवळ जात नाहीं, त्या गर्भघातिनीस गांवांतील सर्व लोकांस विदित करून घरांतून हांकून द्यावी." **बौधायन** ह्मणतो—"पतिसेवा न करणारी, वांझ, व्यभिचारिणी व हिंसक अशीस अन्य उपायांनीं तो तिचा दुःस्वभाव जात नसल्यास कांहीं कालानें, व अप्रिय बोलणारीचा तत्काल बुद्धिमान् पुरुष त्याग करितात. यावांचून जीस मुलींच मूल होत नसेल तिला न्हाण आल्यापासून १० वे वर्षी, व केवळ मुलीच प्रसवणारीस १२ वे वर्षी, आणि जिचीं मुलें वांचत नाहींत तीस १५ वे वर्षी, व अप्रिय बोलणारीस तत्काल त्यागावी." **वसिष्ठ** ह्मणतो—"व्यभिचार व तीर्थ—(योनि) गमनाविषयीं (संगाविषयीं) जी धर्मापासून नष्ट होते तिचा त्याग करावा." **हारीत** ह्मणतो—"धन व धान्य नाश करणाऱ्या स्त्रीस तत्काल वर्जावी." **नारद** ह्मणतो—"कदाचित् स्त्रीनें व्य-

---

ऱ्याच्या संमताशिवाय व्रतादि करूं नये. असेंच तात्पर्य आहे. तेव्हां अर्थात् त्याच्या संमतानें व्रतादि करण्यास दोष नाहीं, असें सिद्ध होतें. व सांप्रत शिष्टाचारही याचप्रमाणें आहे.

१ येथें—'दृष्टीं पडूं नये,' असें सांगितलें आहे. यावरून ती दृष्टीं पडल्यास कांहीं पाप लागतें असें नाहीं. तर—रजस्वलेचा संभोग झाल्यास त्यापासून प्रकृति बिघडते असें वैद्यशास्त्राचें मत आहे. व उभयतांची दृष्टादृष्ट झाल्यास कदाचित् अविचारानें कामाच्या प्रेरणेनें तसा प्रकार घडेल व त्यापासून वाईट परिणाम होईल तो न व्हावा, इतकेंच याचें तात्पर्य आहे.

भिचार केल्यास, तिचें मुंडन करून, तिला पलंगावर न घेतां अर्थात् संग न करतां कदन्न व जाडीभरडीं वस्त्रें देऊन, तिला मलमूत्रादि काढण्याच्या नीच कामास लावावी." **शंख** ह्मणतो—"सासूसासरे व पतीच्या आज्ञेवांचून स्त्रीनें घराबाहेर जाऊं नये. चोळी नघालतां राहूं नये. त्वरेनें चालूं नये. परपुरुषासीं भाषण व त्यास आपली नाभि दाखवूं नये. घोट्यापर्यंत रुंद व धड असें वस्त्र नेसावें. स्तन उघडे ठेवूं नयेत. पतीसीं विनोदावांचून हंसूं नये. पतीस व दीरांस मोकळेपणानें पाहूं नये. वेश्या, धूर्त, जार, इत्यादिकांसीं सहवास व भाषणादि करूं नये." **स्कंदपुराणां**त—"जी प्रियपतीस सदाचरणानें नित्य संतुष्ट करील, तिनें सर्व त्रैलोक्य संतुष्ट केलेंसें होतें. पतीचें भोजन झाल्यानंतर आपण जेवावें. तो उभा असल्यास उभें रहावें. तो निजल्यावर आपण निजावें. त्याच्या पूर्वी उठून गृहकर्म करावें. वेणीफणी व अलंकारादि धारण केल्यावांचून पतीस दृष्टीं पडूं नये. कांहीं कार्याकरितां प्रवासास पति गेल्यास सर्व अलंकार वर्ज करावे. पतीचें नांव स्त्रीनें व तिचें पतीनें घेऊं नये. कदाचित् त्यानें तिची निंदा केली तरी तिनें उलट निंदा करूं नये. त्यानें मारलें तरी रागावूं नये. नेहमीं प्रसन्न असावें. त्यानें असें कर ह्मणतांच केलें असें ह्मणावें. एखादे वेळीं कांहीं योग्य सूचना कर्तव्य असल्यास, हे स्वामिन् ! 'हें सयुक्त आहे, आपल्यास रुचेल तर असें करावें,' असी सूचना करावी. त्यानें बोलाविल्यास हातचें काम सोडून हजर व्हावें. देवपूजेचीं उपकरणीं वगैरे भांडीं स्वतः घांसावीं. नियमानें उदक आणणें व अग्निसेवा, पूजासाहित्य इत्यादि सेवक असला तरी आपणच करावें. पतीचें उच्छिष्ट अन्न व फलादिक भक्षण करावें. पतीनें चांगला वाईट कांहीं पदार्थ दिल्यास मोठा प्रसाद मानून तो घ्यावा," असें सांगितलें आहे. **कल्पतरूं**त **ऋष्यशृंग** ह्मणतो—"स्त्रीनें नित्य गृहमेधिनी[1] असावें, व अलंकार धारण करावे. गृहकृत्यांविषयीं तत्पर असावें. झाडलोट, सडासारवण इत्यादि गृहसेवा करावी. नित्य वेणीफणी व पुष्पधारण करून स्नान करून, स्वच्छ वस्त्र नेसून, सासूसासरे इत्यादिक उठण्यापूर्वी उठून एकांतीं देवाची धूप, दीप, नैवेद्यादिकांनीं पूजा करावी." **शंख** व **लिखित** ह्मणतात—"एकांतीं व उत्सवकालीं गंध, पुष्पें, अलंकार, चित्रविचित्र वस्त्रें इत्यादि धारण करावीं. कांहीं व्यापारसंबंधानें वाण्यासीं, आणि संन्यासी, व वृद्ध यांवांचून परपुरुषासीं भाषण करूं नये." **हारीत** ह्मणतो—"स्नान करून स्वच्छ वस्त्र नेसून देवघरांत देवास नमस्कार करून, अन्नादिकांवर अभिघार—( तूप घालून ) करून, विवाहाग्नींत देव व देवस्त्रियांच्या उद्देशानें हवन करून, बलि द्यावा. असें देवातिथ्य केल्यावर यथायोग्य घरच्या मंडळीला तृप्त करून, शेषान्न एकांतीं आपण भक्षण करून, पात्रें घांसून, घराबाहेर उत्तरेस किंवा पूर्वेस—"**वास्तुपतये नमः । भूपतये नमः । रुद्राय नमः**" ह्मणून, निनयन[2] करावें. तसेंच सायंकालीं स्वयंपाकादि झाल्यावर—"**नमो**

१ घरच्या कामाविषयीं झटणारी, अथवा गृहस्थाश्रमधर्म वाढविणारी.

२ 'निनयन' शब्दानें येथें—भांडीं घांसून तीं विसळण्याचें जें पाणी राहतें तें उत्तरेस किंवा पूर्वेस लोटावें इतकाच अर्थ असावा.

**भुवनपतये रुद्राय भस्मसदे भस्मना रक्षां करोमि"** ह्मणून भस्मानें गृहरक्षा करून द्वार न झांकतां—पति, पुत्र व अन्य मुलांबाळांला आणि आपणास तें भस्म लावावें. जें कांहीं रक्षणीय असेल त्यासही लावावें. नंतर पतीस नमस्कार करून, घरांत बसावें. पति जवळ बसला असला तर उभें रहावें. उंच स्थानीं व संशय येण्यास योग्य अशा ठिकाणीं बसूं नये. वक्रपणानें त्याच्याकडे पाहूं नये. पतिचरण धुवून व रगडून, उष्णकालीं त्यास वारा घालावा. पर्जन्याचें व घर्माचें उदक त्याच्या अंगास असलें तर पुसावें. ग्रामांत राहून पति घरीं येत असतां, ओझें आणीत असतां व निजला असतां मोठ्या आनंदानें त्यास सामोरें जावें, व त्या वेळीं अपेक्षित पदार्थ देऊन, त्याचा सत्कार करावा. तसेंच, परशयन, आसन, वस्त्र, अलंकार इत्यादि आपणास असावें असें मनांतही आणूं नये. एकपात्रीं भोजन, मद्य, मांस, उच्छिष्टभक्षण व निर्माल्यसेवन, हीं—गुरु ( श्वशुरादि ), पति व पुत्र यांशिवाय इतरांचीं घेऊं नयेत." **स्कंदपुराणां**त—"स्त्रीस तीर्थस्नानाची इच्छा झाल्यास, तिनें पतिचरणोदक घ्यावें; कारण तिला शंकर व विष्णु यांहून पतीच श्रेष्ठ आहे," असें सांगितलें आहे. **परशुरामप्रतापरत्नावलीं**त **स्कंदपुराणां**त—"जी सकाळीं सूर्यास अर्घ्य देईल, ती सप्त जन्मपर्यंत वैधव्य पाहणार नाहीं. जी अंगणांत स्वच्छ भूमीवर सूर्यमंडळ काढून, अक्षतादिकांनीं नित्यशः त्याचें पूजन करिते तिजवर सर्व देव प्रसाद करितात. जी प्रातःस्नान करून स्वस्थ अंतःकरणानें गृहाच्या द्वारप्रदेशांत पूर्वोक्त पूजन करिते तिचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. जर, भोजन करण्याच्या अन्नांतून यथाशक्ति प्रतिदिनीं ज्येष्ठादेवीस बलि न देईल, तर ती मेल्यावर नरकास जाईल. पुत्र, पौत्र, द्रव्य इच्छिणाऱ्या स्त्रियांनीं दररोज बलि देऊन, ज्येष्ठादेवीचा संतोष करावा," असें सांगितलें आहे. **कल्पतरूं**त **महाभारतां**त—"ज्या वेळीं स्त्री कांहीं मसलत करण्यास तत्पर आहे असें भर्ता जाणेल. त्या वेळीं घरांत असलेल्या सर्पाप्रमाणें तो तिजपासून भय पावेल; ह्मणून तें सर्वथा वर्ज्य करावें." आणखी त्याच **कल्पतरूं**त **भारतां**त **विष्णूनें लक्ष्मी**चें वाक्य **पृथ्वी**स सांगितलें आहे. तें—"शुद्ध असून ऐश्वर्य इच्छिणाऱ्या, पतीची भक्ति करणाऱ्या व प्रिय बोलणाऱ्या, रिक्तहस्तानें न वागणाऱ्या, पुत्रवती व भांडवल राखणाऱ्या, ज्येष्ठादेवीस बलि देणाऱ्या, सडासारवणादिकानें घर स्वच्छ राखणाऱ्या, जितेंद्रिय असणाऱ्या, कलहत्याग करणाऱ्या, निर्लोभिणी, धर्माचरण करीत असून सदय असणाऱ्या, अशा स्त्रियांचेठायीं मी ( लक्ष्मी ) नेहमीं रहातें." **व्यास** ह्मणतो—"दारांत बसणें, नित्य बारींतून पाहणें, वाईट मनुष्यासीं भाषण करणें व हंसणें हीं कुलस्त्रियांस दूषणकारक आहेत." **भारतां**त—"कलियुगांत सर्व देश अट्टशूल ( अन्नविक्रयी ) व ब्राह्मण शिवशूल ( वेदविक्रयी ), स्त्रिया केशशूलिनी ( भगविक्रयिणी ) होतील," असें सांगितलें आहे. या वाक्यांतील शब्दांचा अर्थ **परशुरामा**नें सांगितला आहे. तो—"वेदाचा तत्त्वतः अर्थ जाणणारे ऋषि अन्नास अट्ट, वेदास शिव, भगास केश आणि यांच्या विक्रयास शूल असें ह्मणतात." **मनु** ह्मणतो—ज्या

हेतूस्तव स्त्रियांस **देव**, गुरु, धर्म, तीर्थें आणि व्रतें हीं भर्ताच होय, त्या **हेतूस्तव** सर्वांचा त्याग **करून** त्यांनीं नित्य एक पतिसेवाच करावी; ह्मणजे त्यांस देवादि सेवेचें **फल प्राप्त होतें.**" पतिव्रतेचें लक्षण तोच सांगतो कीं,—"जी पतीनें भोजन केलें तर भोजन करिते, तो बसल्यास तदाज्ञेनें बसते, तो निजल्यास आपण निजते. सारांश असें अनुकूल वागणारीस पतिव्रता ह्मणावी." **अंगिरा** ह्मणतो—"तो दुःखित असल्यास दुःख करिते, आनंदित असतां आनंद पावते, तो प्रवासांत असतां मळकट व कृश असते, आणि मेला हें समजतांच जी तत्काल प्राणत्याग करील, तीच पतिव्रता होय." रजस्वला व गर्भिणीचे धर्म, सहगमन व अन्वारोहण यांचा निर्णय आणि विधि हीं आह्मीं **निर्णयसिंधू**त सांगितलीं आहेत, ह्मणून येथें सांगितलीं नाहींत.

## ॥ अथ विधवाधर्माः ॥

मदनरत्नपरिजातयोः स्कांदे ॥ पत्यौ मृतेऽपि या योषिद्वैधव्यं पालयेत्क्वचित् ॥ सा पुनः प्राप्य भर्तारं स्वर्गलोकं समश्नुते ॥ १ ॥ विधवाकबरीबंधो भर्तृबंधाय जायते ॥ शिरसो वपनं तस्मात्कार्यं विधवया सदा ॥ २ ॥ एकाहारः सदा कार्यो नो द्वितीयः कदाचन ॥ त्रिरात्रं पंचरात्रं वा पक्षव्रतमथापि वा ॥ ३ ॥ मासोपवासं वा कुर्याच्चांद्रायणमथापि वा ॥ कृच्छ्रं पराकं वा कुर्यात्तप्तकृच्छ्रमथापि वा ॥ ४ ॥ यवान्नेन फलाहारैः शाकाहारैः पयोव्रतैः ॥ प्राणयात्रां प्रकुर्वीत यावत्प्राणः स्वयं व्रजेत् ॥ ५ ॥ पर्यंकशायिनी नारी विधवा पातयेत्पतिम् ॥ तस्माद्भूशयनं कार्यं पतिसौख्यसमीहया ॥ ६ ॥ नैवांगोद्वर्तनं कार्यं स्त्रिया विधवया क्वचित् ॥ गंधद्रव्यस्य संयोगो नैव कार्यः स्वयं पुनः ॥ ७ ॥ तर्पणं प्रत्यहं कार्यं भर्तुः कुशतिलोदकैः ॥ तत्पितुश्चापि कर्तव्यं नामगोत्रादिपूर्वकं ॥ ८ ॥ इदं पुत्राद्यभावे । विष्णोस्तु पूजनं कार्यं पतिबुद्ध्या न चान्यथा ॥ पतिमेव सदा ध्यायेद्विष्णुरूपधरं परं ॥ ९ ॥ यद्यदिष्टतमं लोके यद्यत्पूर्वं समीहितम् ॥ तत्तद्गुणवते देयं पतिप्रीणनकाम्यया ॥ १० ॥ वैशाखे कार्तिके माघे विशेषनियमं चरेत् ॥ स्नानं दानं तीर्थयात्रां विष्णोर्नामग्रहं मुहुः ॥ ११ ॥ वैशाखे जलकुंभाश्च कार्तिके घृतदीपकाः ॥ माघे तिलधनोत्सर्गात्स्वर्गलोके विशिष्यते ॥ १२ ॥ प्रपा कार्या च वैशाखे देवे देया गलंतिका ॥ उपानद् व्यजनं छत्रं सूक्ष्मवासांसि चंदनम् ॥ १३ ॥ देयानि द्विजमुख्येभ्यः पतिर्मे प्रीयतामिति ॥ एवंविधैश्च विधवा विविधैर्नियमैर्व्रतैः ॥ १४ ॥ वैशाखान्कार्तिकान्माघानेवमेवातिवाहयेत् ॥ नाधिरोहेदनड्वाहं प्राणैः कंठगतैरपि ॥ १५ ॥ कंचुकं न परीदध्याद्वासो न विकृतं वसेत् ॥ एवं धर्मसमायुक्ता विधवापि पतिव्रता ॥ १६ ॥ पतिलोकमवाप्नोति न भवेत्क्वापि दुःखिनी ॥ श्राद्धं च पट्पिंडं कार्यं । स्वभर्तृप्रभृतित्रिभ्यः स्वपितृभ्यस्तथैव च ॥ विधवा कारयेच्छ्राद्धं यथाकालमतंद्रितेति स्मृतिरत्नावल्यां वृद्धमनूक्तेः । सुव्रतानां तासां तु लोकाः पतिभिः समाना गोमायुलोका व्यभिचारिणीनां ॥ हारीतः ॥ पतिव्रता तु सा-

१ साध्वी स्त्री, इति पाठान्तरम् ।

ध्वी या निष्ठां याति प्रभौ मृते ॥ सा हित्वा सर्वपापानि पतिलोकमवाप्नुयात् ॥ १ ॥ बृहस्पतिः ॥ व्रतोपवासनिरता ब्रह्मचर्यव्यवस्थिता ॥ दमदानव्रता नित्यमपुत्रापि दिवं व्रजेत् ॥ १ ॥ मनुः कामं तु क्षपयेद्देहं पुष्पमूलफलोदकैः ॥ न तु नामापि गृह्णीयात्पत्यौ प्रेते परस्य तु ॥ २ ॥ मनुयमौ ॥ आसीतामरणात्क्षांता नियता ब्रह्मचारिणी ॥ धर्मेणैव च कांक्षंती सत्पतित्वमनुत्तमम् ॥ १ ॥ स्त्रियाः श्रुतौ वा शास्त्रे वा प्रव्रज्या नाभिधीयते ॥ प्रजा हि तस्याः स्वो धर्मः सवर्णादिति धारणा ॥ २ ॥ अष्टाशीतिसहस्राणि मुनीनामूर्ध्वरेतसां ॥ दिवं गतानि विप्राणामकृत्वा कुलसंततिम् ॥ ३ ॥ मृते भर्तरि या नारी ब्रह्मचर्यव्यवस्थिता ॥ स्वर्गं गच्छत्यपुत्रापि यथा ते ब्रह्मचारिणः ॥ ४ ॥ [ म० स्मृ० अ० ५ ] स्कांदे ॥ अपृष्ट्वा तु सुतान्किंचिन्न कुर्याद्भर्तृतत्परा ॥ इति विधवाधर्माः ॥

यानंतर विधवाधर्म सांगतो.

**मदनरत्नां**त व **मदनपारिजातां**त **स्कंदपुराणां**त—"जी पति मेला असतां कदाचित् वैधव्यधर्म पाळील, ती पुनः भर्त्यास मिळून स्वर्गलोकीं जाईल," असें सांगून, विधवाधर्म सांगितले आहेत. ते "ज्याकरितां विधवेचा कवरीबंध[1] ( वेणी अथवा बुचडा ) भर्तृबंधनास कारण होतो, त्याकरितां विधवेनें नेहेमीं मुंडन करावें. एक वेळ जेवावें,

१ येथें—'विधवेचा बुचडा अथवा वेणी नवऱ्याच्या बंधनास कारण होते,' असें सांगितलें आहे. याचा अभिप्राय—माझी आडकाठी नाहीं तेव्हां आतां माझी बायको व्यभिचार करीत असेल कीं काय ? ह्मणून तिच्या पतीचा जीव घोटाळतो; अतएव विधवेनें केश ठेवूं नयेत, इतकाच असावा असें वाटतें. नाहींतर गेलेल्या नवऱ्यास अन्य कोणत्याही प्रकारचा बंध करण्याचें सामर्थ्य बुचड्यांत किंवा वेणींत असण्याचा संभव मुळींच नाहीं.

आतां यावरून विधवेनें केशवपन कां करावें ? व तें न केल्यास तिला कांहीं दोष आहे कीं काय ? आणि केशवपन न केलें तर ती अशुचि होते कीं काय ? हे प्रश्न साहजिक उत्पन्न होतात. तेव्हां त्यांचें येथें विवेचन केलें तर केवळ अप्रासंगिक होणार नाहीं ह्मणून लिहितों.

केश हे स्त्रियांच्या सर्व सौंदर्याला शोभा देणारे आहेत. किंबहुना ते नसतील तर कितीही रूपवती असली तरी सुंदर दिसणारच नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. तेव्हां ते केश असले तर साहजिक वेणीफणी अलंकारादि धारण होईल; व तसें झालें तर ती सुंदर दिसून पुरुषाच्या मनांत भरेल, आणि तोही तिच्याविषयीं आसक्त होईल व तिच्याही मनांत "एकापुढें एक" याप्रमाणें कामवासना उत्पन्न होतील; ह्मणून भावी प्रसंग न यावा एतदर्थ तिला विरूप करावी; ह्मणजे तो प्रसंग येणार नाहीं असें जाणून शास्त्रकर्त्यांनें—'विधवेनें वपन करावें,' असें सांगितलें आहे. यावांचून अन्य कांहीं कारण असेल असें वाटत नाहीं. असें जर असेल तर या वचनावरून परपुरुषसंग करण्याची जिला इच्छा नसेल तिनें केश राखले तरी कामास येईल; हें अर्थात् सिद्ध होतें. आणि जिला कामवासना असेल तिनें वपन केलें तरी वासना पूर्ण होण्यास कांहीं प्रतिबंध होईल असें दिसत नाहीं. याचीं शेंकडों उदाहरणें वाचकांस स्मरत असतीलच. तेव्हां केशवपन करणें हेंच आवश्यक आहे असें नाहीं; तर—व्रतपरिपालन करणें आवश्यक आहे.

दुसरे वेळ जेवूं नये. त्रिरात्र व पंचरात्र, पक्ष—( पंधरवडा ) व्रत, एक मास उपवासव्रत किंवा चांद्रायण करावें. कृच्छ्र, पराक किंवा तप्तकृच्छ्र, यव भक्षून रहाणें, फळें व शाका भक्षून रहाणें व पयोव्रत ( कांहीं काल नियम करून फक्त दुधावर रहाणें ) इत्यादिकांनीं आपोआप प्राण जाईपर्यंत कसा तरी प्राणांचा निर्वाह करावा. ज्या हेतूस्तव पलंगावर[1] निजणारी विधवा पतीस अधःपात करिते, तस्मात् तिनें नित्य पतीला सुख देण्याच्या इच्छेनें भूमिशयन करावें. विधवेनें कदापि अंगाचें उद्वर्तन (घांसणें माखणें ) करूं नये, व सुगंधिक द्रव्यें आपणच[2] अंगास लावूं नयेत. प्रतिदिनीं भर्त्याचें व सासऱ्याचें दर्भ, तीळ व उदकानें नामगोत्रादि उच्चारपूर्वक तर्पण करावें." हें पुत्रादि नसतील तर, ते असतां तिला करण्याचा अधिकार नाहीं. "पतिबुद्धीनें विष्णूचें पूजन करावें. अन्यथा करूं नये, नित्य विष्णुरूपी दिव्य पतीचें ध्यान करावें. जें जें या लोकीं अति इष्ट वस्तु असेल, व जें पतीस विशेष प्रिय असेल; तें तें पतिप्रियेच्छेनें गुणवान् विप्रास द्यावें. वैशाख, कार्तिक व माघ या ३ मासांत नेहमींहून विशेष नियम आचरावे. स्नान, दान, तीर्थयात्रा व विष्णुनामोच्चार नेहमीं करावा. वैशाख-

---

आतां केशवपन न केलें तरी कांहीं दोष आहे कीं नाहीं याविषयीं विचार केला तर, मूळांत जें वचन घेतलें आहे त्यांत अकरणीं प्रत्यवाय सांगितला नाहीं. व अन्यत्रही उपलब्ध होत नाहीं. उलट न करण्याबद्दल वचनें मिळतात. याविषयीं पृ० २४९ पं० ३४ पहा. आतां याविषयीं शिष्टाचार पाहिला तर, उत्तर हिंदुस्थानांत **गौड** ब्राह्मणांत विधवेचें वपन करीत नाहींत. आणखी—**तेंगले** आणि **वडघले** असे **रामानुज** संप्रदायी ब्राह्मणांत दोन पोटभेद आहेत. त्यांपैकीं तेंगल्यांत विधवेचें वपन मुळींच करीत नाहींत. केरलदेशीय ब्राह्मणांत तर वपन केलेल्या विधवेचें दर्शनच होणार नाहीं. यावरून वपन न केल्यास प्रत्यवाय नाहीं असें ते मानीत असतील; असें दिसतें.

तिसऱ्या प्रश्नाचें उत्तर–विधवा सकेशा असली तर तिला "ओवळी" ह्मणतात. तिच्या हातचा स्वयंपाक दैवपित्र्यकर्मास योग्य नाहीं इतकेंच नाहीं तर,—तिच्या हातचें पाणीसुद्धां उपयोगी पडत नाहीं असें मानतात. याविषयीं धर्मशास्त्रांत कोठें आधार मिळत नाहीं. व वपन केलेल्या विधवेला "सोवळी" ह्मणून तिच्या हातचा स्वयंपाक पवित्र मानतात. त्याविषयीं विचार केला तर—**"रजस्वलां च पाखण्डां पुंश्चलीं पतितां तथा ॥ त्यजेच्छूद्रां तथा वन्ध्यां विधवां चान्यगोत्रजाम्"** ॥ १ ॥ [ नि० सिं० श्रा० प्रकरण पहा ] यावरून विधवा स्वयंपाकाविषयीं निषिद्ध आहे. सांप्रत विधवाकर्तृक पाक अति सोंवळा मानतात याचें कारण कांहीं समजत नाहीं. कदाचित् पूर्वोक्त वचनांतल्या—**'विधवा'** पदानें सकेशीचेंच ग्रहण करीत असतील असें ह्मणावें तर, त्याला कांहीं आधार नाहीं.

१ येथें—'पलंगावर निजूं नये,' असें सांगितलें आहे. याचा हेतु केशवपनासारखाच आहे. कदाचित् पलंगावर निजलें ह्मणून कांहीं अदृष्ट आहे असें वाटत नाहीं.

२ 'विधवेनें स्वतः तेल वगैरे आपल्या अंगास लावूं नये; पण अन्यानें लावलें तर चालेल,' असें यावरून सिद्ध होतें.

मासीं उदकुंभ, कार्तिकांत घृतदीप, माघांत तिळ व द्रव्य दान केल्यास स्वर्गी श्रेष्ठत्व मिळतें; ह्मणून तें अवश्य द्यावें. तसेंच सामर्थ्य असल्यास वैशाखमासीं पाणपोई घालावी. नाहींतर देवावर गळती धरावी. जोडा, विंजणा, छत्री, बारीक वस्त्रें, व चंदन हीं उष्णकालीं श्रेष्ठ विप्रास 'माझा पति तृप्त असो'—ह्मणून द्यावीं. असे अनेक नियम व व्रतें यांहीं विधवेनें—वैशाख, कार्तिक व माघ हे ३ मास घालवावे. तिनें प्राण जाण्याची वेळ आली तरी, बैलावर बसूं नये. चोळी घालूं नये. तांबड्या व शुभ्र वस्त्रावांचून इतर रंगांचीं व चित्रविचित्र वस्त्रें नेसूं नयेत. असी धर्मयुक्त असून, विधवापणींहि पातिव्रत्यास पाळणारी स्त्री पतिलोकीं जाईल. ती कधींही दुःखी होणार नाहीं," असें सांगितलें आहे. विधवेनें यथाकालीं जें पतीचें श्राद्ध करावें त्यांत पिंड ६ च असावे. कारण,—"आपला पति, त्याचा पिता व आजा हे ३, आणि आपला पिता आजा व पणजा हे ३ मिळून ६ यांस उद्देशून आळस न करितां यथाकालीं विधवेनें श्राद्ध करावें," असी **स्मृतिरत्नावलींत वृद्धमनू**क्ति आहे. "अशा व्रतस्थ असणाऱ्या स्त्रियांस पतिसमान लोक व व्यभिचारिणींस कोल्ह्यांचे लोक प्राप्त होतात," असें सांगितलें आहे. **हारीत** ह्मणतो—"जी साध्वी पति मृत झाला असतां निष्ठेनें पातिव्रत्य पाळते; ती सर्व पापापासून मुक्त होऊन पतिलोकीं जाते." **बृहस्पति** ह्मणतो—"व्रतें व उपवास यांविषयीं तत्पर, ब्रह्मचर्यानें वागणारी, इंद्रियनिग्रह व दान व्रतें इत्यादि करणारी विधवा अपुत्रा असली तरी, ती स्वर्गास जाईल." **मनु** ह्मणतो— "पुष्पें, फळें मूळें व उदक हीं सेवन करून यथेच्छ देहनाश करावा; परंतु, पति मेला असतां परपुरुषाचें नांवही घेऊं नये." **मनु** व **यम** ह्मणतात—"आमरणांत—क्षांत, नियमित, व ब्रह्मचारिणी असावें धर्मानेंच उत्तम पति मिळण्याची इच्छा करावी. स्त्रियेस वैराग्य झालें तरी, कोणत्याही श्रुतींत किंवा शास्त्रांत तिला संन्यासाधिकार सांगितला नाहीं. तर—समानवर्ण विवाहित पतीपासून प्रजोत्पादन व तिचें पालन हाच तिचा मुख्य धर्म होय." यावरून प्रजोत्पादन हें स्त्रीसच मुख्य आहे असें सिद्ध होतें. तसेंच, कित्येक वचनांवरून पुरुषांसही विहित आहे. अतएव प्रजोत्पादन हा धर्म त्यांला मुख्य कां नसावा? असी शंका येईल, तर ह्मणतो कीं,-"ऊर्ध्वरेते नैमिषारण्यवासी ८८,००० ऋषि संततीवांचून स्वर्गास गेले, मग इतर कां न जातील." यावरून विरक्तांस संततीचें आवश्यकत्व नाहीं. कदाचित् स्त्रीस संतति नसली तर—"भर्ता मेल्यावर ब्रह्मचर्यानें वागून व्रतपालन केल्यास, जसे ते ८८,००० ऋषि स्वर्गी गेले तसी हीही जाईल.[१]" **स्कंदपुराणांत**—"भर्त्यास किंवा पुत्रास विचारल्यावांचून स्त्रीनें कांहींच कृत्य करूं नये," असें सांगितलें आहे.

## ॥ अथ शूद्रसमानधर्माः ॥

**तथा कुंडगोलकावपि शूद्रसमौ । तथाच स्मृतिकौमुद्यां देवलः ॥ द्वितीयेन तु यः**

१ "**नापुत्रस्य लोकोस्ति**—ज्याला पुत्र नाहीं त्याला परलोक नाहीं." इत्यादि वचनांवरून पुरुषांलाही संतति असण्याची आवश्यकता आहे.

पित्रा सवर्णायां प्रजायते ॥ सवर्णोद् इति ज्ञेयः शूद्रधर्मा च जातितः ॥ १ ॥ व्रतहीनास्त्वसंस्कार्याः सवर्णास्वपि ये सुताः ॥ उत्पादिताः सवर्णेन व्रात्या इति बहिष्कृताः ॥ २ ॥ इति । तत्रैवाह मनुः ॥ परदारेषु जायेते द्वौ सुतौ कुंडगोलकौ ॥ अमृते जारजः कुंडो मृते भर्तरि गोलकः ॥ १ ॥ ननु कुंडगोलकयोरब्राह्मणत्वे कथं श्राद्धे निषेधः । स हि ब्राह्मणः श्राद्धसंपदे इत्युक्तेर्ब्राह्मणमात्रप्राप्तौ तेषां मध्ये केषांचिन्निषेधार्थः । यदाह याज्ञवल्क्यः ॥ रोगी हीनातिरिक्तांगः काणः पौनर्भवस्तथा ॥ अवकीर्णी कुंडगोलौ कुनखी श्यावदंतकः ॥ १ ॥ इति । तयोश्चाब्राह्मण्ये प्राप्त्यभावान्निषेधो व्यर्थः । तथा स्मृत्यर्थसारे ब्राह्मे च तयोः संस्कार्यत्वमुक्तम् ॥ केचिदाहुर्द्विजैर्जातौ संस्कार्यौ कुंडगोलकाविति । तदपि न युज्यते इति । उच्यते । ब्राह्मण्यां ब्राह्मणाज्जातो ब्राह्मण इति भ्रमप्राप्तस्य श्राद्धे निषेध इति विज्ञानेश्वरः । कुंडगोलकयोः संस्कार्यत्वं श्राद्धे निषेधश्च क्षेत्रजपरः । शास्त्रानुज्ञानात् । अन्यस्याब्राह्मणत्वेन प्राप्त्यभावादुपाधेयसंकरेऽप्युपाधेरसंकरादित्यपरार्कः । कल्पतरौ कात्यायनः ॥ सुखार्थं या प्रवृत्ता स्त्री न भर्तुः सुतकाम्यया ॥ पुत्रं तु जनयेदेवं निंद्या पापा च सा स्मृता ॥ १ ॥ भर्तृगोत्रं समुत्सृज्य नारी यद्यन्यमाश्रयेत् ॥ निंद्यैव सा स्मृता लोके परपूर्वेति चोच्यते ॥२॥ परपूर्वा तु यत्र स्यात्तत्र स्यात्राश्रितः प्रभुः ॥ क्रयाद्दत्ते तु धर्मार्थं लब्ध्वा वा स्वामिनो भवेत् ॥ ३ ॥ विरोद्धव्या च ताड्या च परपूर्वापराधतः ॥ चौरहस्तान्नदीवेगाद्दुर्भिक्षाद्देशविप्लवात् ॥५॥ विनिर्मीर्य सकांताराल्लब्धा त्यक्ता क्रमागता ॥ आसां भोगे न दोषः स्यादिति शास्त्रविनिश्चयः ॥ ६ ॥ स्वामिदत्ता तु गृह्णीयाद्देया चेन्न त्वतोऽन्यथा ॥ दीयमानमथात्मानं या नारी नानुमोदते ॥ ७ ॥ न सा देया न च ग्राह्या विधिरेप स्मृतो बुधैः ॥ नचोत्तमां न चाकामां तथा पुत्रवतीं न च ॥ ८ ॥ ईदृशीं त्वनुरूपेण निष्क्रयेण प्रमीलयेत् ॥ यमः ॥ जारजातः सवर्णायां कुंडो जीवति भर्तरि ॥ मृते तु गोलको नाम जातिहीनौ च तौ स्मृतौ ॥ १ ॥ असवर्णासु नारीषु द्विजैरुत्पादिताश्च ये ॥ परपत्नीषु सर्वासु कुंडास्ते गोलकाः स्मृताः ॥ २ ॥ मातृवर्णा न ते प्रोक्ताः पितृवर्णा न च स्मृताः ॥ अविवाह्याः सुताश्चैषां बंधुभिः पितृमातृतः ॥ ३ ॥ सएव ॥ कृच्छ्रं सांतपनं कुर्याद्धत्वा संकीर्णयोनिजं ॥ सूतं हत्वाऽतिकृच्छ्रं तु कुंडं गोलकमेव च ॥ ४ ॥ मनुः ॥ जातो नार्यामनार्यायामार्यादार्यो भवेद्गुणैः ॥ जातोऽप्यनार्यादार्यायामनार्य इति निश्चयः ॥ १ ॥ नीचायामुत्तमजौ संस्कार्यौ । उत्तमायां नीचजौ नेत्यर्थः । स्मृतिकौमुद्यामादित्यपुराणे ॥ सवर्णासु सवर्णैस्तु ये जायंते परैरपि ॥ अवरोटकसंज्ञास्ते[1] व्रतसंस्कारवर्जिताः ॥ १ ॥ विप्रायां विप्रजा उपनेया नान्ये इति तत्रैवोक्तं । चतुर्णामपि वर्णानां जीवतामन्यसंभवः ॥ कुंडस्तु संकरो ज्ञेयो मृतानामथ गोलकः ॥ १ ॥ जातिहीनः स मातृणां ग्राहयेत्कर्मनामनी ॥ तदीयं कर्म नाम च तन्मातृणामित्यर्थः । योज्यो देवपुरे राज्ञा वर्णसंकरभीरुणा ॥ २ ॥ देवपुरे देवद्वारे । कुंडो वा गोलको विप्रः संध्योपासनमात्रवित् । स्नानभोजनसंध्यासु देवेषु स पठेच्च तत् ॥ ६ ॥ विप्र इत्युक्तेस्तस्यैव संध्योपनयनं च ।

---

१ पुस्तकांतरे अवावटकेति पाठः ॥

**मिताक्षरायामपि कुंडगोलकौ यथार्ह संस्कार्यावित्युक्तं । स्मृत्यर्थसारे प्रयोगपारिजाते ब्राह्मे च ॥ एवमेव द्विजैर्जातौ संस्कार्यौ कुंडगोलकाविति । स्नानेति स्नानादिसमये बंदिवद्वाक्यं पठेदित्यर्थः ॥ इति कुंडगोलकौ ॥**

आतां शूद्रसमानांचे धर्म सांगतो.

जशा स्त्रिया शूद्रसम तसेच कुंडगोलकही शूद्रसम होत. त्यांविषयीं **स्मृतिकौमुदीं**त **देवल** ह्मणतो—"दुसऱ्या बापापासून सवर्ण स्त्रीचे ठायीं उत्पन्न होतो; तो जातीनें सवर्णोदर व शूद्रधर्मा असें जाणावें. सवर्ण स्त्रीचे ठायीं विवाहित असल्यावांचून अन्य सवर्ण पुरुषानें उत्पन्न केलेले पुत्र अर्थात् कुंड व गोलक, ते संस्कारास योग्य नाहींत, व त्यांस वेदव्रताधिकार नाहीं. ते सर्वधर्मबहिष्कृत अतएव व्रात्य होत." तेथेंच **मनु** ह्मणतो—"परस्त्रीचे ठायीं तिचा पति जीवंत असतां जारापासून झालेल्यांस कुंड व पति मेल्यावर जारोत्पन्नांस गोलक नांवाचे हे २ प्रकारचे पुत्र होतात." यावर शंका करितात कीं,—कुंड व गोलकांस, जर विप्रत्व नाहीं तर, त्यांचा श्राद्धप्रकरणांत निषेध कां? कारण, ज्यांस मुळींच ब्राह्मण्य नाहीं अशा शूद्रादिकांचा तेथें निषेध नाहीं. यावरून त्यांस ब्राह्मणत्व असावें असें सिद्ध होतें आणि तो निषेध—"ब्राह्मण हा श्राद्धसंपत्तीस कारण आहे." असी उक्ति आहे ह्मणून, ब्राह्मणमात्राची प्राप्ति असतां, त्यांत कित्येकांचा निषेध व्हावा ह्मणून आहे. उदाहरणार्थ **याज्ञवल्क्याचें** वचन घेऊं, तो ह्मणतो कीं,—"रोगी, कमी किंवा अधिक अंगाचा, पुनर्विवाहित स्त्रीचा पुत्र, व्रतभ्रष्ट, कुंड, गोलक, किडक्या नखांचा, आणि धुरकट दांतांचा हे ब्राह्मण श्राद्धांत निषिद्ध आहेत." यावरून पूर्वोक्त रोगी व हीनांगादिकांस ब्राह्मण्य असतांहीं ते दूषित असल्यावरून निषिद्ध केले आहेत, तसेच कुंडगोलकही असावे. असें असतां पूर्वोक्त **देवल**-वचनाप्रमाणें त्यांस ब्राह्मण्यच नसेल तर, श्राद्धभोजनप्राप्तिच नाहीं ह्मणून त्यांचा निषेधच व्यर्थ आहे. तसेंच **स्मृत्यर्थसारां**त व **ब्रह्मपुराणां**त कुंडगोलकांस संस्कारयोग्यत्व आहे. असें सांगितलें आहे. तें—"कित्येक धर्मज्ञ—समानवर्ण द्विजोत्पन्न कुंडगोलकांस संस्कार करावे, असें ह्मणतात." हें वचनही अयोग्य होईल. याचें समाधान सांगतो—"ब्राह्मणीचे ठायीं ब्राह्मणापासून झालेला तो ब्राह्मण. या लक्षणाच्या भ्रांतीनें कुंडगोलकांस प्राप्त झालेल्या ब्राह्मण्याचा श्राद्धांत निषेध केला आहे," असें **विज्ञानेश्वर** ह्मणतो. "कुंडगोलकांचें संस्कारयोग्यत्व व जो श्राद्धांत निषेध आहे; तो क्षेत्रजपुत्रपर आहे; कारण, तशा पुत्राविषयीं शास्त्राची आज्ञा आहे ह्मणून. इतरांस (कुंडगोलकांस) ब्राह्मणभिन्नत्व असल्यामुळें श्राद्धप्राप्तीच्या अभावास्तव उपाधेयाचा संस्कार असला तरी, उपाधीचा संकर होत नाहीं ह्मणून" असें **अपरार्क** ह्मणतो. **कल्पतरूं**त **कात्यायन** ह्मणतो—"जी पतीस पुत्र होण्याची इच्छा न धरितां केवळ रतिसुखार्थ परपुरुषसंग करून, पुत्र उत्पन्न करिते; ती निंद्य व पापिणी होय. जर स्त्री

१ येथें—'**सवर्णोदर**' असें असावेसें दिसतें; आह्मी पाहिलेल्या सर्व पुस्तकांत '**सवर्णोद**' असेंच आहे. याचा सुज्ञ वाचकांनीं विचार करावा.

पतीचें गोत्र सोडून अन्याचा आश्रय करील, तर ती लोकांत निंद्यच होय. तिला परपूर्वा असें ह्मणतात. व ती परपूर्वा जेथें असेल, तेथें तिला आश्रय देणारा पुरुष तिचा मालक होत नाहीं. जरी पतीपासून विकत घेतल्यावांचून धर्मार्थ अथवा अन्य कोणत्याही रीतीनें अन्य पुरुषाला स्त्री मिळाली तरी, तिच्यावर तिच्या नवऱ्याची सत्ता आहे. परपूर्वा स्त्रीनें अपराध केल्यास तिला कोंडावी, किंवा मारावी. चोरापासून सोडवून घेतलेली, नदींत बुडत असतां तारलेली, नदीच्या ओघांत सांपडून मिळालेली, दुर्भिक्षांत अन्न देऊन जिचे प्राण वांचविले असतील ती, व देशाचें अरिष्ट आणि भयंकर अरण्यांत अडचणींत अकस्मात् मिळालेली, आणखी नवऱ्यानें टाकलेली, क्रमानें प्राप्त झालेली, ह्यांचा त्या संकटापासून मुक्त करणाऱ्यानें उपभोग केला असतां त्याला दोष नाहीं. असा शास्त्राचा नियम आहे. जर देण्यास योग्य असलेली स्त्री तिच्या पतीनें दिली असेल तर, ती घेणारानें भोगिल्यास त्याला दोष नाहीं.[1] तसें नसल्यास परस्त्री भोगूं नये. पति देण्यास सिद्ध असून, ती कबूल नसेल तर तिला पतीनें देऊं नये, व घेणारानें घेऊं नये, असा ज्ञात्यांनीं विधि केला आहे. जी आपल्याहून उत्तम वर्णाची नसून निरिच्छ ह्मणजे आपल्याकडे येण्यास नाकबूल नसेल, व पुत्रवती नसेल अशी स्त्री तिच्या किंमतीला योग्य द्रव्य देऊन मिळवावी." **यम** ह्मणतो—"सवर्ण स्त्रीचेठायीं तिचा पति जीवंत असतां अन्यापासून कुंड, व पति मेल्यावर गोलक नामक पुत्र होतात, ते जातिहीन होत. जे असवर्ण स्त्रीचेठायीं व सर्व अन्य स्त्रियांचेठायीं द्विजांनीं उत्पादित पुत्र त्यांसही कुंड व गोलक ह्मणावें. ते मातापितरांच्या वर्णांतील नव्हेत. यांच्या आईबापांच्या गोत्रसंबंधानें संबंधिकांनीं मुली करूं नयेत, व आपल्या त्यांस देऊं नयेत." आणखी तोच ह्मणतो—"कोणी संकीर्णयोनींत उत्पन्न झालेल्या पुरुषास मारला असेल तर त्यानें दोषपरिहारार्थ कृच्छ्र किंवा सांतपन प्रायश्चित्त करावें. तसेंच सूत, कुंड व गोलक यांस मारल्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करावें." **मनु** ह्मणतो—"अनार्य—( अधम अथवा नीच ) स्त्रीचेठायीं आर्यापासून ( श्रेष्ठवर्णापासून ) पुत्र झाल्यास, बीजाच्या उत्तमत्वास्तव तो श्रेष्ठ गुणवान् होतो. परंतु उत्तमवर्ण स्त्रीचेठायीं अधमवर्णापासून झाल्यास, तो बीजाच्या नीचत्वास्तव अधम होतो, असा शास्त्राचा निश्चय आहे." अर्थात् नीच स्त्रीचेठायीं उत्तमापासून झालेले पुत्र संस्कार करण्यास योग्य आहेत परंतु, उत्तमस्त्रीचेठायीं नीचापासून झालेले संस्कारास योग्य नाहींत असें सिद्ध होतें. **स्मृतिकौमुदींत आदित्यपुराणांत**,—"सवर्ण स्त्रीचेठायीं सवर्ण परपुरुषापासून जे होतात, त्यांस अवरोटक ( अवावटक ) ह्मणतात. ते व्रतें, संस्कार इत्यादिवर्जित आहेत." तसेंच "विप्रापासून, विप्रस्त्रीचेठायीं झालेले पुत्र संस्कारास योग्य

१ यावरून पूर्वकालीं दुसऱ्याची स्त्री तिच्या नवऱ्यापासून विकत घेत असत, व तसें केलें असतां तें धर्मविरुद्ध मानीत नसत, हें उघड सिद्ध होतें. आणि याप्रमाणें विकत घेतलेल्या स्त्रीला गुलामासारखी बाळगीत असत. हें पृ० २५४ ओ० ३० यांत सांगितलेल्या वचनावरून सिद्ध होतें.

आहेत, अन्य नाहींत," असें तेथेंच सांगितलें आहे. तें—"४ हि वर्णांत पति जीवंत असतां अन्यापासून झालेल्यांस—कुंड व पति मेल्यानंतर अन्यापासून झालेल्यांस गोलक असें ह्मणावें. हे जातिभ्रष्ट होत. यांस कर्म व नामें मातेचीं प्राप्त व्हावीं (अमकीचा मुलगा ह्मणावें). यांस वर्णसंकराची भीति बाळगणाऱ्या राजांनीं देवपूजा, व देवळांतील झाडलोट वगैरे करण्यास लावावें. त्यांस नित्यकर्मांपैकीं संध्योपासन मात्र विहित आहे. स्नान, भोजन, संध्या व देवपूजा यांत याच मंत्राचा पाठ करावा," असें सांगितलें आहे. येथें 'विप्र' असें ह्मटलें आहे ह्मणून. पूर्वोक्त प्रकारें ब्राह्मणापासून झालेल्या कुंडगोलकांसच संध्या व उपनयन विहित आहे, इतरांस नाहीं. **मिताक्षरें**तही—"कुंड व गोलक यथार्ह संस्कारास योग्य आहेत," असें सांगितलें आहे. तसेंच **स्मृत्यर्थसार** व **प्रयोगपारिजातां**त **ब्रह्मपुराणां**त—"असेच द्विजोत्पन्न कुंडगोलक संस्कारास योग्य आहेत," असें सांगितलें आहे. वरील **आदित्यपुराणव**चनांत—'स्नान' शब्द आहे. यावरून राजादिकांच्या स्नानकालीं यांनीं बंदिजनासारखें राजस्तवन करावें असा अभिप्राय. **इति कुंडगोलकविचारः ॥**

## ॥ अथ क्लीबधर्माः ॥

तथा द्विजोत्पन्न पंढोऽपि शूद्रसमः । वसंते ब्राह्मणमुपनयीतेत्युपनयनविधौ चमसाध्वर्युवदुपादेयत्वेन विवक्षितपुंस्त्वात्स्त्रीणामिव तस्याप्युपनयनाभावात् । अष्टवर्षवाक्ये उद्देश्यत्वेऽपि प्राप्तानुवादेन पुंस एवानुवादात् । मिताक्षरायां देवलोऽपि ॥ पंढको हीनलिंगः स्यात्संस्कारार्हश्च नैव स इति । अतएव तत्रैव वृद्धमनुः ॥ पंढं तु ब्राह्मणं हत्वा शूद्रहत्याव्रतं चरेदिति । बौधायनसूत्रे स्मृत्यर्थसारे च वचनादुपनयनमुक्तं । प्रयोगपारिजाते ब्राह्मेऽपि ॥ ब्राह्मण्यां ब्राह्मणाज्जातो ब्राह्मणः स इति श्रुतिः । तस्माच्च पंढबधिरकुब्जवामनपंगुषु ॥ इत्याद्युक्त्वा । ध्वस्तपुंस्त्वेषु चैतेषु संस्काराः स्युर्यथोचितमिति । एतच्चोक्तं प्राक् । स च सप्तविधः । तथा च गौडधृतदेवलः ॥ पंढको वातजः पंढः पंडः क्लीबो नपुंसकम् ॥ कीलकश्चेति सप्तैव क्लीबभेदो व्यवस्थितः ॥ १ ॥ एषां स्वरूपमाह स एव ॥ तेषां स्त्रीतुल्यवाक्चेष्टः स्त्रीतुल्यः पंढको भवेत् ॥ उन्नतकुचककूर्पहीनत्वादिधर्मक इत्यर्थः । पुमान्कृत्वा सलिंगानि पश्चाच्छिद्यात्तथैव च ॥ स्त्री च पुंभावमास्थाय पुरुषाचारवद्गुणः ॥ २ ॥ वातको नाम पंढः स्यात्स्त्रीपंढो वापि नामतः ॥ लिंगानि स्त्रीपुंनपुंसकानि बिभ्यात् त्यजेत् । कदाचित् स्त्री कदाचित्पुमान् कदाचित् पंढ इत्यर्थः । स्त्री च पुरुषवत्स्वयंतरं भुंक्ते शुक्रोत्सर्गं विनैव वातवशादित्यर्थः । असल्लिंगोऽथ पंढः स्यात्पण्डस्तु म्लानमेहनः ॥ अमेध्याशी पुमान् क्लीबो नष्टरेता नपुंसकः ॥ ३ ॥ अमेध्याशी मुखमैथुनात्परशुक्राशी । अयं वैद्यके आसेक्य इत्युक्तः । तदुक्तं सुश्रुते ॥ आसेक्यो नाम भवति दंपत्योरल्पवीर्ययोः ॥ स शुक्रं प्राश्य लभते लिंगोच्छ्रायमसंशयं ॥१॥ स कीलक इति प्रोक्तो यः क्लैब्यादात्मनः स्त्रियं ॥ अन्येन सह संयोज्य पश्चात्तामेव सेवते ॥ ४ ॥ सुश्रुतेत्वन्येऽपि ॥ यः पूतियोनौ जायेत स सौगंधिकसंज्ञकः ॥ स योनिशेफसौगंधमाघ्राय लभते बलं ॥ १ ॥ स्वे गुदे मैथुनाद्यस्तु

स्त्रीषु पुंवत् प्रवर्तते ॥ कुंभीकः स तु विज्ञेय ईर्ष्यकं शृणु चापरं ॥ २ ॥ दृष्ट्वा व्यवायमन्येषां व्यवाये यः प्रवर्तते ॥ ईर्ष्यकः स तु विज्ञेयः पंढकं शृणु पंचमं ॥ ३ ॥ यो भार्यायामृतौ मोहादंगनेव प्रवर्तते ॥ ततः स्त्रीचेष्टिताचारो जायते पंढसंज्ञितः ॥ ४ ॥ माधवीये तु चतुर्दश भेदा उक्ताः । ते तत्रैव ज्ञेयाः । तेषां चोपनयनव्रतचतुष्टयसमावर्तनविवाहवर्जं सर्वे संस्कारास्तूष्णीं भवंति । कुमारं जातमित्यादौ संस्कार्यरूपोद्देश्यगतत्वेन पुंस्त्वस्याविवक्षया स्त्रीणामिव पंढस्यापि प्राप्तेः । तूष्णीमेताः क्रियाः स्त्रीणां विवाहस्तु समंत्रकः ॥ इति याज्ञवल्क्योक्तेः । ते च स्त्रीतुल्यवाक्चेष्टाः स्त्रीधर्माणः प्रकीर्तिताः ॥ इतिवृद्धमनूक्तेश्च । जलाशयागमप्रासाददेवप्रतिष्ठामहादानादिष्वप्येवम् । पाष्टन्यायेन कामश्रुतिगतस्य पुंस्त्वस्योद्देश्यगतत्वेनाविवक्षया स्त्रीणामिवाधिकारात् । एवं सर्वदानेषु । अहिंसादेः साधारण्याच्च । पितुः श्राद्धादौ तु नाधिकारः । यश्चार्थहरः स पिंडदायीत्यापस्तंबेनार्थहरस्यैव पिंडदानोक्तेः पंढस्य च ॥ अनंशौ क्लीबपतितौ पंगुरुन्मत्तको जड इति मन्वाद्यैरर्थहरत्वनिषेधात् । याज्ञवल्क्योऽपि । क्लीबाद्या नोदकं कुर्युस्तेनाव्रात्या विधर्मिण इति पंढाः ॥

आतां क्लीबां—( नपुंसकां ) चे धर्म सांगतो.

जसे कुंडगोलक शूद्रसम, तसेच द्विजोत्पन्न नपुंसकही शूद्रतुल्य आहेत. ह्मणूनच त्यांस उपनयनादि संस्कार नाहींत. कारण,—"वसंत ऋतूंत ब्राह्मणाचें उपनयन करावें." या उपनयनविधींत जसें—"चमसाध्वर्यूस वरावें." या वाक्यांत उपादेयत्वेंकरून, अध्वर्युशब्द पुल्लिंगी असल्यावरून पुंस्त्व विवक्षित आहे; तद्वत् पूर्वोक्त उपनयनविधींत—'ब्राह्मणं' या पुल्लिंगनिर्देशानें पुंस्त्व विवक्षित असल्यामुळें तद्भिन्न स्त्रियांचें जसें होत नाहीं तसेंच नपुंसकांचेंही उपनयन होत नाहीं. तसेंच, "८ वर्षांच्या ब्राह्मणाचें उपनयन करावें." या वाक्यांत उद्देश्यत्व असतांहि प्राप्तानुवादेंकरून पुरुषत्वाचाच अनुवाद केला आहे. व **मिताक्षरें**त **देवल** ह्मणतो कीं,—"नपुंसक व हीनलिंग (हिजडा) हे संस्कारास योग्य नाहींत." ह्मणूनच, त्याच **मिताक्षरें**त **वृद्धमनु** ह्मणतो—"ब्राह्मणापासून झालेला नपुंसक मारल्यास दोषपरिहारार्थ शूद्रहत्येचें प्रायश्चित्त करावें." **बौधायनसूत्रां**त व **स्मृत्यर्थसारां**त—"त्यांस, उपनयनविधायक वचन आहे ह्मणून, तें करावें," असें सांगितलें आहे. **प्रयोगपारिजातां**त **ब्राह्मपुराणां**त—"ब्राह्मणीचेटायीं ब्राह्मणापासून झालेल्यास ब्राह्मण ह्मणावें अशी श्रुति आहे. ह्मणून—नपुंसक, बहिरा, कुबडा, गिड्डा, पांगळा," इत्यादि सांगून,—"पूर्वीं पुरुषत्व असून कालांतरीं तें नष्ट झालेला, या सर्वांस यथायोग्य संस्कार होतात," असें सांगितलें आहे; हें आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे. असे नपुंसक किती प्रकारचे आहेत याविषयीं **गौडां**नीं घेत-

१ हें वचन येथें घेण्याचें मुख्य कारण असें आहे कीं,—**वृद्धमनू**ही—'नपुंसकांस ब्राह्मण्य नाहीं हेंच सांगतो; कारण, तसें नसतें तर—नपुंसक ब्राह्मणास मारलें असतां दोषपरिहारार्थ ब्रह्महत्येचें प्रायश्चित्त सांगण्याचें टाकून, शूद्रहत्येचें प्रायश्चित्त सांगणार नव्हता.' हें स्पष्ट करून दाखवावयाचें.

लेलें **देवल**वचन असें आहे कीं—"षंढक, वातज षंढ, पंडं, क्लीब, नपुंसक आणि कीलक असे नपुंसकाचे ७ भेद आहेत." यांचीं निरनिराळीं लक्षणें तोच सांगतो—"या ७ नपुंसकांत स्त्रीसारखें भाषण व चेष्टा करणारा स्त्रीच्या आकाराचा ह्मणजे—स्तन उंच असून कोंपराचें अग्र न दिसणें, उरावर केश नसणें इ० स्त्रीलक्षणाच्या नपुंसकास षंढक ह्मणावें १, जो स्त्री, पुरुष आणि नपुंसक लिंगाचा त्याग करील; ह्मणजे कधीं स्त्री, कधीं पुरुष व कधीं नपुंसक होईल व जशी स्त्री पुरुषत्व स्वीकारून रेतत्यागावांचून वायुसामर्थ्यानें दुसऱ्या स्त्रीस भोगते तसें करणारा, त्यास वातज, वातक किंवा स्त्रीषंढ असें ह्मणावें २, असलिंग ह्मणजे मुळींच ज्यास इंद्रिय नाहीं तो पंढ ३, व निर्जीव इंद्रियाचा तो पंड ४, मुखमैथुन करून घेऊन परवीर्य भक्षणारा तो क्लीब ५, ज्याचें रेत नष्ट झालें असेल व ज्यास इंद्रिय असून वीर्य नाहीं तो नपुंसक ६." पूर्वोक्त क्लीबास वैद्यशास्त्रांत आसेक्य असें ह्मटलें आहे. त्याविषयीं **सुश्रुत**नामक वैद्यग्रंथांत असें सांगितलें आहे कीं—"अल्पवीर्य स्त्रीपुरुषांपासून, आसेक्यनामक नपुंसक होतो. त्यास रेतप्राशनानें निःसंशय इंद्रियचेतना होते." "जो नपुंसकत्वास्तव स्वस्त्रीशीं दुसऱ्याचा संयोग करून नंतर तिचा उपभोग करितो त्यास कीलक असें ह्मणतात ७," असें आहे. **सुश्रुतां**त तर, नपुंसकाचे अन्यहि कित्येक भेद सांगितले आहेत. ते—"जो दुर्गंधियुक्त योनींत उत्पन्न होतो, त्यास सौगंधिक ह्मणतात, व तो स्त्रीसंभोगकालीं तिच्या योनीचा वास घेऊन बलाढ्य होतो २, जो पूर्वी आपल्या पश्चिमद्वारांत अन्य पुरुषाकडून मैथुन करवून, मग स्त्रीचे ठायीं पुरुषासारखा संभोगास प्रवृत्त होतो, त्यास कुंभिक असें ह्मणतात ३, जो अन्य स्त्रीपुरुषांचें मैथुन पाहून, ईर्ष्येनें आपण तसें करण्यास प्रवृत्त होतो त्यास ईर्ष्यक ह्मणतात ४, जो मोहानें ऋतुकालीं स्त्रीचे ठायीं स्त्रीवत् व्यवहार करितो; तो त्यामुळें स्त्रीवत् चेष्टा करणारा असा षंढक नांवाचा होतो ५." असे पूर्वी सांगितलेल्या आसेक्यासह पांच भेद सांगितले आहेत. **पराशरमाधवीयां**त १४ भेद सांगितले आहेत. ते तेथेंच पहावे. अशा नपुंसकांस—उपनयन, महानाम्न्यादि '४' व्रतें, समावर्तन व विवाह यांवांचून सर्व संस्कार वैदिक व पौराणमंत्ररहित, तूष्णीं करावे. कारण,—"उत्पन्न झालेल्या पुत्रास संस्कृत करावा," इत्यादि वाक्यांत संस्कार्यरूप उद्देश्यगतत्वानें पुंस्त्वाच्या अविवक्षेनें स्त्रीसारखी नपुंसकासहि जातकर्मादि संस्काराची प्राप्ति आहे. तसेंच—"ह्या क्रिया स्त्रियांस तूष्णीं व विवाह समंत्रक करावा." अशी **याज्ञवल्क्यो**क्ति आहे. व "ते हे नपुंसक स्त्रियांसारखें भाषण व चेष्टा करणारे अतएव स्त्रीधर्मेंच आहेत," अशी **वृद्धमनू**क्ति आहे ह्मणून. विहिरी इत्यादि जलाशय करणें, आगमोक्त कर्में, देवालय बांधणें, देवस्थापन, तुलादि महादानें, इत्यादिकांविषयीं पूर्ववत् अधिकार आहे. कारण **षष्ठाध्यायस्थ** न्यायानें—"स्वर्ग इच्छिणाऱ्यानें ज्योतिष्टोम यज्ञ करावा." इ० **श्रुतीं**त असलेल्या पुरुषत्वाची उद्देश्यगतत्वेंकरून, विवक्षा नसल्यावरून, स्त्रियांचे परी नपुंसकादिकांसही अधिकार आहे. असाच सर्व दानांविषयीं आहे. अहिंसादि धर्म सर्वांस साधारण आहेत. तरी, पितृश्राद्धादिकांचा तर अधि-

कार नाहीं. कारण, "जो बापाचें द्रव्य घेणारा असेल, त्यानें त्यास पिंड द्यावा," असें **आपस्तंबानें** द्रव्य घेणारासच श्राद्ध करण्याचा अधिकार सांगितला आहे, व नपुंसकास—"नपुंसक व पतित, पांगळा, उन्मत्त, व जड हे पितृद्रव्याचे अधिकारी होत नाहींत.—" इत्यादि वचनांनीं **मन्वादि** धर्मशास्त्रकर्त्यांनीं दायाधिकारित्वाचा निषेध केला आहे. **याज्ञवल्क्य**ही असेंच ह्मणतो कीं,—"नपुंसक, चोर, व्रात्य, धर्मभ्रष्ट यांनीं पित्रादिकांचें उदकदान व पिंडदान इत्यादि करूं नये." **इति षंढादिनिर्णयः ॥**

## ॥ अन्येऽपि शूद्रसमाः ॥

**कल्पतरौ यमेनोक्ताः ॥ प्रव्रज्योपनिवृत्ताश्च वृथाप्रव्रजिताश्च ये ॥ यश्च प्रव्रजिताज्जातः प्रव्रज्यावसितश्च यः ॥ १ ॥ एते शूद्रसधर्माणो मनुना परिकीर्तिताः ॥ याज्ञवल्क्यः ॥ प्रव्रज्यावसितो राज्ञो दास आमरणांतिकः ॥ अन्येऽपि शूद्रसमा याज्ञवल्क्येनोक्ताः ॥ सद्यः पतति मांसेन लाक्षया लवणेन च । मासेन शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात् ॥ १ ॥ अत्र धर्मनिंदामात्रमिति वार्तिके भट्टाचार्याः । द्विजातिकर्महानिपराणीति विज्ञानेश्वरः । अतस्ते शूद्रसमाः ॥**

यानंतर अन्यही शूद्रसमानधर्मे सांगतो.

ते **कल्पतरूंत यमानें** सांगितले आहेत. जसें—"संन्यास करून पुनः विषयी होणारे, वैराग्यावांचून व्यर्थ संन्यासी होणारे, आणखी जो संन्याशापासून उत्पन्न झाला असेल तो, व संन्यासभ्रष्ट हे शूद्रसमानधर्मे असें **मनूनें** सांगितलें आहे." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"संन्यासभ्रष्ट व मरणपर्यंत राजसेवा करणारे हेहि तसेच." अन्यहि कित्येक शूद्रसम **याज्ञवल्क्यानें** सांगितले आहेत. ते—"मांसभक्षणानें, आणि लाख व मीठ यांच्या विक्रयानें ब्राह्मण तत्काल पतित होतो. तसाच, एक मासपर्यंत दूध विक्रय केल्यानें ब्राह्मण शूद्र होतो." "येथें पूर्वोक्त कर्मांची निंदा करण्याकरितां 'शूद्र होतो' असें सांगितलें आहे. परंतु, वास्तविक तो शूद्र होत नाहीं," असें **वार्तिकां**त **'भट्टाचार्य** ह्मणतात. "द्विजांच्या कर्मांचीं नाशक पूर्वोक्त कर्मे आहेत. हेंच सांगण्याकरितां तसें ह्मटलें आहे," असें **विज्ञानेश्वर** ह्मणतो. या हेतूस्तव ते शूद्रसम आहेत.

## ॥ अथ व्रात्याः ॥

**तथा व्रात्या अपि । तथा च मनुः ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या स्वावधेरूर्ध्वमब्दतः ॥ अकृतोपनयाः सर्वे वृषला एव ते स्मृताः ॥ १ ॥ व्रात्यस्तोमं विना । तदाह याज्ञवल्क्यः ॥ आषोडशादाद्वाविंशाच्चतुर्विंशाच्च वत्सरात् ॥ ब्रह्मक्षत्रविशां काल औपनायनिकः परः ॥ १ ॥ अतऊर्ध्वं पतंत्येते सर्वधर्मबहिष्कृताः ॥ सावित्रीपतिता व्रात्या व्रात्यस्तोमादृते क्रतोः । इति व्रात्याः ॥**

आतां व्रात्य सांगतो.

तसेच व्रात्यहि शूद्रसम आहेत. याविषयीं **मनु** ह्मणतो—"ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे स्ववर्णोक्त उपनयन कालावधीपेक्षां १ वर्ष तसेच राहतील तर, त्यांस शूद्र ह्मणावें.

---

१ गर्भधारणापासून अथवा जन्मापासून ८ व्या वर्षी ब्राह्मणाचें, असेंच ११ व्या वर्षी क्षत्रि-

परंतु व्रात्यस्तोम नांवाचा यज्ञ न केला तर." तेंच **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"ब्राह्मणांस १६, क्षत्रियांस २२, व वैश्यांस २४ वर्षपर्यंत उपनयनाचा परमावधिकाल आहे. ह्या कालीं उपनयन न झाल्यास ते धर्मभ्रष्ट सावित्रीपतित व्रात्य होतात; पण व्रात्यस्तोम नांवाचा यज्ञ केला तर ते उपनयनास अधिकारी होतात." **इति व्रात्याः ॥**

## ॥ अथ नियोगः ॥

**कल्पतरौ देवलः ॥ नष्टः प्रव्रजितः क्लीबः पतितो राजकिल्बिषी ॥ लोकांतरगतो वापि परित्याज्यः स्त्रिया पतिः ॥ १ ॥ मृते भर्तरि जीवे वा स्त्री विंदेतापरं पतिं ॥ संतत्यनाशार्थतया न स्वातंत्र्येण योषितः ॥ २ ॥ नारदः ॥ अष्टौ वर्षाण्युदीक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिं ॥ अप्रसूता तु चत्वारि द्वे समे च प्रसूतिका ॥ १ ॥ न शूद्रायाः स्मृतः कालो न च धर्मव्यतिक्रमः ॥ विशेषतो प्रसूतायाः स्त्रियाः संवत्सरा स्थितिः ॥ २ ॥ अप्रवृत्तौ स्मृतः काल एषः शेपितयोषितां ॥ जीवति श्रूयमाणे तु स्यादेष द्विगुणोऽवधिः ॥ ३ ॥ प्रजाप्रवृत्तौ नारीणां वृत्तिरेषा प्रजापतेः ॥ अतोऽन्यगमने स्त्रीणामेष दोषो न विद्यते ॥ ४ ॥ इति नियोगः ॥**

आतां नियोग सांगतो.

याविषयीं **कल्पतरूं**त देवल ह्मणतो—"नष्ट ( परदेशीं गत असून ज्याचा पत्ता लागत नाहीं तो ), संन्यासी झालेला, नपुंसक, पतित, राजाचा अपराधी, आणि परलोकीं गेलेला अशा पतीचा स्त्रियांनीं त्याग करावा. अशा प्रकारचा पति जीवंत किंवा मेला असतां, स्त्रीनें वंशरक्षणार्थ पतीच्या किंवा गुरुजनाच्या आज्ञेनें अन्य पति करावा. स्वतंत्रतेनें मात्र करूं नये." **नारद** ह्मणतो—"सापत्यस्त्रीनें प्रवासास गेलेल्या पतीची ८ वर्षें, व अपत्यरहित स्त्रीनें ४ वर्षें आणि बाळंतिणीनें २ वर्षें वाट पहावी. शूद्रस्त्रियेस कालावधि नाहीं. तिनें अन्य पति केल्यास धर्मातिक्रम होत नाहीं. विशेषतः प्रसूत झालेल्या शूद्रीनें १ वर्ष वाट पहावी. हा प्रतीक्षाकाल पतीचा कांहींच समाचार कळत नसल्यास. कळत असेल तर किंवा निदान तो जीवंत आहे असेंहि समजल्यास पूर्वोक्ताच्या दुप्पट, ( १६।८ वर्षें ) वाट पहावी. प्रजापतीनें संततिवृद्ध्यर्थ स्त्रियांस हा धर्म सांगितला आहे. याकरितां अन्य पुरुषसंगाचा त्यांस दोष नाहीं. **इति नियोगविधिः ॥**

## ॥ अथ शूद्रसमान्वक्तुं संकरजा उच्यंते ॥

**याज्ञवल्क्यः ॥ विप्रान्मूर्धावसिक्तो हि क्षत्रियायां विशः स्त्रियां ॥ अंबष्ठः शूद्र्यां,**

---

यानें आणि १२ व्या वर्षी वैश्याचें उपनयन करावें. हा त्याचा मुख्य काल होय. याविषयीं **आश्वलायन**गृह्यसूत्र अ० १ कं० १९ पहा.

१ 'सावित्रीपतित' ह्मणजे गायत्रीमंत्राचा अधिकार नसलेले, असा याचा अर्थ होतो. **विज्ञानेश्वरानें** असाच केला आहे; परंतु **आश्वलायन**गृह्यसूत्रवृत्तिकर्ता **गार्ग्यनारायण** यानें—"सावित्रीपतित ही एक संज्ञा त्यांस प्राप्त होते," असें ह्मटलें आहे. याविषयीं अ० १ कं० १९ सू० ६ यावरची वृत्ति पहा. या प्रकारच्या पतितसावित्रीकानें—'उद्दालकव्रत आचरण करावें, ह्मणजे त्यास उपनयनाधिकार प्राप्त होतो' असेंही तेथेंच सांगितलें आहे.

निषादो जातः पारसवोऽपि वा ॥ १ ॥ वैश्याशूद्र्योस्तु राजन्यान्माहिष्योग्रौ सुतौ स्मृतौ ॥ वैश्यात्तु करणः शूद्र्यां विन्नास्वेष विधिः स्मृतः ॥ २ ॥ एवं मूर्धावसिक्तांबष्ठपारसवमाहिष्योग्रकरणाः षडनुलोमाः । मातृजात्युक्तकर्मभाजश्च ॥ एते हीनवर्णासु जाताः । एतासु चोत्कृष्टजा अनुलोमाः । नीचजाः प्रतिलोमाः । मनुः ॥ ब्राह्मणादुग्रकन्यायामावृतोनाम जायते ॥ शूद्रायां क्षत्रजा उग्राः । याज्ञवल्क्यः ॥ माहिष्येण करण्यां तु रथकारः प्रजायते ॥ क्षत्राद्वैश्यायां माहिष्यः । वैश्याच्छूद्रायां करणी तस्यां रथकारः । एषां वृत्तिराह स्मृतिकौमुद्यां वसिष्ठः ॥ मूर्धावसिक्तानां हस्त्यश्वरथशस्त्रशिक्षास्त्रधारणं च । मणिमंत्रौषधैः प्राणिरक्षणमंबष्ठानां । माहिष्याणां गीतनृत्यनक्षत्रैर्जीवनं सस्यरक्षा च । पारसवोग्रकरणानां द्विजशुश्रूषा धनाध्यक्षता राजसेवा दुर्गांतःपुररक्षा च । रथकारस्य निधिज्ञानं हस्त्यश्वसारथ्यवर्धनपोषप्रदमनादि । शंखः ॥ क्षत्रियवैश्यानुलोमानंतरोत्पन्नजो रथकारस्तस्याध्ययनेज्यादानोपनयनसंस्काराश्चाप्रतिषिद्धाः । रथसूत्रवास्तुविद्याध्ययनवृत्तिता चेति । जातिविवेके ॥ शूद्रां शयनमारोप्य ब्राह्मणश्चेत्कथंचन ॥ जनयेद् ग्राम्यधर्मेण तस्यां पारसवं सुतम् ॥ १ ॥ महाशूद्रः स विख्यातः शूद्रेभ्यः किंचिदुत्तमः ॥ स्वर्णकारस्य तस्येह स्नानं धौत्रं पवित्रकं ॥ २ ॥ सर्वं शूद्रस्य धर्मेण वर्तनं तस्य जीविका ॥ तथा ॥ कूटस्वर्णव्यवहारी विमांसस्य च विक्रयी ॥ राज्ञा विप्रस्तु कर्तव्यो दाप्यश्चोत्तमसाहसं ॥ १ ॥ उशनाः ॥ क्षत्रियाविप्रसंयोगाज्जातो मूर्धावसिक्तकः ॥ राजन्यः क्षत्रधर्मेभ्योऽभ्यधिकः संप्रकीर्तितः ॥ २ ॥ आथर्वणक्रियां कुर्वन्नित्यनैमित्तिकीं क्रियाम् ॥ अश्वं रथं हस्तिनं वा वाहयेद्वै नृपाज्ञया ॥ ३ ॥ सेनापत्यं च भैषज्यं कुर्याज्जीवेच्च वृत्तिषु ॥ आयुर्वेदमथाष्टांगं तन्त्रोक्तं धर्मतश्चरेत् ॥ ४ ॥ ज्योतिषं गणितं वापि कायिकीं वृत्तिमाचरेत् ॥ वैश्यायां विधिना विप्राज्जातो ह्यंबष्ठ उच्यते ॥ ५ ॥ कृष्याजीवो भवेत्तस्य तथैवाग्ने प्रनर्तकः ॥ अन्येभ्यो वैश्यजातिभ्यः षट्कर्मादधिकं स्मृतम् ॥ षट्कर्माण्यपि तस्यैव कर्मत्रितयमेव च ॥ नरवाजिगआदीनां चिकित्सा तस्य जीविका ॥ १ ॥ वाग्भट्टः ॥ सप्त वा पंच वा तिस्रो यो न वेत्ति हि संहिताः ॥ राज्ञा तस्य कुवैद्यस्य छेत्तव्यो दक्षिणः करः ॥ १ ॥ मनुः ॥ प्रायश्चित्तं चिकित्सां च ज्योतिषं धर्मनिर्णयम् ॥ विना शास्त्रेण यो ब्रूयात्तमाहुर्ब्रह्मघातकम् ॥ १ ॥ अयं शस्त्रवैद्यः । वैश्यायां क्षत्रियाज्जातो माहिष्यस्त्वनुलोमजः ॥ २ ॥ अष्टाधिकारनिरतश्चतुःषष्ट्यंगकोविदः ॥ व्रतबंधादिकास्तस्य क्रियाः स्युः सकला विशः ॥ ३ ॥ ज्योतिषं शाकुनं शास्त्रं स्वरशास्त्रं च जीविका [ स्कं० पु० स० अ० २७ ] ॥ विश्वंभरशास्त्रे ॥ शूद्र्यां क्षत्रादुग्रजातिर्युद्धशस्त्रादिजीविका ॥ शस्त्रास्त्रन्यासकुशलः संग्रामकुशलो भवेत् ॥ १ ॥ तया वृत्त्या ह्यजीवन् वै शूद्रधर्मांश्च पालयेत् ॥ अयं रजपूत इति प्रसिद्धः । शूद्रधर्मा च । शूद्र्यां जातस्तु वैश्याद्वै करणो लिपिलेखकृत् ॥ याज्ञवल्क्यः ॥ जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः सप्तमे पंचमेऽपि वा ॥ व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्चाधरोत्तरं ॥ १ ॥ जात्युत्कर्ष उत्कृष्टजातिप्राप्तिः सप्तमे । अपिशब्दात्षष्ठे । पंचमे वा ज्ञेयः । अयमर्थः । विप्रोढा शूद्रा कन्यां सूते । सापि तदूढान्यामिति सप्तमं विप्रं

सूते । एवं विप्रोढवैश्याजन्या कन्यां षष्ठं विप्रम् । विप्रोढक्षत्रियाजन्या पंचमं । क्षत्रियाच्छूद्रोत्पन्ना षष्ठं क्षत्रियं । वैश्यजा पंचमं वैश्यमिति पूर्वार्धार्थः । एवं विप्रस्य क्षात्रवृत्त्याऽपत्यपरंपरया जीवने पंचमः क्षत्रियः । वैश्यवृत्तौ जीवने षष्ठो वैश्यः । शूद्रवृत्तौ सप्तमः शूद्रः । क्षत्रस्य वैश्यवृत्तौ पंचमो वैश्यः । शूद्रवृत्तौ षष्ठः शूद्रः ॥ वैश्यस्य शूद्रवृत्तौ पंचमः शूद्र इति ॥

यानंतर शूद्रसम सांगण्याकरितां संकरजातीय सांगतो.

**याज्ञवल्क्य** ह्मणतो—"ब्राह्मणापासून, अविवाहित क्षत्रियस्त्रीचेठायीं झालेला मूर्धावसिक्त व वैश्यस्त्रीचेठायीं झालेला अंबष्ठ, शूद्रीचेठायीं झालेला निषाद अथवा पारसव या नांवांचे पुत्र होतात. वैश्य व शूद्रस्त्रियांचेठायीं क्षत्रियापासून झालेल्यांस अनुक्रमें माहिष्य व उग्र अशा संज्ञा आहेत. वैश्यापासून शूद्रीचेठायीं झालेल्यास करण ह्मणतात. हा विधि विवाहितभिन्नांपासून झालेल्यांस लागू आहे." असेंच—मूर्धावसिक्त, अंबष्ठ, पारसव, माहिष्य, उग्र व करण हे ६ अनुलोम आहेत. यांस त्यांच्या मातृजातीस जीं कर्मे उक्त असतील तीं करण्याचा अधिकार आहे. हे हीनवर्ण स्त्रियांचेठायीं झालेले. यांचेठायीं उत्कृष्ट वर्णापासून झालेले अनुलोम व नीचापासून झालेले प्रतिलोम समजावे. **मनु** ह्मणतो—"विप्रापासून उग्रकन्येचेठायीं होतो त्यास आवृत्त ह्मणावें." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"माहिष्या—( क्षत्रियापासून वैश्येचेठायीं उत्पन्न झालेला ) पासून करण ( वैश्यापासून शूद्रीचेठायीं झालेला ) स्त्रीचेठायीं उत्पन्न होतो त्यास रथकार ( सुतार ) ह्मणावें. याची वृत्ति **स्मृतिकौमुदीं**त **वसिष्ठानें** सांगितली आहे. ती—"पूर्वोक्त मूर्धावसिक्तांनीं—हत्ती, घोडे व रथ यांवर बसणें, शस्त्रविद्या शिकविणें, अस्त्रधारण, हीं कर्मे करावीं. मणि, मंत्र व औषधींनीं प्राणिमात्राचें रक्षण, हीं कर्मे करून पोट भरावें. अंबष्ठ व माहिष्यानें—'गायन, नाच व आकाशांतील नक्षत्रांचें ज्ञान आणि शेताची राखण यांवर निर्वाह करावा. पारसव, उग्र व करण या तिघांनीं—द्विजसेवा, जामदारी, राजसेवा, आणि किल्ले कोट व नगरजनानखाना इत्यादिकांचें रक्षण करावें. रथकारानें—ठेव सांगणें, हत्ती व घोड्यांवर बसणें, सारथ्य करणें, हत्ती घोडे इत्यादिकांस वाढविणें, त्यांचें पोषण व दमन करणें इत्यादि कर्मे करून पोट भरावें." रथकारांविषयीं **शंख** ह्मणतो—"क्षत्रिय व वैश्योत्पन्न अनुलोमांचा ( माहिष्य पुरुष व करणी स्त्रीचा ) पुत्र जो रथकार त्यास—अध्ययन, यज्ञ, दान, व उपनयनादि संस्कार हे निषिद्ध नाहींत. सारथ्य, निधिज्ञान, विद्या व अध्ययनांवर वृत्ति चालविणें हें त्यास योग्य आहे." **जातिविवेकां**त—"जर, कधींतरी विप्र शूद्रस्त्रीला शयनावर घेऊन ( संभोग करून ), ग्राम्यधर्मानें पारसवनामक पुत्र उत्पन्न करील; तर त्यास महाशूद्र ह्मणावें. तो शूद्राहून कांहीं उत्तम आहे, त्यालाच सोनार ह्मणतात. त्यास—स्नान, पट्टवस्त्र व पवित्रधारण विहित आहे. त्यानें सर्व प्रकारें शूद्रधर्मानें वागून सुवर्णाच्या व्यवहारानें पोट भरावें. तसेंच हा त्या व्यवहारांत कपट करील ( खोटे अलंकार घडवील ) व पक्ष्यादिकांचें मांस विकील तर, राजानें त्याचें नाक कापावें. व उत्तम-

साहस दंड करावा." असें सांगितलें आहे. **उशना** ह्मणतो—"क्षत्रियस्त्रीला विप्रसंयोगापासून झालेला मूर्धावसिक्तक. तो क्षत्रियाहून किंचित् अधिक आहे. त्यानें अथर्वणवेदोक्त नित्यनैमित्तिक कर्में करावीं. हत्ती, रथ व घोडे राजाज्ञेनें वहावे. सेनापत्य किंवा वैद्यकी करावी. अष्टांग आयुर्वेद ( वैद्यशास्त्र ) व त्यांत सांगितलेला प्रकार धर्मतः आचरण करावा. अथवा ज्योतिष, गणितविद्या शिकावी. हीं त्यास देहनिर्वाहक कर्में होत." "वैश्यस्त्रीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास अंबष्ठ ह्मणतात. त्यानें शेती करावी किंवा राजापुढें नाचावें. अथवा मनुष्य, घोडे, हत्ती यांची चिकित्सा करावी. ही त्याची जीविका होय." वैद्य कसा असावा? याविषयीं **वाग्भट्ट** ह्मणतो—"७। ५ अथवा ३ वैद्यशास्त्रसंबंधी संहिताग्रंथ उत्तमप्रकारें जो जाणत नसेल तो कुवैद्य होय. तो औषध देईल तर राजानें त्याचा उजवा हात तोडावा." **मनु** ह्मणतो—"प्रायश्चित्त, चिकित्सा, ज्योतिष आणि धर्मशास्त्राचा निर्णय, हीं शास्त्रज्ञानावांचून जो सांगतो त्यास ब्रह्मघातकी ह्मणतात." हा शस्त्रवैद्य होय. "वैश्यस्त्रीचेठायीं क्षत्रियोत्पन्न माहिष्यनामक अनुलोम उत्पन्न होतो तो अष्टाधिकारतत्पर, व ६४ अंगें ( कला ) जाणणारा होय. वैश्यवत् व्रतबंधादिक सर्व कर्में त्यास विहित आहेत. ज्योतिष, शाकुन व संगीत या शास्त्रांवर त्यानें निर्वाह करावा." **विश्वंभरशास्त्रां**त—"शूद्रीचेठायीं क्षत्रियापासून उत्पन्न होतो त्यास उग्र ह्मणतात. त्याची युद्ध व शस्त्रादिक ही जीविका होय. त्यानें शस्त्रास्त्रन्यासाविषयीं व युद्धाविषयीं कुशल असावें. त्या वृत्तीनें निर्वाह करावा. यास देशभाषेंत—'रजपूत' असें ह्मणतात. यानें शूद्रवत् वागावें. शूद्रीचेठायीं वैश्यापासून उत्पन्न होतो त्यास करण ह्मणतात. यानें देशलिपी लिहिण्याचें ( कारकुनीचें ) काम करावें." असें सांगितलें आहे. **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"या युगीं ७ व्या अथवा ५ व्या पिढीस अनुक्रमें कर्मव्यत्यय–( उत्तम कर्म ) करीत गेल्यास संकर वर्णासहि शूद्रवर्णत्व प्राप्त होतें. व अधम कर्म करीत गेल्यास अधमत्व येतें." येथें 'जात्युत्कर्ष' शब्दावरून ७ व्या पिढीस उत्तमत्व, व अपिशब्दावरून ६ व्या व ५ व्या पिढीस उत्तमजातित्वाची प्राप्ति होते असें सिद्ध होतें. याचा अभिप्राय असा आहे कीं,—एका ब्राह्मणापासून विवाहित शूद्रीस कन्या झाली. तिनें ब्राह्मणासच वरला. तिलाही कन्या झाली आणि तिनेंही ब्राह्मण वरला. असा क्रम चालल्यास ७ व्या पिढीस तिची संतति ब्राह्मणच होते. असेंच—ब्राह्मणानें विवाहित -वैश्यस्त्रीचेठायीं कन्या उत्पन्न केली. तिनें पुनः ब्राह्मण वरला. तिच्या कन्येनें पुनः ब्राह्मण वरला. अशा क्रमानें ६ व्या पिढीस ब्राह्मण्य मिळतें. असेंच—ब्राह्मणानें विवाहित अशा क्षत्रियकन्येचेठायीं कन्या झाली तर, तिच्या पूर्ववत् विवाहक्रमानें ५ व्या पिढीस ब्राह्मण्य मिळतें. असेंच क्षत्रियानें विवाहित अशा शूद्रीपासून उत्पन्न झालेली कन्या क्षत्रियासच दिली. आणि पुढें तसाच

---

१ 'साहस'—ह्मणजे दंड. उत्तमसाहस ह्म० एक हजार रुपये दंड तो अपराधाच्या तारतम्यानें करावा. २ येथें सांगितलेला 'जात्युत्कर्ष' वस्तुतः फार योग्य असून आवश्यक आहे; पण सांप्रतकालीं हा प्रकार चालू असल्याचें कोठें आढळत नाहीं.

क्रम चालविला तर ६ व्या पिढीस क्षत्रियत्व मिळतें. वैश्यानें विवाहित शूद्रीपासून उत्पन्न झालेल्या कन्येचा वैश्याशींच विवाह केला आणि पुढें तोच क्रम चालविल्यास ५ व्या पिढीस वैश्यत्व मिळतें. हा वरील वचनाच्या पूर्वार्धाचा अर्थ आहे. तसेंच ब्राह्मण—परंपरेनें क्षत्रियकर्मावर निर्वाह करीत गेल्यास ५ वा पुरुष क्षत्रिय होतो. असाच वैश्यवृत्तीनें व शूद्रवृत्तीनें वागत गेल्यास ६ वा वैश्य, व ७ वा पुरुष शूद्र होतो. असेंच क्षत्रिय असून, वैश्य व शूद्रवृत्तीनें वागत गेल्यास ५ वा वैश्य व ६ वा शूद्र होतो. वैश्य पूर्ववत् शूद्रवृत्तीनें वागत असल्यास ५ वा पुरुष शूद्र होतो. ॥ **इति अनुलोमप्रकरणम् ॥**

## ॥ अथ प्रतिलोमजाः ॥

कल्पतरौ कात्यायनः ॥ नियोगोत्पादनं कुर्याद्यथोक्तं तद्विशुद्धये ॥ द्विजस्त्रीषु च धर्मोऽयं शूद्रस्यैतत्सदा भवेत् ॥ १ ॥ शूद्रेषु न नियोग इत्यर्थः । बृहस्पतिः ॥ उक्तो नियोगो मनुना निषिद्धः स्वयमेव तु ॥ युगह्रासादशक्योऽयं कर्तुं मर्त्यैर्विधानतः ॥ १ ॥ अनेकधा कृताः पुत्रा ऋषिभिर्ये पुरातनैः ॥ न शक्यंतेऽधुना कर्तुं शक्तिहीनैरिदंतनैः ॥ २ ॥ तत्रैव हारीतः ॥ स्वैरिणी च पुनर्भूश्च रेतोधाः कामचारिणी ॥ सर्वभक्षा च विज्ञेयाः पंचैताः शूद्रयोनयः ॥ १ ॥ एतासां यान्यपत्यानि उत्पद्यंते कदाचन ॥ न तान् पंक्तिषु युंजीत न ते पंक्त्यर्हकाः स्मृताः ॥ २ ॥ रेतोधाः कुंडमाता । कामचारिणी चतुर्भ्योऽधिकपुरुषगा । सर्वभक्षा सुरापी । याज्ञवल्क्यः ॥ ब्राह्मण्यां क्षत्रियात्सूतो वैश्याद्वैदेहकस्तथा ॥ शूद्राज्जातस्तु चांडालः सर्वधर्मबहिष्कृतः ॥ १ ॥ क्षत्रिया मागधं वैश्याच्छूद्रात्क्षत्तारमेव च ॥ शूद्रादायोगवं वैश्या जनयामास वै सुतम् ॥ २ ॥ मागधो बंदी । क्षत्ता निषादो भिल्ल इति प्रसिद्धः । आयोगवः पुल्कसः । तदाह हारीतः ॥ क्षत्रियायां वैश्यशूद्रौ बंदिनिषादौ जनयतो वैश्यायां शूद्रः पुल्कसानिति । व्यासोऽपि ॥ शूद्रान्निषादो मत्स्यघ्नः क्षत्रियायां व्यतिक्रमात् ॥ तेन द्वौ निषादौ । एकः प्रागुक्तोऽनुलोमः । अयं चैकः । जातिविवेके ॥ क्षत्रिया शूद्रसंयोगात्क्षत्तारं जनयेत्सुतम् ॥ निषाद इति विख्यातः सर्ववर्णबहिष्कृतः ॥ १ ॥ शूद्राचारविहीनश्च पापधीनिरतः सदा ॥ वागुरापाशपाणिस्तु मृगबंधनकोविदः ॥ २ ॥ आरण्यपशुजातीनामंतकश्च वनेचरः ॥ क्रोधान्वितो मांसवृत्त्या तया जीवेत्सदैव हि ॥ ३ ॥ घंटां पापर्द्धिकां कुर्याद्रात्रौ विस्मयकारिणीं ॥ द्विधा च मृगया प्रोक्ता व्योमभूचारिणामिह ॥ ४ ॥ विक्रयं मधुनः कुर्याद्धनमिच्छन्समृद्धये ॥ यमस्तु मागधनिषादयोः संज्ञांतरमाह ॥ क्षत्रियायां तु वैश्येन मुचुपो नाम जायते ॥ शूद्रेण जायते मद्गुः क्षत्रिया यत्र मुह्यति ॥ १ ॥ मोहो मैथुनं । स्मृत्यंतरे ॥ क्षत्रिया मागधं वैश्याज्जनयामास वै सुतं ॥ स बंदीजन इत्युक्तो व्रतबंधविवर्जितः ॥ १ ॥ शूद्रेभ्योऽभ्यधिकः किंचित्तस्य जीवनमुच्यते ॥ काव्यालंकारगद्यादिषट्भाषासु कलाक्षमः ॥ २ ॥ गद्यपद्यानि चित्राणि विरुद्धानि मही-

१ रिदन्तनैरिति पाठान्तरं दृश्यते । २ नरैरिहेति पुस्तकान्तरे ।

भृताम् ॥ ३ ॥ क्षत्रियायां वैश्यजातः क्षत्ता वेत्रधरो भवेत् ॥ लघुजातिविवेके ॥ सूतास्ते ये पुराणस्थानुच्चरंति नृपान्सदा ॥ येऽल्पकालगतान् शूरान् वर्णयंति च मागधाः ॥ १ ॥ वर्तमानान्नृपान्सम्यक्कृतसंग्रामकर्मणः ॥ वर्णयंति प्रबंधैर्ये बंदिनस्ते प्रकीर्तिताः ॥ १ ॥ मनुः ॥ कारावरं निषादात्तु चर्मकारं प्रसूयते ॥ वैदेहीति शेषः । वैदेहकादंध्रमेदौ बहिर्ग्रामप्रतिश्रयौ ॥ ४ ॥ विप्रायां वैश्यजो वैदेहः । तस्मात्कारावर्योमंध्रः । निषाद्यां मेद इति मेधातिथिः ॥ अंगिरसा त्वन्येऽपि चंडाला उक्ताः ॥ यस्तु प्रव्रजिताज्जातो ब्राह्मण्यां यश्च शूद्रजः । तावुभौ विद्धि चंडालौ सगोत्राद्यश्च जायते ॥५॥ यमोऽपि ॥ आरूढपतितापत्यं ब्राह्मण्यां यश्च शूद्रजः ॥ सगोत्रोढासुतश्चैव चंडालास्त्रय ईरिताः ॥ १ ॥ मनुः पुल्कसमप्याह ॥ जातो निषादाच्छूद्रायां जात्या भवति पुल्कसः ॥ शूद्राज्जातो निषाद्यां तु स वै कुक्कुटकः स्मृतः ॥ १ ॥ क्षत्तुर्जातस्तथोग्र्यां तु श्वपाक इति चोच्यते ॥ वैदेहकेन त्वंबष्ठ्यामुत्पन्नो वेन उच्यते ॥ २ ॥ शूद्रात्क्षत्रियाजः क्षत्ता । क्षत्राच्छूद्रायामुग्रः । ताभ्यां श्वपाकः । वैश्याद्विप्रायां वैदेहः । विप्राद्वैश्यायामंबष्ठी । तस्यां वेनः । एषां वृत्तीराह वसिष्ठः ॥ सूतानां मंत्रिकायस्थत्वस्त्रीजीवनवस्त्रपूरणानि । मंत्रित्वं कायस्थो लेखकस्तत्त्वं च । वैदेहकानां नटवृत्तिरंगावतरणे । वेनानां दारुच्छेदनं भ्रमरोपणं मणिमुक्ताप्रवालवेधनं च । भ्रमः शाणः । आयोगवानां ताम्रायस्त्रपुसीसायुधकरणं योजनं नगरकरणं च सैरंध्राणां सुरामद्यसीधुकरणं तद्विक्रयः पुष्पफलशाकविक्रयश्च । विश्वंभरशास्त्रे ॥ विप्रायां यः सुतः क्षत्रात्सूताख्यो गजबंधकृत् ॥ दमनं तुरगाणां च कुर्यात्तज्जीवनं परम् ॥ १ ॥ नृपात् ब्राह्मणकन्यायां विवाहेषु समन्वयात् ॥ जातः सूतस्तु निर्दिष्टः प्रतिलोमविधिर्द्विजः ॥ २ ॥ विवाहसंबंधे ऊढायां ब्राह्मणकन्यायामित्यर्थः । वेदानर्हस्तथा चैषां धर्माणामनुबोधकः ॥ ब्राह्मण्यां तु सुतो जातो वैश्याद्वैदेहकः स्मृतः ॥ ३ ॥ पाषाणकाष्ठयोः शिल्पं तस्य जीवनमुत्तमम् ॥ मनुः ॥ सूतानामश्वसारथ्यमंबष्ठानां चिकित्सितं ॥ वैदेहकानां स्त्रीकार्यं मागधानां वणिक्पथः ॥ १ ॥ स्त्रीकार्यमंतःपुररक्षा । वणिक्पथो राजमार्गस्तद्रक्षा । मत्स्यघातो निषादानां तष्टिरायोगवस्य च ॥ २ ॥ तष्टिर्दारुतक्षणं वर्द्धकिरित्यर्थः । उशनसा तु ॥ नृपायां वैश्यसंसर्गादायोगव इति स्मृतः ॥ तंतुवाया भवंत्येते वसुकांस्योपजीविनः ॥ १ ॥ शीलिकाः केचिदत्रैव जीवनं वस्त्रनिर्मितं ॥ क्षत्त्रुग्रपुल्कसानां[1] तु बिलौकोवधबंधने ॥ २ ॥ बिलौकसः सर्पादयः । उग्रोऽत्र प्रतिलोमजः । तन्मध्यपाठादिति स्मृतिमंजर्यां ॥ धिग्वणानां चर्मकार्यं वेनानां भांडवादनम् ॥ भांडं मुरजपटहादि । चैत्यद्रुमश्मशानेषु शैलेषूपवनेषु च ॥ ३ ॥ वसेयुरेते विज्ञाता वर्तयंतः स्वकर्मभिः ॥ विज्ञाता ज्ञातिचिह्नांकिताः । चांडालश्वपचानां तु निर्ग्रामः स्यात्प्रतिश्रयः ॥ ४ ॥ अवपात्राश्च कर्तव्या धनमेषां श्वगर्दभम् ॥ निर्ग्रामो बहिर्ग्रामः । अवपात्रं भिन्नपात्रं । यद्वा पाकपात्रादिहीनाः । यद्वक्ष्यति अन्नमेषां पराधीनमिति । यद्वा तद्धस्तस्थे पात्रेऽन्नादि न देयं । किंतु भूमिस्थे । वासांसि मृतचैलानि भिन्नभांडे च भोजनम् ॥ ५ ॥ कार्ष्णाय-

---

१ पुस्तकान्तरे पुक्कस इति पठ्यते ।

समलंकारः परिव्रज्या च नित्यदा ॥ परिव्रज्या एकत्रानवस्थानं । न तैः समयमन्विच्छेत्पुरुषो धर्ममाचरन् ॥ ६ ॥ व्यवहारो मिथस्तेषां विवाहः सदृशैः सह ॥ अन्नमेषां पराधीनं देयं स्याद्भिन्नभाजने ॥ ७ ॥ रात्रौ न विचरेयुस्ते ग्रामेषु नगरेषु च ॥ कार्यार्थं विचरेयुर्वा चिह्निता राजशासनैः ॥ ८ ॥ अबांधवं शवं चैव निर्हरेयुरिति स्थितिः[1]॥ वध्यांश्च हन्युः सततं यथाशास्त्रं नृपाज्ञया ॥ ९ ॥ वध्यवासांसि गृह्णीयुः शय्याश्चाभरणानि च ॥ ब्राह्मणार्थे गवार्थे वा देहत्यागोऽनुपस्कृतः ॥ १० ॥ धनाद्यलोभोऽनुपस्कर इति मेधातिथिः । स्त्रीबालाभ्यवपत्तौ च बलिनां सिद्धिकारणम् ॥ स्त्रीबालादिविपत्तौ च देहत्याग इत्यनुषंगः । सिद्धिः श्रेयः । उशना ॥ सीसमाभरणं तेषां कालायसमथापि वा ॥ वर्ध्रीं कंठे समाबध्य झल्लरीं कक्षतोऽपि वा ॥ ९ ॥ मलापकर्षणं कुर्युः पूर्वाह्ले परिशुद्धिकं ॥ [1]पिंडीभूता वसेयुस्ते नोचेद्वध्या विशेषतः ॥ १० ॥

यानंतर प्रतिलोमज सांगतो.

याविषयीं **कल्पतरूंत कात्यायन** ह्मणतो—"शास्त्रोक्तप्रकारें वंशवृद्ध्यर्थ नियोगानें पुत्रोत्पादन करावें. हा धर्म द्विजस्त्रियांविषयीं आपत्कालीं विहित आहे; पण शूद्रांस तो नित्य होतो." अर्थात् त्यांस नियोगाची अपेक्षा नाहीं असा अभिप्राय. **बृहस्पति** ह्मणतो—"हा नियोग[2] **मनूनें** सांगितला असून आपणच निषिद्ध केला आहे. युगाच्या क्षयास्तव कलियुगांतल्या मनुष्यांनीं यथाविधि करण्यास अशक्य आहे. पुरातन ऋषींनीं जसे अनेक प्रकारचे पुत्र उत्पन्न केले, तसे सांप्रतकालीन शक्तिहीन मनुष्यांच्या हातून होण्यास

---

१ नापराण्हे प्रविष्टोऽपि बहिर्ग्रामाच्च नैर्ऋते । इति पुस्तकान्तरेऽधिकं दृश्यते ।

२ ह्या शब्दाचा अर्थ—योजणें अथवा ( पुत्र उत्पन्न करून घेण्याकरितां ) आज्ञा देणें—इतकाच आहे. प्रकृत स्थलींही असाच इष्ट आहे. हा नियोग दोन प्रकारचा आहे, त्यांतून पहिला प्रकार—पुत्र उत्पन्न होण्यापूर्वींच पति मरण पावला असून वंशास कांहीं आधार नसेल तर गुरुजनाच्या आज्ञेनें स्त्रीनें केवळ वंशरक्षणार्थ आपल्या दिरापासून पुत्रोत्पादन करून घ्यावें. त्यानेंही त्याच हेतूनें आपल्या अंगास तूप लावून ऋतुकालीं तिशीं संग करावा. असें **याज्ञवल्क्यानें** सांगितलें आहे. ( या० स्मृ० अ० १ श्लो० ६८ पहा ) याला नियोग ह्मणतात. **धृतराष्ट्र** व **पांडु**राजा हे दोघेही याप्रमाणेंच उत्पन्न केले आहेत. दुसरा प्रकार असा आहे कीं—पति जीवंत असून त्यापासून पुत्र उत्पन्न होत नाहीं, किंवा रोगामुळें अथवा शापादि योग्य प्रतिबंधामुळें त्याच्यानें संग करवत नाहीं. असें असून पतीनें जर आज्ञा दिली असेल तर स्त्रीनें योग्य पुरुषापासून संतति उत्पन्न करून घ्यावी असी धर्मशास्त्राची आज्ञा आहे. **पांडु** राजाची स्त्री **कुंती** हिनें **यमा**दिकांपासून याचप्रकारें पुत्र उत्पन्न करून घेतले. याविषयीं **महाभारत** आदिपर्व पहा. सूर्यवंशी **सौदास** राजाची स्त्री **मदयंती** हिचेठायीं **वसिष्ठानें** पुत्र उत्पन्न केले आहेत. **श्रीमद्भागवत** नवमस्कन्धीं पहा. वर सांगितलेल्या दोन प्रकारच्याही नियोगांत उभयतांची रतिसुखार्थ प्रवृत्ति नसावी.

शक्य नाहीं." तेथेंच **हारीत** ह्मणतो—"जारिणी, पुनर्भू[1], रेतोधा[2], कामचारिणी[3], व सर्वभक्षा[4], ह्या पांच प्रकारच्या स्त्रिया शूद्रवत् आहेत. कदाचित् यांपासून संतति उत्पन्न होईल तर तीस पंक्तीस घेऊं नये. ती पंक्तिभ्रष्ट आहे." **याज्ञवल्क्य** ह्मणतो—"ब्राह्मणीचेठायीं क्षत्रियापासून सूत, वैश्यापासून वैदेहक, व शूद्रापासून झालेल्यास सर्वधर्मबहिष्कृत चांडाल असें ह्मणतात. क्षत्रियीचेठायीं वैश्यापासून मागध ( बंदी ), व शूद्रापासून क्षत्ता ( निषाद अथवा भिल्ल ), व शूद्रापासून वैश्येचेठायीं अयोगव (पुल्कस )—नामक पुत्र होतात." **हारीत** ह्मणतो—"क्षत्रियेचेठायीं वैश्य व शूद्रापासून बंदी व भिल्ल, आणि शूद्रापासून वैश्येचेठायीं पुल्कसनामक पुत्र होतात." **व्यास** ह्मणतो कीं,—"क्षत्रियेचेठायीं व्यभिचारानें शूद्रापासून मत्स्यघातकी[5] निषाद ( धीवर ) नामक पुत्र होतो." यावरून—पूर्वी **याज्ञवल्क्यो**क्त शूद्रीचेठायीं ब्राह्मणापासून झालेला अनुलोम निषाद १, व सांप्रत सांगितलेला—शूद्रापासून क्षत्रियेचेठायीं झालेला प्रतिलोम निषाद १ असे २ प्रकारचे निषाद सांगितले आहेत. **जातिविवेकांत**—"क्षत्रियस्त्री शूद्रापासून ज्यास उत्पन्न करिते, त्यास क्षत्ता किंवा निषाद ह्मणतात. तो सर्ववर्णबहिष्कृत. मृग बांधण्याचें जाळें, व पाश ( फांस ) हातांत घेऊन मृग धरण्यास निपुण, अरण्यसंबंधी पशूंचा नाश करणारा वनचर मोठा क्रोधी, मांसवृत्तीनें नित्य वांचणारा, रात्रीं आश्चर्यकारक व पापवृद्धी ( मृगाचा घात ) करणारा घंटाशब्द करून मृगयातत्पर असतो; मृगया २ प्रकारची आहे. १ भूचर—हरिणादिकांची हिंसा व आकाशसंचारी पक्ष्यादि[6]कांची हिंसा. ह्या २ ही करणारा. यानें द्रव्येच्छेनें मधुविक्रय करावा." असें सांगितलें आहे. **यमा**नें तर—मागध व निषाद यांचीं नांवें अन्य सांगितलीं आहेत. तीं—"क्षत्रियेचेठायीं वैश्यापासून, मुचुप व शूद्रापासून मद्गु, या नांवाचे पुत्र होतात." अन्य **स्मृतीं**त—"क्षत्रिया, वैश्यापासून मागध नांवाचा पुत्र उत्पन्न करिते. त्यास लोक बंदीजन असें ह्मणतात. त्यास व्रतबंध करण्याचा अधिकार नाहीं, परंतु तो शूद्राहून किंचित् अधिक आहे. त्याची जीविका सांगतो—काव्यें, अलंकार, गद्यें प्राकृतादिभाषा रचण्याविषयीं त्यानें निपुण असावें. गद्यमय काव्यें, पद्यमय काव्यें, चित्रकाव्यें, विरुद्ध काव्यें इत्यादि रचून राजापुढें निवेदन करून त्यांवर निर्वाह करावा. क्षत्रियेचेठायीं वैश्यापासून झालेल्यास क्षत्ता ह्मणतात. त्यानें राजगृहांत चोपदारीचें काम करावें." असें सांगितलें आहे. **लघुजातिविवेकांत**—"जे पुराण सांगतात ( पूर्वराजांचें स्तवन करितात—) ते सूत. व जे अल्पकालीन शूरांचें वर्णन करितात ते

---

१ पुनर्विवाह करून घेणारीस 'पुनर्भू' ह्मणतात.

२ नवरा जीवंत असतां जारापासून पुत्र उत्पन्न करून घेते तिला 'रेतोधा' असें ह्मणतात.

३ चौघांपेक्षां अधिक पुरुषांशीं संयोग करिते तिला 'कामचारिणी' ह्मणतात.

४ दारुप्राशन वगैरे करणारीला 'सर्वभक्षा' ह्मणतात.

५ शस्त्रानें हरिणादिकांची हिंसा करणाऱ्यास देशभाषेंत 'पारधी' ह्मणतात. येथें सांगितलेला तोच असावा.

६ 'फांसेपारधी' ज्यास ह्मणतात तो हाच असावा.

मागध, व वर्तमान राजांचें आणि त्यांनीं केलेल्या युद्धप्रसंगांचें प्रबंधरूपानें वर्णन करितात ते बंदी, असें समजावें. " असें सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो—" वैदेहीस्त्री निषादापासून कारावर चर्मकार ( चांभार ) नाम, व वैदेहका—( ब्राह्मणीचे ठायीं वैश्यापासून झालेला ) पासून अंध्र, व मेद नामें गांवाबाहेर राहणारे उत्पन्न होतात. " " वैदेहकापासून कारावरीचेठायीं अंध्र व निषादीचेठायीं मेदनामक होतात. " असें **मेधातिथि** ह्मणतो. **अंगिरा**ऋषीनें तर अन्यहि कित्येक सांगितले आहेत. ते— "जो, संन्याशापासून झालेला, व ब्राह्मणीचे ठायीं शूद्रापासून झालेला, व सगोत्र-विवाहापासून झालेला, हे तिघेही चांडाल होत." **यम**हि ह्मणतो कीं,—"आरू-[१]ढपतिताचा पुत्र व जो ब्राह्मणीचेठायीं शूद्रापासून झालेला व एकगोत्रीय विवाहित स्त्रीपासून झालेला, हे तिघेही चांडाल होत. " यांत **मनूनें** पुल्कसाविषयीं सांगितलें आहे कीं,—निषादापासून शूद्रीचेठायीं झालेला जातीनें पुल्कस, व शूद्रापासून निषादीचेठायीं झालेला कुक्कुटक असें समजावें. क्षत्त्या—( शूद्रापासून क्षत्रियीचेठायीं झालेला ) पासून उग्रस्त्रीचेठायीं उत्पन्न झालेल्यास श्वपाक ह्मणावें. वैदेहकापासून अंबष्ठीचेठायीं झालेल्यास वेन ह्मणतात. " यांच्या वृत्ति **वसिष्ठ** सांगतो—" सूतांस मंत्रिपणा, लेखकत्व, स्त्रीजीवन व वस्त्रांस रफू करणें. वैदेहकांस—नटवृत्ति, सोंग घेणें व नाटकें वगैरे करणें. वेनांस—काष्टें तोडणें, चरक लावणें, रत्नें मोतीं व पोवळीं यांस विंधणें अयोगवांस—तांबें लोखंड, कथिल व शिसें यांचीं आयुधें करणें व त्यांची योजना करणें; तसेंच नगररचना करणें इत्यादि. सैरंध्रास सुरा[२], मद्य[३] व सीधु[४]

---

१ जो संन्यास आश्रम घेऊन पुन: विषयी होतो त्यास—' आरूढपतित' ह्मणतात. या शब्दाचा अर्थ—वर चढून खालीं पडलेला—असा होतो. ब्राह्मणास जे चार आश्रम सांगितले आहेत त्यांत संन्यासाश्रम श्रेष्ठ आहे. तेव्हां त्या आश्रमाचा स्वीकार करून त्याग करणें हें वर चढून खालीं पडण्यासारखेंच आहे.

२ हा शब्द दारूचा वाचक आहे हें प्रसिद्ध आहे, पण त्याचा विशिष्ट अर्थ घेऊन हा व याच्या पुढचा ( मद्य ) शब्द येथें संगृहीत आहे. धर्मशास्त्रांत—**"मदजनकोऽन्नविकारविशेषः सुरा"** " कैफ उत्पन्न करणारा अन्नाचा एक प्रकारचा जो विकार त्याला ' सुरा ' ह्मणतात. " असें सांगितलें आहे. याप्रकारच्या दारूचे—मुख्य आणि गौण असे दोन भेद आहेत. जी केवळ धान्याची करतात ती मुख्य, आणि गुळाची वं मधाची करतात ती गौण होय. सर्व प्रकारच्या दारूंत ' पैष्टी ह्मणजे वर सांगितलेली मुख्य. सुरा ही फारच निंद्य मानली आहे. व इतरापेक्षां प्रायश्चित्तही विशेष आहे. जाणून ब्राह्मणानें सुरा ( पैष्टी ) प्राशन केली तर देहांत प्रायश्चित्त सांगितलें आहे. याविषयीं **प्रायश्चित्तेन्दुशेखर** पहा. ३ ' मद्य ' याचें लक्षण **पराशरमाधवी-यांत—पनसादिजन्यं मदकारणं द्रवत् द्रव्यं मद्यम्** " " फणस इत्यादि फळांपासून प्रवाही असून मादक जें द्रव्य उत्पन्न होतें त्यास मद्य ह्मणावें. " असें सांगितलें आहे त्याचे—पानस, द्राक्ष, खार्जूर इत्यादि ११ भेद सांगितले आहेत. सुरेपेक्षां यांचा दोष कमी आहे. क्षत्रियांस तर दोषच नाहीं. याविषयीं **पराशरमाधवी** व प्रायश्चित्तेन्दुशेखर पहा. ४ ' सीधु ' हें एकप्रका-

करून विक्रय करणें; व पुष्पें फलें, आणि शाका यांचा विक्रय हीं उदरपूर्तीचीं कर्मे होत. " **विश्वंभरशास्त्रां**त—" ब्राह्मणीचेठायीं क्षत्रियापासून झालेला" जो सूतनामक पुत्र त्यानें—हत्तीचें बंधन व घोडे दमविणें यांवर निर्वाह करावा. क्षत्रियापासून विवाहित ब्राह्मणकन्येचेठायीं प्रतिलोमविधीनें झालेला सूतनामक जो पुत्र, तो वेदाविषयीं अनधिकारी व धर्माचा अनुबोधक होय. ब्राह्मणीचेठायीं वैश्योत्पन्न जो वैदेहक त्याचें दगडकाम व लांकूडकाम हें निर्वाहसाधन होय. " असें सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो—" सूतांस—घोड्यावर बसणें व सारथ्य करणें, अंबष्ठांस—चिकित्सा, वैदेहकांस—अंतःपुराचें रक्षण, मागधांस—व्यापाराच्या रहदारीच्या मार्गाचें रक्षण, निषादांस—मासे मारणें, अयोगवांस—सुतारकाम, हीं कर्मे योग्य आहेत. " **उशना ऋषीनें**—" क्षत्रियीपासून वैश्यसंयोगानें आयोगवनामक होतो. यानें कोष्टीपणा अथवा कांशाचीं पात्रें करावीं. यांतच कित्येक शीलिकनामक वस्त्रविक्रयानें निर्वाह करणारे आहेत. क्षत्ता ( प्रतिलोमज ), उग्र व पुल्कस यांनीं सर्पादिकांस मारणें व कोंडणें, हीं कर्मे करावीं. "—येथें प्रतिलोमजच उग्र घ्यावा. कारण,—"त्याचा मध्यें पाठ आहे. ह्मणून" असें **स्मृतिमंजरीं**त सांगितलें आहे. ह्मणून धिग्वणांस—चर्मकार्य ( कातड्याचे नानापदार्थ करणें ), वेनांस वाद्यें वाजविणें हीं कर्मे त्यांस विहित आहेत. यांनीं—देवालयें, नगारखाने, पर्वत, जंगलें, बागा यांत असावें. " यांनीं स्वजातिचिह्नें धारण करून स्वकर्मे करावीं. चांडाल व श्वपचांनीं गांवांबाहेर रहावें. यांचे घरीं फुटकींतुटकीं भांडीं असून चांगलीं नसावीं. स्वयंपाकाचीं पात्रें नसावीं. यांस अवपात्र करावें. त्यांचें द्रव्य काय तें—गाढवें, कुत्रीं, कोंबडीं, हेंच असावे. " येथें अवपात्र शब्दाचा अर्थ—फुटकीं पात्रें आहेत ज्याचीं असा घ्यावा. अथवा—स्वयंपाकाचीं पात्रें नसलेले—असा अर्थ करावा. कारण, यांचें अन्न पराधीन असावें." असें पुढें सांगणार आहे. अथवा अवपात्र ह्मणजे—त्यांच्या हातांतील भांड्यांत कांहीं अन्न वगैरे द्यायाचें असेल तर देऊं नये. तर अव—ह्मणजे खालीं अर्थात् भूमीवर पात्र ठेवल्यावर त्यांत घालावें. " यांनीं नेसण्यापांघरण्यास प्रेतांचीं वस्त्रें घ्यावीं. फुटक्या पात्रांत जेवावें. पोलाद,

---

रच्या मद्याचेंच नांव आहे. याविषयीं—" **इक्षोः पक्वरसैः सिद्धः सीधुरित्यभिधीयते** " " उंसाच्या पक्व रसापासून होतें त्यास सीधु ह्मणतात. " असें सांगितलें आहे. वस्तुतः वरच्या टिपेंत सांगितलेल्या मद्यांस सुगंधी अथवा अन्य कोणत्याही प्रकारच्या द्रव्यांचा संयोग करून जे त्यांचे अनेक प्रकार करितात त्या सर्वांचें हें सामान्य असावें असें वाटतें.

१ कोठें कोठें ' शालिक ' असेंही उपलब्ध होतें. याचाच अपभ्रंश होऊन ' साळी ' हा शब्द झाला असावा. तालव्य-श-च्या ठिकाणीं दंत्य-स नेहमीं येतो. व ल आणि ळ यांचा भेद नाहीं.

२ देशभाषेंत ज्यांला ' डोंब ' ह्मणतात ते हेच असावे असें वाटतें. हे **काशींत** याच नांवानें प्रसिद्ध आहेत. व अद्यापि प्रेताचीं वस्त्रें वगैरे घेतात. हें प्रसिद्ध आहे. अन्यत्र हें काम महारच करतात.

लोखंड, शिसें यांचे अलंकार घालावे. नेहमीं, या गावांहून त्या गावांस याप्रमाणें फिरत रहावें. धर्माचरणकर्त्या पुरुषानें त्यांच्याशीं कांहीं भाषणादिकाचाहि संबंध ठेवूं नये. त्यांनीं आपापल्यांत व्यवहार करावा व बरोबरीच्यांशीं विवाहसंबंध करावा. यांचें अन्न [1]पराधीन असावें. अन्न देणारांनीं फुटक्या पात्रांतून द्यावें. यांनीं रात्रौ गांवांत व शहरांत फिरूं नये. कांहीं कामाकरितां राजानें नेमले असतील तर, राजचिन्हें घेऊन फिरावें. व अनाथप्रेत वहावें. राजाज्ञेनें फांशीं जाणारांस फांशीं [3]द्यावें. त्यांचीं वस्त्रें, शय्या, अलंकार इत्यादि घ्यावीं. ब्राह्मण व गायी यांच्या कामाकरितां अनुपस्कृत ( द्रव्यलोभावांचून ) देहत्याग करावा." येथें—'अनुपस्कृत' शब्दाचा अर्थ **मेधातिथीनें**—" द्रव्यलोभ नसणें. " असा केला आहे. तसेंच " स्त्रिया बाल इत्यादिकांस विपत्ति प्राप्त झाली असतां देहत्याग करून त्यांचें रक्षण करावें. "**उशना** ह्मणतो—" त्यांनीं शिसें किंवा पोलादाचे अलंकार घालावे. गळ्यांत वादी अथवा काखेंत झल्लरी ( वाद्यविशेष ) घालून किंवा कासोटा मारून, सकाळपासून दोनप्रहरपर्यंत मलापकर्षण ( शौचकूप झाडणें ) करावें. यांची संतति फार होऊं देऊं नये. झाल्यास राजानें बीजमात्र ठेवून बाकीची मारावी. "

**तथा व्रात्योत्पन्नाः शूद्रसमाः । तानाह मनुः ॥ व्रात्यात्तु जायते विप्रात् पापात्मा भूर्जकंटकः ॥ आवंत्यवाटधानौ च पुष्पशेखर एव च ॥ ३१ ॥ विप्रायां जायते व्रात्यविप्रजो भूर्जकंटकः ॥ आवंत्याद्यास्तस्यैव संज्ञा इति मेधातिथिः । अन्येतु भूर्जकंटकाद्विप्रायामावंत्यः । तस्मात्तस्यां वाटधानः । तस्माच्च पुष्पशेखर इत्याहुः । एवमग्रेऽपि । विश्वंभरे एतानुक्त्वा ॥ एतैस्तु जीवनार्थाय कार्यं विष्ण्वादिपूजनम् ॥ नृत्यगीतादिवादित्रशंखवीणादि वादनम् ॥ १ ॥ झल्लो मल्लश्च राजन्याद्व्रात्याद्विच्छिबिरेव च ॥ नटश्च करणश्चैव खंसो द्रमिड एव च ॥ २ ॥ क्षत्रियायां व्रात्यक्षत्रजा एते । अयमन्यः करणोऽनुलोमात् ॥ वैश्यात्तु जायते व्रात्यात्सुधन्वाचार्य एव च ॥ कारूपश्च विजन्मा च मैत्रः सात्वत एव च ॥ ३ ॥ वैश्यायामेव । आदित्यपुराणे ॥ ब्राह्मण्यां ब्राह्मणव्रात्याज्जा-**

---

१ ' यांच्या घरीं स्वयंपाक करण्याचीं वगैरे भांडीं असूं नयेत. ' असें सांगितलें आहे; तेव्हां त्यांस भोजन कसें मिळावें ? असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. त्याकरितां ' त्यांचें अन्न पराधीन असावें ' ह्मणजे—त्यांनीं दुसऱ्यानीं दिलेल्या अन्नावर निर्वाह करावा. असें सांगितलें आहे.

२ ह्यावरून सांप्रत ' रामोशी ' असें ज्यांला ह्मणतात ते हेच असावे असें वाटतें.

३ देशभाषेंत ज्यांला ' मांग ह्मणतात ते हेच असावे. ' विद्यमानकालींही सरकारच्या हुकुमानें फांसावर चढविण्याचें काम हेच करीत असतात. यद्यपि येथें—डोंब, रामोशी, व मांग यांचीं नांवें निरनिराळीं सांगितलीं नाहींत; तथापि त्यांच्या कर्मावरून त्यांचा भेद दृष्टीस पडतो. व देशभाषेंत जीं त्यांच्या धंद्याच्या संबंधानें नांवें दिलीं आहेत त्यांवरून यांची जात एक असली तरी हे तिचे पोटभेद असून परस्पर भिन्न असावे असें दिसतें.

४ देशभाषेंत ज्यांला ' भंगी ' अथवा 'हलालखोर' ह्मणतात ते हेच होत. यांतही कित्येक हिंदू व कांहीं मुसलमान असे धर्मसंबंधानें भेद आहेत.

यते भृज्जकंटकः ॥ आवंत्यवाटधानौ च पुष्पशेखरजातयः ॥ १ ॥ आभिचारिककर्मात्र भृज्जकंटकिनोऽशनं ॥ मंत्रौषधीशात्रवाणां संमुखीकरणादृते ॥ २ ॥ कुर्वंति राज्ञां हि ततस्तेनैवाविकृताः परैः ॥ अविकृताः अदंड्याः । संमुखीकरणं वशीकरणं । राज्ञीषु क्षत्रियाद्व्रात्याज्झल्लमल्लनटा झषाः ॥ ३ ॥ आवित्थिबीकाः करणा द्रमिडाः संति भूरिशः ॥ विज्ञेयाः परराष्ट्राणां तैश्च राजाज्ञया क्रियाः ॥ ४ ॥ खसो मल्लस्तथा वृत्तं मित्रामित्रत्वमेव च ॥ वैश्यस्त्रीषु तथा व्रात्याद्वैश्यात्कारुषको भवेत् ॥ ५ ॥ चतुष्पथे स्मशाने च स भवेन्मित्रमंडलम् ॥ तत्र लोकवृत्तांतज्ञो राजाज्ञया स्यादित्यर्थः ॥ मातृमंडन इति पाठे देवीपूजकः । सुधन्वाचार्यस्त्वपरो भवेद्रुद्रस्य पूजकः ॥ ६ ॥ तृतीयश्च विजन्माख्यः सूतिकावेश्मपूजकः ॥ तत्स्त्री सांबिका स्यादित्यर्थः । भूतप्रेतपिशाचांश्च पूजयेद्राजशासनात् ॥ ७ ॥ साध्यानां पूजको मैत्रश्चैत्याद्दीनां चतुर्थकः ॥ पंचमः सात्वतो नाम विष्णोरायतनार्चकः ॥ ८ ॥ एभ्योऽन्योन्यसंकरे नीचा जायंते । तदाह मनुः ॥ यथैव शूद्रो ब्राह्मण्यां बाह्यं जंतुं प्रसूयते ॥ तथा बाह्यान्तरं बाह्यश्चातुर्वर्ण्ये प्रसूयते ॥ १ ॥ वर्णजानामन्योन्यसंकरे भेदानाह मनुः ॥ प्रतिकूलं वर्तमाना बाह्या बाह्यांतरान्पुनः ॥ हीना हीनान् प्रसूयंते वर्णाः पंचदशैव तु ॥ १ ॥ बाह्याश्चंडालाद्याः । प्रतिकूलं चातुर्वर्ण्यस्त्रियो गच्छंतः । स्वतो बाह्यांतरान्नीचान् जनयंति । ते पुनरुच्चनीचस्त्रियो गच्छंतो हीनानहीनांश्च सुवते । वर्णा जातयः । अयं भावः । विप्रादनुलोमा एव । शूद्रात्प्रतिलोमा एव । मध्यमयोरुभयोरुभये । क्षत्रस्य द्वावनुलोमौ एकः प्रतिलोमः । वैश्यस्यैकोऽनुलोमो द्वौ प्रतिलोमौ । तत्र शूद्राद्विप्राक्षत्रियावैश्यासु क्रमाच्चंडालक्षत्तायोगवास्त्रयः चंडालाद्विप्रादिस्त्रीषु चत्वारः । एवं क्षत्तुरायोगवादिति द्वादश । तेच स्वयं त्रय इति पंचदश । तथा वैश्यात्क्षत्रियायां मागधो विप्रायां वैदेहकः । शूद्रायां करणोऽनुलोमः । तैश्चतुर्वर्णस्त्रीपूत्पादिताः प्रत्येकं चत्वार इति द्वादश । स्वयं च ते त्रय इति पंचदश । तथा क्षत्रियाद्वैश्यायां माहिष्यः। शूद्रायामुग्रः। विप्रायां सूतः प्रतिलोमः । तेभ्यश्चतुर्वर्णस्त्रीषु प्रत्येकं चत्वार इति द्वादश । स्वयं च ते त्रय इति पंचदश । एवं विप्रात्त्रयोऽनुलोमाः । मूर्धावसिक्तांबष्ठपारसवाश्चतुर्वर्णस्त्रीषु प्रत्येकं चतुरो जनयंतीति द्वादश । ते च त्रय इति पंचदशेति सर्वे षष्टिसंख्याः। दुष्टाः चत्वारो वर्णाश्चेति चतुःषष्टिः । जातिविवेके त्वन्यथोक्तं ॥ आनुलोम्येन वर्णानां षण्नराः संप्रकीर्तिताः ॥ प्रातिलोम्येन ते षट् स्युरिति द्वादश भेदतः ॥ १ ॥ एते द्वादश मिश्रास्तु चतुर्वर्णैर्विमिश्रिताः ॥ अष्टौ च ये स्युर्भेदास्ते षष्टिर्द्वादशसंयुताः ॥ २ ॥ हतास्ते षष्टिसंख्यातैः षट्त्रिंशच्छतसंख्यया ॥ भेदाः संकरजातीनां बहवः स्युस्ततः परे इति । एते शूद्रसमाः । शूद्राणां तु सधर्माणः सर्वेऽपध्वंसजाः स्मृताः ॥ इति मनूक्तेः । अपध्वंसजा व्यभिचारजाताः ॥

तसेंच व्रात्यापासून उत्पन्न झालेलेही शूद्रतुल्य आहेत. तेंच **मनु** सांगतो—"व्रात्य ब्राह्मणापासून पापात्मे भृज्जकंटक, आवंत्य, वाटधान, पुष्पशेखर असे होतात. ब्राह्मणीचेठायीं व्रात्यब्राह्मणासून होतो तोच भृज्जकंटक होय." "त्यासच आवंत्य

वाटधानादि नांवे आहेत. " असें **मेधातिथि** ह्मणतो. अन्य **कित्येक** तर—" भृज्जकंटकापासून ब्राह्मणीचेठायीं आवंत्य, त्यापासून ब्राह्मणीचेठायीं वाटधान, व त्यापासून ब्राह्मणीचेठायीं पुष्पशेखर होतो. " असें ह्मणतात. पुढेंहि असेंच जाणावें. **विश्वंभरशास्त्रां**त यांची उत्पत्ति सांगून जीविका सांगितली आहे. ती—" या पूर्वोक्त भृज्जकंटकादिकांनीं उदरभरणार्थ विष्ण्वादिकांचें पूजन, नाच, गायन करावें 'व वाजंत्रें, वाद्यें, शंख,' वीणा इत्यादि वाजवावीं. व्रात्य क्षत्रियापासून क्षत्रियस्त्रीचेठायीं झल्ल, मल्ल, शिबि, नट, करण, खस, व द्रमिड इत्यादि होतात." यांत सांगितलेला करण हा पूर्वोक्त अनुलोमाहून भिन्न समजावा. व्रात्य वैश्यापासून स्वजातीय स्त्रीचेठायीं जे उत्पन्न होतात त्यांस सुधन्वाचार्य, कारूष, विजन्मा, मैत्र, सात्वत, इत्यादि संज्ञा आहेत." **आदित्यपुराणां**त—" ब्राह्मणीचेठायीं व्रात्य ब्राह्मणापासून भृज्जकंटक, आवंत्य, वाटधान, पुष्पशेखर इत्यादि होतात. त्यांतून भृज्जकंटकानें आभिचारिक कर्म करावें. मंत्र, औषधि, इत्यादि देऊन लढाईवांचून शत्रूचें वशीकरण व प्रसंगी खोटें भाषण इत्यादि राजकार्यें आवंत्यादिकांनीं करावीं. तेणेंकरूनच परक्या राजांसही हे अदंड्य आहेत. क्षत्रियस्त्रीचे ठायीं व्रात्य क्षत्रियापासून झल्ल, मल्ल, नट, झष, आवितिथक, करणं, द्रमिड इत्यादि बहुत उत्पन्न होतात. यांनीं परराज्यांतील व्यवहार गुप्तपणें पाहून, स्वराजास कळवावा[1]. खस व मल्ल यांनीं मित्रत्व व शत्रुत्व जाणून, परराजाशीं गुप्त व्यवहार करावा. वैश्यस्त्रीचेठायीं व्रात्य वैश्यापासून कारूषक होतो. त्यानें चवाठा, स्मशान इत्यादि ठिकाणीं जाऊन लोकांचा वृत्तांत जाणून, राजास सांगावा. दुसरा सुधन्वाचार्य यानें महादेवाची पूजा करावी. ३ रा विजन्मा यानें बाळंतघराचें पूजन करावें. ह्मणजे त्याच्या स्त्रीनें अंबिका[2] व्हावें. व राजाज्ञेनें भूतप्रेतपिशाचांची पूजा करावी. ४ थ्या मैत्रानें साध्य, चैत्य यांची पूजा करावी. ५ व्या सात्वतानें विष्णुमंदिरांत पूजा करावी." या पूर्वोक्तांचा एकमेकांत संकर झाल्यास त्यांहून नीच उत्पन्न होतात. तेंच **मनूनें** सांगितलें आहे. जसें,—"जसा शूद्र, ब्राह्मणीच्चेठायीं वर्णबाह्य ( चांडाल ) पुत्र उत्पन्न करितो, तसाच बाह्यानें उत्पन्न केल्यास त्याहून नीच उत्पन्न होतो. हा प्रकार ४ हि वर्णांत सारखा आहे." वर्णजांचा अन्योन्यसंकर झाल्यास, त्यांचे भेद किती होतात ते **मनु** सांगतो—"प्रतिकूल ह्मणजे चांडालादिक चातुर्वर्णांतील स्त्रियांशीं गमन करूं लागल्यास आपल्याहून नीच व ते नीच, आपल्याहून उंच व नीच स्त्रियांसीं गमन. करतील तर, उंच व नीच पुरुष होतात. त्यांच्या प्रत्येकीं १५ जाति आहेत. " याचा अभिप्राय असा कीं—ब्राह्मणानें कोणत्याहि वर्णाच्या स्त्रीशीं व्यभिचार केल्यास त्यापासून सर्व अनुलोमच होतील. कारण, त्याहून दुसरा उंच वर्ण नाहीं. शूद्रापासून सर्व प्रतिलोमच होतील कारण, त्यापेक्षां दुसरा नीच वर्ण नाहीं. मधच्या ह्मणजे—क्षत्रिय व वैश्य यांपासून वरच्या व खालच्या वर्णांच्या स्त्रियांचेठायीं अनुलोम प्रतिलोम होतात. कारण, त्यांपेक्षां उत्तम व नीच वर्ण

१ देशभाषेंत ज्यांस ' हेर ' ह्मणतात ते हेच होत.

२ देशभाषेंत जिला 'सुवीण' ह्मणतात ती हीच असावी.

दुसरे आहेत. ते असे कीं—क्षत्रियांस २ अनुलोम व १ प्रतिलोम, वैश्यांस १ अनुलोम व २ प्रतिलोम त्यांत शूद्रापासून—ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य या स्त्रियांचेठायीं अनुक्रमें—चांडाल, क्षत्ता, व आयोगव हे ३ होतात. यांतल्या चांडालापासून—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या स्त्रियांचेठायीं ४, व क्षत्त्यापासून पूर्वोक्त ब्राह्मणादि स्त्रियांचेठायीं ४, व आयोगवापासून ४, मिळून १२, व ते मूळचे चांडालादि ३ मिळून १५ भेद होतात. तसेंच वैश्यापासून क्षत्रिय स्त्रीचेठायीं मागध १, ब्राह्मणीचेठायीं वैदेहक २, हे दोन प्रतिलोम, व शूद्रीचेठायीं करण हा १ अनुलोम असे ३ होतात. यांनीं—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्या ४ वर्णांच्या स्त्रियांचेठायीं उत्पन्न केलेले पुत्र पूर्ववत् १२, व हे मूळचे मागध, वैदेहक, करण असे ३ मिळून १५ होतात. तसेच क्षत्रियापासून वैश्य स्त्रीचेठायीं माहिष्य १, व शूद्रीचेठायीं उग्र २, हे दोन अनुलोम आणि ब्राह्मणीचेठायीं सूत हा १ प्रतिलोम असे ३ होतात. यांनीं ४ ही वर्णांच्या स्त्रियांचेठायीं पुत्र उत्पन्न केल्यास प्रत्येकाचे ४ । ४, मिळून १२ व ते स्वतः ३ मिळून १५ होतात. असेंच ब्राह्मणापासून क्षत्रियस्त्रीचेठायीं मूर्धावसिक्त १, वैश्यस्त्रीचेठायीं अंबष्ठ २, आणि शूद्रीचेठायीं पारसव ३ अनुलोम होतात. या तिघांनीं ४ हि वर्णांच्या स्त्रियांचेठायीं पुत्र उत्पन्न केल्यास; प्रत्येकीं ४ । ४, मिळून १२ व ते स्वतः ३ मिळून १५ होतील. असे ४ हि वर्णांपासून एकंदर ६० भेद होतात. व हे मूळचे दुष्टवर्ण ( स्ववर्णाहून भिन्नस्त्रीशीं गमन करणारे ब्राह्मणादिक ) ४ मिळून ६४ होतात. **जातिविवेकांत** याहून अन्य प्रकारें सांगितले आहेत. जसें—"वर्णाच्या आनुलोम्यानें ६ व प्रातिलोम्यानें ६ मिळून १२. हे ४ हि वर्णांशीं मिश्रित झाल्यास, १३६ होतात. यांहून संकर जातीचे अन्य बहुत भेद आहेत." हे सर्वहि शूद्रसम आहेत. कारण, "व्यभिचारज सर्वेहि शूद्रसमानधर्मे होत." असी **मनूक्ति** आहे.

## ॥ संकरजस्वरूपं वृत्तयश्च ॥

एतत्स्वरूपं वृत्तयश्चोक्ताः आदिपुराणेऽपि ॥ मूर्धावसिक्तो विप्राद्यः क्षत्रियायां प्रसूयते ॥ स करोति मनुष्याणां चिकित्सां रोगिणामपि ॥ १ ॥ अपिशब्दात्क्षात्रं कर्म च । ब्राह्मणाच्छूद्रकन्यायां भवेत्पारसवस्तु सः ॥ निषादो मत्स्यघातित्वं चक्रे राजाज्ञया सदा ॥ २ ॥ ब्राह्मणेनोग्रकन्यायामंबष्ठो नाम जायते ॥ स करोति मनुष्याणां चिकित्सां रोगिणामपि ॥ ३ ॥ विप्राद्वैश्याजः क्षत्राच्छूद्राजश्चेति द्वावंबष्ठौ । ब्राह्मणेन तथांबष्ठ्यामाभीरो जायते सुतः ॥ गोजाविरक्षां कुरुते स च राजगृहेष्वपि ॥४॥ आयोगव्यां ब्राह्मणात्तु जायते धिग्वणो नरः ॥ वैश्यायां शूद्रजा आयोगवी । स चर्मकारो विज्ञेयो गर्हितश्चर्मजीवनः ॥ ५ ॥ एते मातृसधर्माणो न पितुः पुत्रकाश्च षट् ॥ मूर्धावसिक्तपारसवांबष्ठाभीरचर्मकाराः प्रागुक्ता अवरोटश्चेति षट् । मूर्धावसिक्तोंऽबष्ठश्च निषादश्च तथा त्रयः ॥ ६ ॥ विप्रक्षत्रियविट्शूद्रनारीणां गमनादिह ॥ एकैकशस्तु चतुरो जनयंति सुतानपि ॥ ७ ॥ एते द्वादश विद्यन्ते मूलप्रकृतिभिर्युताः ॥ भवंति पंचदश वै विप्रः षोडशको भवेत् ॥ ८ ॥ मूर्धावसिक्ताद्विप्रायां प्रतिलोमाः । क्षत्रादिष्वनुलोमा इति च-

त्वारः। एवमंबष्ठान्निषादाच्चेति द्वादश। स्वयं चैते त्रय इति पंचदश। व्रात्यो विप्रः अवरोटो वा षोडशः॥ दस्युसंज्ञा भवंत्येते मातृवत्कर्मकारिणः॥ राज्ञो ब्राह्मणकन्यायां सूतो वर्णस्तु जायते॥ ९॥ स राज्ञामश्वसारथ्यं चक्रे दक्षश्च नित्यशः। सूतः प्रजापतिस्त्वन्यो मायारूपी जनार्दनः॥ १०॥ वक्ता वेदादिशास्त्राणां पुराणानां च स स्मृतः॥ अन्य इति नाम्नैव सूतो न तु जात्येत्यर्थः। उग्रादिसंज्ञावत्। सूतपुत्र उग्रश्रवा सौतिः पौराणिकोऽपि। तथा। क्षत्रियाद्वैश्यकन्यायां माहिष्यो नाम जायते॥ नक्षत्रगाननृत्यज्ञो धनानां परिरक्षिता॥ ११॥ राज्ञस्तु शूद्रकन्यायामुग्राख्यो नाम जायते॥ दुर्गांतःपुरकोशानां रक्षां विप्रेषु याचनं॥ १२॥ उग्रो दुष्टश्च दस्यूनां कश्चिदन्योऽपि विद्यते॥ सूतमाहिष्यकोग्रास्तु त्रयो वर्णचतुष्टयात्॥ १३॥ एकैकशस्तु चतुरो जनयंति सुतानपि॥ आत्मना सह राज्ञा तु तत्र षोडश संति ते॥ १४॥ देवलः। देवब्राह्मणबालस्त्रीदीनांधकृपणैस्तु यत्॥ उपार्जितं धनं तस्य परित्यागात्तु दस्यवः॥ १॥ ब्राह्मण्यामथ वैश्येन वैदेहो नाम जायते॥ एते द्वादश विद्यंते मूलप्रकृतिभिर्युताः॥ ३॥ भवंति पंचदश वै विप्रः षोडशको भवेत्॥ रक्षिता राजदुर्गाणां तद्वृत्तिपरसंयुतः॥ ३॥ क्षत्रियायां तु वैश्येन मुचुं( को ) पो[1] नामतो भवेत्॥ जले स्थले च यो मार्गस्तत्र रक्षां करोति सः॥ ४॥ राजदूतो वाद्यजीवो भवेत्कीर्तिप्रकाशकः॥ अयमेव बंदी। वैश्येन शूद्र्यां करणो वर्णः स्यात्प्रकरोति सः॥ ५॥ दुर्गांतःपुरगंजानां रक्षां ब्राह्मणसंग्रहम्॥ गंजा तु मदिरागृहमित्यमरः। संग्रहो रक्षणं। वैदेहमागधावेतौ करणश्चेति ते त्रयः॥ वर्णेभ्यः पूर्ववत्पुत्रान् जनयंति विमोहिताः॥ ते च षोडश जायंते मूलप्रकृतिभिः सह॥ ७॥ दुष्टानि वैश्यकर्माणि तेऽपि कुर्वंति दस्यवः॥ ब्राह्मण्यामथ शूद्रेण चंडालः स्याज्जुगुप्सितः॥ ८॥ स चक्रे राजमार्गादिशोधनं च कुकर्म च॥ राजस्त्रियां च शूद्रेण क्षत्ता मैदश्च जायते॥ ८॥ श्वाविध्यमथ गोधानां स चक्रे वधबंधनम्॥ आयोगवस्तु शूद्रेण वैश्यायां तु भवेच्च सः॥ १०॥ तक्षा स्थपतिरित्युक्तो राज्ञां वेश्मकरः सदा॥ दारुतक्षकस्तक्षा। पाषाणभेदकः स्थपतिरितिद्वावप्येतद्भेदौ। आयोगवस्तथा क्षत्ता चंडालश्चापि ते त्रयः॥ ११॥ चतुर्वर्णासु तनयान् जनयंत्यथ पूर्ववत्॥ शूद्रेण सहितास्ते तु संति षोडश संख्यया॥ १२॥ दुष्टानि यानि कर्माणि तेपि कुर्वंति दस्यवः॥ एते विप्रादयो ज्ञेयाश्चतुःषष्टिषु योनिषु॥ १३॥ उत्पादयंति सदृशान्संकीर्णानन्ययोनिषु॥ अत्र स्वभिन्नासु त्रिषष्टिभिर्जनितास्तासु वा तैर्जनिता एकैकस्य षड्विंशत्यधिकं शतं भेदाः। ते च चतुःषष्टिभिर्गुणिताः अष्ट सहस्राणि चतुःषष्टिश्च भवंति। तेषां वर्णसंकीर्णसंकरेणान्योन्यसंकराच्चानंत्यं भवति। विस्तरापत्तेर्नोच्यते। मनुः॥ शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः॥ वृषलत्वं गता लोके ब्राह्मणातिक्रमेण च॥ १॥ व्यभिचारेण वर्णानामवेद्यावेदनेन च॥ संगेन धर्मत्यागेन जायते वर्णसंकरः॥ २॥ संगो म्लेच्छादिनीचसंगतिः। एतेषु कांश्चिदाह मनुः॥ प्रसाधनोपचारज्ञमदासं दासजीविनम्॥ सैरंध्रं वागुरावृत्तिं सूते दस्युमयोगवी

१ पुस्तकान्तरे मुत्प इति दृश्यते।

**॥ ३ ॥ वैश्यायां शूद्रजाऽऽयोगवी । दस्योर्वर्णसंकरजान् सूते । ते च दस्यवो मनूक्ताः ॥ पौंड्रकाश्चौंड्द्रमिडाः कांबोजा यवनाः शकाः ॥ पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदास्तथा ॥ ४ ॥ मुखबाहूरुजातानां या लोके जातयो बहिः ॥ म्लेच्छवाचोर्यवाचो वा सर्वे ते दस्यवः स्मृताः ॥ ५ ॥ एते म्लेच्छभेदाः । प्रसाधनं मंडनं । उपचारोंऽगमर्दनादि । वसिष्ठस्तु वृत्त्यंतरमाह ॥ सैरंध्राणां सुरामद्यसीधुकरणं तद्विक्रयः पुष्पफलशाकविक्रयश्चेति । मनुः ॥ मैत्रेयकं तु वैदेहो माधूकं संप्रसूयते ॥ नृन्प्रशंसत्यजस्रं यो घंटावादोऽरुणोदये ॥ १ ॥ भवंत्यायोगवीष्वेते इति मनूक्तेर्वैश्यायां शूद्रजायोगव्यां विप्रायां वैश्यजाद्वैदेहान्मैत्रेयं सूते । स एव माधूकः निषादो मार्गरं सूते दाशं नौकर्मजीविनम् ॥ कैवर्तमिति यं प्राहुरार्यावर्तनिवासिनः ॥ २ ॥ क्षत्रायां शूद्रजान्निषादात्प्रागुक्तायोगव्यां दाश इत्यर्थः । ब्राह्मणादित्यनुवृत्तौ मनुः ॥ आभीरोंऽबष्ठकन्यायामायोगव्यां तु धिग्वणः ॥ वैश्यायां शूद्रजायोगवी । तस्यां विप्रजो धिग्वणः । वैश्यायां विप्रजांबष्ठी । तस्यां विप्रादाभीरः । अयं गोपालानुलोमः प्रसंगादुक्तः ॥ जातिविवेके ॥ वर्तनं गोमहिष्यादि पोषयेत्तृणवारिभिः ॥ पयो दधि घृतं तक्रं विक्रेतव्यं धनार्थिभिः ॥ १ ॥**

यांचें स्वरूप व वृत्ति सांगतो.

यांचें स्वरूप व वृत्ति **आदिपुराणां**त सांगितली आहे. जसें—" ब्राह्मणापासून क्षत्रियस्त्रीचेठायीं जो उत्पन्न होतो त्याला मूर्धावसिक्त ह्मणतात, त्यानें मनुष्यांची चिकित्सा व युद्धादि क्षत्रियकर्मे हीं करावीं. ब्राह्मणापासून शूद्रकन्येचे ठायीं होतो त्यास निषाद अथवा पारसव ह्मणतात. त्यानें मासे मारावे. ब्राह्मणापासून उग्रकन्येचे ठायीं उत्पन्न होतो त्यास अंबष्ट ह्मणतात; त्यानें मनुष्याची रोगचिकित्सा करावी. वैश्यस्त्रीचे ठायीं ब्राह्मणोत्पन्न १ व शूद्रीचेठायीं क्षत्रियोत्पन्न १—असे २ प्रकारचे अंबष्ट आहेत. अंबष्ठीचेठायीं ब्राह्मणापासून जो पुत्र उत्पन्न होतो त्यास आभीर ( गौळी ) ह्मणतात. त्यानें गायींचें संरक्षण करावें; आणि राजाच्या घरांत चोपदारी करावी. अयोगवीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास धिग्वण अथवा चर्मकार ह्मणतात. तो अति निंद्य चर्मावर निर्वाह करितो. हे सर्वहि मातृसधर्मे आहेत. पितृसधर्म नाहींत. मूर्धावसिक्त, पारसव अंबष्ठ, आभीर, चर्मकार हे ५ पूर्वी सांगितले आहेत व अबरोट ६ वा. मूर्धावसिक्त, अंबष्ट व निषाद या तिघांपासून ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य व शूद्र यांच्या स्त्रियांचेठायीं पुत्र उत्पन्न झाले तर प्रत्येकीं ४ । ४, मिळून—१२, व मूळचे ते ३ मिळून—१५, व विप्र १ मिळून १६ होतात. मूर्धावसिक्तापासून ब्राह्मणीचेठायीं उत्पन्न झालेला प्रतिलोम १, व क्षत्रियादिकांच्या स्त्रियांपासून उत्पन्न झालेले अनुलोम ३ मिळून ४, असे प्रत्येकीं अनुलोम व प्रतिलोम १२ व स्वतः ते ३ मिळून १५, ते व्रात्य विप्रासह १६ होतात. किंवा १६ वा अवंरोट धरावा. या सर्वांस दस्यु अशी संज्ञा आहे. त्यांनीं आपल्या आईच्या वर्णास विहित असतील तीं कर्मे करून निर्वाह करावा. क्षत्रियापासून विप्रकन्येचेठायीं

उत्पन्न होतो त्यास सूत ह्मणतात. त्यानें राजाचें अश्वसारथ्य करावें. व राजकार्य-कुशल असावें. यावरून, नैमिषारण्यांत दीर्घसत्री ऋषींस पुराण सांगणारा सूत यांतीलच असें समजूं नये. कारण, "मायेनें सूतरूपी साक्षात् विष्णूचा अवतार झालेला, ज्यास प्रजापति ह्मणत असत, व जो वेदादि सर्व शास्त्रपुराणांचा वक्ता असें ह्मणतात, तो पूर्वोक्त सूतांहून भिन्न आहे." अर्थात् नांवानें मात्र सूत. परंतु, जातीनें तसा नाहीं. जशा उग्रादि यथार्थ संज्ञा आहेत तद्वत् त्याची सूत ही संज्ञा अन्वर्थक नाहीं. कारण,—"**महाभारतां**त सूताचा ( रोमहर्षणाचा ) पुत्र उग्रश्रवा सौति पौराणिक." असें ह्मटलें आहे. यावरून, त्याच्या पित्याचें नांव सूत होतें ह्मणून त्यास सौति ह्मणत असत. "तसेंच क्षत्रियापासून वैश्यकन्येचेठायीं उत्पन्न होतो त्यास माहिष्य ह्मणतात. तो—नक्षत्रें, गायन, नाट्य, इत्यादि जाणणारा, व द्रव्यरक्षण करणारा होय. क्षत्रियापासून शूद्रकन्येचेठायीं उत्पन्न होतो त्यास उग्र ह्मणतात. तो किल्ले, अंतःपुर व भांडारगृह यांचा रक्षक होतो. याहून उग्रनांवाचा दस्यूंत गणलेला कोणी दुष्ट निराळाच आहे. सूत, माहिष्य, व उग्र या तिघांपासून प्रत्येकीं ब्राह्मणादि ४ वर्णांच्या स्त्रियांचेठायीं झालेले पुत्र ४। ४ मिळून—१२, व हे ३ मिळून १५ व व्रात्य क्षत्रिय १ असे १६ होतात." **देवल** ह्मणतो—"देव, ब्राह्मण, बाल, स्त्रिया, दीन, आंधळे व कृपण यांहीं जें संपादित द्रव्य त्याचा हे अपहार करितात ह्मणून या पूर्वोक्तांस दस्यु ह्मणावें." ब्राह्मणीचे ठायीं वैश्यापासून वैदेहनामक पुत्र होतो. हे पूर्वोक्त प्रकारें १२ व मूळचे ३ मिळून—१५ व व्रात्य विप्र १ असे १६ होतात. राजाचे किल्ल्याचें रक्षण करणारा व त्यावर निर्वाह करणारा असा क्षत्रियेचेठायीं वैश्यापासून मुचुप ( क ) नांवाचा पुत्र होतो. त्यानें राजाज्ञेनें उदक व स्थल यांवर शत्रूंस येण्याचे जे मार्ग असतात त्यांचें रक्षण करावें. दूतत्व, राजापासीं वाद्यें वाजविणें, व त्याची कीर्ति गाणें इत्यादि कर्मे करावीं. यासच वंदि ( भाट ) ह्मणतात. वैश्यापासून शूद्रीचेठायीं करण नामक होतो. त्यानें राजाच्या आज्ञेनें किल्ले, अंतःपुर, दारूचें घर, व ब्राह्मण यांचें रक्षण करावें. हे वैदेह, मागध, व करण तिघेहि ब्राह्मणादि चारवर्णांच्या स्त्रियांपासून १२ प्रकारचे पुत्र उत्पन्न करितात. व स्वतः ते ३ व व्रात्य वैश्य १ मिळून १६ यांस दस्यु ह्मणतात. हे सर्व निंद्य वैश्यांचीं कर्मे करितात. ब्राह्मणीचेठायीं शूद्रापासून उत्पन्न होतो तो अतिशूद्र ( महार ). त्यानें मोठे मार्गझाडणें लोटणें इत्यादि व अन्य कुत्सित कर्मे करावीं. क्षत्रियस्त्रीचेठायीं शूद्रापासून होतो त्यास क्षत्ता अथवा मेंद ह्मणतात. तो बरोबर कुत्रे घेऊन शिकार करून—साळयी, घोरपड इत्यादिकांचें बंधन व नाश

१ येथें अपत्यार्थीं तद्धित प्रत्यय होऊन—**सूतस्यापत्यं पुमान् सौतिः** असा शब्द सिद्ध झाला आहे. **उग्रश्रव्या**चा बाप जो **रोमहर्षण** त्याचें 'सूत' हें नांव होतें असें मानलें पाहिजे असें दिसतें. २ येथें—'करणानें दारूच्या घराचें रक्षण करावें' असें सांगितलें आहे. यावरून करण हे कलाल अथवा दारूचा व्यापार करणारे असें समजूं नये. तर त्या पदार्थावर राजाचा जो कर असेल तो वसूल होण्यापुरती त्यावर देखरेख ठेवावी इतकेंच यांचें काम आहे.

करितो. "वैश्येचेठायीं शूद्रापासून आयोगवनामक पुत्र होतो. त्यास तक्षा ( सुतार ) अथवा स्थपति (कारागीर) असें ह्मणतात. त्यानें राजांच्या व इतरांच्या घरांचीं वगैरे कामें करावीं" या दोनहि नांवांचा सूक्ष्म भेद असा आहे कीं,—तक्षा ह्मणजे लांकूड तासणारा, व दगडकाम करणारा स्थपति. हे दोनही एका आयोगवाचेच पोटभेद आहेत. आयोगव, क्षत्ता व चांडाल हे ३ घे चतुर्वर्णस्त्रियांपासून १२ प्रकारचे पुत्र उत्पन्न करितात. व ते आपण ३, व व्रात्यवैश्य १ मिळून १६ होतात. एकंदर—व्रात्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांपासून झालेले प्रत्येकीं १६ भेद मिळून ६४ होतात. हे आपल्याहून भिन्नवर्ण स्त्रियांचे ठायीं शेंकडों संकरजातीय उत्पन्न करितात. " येथें आपल्यावांचून, ६३ जातीच्या स्त्रियांचेठायीं यानीं उत्पन्न केले, अथवा त्यांनीं त्यांचेठायीं उत्पन्न केले असतां एकेकाचे १२६ भेद होतात. ते ६४.नीं गुणल्यास ८०६४ जाति होतात. त्यांनींहि स्ववर्णभिन्न स्त्रियांचेठायीं पुत्र उत्पन्न केले व त्यांचा अन्योन्य संकर झाल्यास अनंत जाति होतात. त्या विस्तारभयास्तव येथें सांगत नाहीं. **मनु** ह्मणतो—" हळूहळू कर्मलोप केल्यानें ह्या क्षत्रियजाति शूद्रत्वाला पावल्या आहेत. ब्राह्मणांच्या अतिक्रमानें व व्यभिचार आणि अग्राह्य स्त्रियांचें ग्रहण, म्लेच्छादिकांचा संग, स्वधर्माचा त्याग इत्यादि कारणानें वर्णसंकर होतात. " यांपैकीं कित्येक **मनूनें** सांगितले आहेत. ते—"वेणीफणी व उपचार करण्यास जाणणारा, दास नसून सेवावृत्तीनें निर्वाह करणारा, व हत्ती मृग इत्यादिकांस धरणारा, अशा सैरंध्रनामक दस्यूंस अयोगवी प्रसवते. ( वैश्यस्त्रीचे ठायीं शूद्रोत्पन्न कन्येस अयोगवी ह्मणतात. ) इजपासून दस्युसंयोगानें वर्णसंकरज होतात. ते दस्यु **मनूनें** सांगितले आहेत. जसें—"पौंड्रक, ओंड्र, द्रमिड, कांबोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन, किरात, दरद, हे ११ दस्यु होत. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांपासून ज्या अन्य संकरजाति होतात, त्यांपासून यांची उत्पत्ति आहे. ह्यांत कित्येक म्लेच्छभाषा व कित्येक आर्यांची भाषा बोलणारे आहेत. हे म्लेच्छभेद सांगितले आहेत. **वसिष्ठानें** तर,—सैरंध्रांची अन्य वृत्ति सांगितली आहे. ती—"त्यांनीं—सुरा, मद्य व सीधु करावीं व विकावीं. अथवा—पुष्प, फल, मूल, शाक यांचा विक्रय करावा." **मनु** ह्मणतो—"वैदेहापासून, आयोगवीचेठायीं मैत्रेयनामा होतो. यासच माधूक ह्मणतात. तो नेहेमीं राजादिकांची स्तुति करणारा व पहांटेस घंटा वाजविणारा होय. ( क्षत्रियस्त्रीचेठायीं शूद्रापासून झालेल्या )—निषादापासून पूर्वोक्त आयोगवीचेठायीं दाश ( अंबी ) नामक पुत्र उत्पन्न होतो. हा नित्य तरी ( नाव ) वाहून पोट भरणारा होय. यास आर्यावर्तांत राहणारे लोक कैवर्त ( धीवर कोळी ) अथवा

१ सांप्रत 'सुतार' या नांवानें प्रसिद्ध आहेत ते हेच होत, यांतही विद्यमानकालीं कित्येक पोटभेद आहेत त्यांचीं कारणें बरोबर समजत नाहींत. २ देशभाषेंत 'गवंडी' ह्मणतात ते हेंच होत. यांतही पोटभेद उपलब्ध होतात. ३ विंध्य (सातपुडा) पर्वत आणि हिमालय यांच्या मधल्या प्रदेशाला ' आर्यावर्त ' म्हणतात.

गावीत ह्मणतात. ब्राह्मणापासून झालेले या अनुवृत्तीचेठायीं **मनु** ह्मणतो—"ब्राह्मणापासून अंबष्ठी ( वैश्यस्त्रीचेठायीं विप्रापासून झालेली ) चेठायीं आभीर, व आयोगवीचेठायीं धिग्वण नामक उत्पन्न होतात. हा गोपाल अनुलोम होय. प्रसंगानें येथें सांगितला आहे. याची वृत्ति **जातिविवेकां**त सांगितली आहे. जसें—" यानें चारा पाणी देऊन गायी व ह्मशी पोसाव्या. व दूध, दहीं, ताक, तूप इत्यादि द्रव्य पाहिजे असल्यास विकावें."

## ॥ अथ भोज्यान्नाः ॥

**अस्य भोज्यान्नत्वमाह याज्ञवल्क्यः ॥ शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्द्धसीरिणः ॥ भोज्यान्ना नापितश्चैव यश्चात्मानं निवेदयेत् ॥ ४ ॥ शूद्रान्नभक्षणे मनुः ॥ राजान्नं तेज आदत्ते शूद्रान्नं ब्रह्मवर्चसं ॥ आयुः सुवर्णकारान्नं यशश्चर्मावकर्तिनः ॥ १ ॥ भुक्त्वातोऽन्यतमस्यान्नममत्या क्षपणं त्र्यहम् ॥ मत्या तु भक्षणे कृच्छ्रं रेतोविण्मूत्रमेव च ॥२॥ यत्तु शंखः ॥ शूद्रान्नं ब्राह्मणो भुक्त्वा तथा रंगावतारिणः ॥ चिकित्सकस्य क्रूरस्य तथा स्त्रीमृगजीविनः ॥ १ ॥ चंडालान्नं भूमिपान्नमजजीविश्वजीविनां । शौंडिकान्नं सूतिकान्नं भुक्त्वा मासं व्रतं चरेत् ॥ २ ॥ व्रतं गोमूत्रयावकं । इदमभ्यासे । आमान्ने तु तृतीयांशः । चंडालान्नं भुक्त्वा त्रिरात्रमुपवसेत्सिद्धान्नं भुक्त्वा पराकमिति माधवीये चंडालान्ने विष्णुना तथोक्तेः । चंडालान्नमामं । आपदि तु पराशरः ॥ आपत्काले तु विप्रेण भुक्तं शूद्रगृहे यदि ॥ मनस्तापेन शुद्ध्येत द्रुपदानां शतं जपेत् ॥ १ ॥ इदमामान्नपरम् । नाद्याच्छूद्रस्य पक्वान्नं विद्वानश्राद्धिनो द्विजः ॥ आददीताममेवास्माद्वृत्तौ चैकरात्रिकमिति मनूक्तेः । यत्तु याज्ञवल्क्यः ॥ शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्द्धसीरिणः ॥ भोज्यान्ना नापितश्चैव यश्चात्मानं निवेदयेदिति । यश्च देवलः ॥ स्वदासो नापितो गोपः कुंभकारः कृषीवलः ॥ ब्राह्मणैरपि भोज्यान्नाः पंचैते शूद्रयोनय इति । अत्रान्नशब्दोऽदनीयमात्रपरो न त्वोदनपरः । यत्तु भविष्ये ॥ उपक्षेपणधर्मेण शूद्रान्नं यः पचेद्द्विजः ॥ अभोज्यं तद्भवेदन्नं स च विप्रः पुरोहितः ॥ १ ॥ उपक्षेपणं शूद्रेण स्वान्नस्य पाकार्थं विप्रगृहे समर्पणमिति कल्पतरुः । इदं शुश्रूषकभिन्नपरं । त्रिषु वर्णेषु कर्तव्यं पक्वभोजनमेव च ॥ शुश्रूषामभिपन्नानां शूद्राणां च वरानने इति वाराहोक्तेः । तेन देवेभ्यो नैवेद्यमपि पक्वेनेति गंगावाक्यावली । सर्वं कलीतरपरमिति शुद्धितत्त्वे उक्तं । संसृष्टदुष्टभोज्येऽन्ने विशेषमाहापरार्के शूलपाणौ च सुमंतुः ॥ गोरसं चैव सक्तूंश्च तैलं पिण्याकमेव च ॥ अपूपान् भक्षयेच्छूद्राद्यच्चान्यत्पयसा कृतं ॥ १ ॥ पयसान्यासंसृष्टदुग्धेन कृतं पाकं विना । तेन पायसे दोष एव । पयसेति तृतीयया नैरपेक्ष्यावगतेः । शूद्रजले दोषोक्तेश्च । यच्चेति चकारादपूपेषु पयःकृतेष्वेव । तेन जलकृते पोलिकादौ दोष एवेत्यर्थः ॥ अत्रेदं तत्त्वं । द्विविधो द्विजः । शूद्रान्नरतस्तन्निवृत्तश्च । आद्यस्य पूर्वोक्तं शूद्रान्नं भोज्यं । अत एवापरार्के शूलपाणौ च हारीतः ॥ कंदुपक्वं स्नेहपक्वं पायसं दधि सक्तवः ॥ एतानि शूद्रान्नभुजो भोज्यानि मनुरब्रवीत् ॥ द्विजैरेतानि भोज्यानि शूद्रगेहकृतान्यपीति शुद्धितत्त्वे कौर्मोत्तरार्द्धे । पायसं पाकं विना**

क्षीरेण कृतम् । आमं शूद्रस्य पक्कान्नं पक्कमुच्छिष्टमुच्यते ॥ इति शातातपोक्तेः । यच्चान्यत्पयसा कृतमिति पूर्वमुक्तेः । इदं शूद्रगेहेऽपि भोज्यं । तदुक्तं शूलपाणौ ब्राह्मे ॥ राज्ञां पर्वणि वैश्यानामश्नीयान्मंगले गवाम् ॥ वासोभूरत्नहेमान्नं सच्छूद्रस्य गृहे तथेति । इदमपि कलौ वर्ज्यं । शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्द्धसीरिणां ॥ भोज्यान्नता गृहस्थस्य तीर्थसेवातिदूरतः ॥ १ ॥ ब्राह्मणादिषु शूद्रस्य पक्वतादिक्रियापि वेति च माधवीये पृथ्वीचंद्रोदये चादित्यपुराणात् । शूद्रान्ननिवृत्तस्य तु शूलपाणावंगिराः ॥ पात्रांतरगतं ग्राह्यं शूद्रात्स्वगृहमागतं ॥ शूद्रवेश्मनि विप्रेण क्षीरं वा यदि वा दधि ॥ १ ॥ निवृत्तेन न भोक्तव्यं शूद्रान्नं तदपि स्मृतम् ॥ विष्णुपुराणे ॥ संप्रोक्षयित्वा गृह्णीयाच्छूद्रान्नं गृहमागतम् ॥ यत्तु याज्ञवल्क्यः ॥ विकर्मस्थान् द्विजान् शूद्रान् सवासा जलमाविशेदिति शूद्रस्पर्शे स्नानमाह तद्दासादिभिन्नशूद्रपरं वा । अन्यथा ॥ मूल्यकर्मकराः शूद्रदासीदासास्तथैव च ॥ स्नाने शरीरसंस्कारे गृहकर्मण्यदूषिताः ॥ १ ॥ सद्यःस्पृश्यो गर्भदासो भक्तदासस्त्र्यहाच्छुचिरित्यादिविरोधात् । मनुः ॥ अभोज्यानां तु भुक्त्वान्नं स्त्रीशूद्रोच्छिष्टमेव च ॥ जग्ध्वा मांसमभक्ष्यं च सप्तरात्रं यवान्पिबेत् ॥ १ ॥ [म० स्मृ० अ० ] ज्ञाने द्विगुणम् ॥

यांचें ( अनुलोमगोपालाचें ) अन्न ब्राह्मणादिकांस भक्ष्य आहे असें **याज्ञवल्क्य** ह्मणतो. जसें—"शूद्रामध्यें—दास, गोपाल, कुलमित्र, अर्धसीरी ( शेतांतला वांटेकरी ), न्हावी व आत्मनिवेदनकर्ता ( मी तुझा आहें ह्मणून सांगणारा ) हे भोज्यान्न आहेत." या वाक्याची प्रवृत्ति युगांतरीं होती; पण कलियुगांत वर्ज्य आहे. शूद्रान्न भक्षण केल्यास त्याचा दोष **मनूनें** सांगितला आहे. जसें—"राजा, शूद्र व सोनार या तिघांचें अन्न, अनुक्रमें—तेज, ब्रह्मवर्चस ( वेदाध्ययनादिकांपासून झालेलें तेज ), आयुष्य यांचें हरण करितें. व जिनगराचें अन्न यश हरण करितें. या चौघांपैकीं न समजून कोणाचेंही अन्न भक्षण केल्यास ३ दिवस उपवास, व जाणून भक्षण केल्यास कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. रेत, विष्ठा व मूत्र भक्षण केलें असतांही हेंच प्रायश्चित्त करावें. जें **शंख** ह्मणतो कीं— "शूद्र सोंगाड्या, वैद्य, क्रूर, स्त्रीजीवी, ( बायकोच्या कसबावर पोट भरणारा ) व मृगजीवी, ( माकडें, अस्वलें वगैरे घरोघर फिरवून त्यांवर पोट भरणारा ) यांचें अन्न; व चांडाल, राजा, अजजीवि ( बोकडावर पोट भरणारा ), श्वजीवी ( कुत्रे शिकवून त्यांवर पोट भरणारा ), कलाल, व बाळंतीण, यांचें अन्न ब्राह्मणानें भक्षिल्यास १ मासपर्यंत गोमूत्रयावक व्रत करावें." हें प्रायश्चित्त कांहीं दिवस अन्नभक्षणाचा अभ्यास केल्यास करावें. व यांचें आमान्न भक्षिल्यास पूर्वोक्त प्रायश्चित्ताचा तृतीयांश करावा. कारण, "चांडालाचें आमान्न भक्षिल्यास त्रिरात्र उपवास, व शिजलेलें अन्न भक्षिल्यास पराक प्रायश्चित्त करावें." असें **पराशरमाधवीयांत** चांडालान्नाविषयीं **विष्णूनें** सांगितलें आहे, ह्मणून येथें चांडालान्नशब्दानें आमान्न घ्यावें. हेंच जर आपत्कालीं भक्षिलें तर, **पराशर** ह्मणतो—"आपत्कालीं ब्राह्मणानें शूद्रगृहीं

१ जव अथवा ते न मिळतील तर गहूं गोमूत्रांत भिजवून खाणें याला 'गोमूत्रयावक' ह्मणतात.

भोजन केल्यास तो पश्चात्तापानें शुद्ध होतो. नाहीं तर—" द्रुपदादिवे० " या सूक्ताच्या १०० आवृत्ति कराव्या." हें आमान्नाविषयीं समजावें. कारण, शूद्राचें शिजलेलें अन्न घेण्याविषयीं निषेध आहे. तो—"अश्राद्धी याप्रकारच्या शूद्राचें विद्वान् ब्राह्मणानें सिद्धान्न कधींही खाऊं नये. कदाचित् आपत्ति असल्यास एकरात्र पुरेल इतकें आमान्न त्यापासून घ्यावें. " असें **मनूनें** सांगितलें आहे. जें **याज्ञवल्क्यानें**—" शूद्रजातींपैकीं गोपालांचें अन्न घ्यावें." असें सांगितलें, व जें **देवलानें**—" आपला दास, न्हावी, गौळी, कुंभार, व शेती करणारा या ५ शूद्रजातींचें अन्न ब्राह्मणांनींही भक्षण करावें. " असें सांगितलें आहे. तेथें अन्नशब्द भक्षणास योग्य अशा धान्याचा वाचक आहे. भाताचा नाहीं. व जें **भविष्यपुराणां**त " उपक्षेपणधर्मानें शूद्रान्न [१]जो ब्राह्मण शिजवून भक्षील तें अन्न अभोज्य व तो जेवणारा ब्राह्मण पुरोहित होईल. " या वाक्यांत जो उपक्षेपण शब्द आहे त्याचा—शूद्रानें आपल्या घरचें आमान्न ब्राह्मणाचे घरीं शिजविण्यास दिलेलें." असा अर्थ **कल्पतरु** करितो. हें शुश्रूषकभिन्न शूद्रपर समजावें. कारण,—तीनही वर्णांत ब्राह्मणानें पक्कान्न भक्षण करावें, व सेवा करणाऱ्या शूद्राचेंहि अन्न खावें. " असें **वराहपुराण**वचन आहे. यावरून—" देवांस नैवेद्यही पक्कान्नानेंच द्यावा. " असें **गंगावाक्यावली** ग्रंथांत सांगितलें आहे. " शूद्राचें पक्कान्न भोजन करण्याचा हा सर्वहि विषय युगांतरीय आहे, तो कलींत वर्ज्य आहे " असें **शुद्धितत्त्वां**त सांगितलें आहे. संसृष्ट व दुष्ट भोज्यान्नाविषयीं विशेष प्रकार **अपरार्क** व **शूलपाणीं**त **सुमंतूनें** सांगितला आहे. तो—" गोरस, सक्तु, तेल, पेंड, अपूप ( कानवले इ० ) व जे अन्य दुधाचे पदार्थ—" येथें—दुधानें केलेले, असें ह्मटलें आहे यावरून दुधांत अन्य कांहीं न मिसळतां केलेले बासुंदी इ० दुधाचेच पदार्थ घ्यावे असा अभिप्राय आहे. यावरून पायस भक्षिल्यास त्यांत गोधूमादिकांचें मिश्रण होतें ह्मणून दोष आहेच. कारण, मूळवचनांत **'पयसा'** असा पयस् शब्दाचा तृतीयांत निर्देश केला आहे, त्यानें अन्याची अपेक्षा नाहीं असें अवगत होतें. व शूद्राकडचें उदक घेतल्यास दोष सांगितला आहे. आणखी यांत **'यच्च'** असा चकार आहे ह्मणून, अपूप खाणें तें केवळ दुधानेंच केलेले असतील तर खावे. पाण्यानें केलेल्या पोळ्या इत्यादिक खाल्ल्यास दोष आहे असा अभिप्राय होतो. आतां यांतील तत्त्व तर पुढें लिहिल्याप्रमाणें—ब्राह्मण २ प्रकारचे आहेत. १ शूद्राचें अन्न भक्षण करणारा व २ रा न

१ येथें 'पुरोहित होईल.' असें सांगितलें आहे; यावरून पुरोहित निंद्य आहे हें अर्थात् सिद्ध होतें. पुरोहितपणास निंद्यत्व धर्मशास्त्रांत अनेक ठिकाणीं वर्णन केलें आहे. यजमानानें कांहीं अविधि कर्म केलें तर यजमानापेक्षां पुरोहितास दोष अधिक सांगितला आहे. याविषयीं **वसिष्ठानें रामा**स सांगितलें आहे कीं—" हें पौरोहित्य अतिनिंद्य आहे हें मी जाणत असून **इक्ष्वाकूं**च्या वंशांत तूं साक्षात् विष्णु अवतार घेणार असें समजल्यावरून मीं हें पतकरलें आहे." याविषयीं **अध्यात्मरामायण** अयोध्याकांड पहा.

भक्षण करणारा. पहिल्यास पूर्वोक्तशूद्रान्न भोजनास योग्य आहे. अतएव **अपरार्क** व **शूलपाणीं**त **हारीत** ह्मणतो—" भट्टींत अथवा तेलांत पक्व झालेले पदार्थ पायस व दह्यांत मिळविलेले सक्तु हीं, शूद्रान्नसेवी ब्राह्मणास भोज्य आहेत असें **मनु** ह्मणतो." " हीं पूर्वोक्त शूद्रगृहांत केलेलीं असलीं तरी ब्राह्मणानें सेवावीं. " असें **शुद्धितत्त्वां**त **कूर्मपुराणां**तील एक श्लोकाचें उत्तरार्ध घेतलें आहे. **हारीत**वचनांत पायस शब्द आहे तो, शिजविल्यावांचून, केवळ दुधानें केलेल्याचा वाचक समजावा. कारण,— "शूद्राचें आमान्न शिजलेल्यासारखें व शिजलेलें उष्ट्यासारखें असें **ऋषी** ह्मणतात. " असी **शातातपो**क्ति आहे. व " जें अन्य दुधानें केलेलें असेल तें घ्यावें. " असें **सुमंतु**वचन आहे. हें शूद्राच्या घरींहि भक्षण करावें. तेंच **शूलपाणीं**त **ब्रह्मपुराणां**त सांगितलें आहे. जसें—"राजगृहीं पर्वकालीं व वैश्यगृहीं गायींच्या मंगलकार्यांत, व शूद्रगृहीं—वस्त्र, भूमि, रत्न, सुवर्ण, हीं त्यांपासून घेऊन अन्न ब्राह्मणानें भक्षण करावें. " परंतु हेंहि कलींत वर्ज्य आहे. कारण, "शूद्रांपैकीं दास गोपाल इत्यादिकांचे घरीं भोजन करणें व गृहस्थानें दूरची तीर्थयात्रा करणें व ब्राह्मणगृहीं शूद्रानें स्वयंपाक करणें, हीं कलींत निषिद्ध आहेत. " अशीं **पराशरमाधवीयां**त व **पृथ्वीचंद्रोदयां**त **आदित्यपुराण**वचनें घेतलीं आहेत. येथपर्यंत शूद्रान्न भक्षण करणाऱ्या ब्राह्मणाविषयीं सांगितलें. आतां शूद्रान्न न घेणाऱ्या ब्राह्मणाविषयीं **शूलपाणीं**त **अंगिरा** ऋषीचें वचन आहे. तें—"शूद्रानें आमान्न आपल्या घरीं आणून दिल्यास, तें त्याकरवीं आपल्या भांड्यांत ओतवून घ्यावें. शूद्रगृहीं—त्यांचें अन्न न स्वीकारणाऱ्या ब्राह्मणानें दूध व दहींसुद्धां सेवूं नये. कारण, तेंहि शूद्रान्न असें ह्मटलें आहे. " **विष्णुपुराणां**त,—" आपल्या घरीं आलेलें शूद्रान्न प्रोक्षण करून घ्यावें. " असें सांगितलें आहे. जें **याज्ञवल्क्य** ह्मणतो कीं,—" नित्यकर्मकर्ते ब्राह्मण व शूद्र यांचा स्पर्श झाल्यास, सचैल स्नान करावें. " तें दास गोपालादिक जे सच्छूद्र त्यांहून इतर शूद्रस्पर्शाविषयीं अथवा मुळींच स्पर्श न करून घेणाऱ्यांविषयीं जाणावें. नाहींपेक्षां—" मजुरीनें काम करणारे शूद्र, दासी व दास, हे, स्नान, शरीरसंस्कार ( स्त्रियांची वेणीफणी व पुरुषांचे अंगास तैलादिक लावणें ) व गृहकर्म करण्याविषयीं दूषित नाहींत. कदाचित् यांस आशौचादि आल्यास गर्भदास तत्काल व भक्तदास ३ दिवसांनीं पूर्वोक्त कर्मास शुद्ध होतो. " इत्यादि वचनांशीं विरोध येईल. **मनु** ह्मणतो—" अभोज्याचें अन्न व स्त्रीशूद्रांचें उच्छिष्ट आणि अभक्ष्य मांस, अज्ञानानें भक्षण केल्यास सप्तरात्रपर्यंत यवोदक पिऊन रहावें. जाणून भक्षण केल्यास १४ दिवस रहावें. "

**विश्वंभरशास्त्रे ॥ माहिष्यायां द्विजाज्जात आभीरः क्षीरविक्रयी ॥ उद्वाहः सुतो विप्राद्वैदेह्यां व्यभिचारतः ॥ १ ॥ स छत्रं धारयेत्कुर्यान्नराणां विक्रयं तथा ॥ क्षत्राद्वैश्यायां माहिष्या । वैश्याद्विप्रायां वैदेही। विप्रान्निषाद्यां यो जातः पौष्टिकः स्कंधवाहकः ॥ २ ॥ शूद्र्यां विप्रान्निषादी । अंबष्ठायां द्विजाज्जातः पुत्रः कांस्यस्य कर्मकृत् ॥ कांस्यपा-**

त्राणि चित्राणि रचयेज्जीवनाय सः ॥ ३ ॥ शूद्रधर्मेण सर्वत्र स्थितिरस्य विधीयते ॥ उग्रायां यो द्विजाज्जातः कुंभकारः स उच्यते ॥ ४ ॥ स शूद्राद्धीयते धर्मे घटयेन्मृन्मयान्घटान् ॥ जातिविवेके ॥ व्रात्यः क्षत्रियतः शूद्र्यां जातः शूद्रविधानकृत् ॥ स कुर्याद्राजपुत्रांश्च शस्त्रास्त्रकुशलान्धनम् ॥ १ ॥ तेभ्यो लब्ध्वात्मवृत्त्यर्थं स्वधर्ममनुपालयेत् ॥ राजगुरुः । तस्मान्मल्लः सुतो जातः क्षत्रिण्यां व्यभिचारतः ॥ राज्ञां कौतुकमापाद्य नियुद्धेनार्जयेद्धनम् ॥ वैश्याच्छूद्र्यामथांबष्ठ्यां जातो वैतालिकाभिधः ॥ २ ॥ जीवनं कामशास्त्रेण स्तुत्या वा वंदिकर्मणा । क्षत्रात्पारसवीपुत्रः किंनाटस्ताम्रकुट्टकः ॥ ४ ॥ वणिग्जनात्तु विप्रायां जातोऽतःपुरपालकः । ब्राह्मण्यां जायते वैश्याद्योऽसौ वैदेहकाभिधः ॥ ५ ॥ शुद्धांतरक्षणं राज्ञां कुर्यादनुश्रमं हि सः ॥ 'सामान्यवनिताः पोष्यास्तासामाद्या च जीविका'॥ ६ ॥ पण्यांगनानां राज्ञां च कुर्यात्संगं तदिच्छया ॥ रूपाजीवासु तास्वेव विशिष्यासंगतो विटः ॥ ७ ॥ स एव तासां प्राणेशो नान्यः कांतोऽपि तत्पतिः ॥ चतुःषष्टिकलाः कामशास्त्रं तदुपजीवनम् ॥ ८ ॥

**विश्वंभरशास्त्रांत**—" माहिष्यस्त्रीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास आभीर ( गौळी ) ह्मणतात. त्यानें गोरस विकून निर्वाह करावा. वैदेहीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास उदवाह ह्मणतात. त्यानें राजाच्या मस्तकीं छत्र धारण व मनुष्यविक्रय करावा. ब्राह्मणापासून निषादीचेठायीं झालेल्यास पौष्टिक ( भोई ) ह्मणावें. त्यानें पालखी, म्याने इत्यादि वहावीं. अंबष्ठीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास वोगार ह्मणावें. त्यानें पोट भरण्यास नानाप्रकारचीं कांशाचीं भांडीं वगैरे करून विकावीं. यानें शूद्रधर्मानें वागावें हें योग्य आहे. उग्रस्त्रीचेठायीं ब्राह्मणापासून उत्पन्न होतो त्यास कुंभार ह्मणतात. तो शूद्राहून धर्मानें कमी आहे. त्यानें मातीचीं भांडीं करावीं. " असें सांगितलें आहे. **जातिविवेकांत**—व्रात्य क्षत्रियापासून, शूद्रीचेठायीं शूद्रविधान कर्ता जो होतो त्यानें राजपुत्रांस शस्त्रांत कुशल करून. त्यांपासून द्रव्य मिळवून स्वधर्मपालन करावें. यास राजगुरु ह्मणतात. त्यापासून क्षत्रियस्त्रीचेठायीं व्यभिचारानें झालेल्या पुत्रास मल्ल ( पैलवान् ) ह्मणतात. त्यानें कसरतीनें राजाचा संतोष करून द्रव्य मिळवावें. वैश्यापासून शूद्री व अंबष्ठीचेठायीं झालेल्यास वैतालिक ह्मणतात. त्यानें कामशास्त्र व राजस्तुति व वंदीच्या कर्मानें निर्वाह करावा. क्षत्रियापासून पारसवीचेठायीं झालेल्यास किंनाट ह्मणतात. वणिक्जना—(वैश्यस्त्रीचेठायीं शूद्रोत्पन्नास वणिक्जन ह्मणतात. ) पासून ब्राह्मणीचेठायीं उत्पन्न झालेल्यास अंतःपुरपालक ह्मणावें. व वैश्यापासून ब्राह्मणीचेठायीं जो वैदेहक नामक होतो; त्यानें राजाचें अंतःपुररक्षण व सामान्य स्त्रियांचें ( नायकिणी, कुणबिणी, भाविणी इत्यादिकांचें ) पोषण करावें. व त्यावरच निर्वाहही करावा. त्या पण्यस्त्रिया राजादिकांस पाहिजे असल्यास त्यानें नेऊन द्याव्या. ( त्याचें काम जुळून द्यावें. ) स्वरूपावर पोट भरणाऱ्या—( नायकिणी )चेठायीं पूर्वोक्त वैदेहकापासून झालेल्यास विट ह्मणतात. तोच त्यांचा प्राणपति. अन्यानें

तिला ठेवली तथापि तो कांहीं कालाच्या मर्यादेनें तिचा पति असतो, परंतु विट हा त्यांचा नेहमींचा पति होय. त्यानें ६४ कला व कामशास्त्रावर[1] निर्वाह करावा."

चतुष्षष्टिकला भरतेनोक्ताः । वेदांगागमशिल्पशास्त्रकविता वक्तृत्वतौर्यत्रिकद्यूतास्त्राद्भुतवादसूपरचनाश्चित्रं पणो वैद्यकं ॥ नानारत्नपुराणलेखपुरुषस्त्रीधातुभाषालिपिप्रज्ञानाटककेलिदंतितुरगप्रज्ञा च सामुद्रिकम् ॥ १ ॥ शय्याभोजनयुद्धमर्दनविभूषाबंधसर्वेंगितज्ञानं रज्जुतरीकलारथकृतिः सौख्येऽष्टभोगेषु धीः ॥ त्राणे वारिविषाग्निवारिपु रथारेवांगशीर्षेषु यद्दुर्गारामकृतिः पशुद्विपनमेत्कारः (?) शिवार्चादयः ॥२॥ सुगंधं वनिता वस्त्रं गीतं तांबूलभोजनम् ॥ शय्या विभूषा सुरतं भोगाष्टकमुदाहृतम् ॥ ४७ ॥ [ स्कं० पु० स० अ० २६ ] शूद्राद्वैश्यायां यो जातो वणिग्जन इति स्मृतः ॥ पारसव्यां च माहिष्यान्मालाकारः स उच्यते ॥ १ ॥ कुसुमानि सशाकानि वर्द्धयेद्धनवृद्धये ॥ स हीनः शूद्रधर्मेभ्यः समूहे पञ्चके प्रभुः ॥ ४ ॥ सूताज्जातस्तु वैदेह्यां सूतकारः स जायते ॥ आयोगव्यां तु वैदेहाज्जातो मैत्रेयको भवेत् ॥ ३ ॥ घंटावादनकृत्प्रातस्तथा मंगलगानकृत् ॥ आयोगव्यां तु करणात्सैरंध्रो गंधकर्मकृत् ॥ ४ ॥ पुष्पचंदनपण्यादिशृंगारैस्तस्य जीवनम् ॥ पादयोः क्षालनं चैव धम्मिल्लानां प्रसाधनम् ॥ ५ ॥ प्रत्यंगमर्दनं चैव चंदनेनानुलेपनम् ॥ मृगनाभेश्चंद्रयोगं शृंगाररचनां नवां ॥ ६ ॥ आजीवनं तु तस्योक्तं तत्स्त्री सैरंध्रिका स्मृता ॥ विश्वंभरशास्त्रे । प्रसाधनोपचतुरा सैरंध्रीति प्रकीर्तिता ॥ शैवः पाशुपतः कश्चिदारूढः पतितो यदि ॥ १ ॥ जंगम इति प्रसिद्धः ॥ तस्माज्जातः शूद्रपत्न्यां पुत्रो भस्मांकुरः स्मृतः ॥ शिवार्चनं तु तत्कार्यं शिवदायेन जीवनम् ॥ २ ॥ स जटाभस्मधारी च शिवलिंगं प्रपूजयेत् ॥ तांबूलमक्षता द्रव्यं गावः क्षेत्राणि काकिणी ॥ ३ ॥ शिवाय प्राणिभिर्दत्तमन्यत्किमपि भक्तितः ॥ चंडीशं यत्क्षितौ ख्यातं तेन तस्येह जीविका ॥ ४ ॥ कुशीलवः सुतोऽवष्ठाद्वैदेह्यां नर्त्तनादिकृत् ॥ जातिविवेके ॥ माहिष्या मागधा चैव शुद्धमार्गकसंज्ञकं ॥ जनयेत्तनयं सोऽपि शूद्रधर्मविनाकृतः ॥ १ ॥ गीतं चतुर्विधं वाद्यमभ्यसेज्जीवनाय सः ॥ संगीतशास्त्रे ॥ तत्रादौ त्रिविधं गीतं वाद्यं चापि चतुर्विधं ॥ चतुर्दशविधं नृत्यं गीतपूर्वं विचक्षणैः ॥ १ ॥ चतुर्विधं वाद्यमाहामरसिंहः ॥ ततं वीणादिकं वाद्यमानद्धं मुरजादिकम् ॥ वंशादिकं तु सुषिरं कांस्यतालादिकं घनं ॥ १ ॥ अयं मृदंगजीवी । निर्मंडलक आभीराज्जातोऽसौ बाणपिच्छकृत् ॥ शराणां शरपत्रैश्च रचना तस्य जीविका ॥ २ ॥ उग्रायां मागधाज्जातः कुंतलश्मश्रुकर्मकृत् ॥ स नापित इति प्रोक्तः क्षौरकर्मविधानकृत् ॥ २ ॥ क्षत्राच्छूद्राज उग्रः । वैश्यात्क्षत्राजो मागधः । श्मश्रुकर्तनकृच्चैव नखकर्तनकोविदः ॥ वृत्त्यानया ग्राममध्ये तिष्ठेद्वर्णेषु सेवकः ॥ २ ॥ नराणां ना-

१ **वात्स्यायन** नांवाच्या ऋषीनें कामसूत्रें केलीं आहेत. त्यांसच **कामशास्त्र** ह्मणतात. **जयदेव** इत्यादि कवींनीं **रतिमंजरी** वगैरे ग्रंथ केले आहेत; पण ते सर्व वर सांगितलेल्या कामसूत्राच्या आधारें रचले असावे, असें वाटतें.

पितो धूर्तः शूद्रेभ्योऽभ्यधिकः स्मृतः ॥ वृद्धमनुः ॥ शूद्रकन्यासमुत्पन्नो ब्राह्मणेन तु संस्कृतः ॥ अपरो नापितः प्रोक्तः शूद्रधर्माधिकोऽपि सः ॥ १ ॥ याज्ञवल्क्येन तु शूद्र एव नापित उक्तः ॥ शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्द्धसीरिणः ॥ भोज्यान्ना नापितश्चैवेति । शंखेन तु प्रतिलोमजोऽयमुक्तः । यत्तु सूतसंहितायां ॥ ऊर्ध्वनापितोऽधोनापितश्चेति द्वैविध्यमुक्तं तद्व्यवस्थितं ज्ञेयम् ॥

६४ कला **भरतानें** सांगितल्या आहेत. त्या—“ वेदांगज्ञान १, आगमज्ञान २, शिल्पज्ञान ३, शास्त्रज्ञान ४, कविता करणें ५, वक्तृत्व ६, तौर्यत्रिक नाच गायनादि ७, जुगारखेळ ८, अस्त्रज्ञान ९, अद्भुतवाद करणें १०, स्वयंपाक करणें ११, चित्रें काढणें १२, वैद्यकीकरणें १३, रत्नपरीक्षा १४, पुराणज्ञान १५, ग्रंथलेखन, १६, पुरुषधातुपरीक्षा १७, स्त्रीधातुपरीक्षा १८, अनेक भाषा व लिपि जाणणें १९, नाट्यज्ञान २०, हत्ती घोडे इत्यादिकांची परीक्षा करणें २१, सामुद्रिक ज्ञान २२, शय्याकल्पना २३, भोजनरसज्ञान २४, युद्धकौशल्य २५, अंगमर्दन २६, अलंकार घालण्याचें ज्ञान २७, विलक्षण गांठी मारणें २८, सर्वांचें इंगित जाणणें २९, रेशमादिकांचे गोफ वळणें ३०, नौका वाहण्याचें ज्ञान ३१, गायनादिक कलांचें ज्ञान ३२, रथाची कृति ३३, सुगंधज्ञान ३४, स्त्रीसंभोग ज्ञान[1] ३५, वस्त्रस्वीकरण ३६, गायन ३७, तांबूलभक्षण ३८, शय्या ३९, विशिष्ट अलंकार ४०, सुरतक्रीडा ४१, उदकस्तंभन ४२, विषस्तंभन ४३, अग्निस्तंभ ४४, रथ वाहणें ४५, अंगक्रीडा ४६, मस्तकक्रीडा ४७, किल्ले बांधणें ४८, बाग करणें ४९, सर्व प्रकारच्या पशूंचें दमन ५०, बाण घडविणें ५१, बाण सोडणें ५२, शिवपूजादि ज्ञान ५३, अष्टभोगज्ञान[2] ५४; कीरादि पक्ष्यांचें भाषण जाणणें ५५, वेणी घालणें ५६, वृक्षादिकांचें आयुष्य जाणणें ५७, खाणीचें ज्ञान ५८, नानातऱ्हेच्या पुष्पमाला करणें ५९, कपडे शिवणें ६०, समस्यापूरण ६१, गारुड ६२, खड्गबंधादि श्लोकरचना ६३, हस्तलाघव ६४, ह्या होत. पारसवीचेठायीं माहिष्यापासून झालेल्यास मालाकार ( माळी ’) असें ह्मणतात. त्यानें फुलझाडें व भाजीपाला लावून त्याजवर द्रव्य मिळवावें. तो शूद्राहून हीन आहे. सूतापासून वैदेहीचेठायीं झालेल्यास सूतकार ह्मणतात. आयोगवीचेठायीं वैदेहकापासून उत्पन्न झालेल्यास मैत्रेयक ह्मणतात. त्यानें प्रातःकाली घंटा ( तास ) वाजवाव्या व मंगलगायन करावें. आयोगवीचेठायीं करणापासून झालेल्यास

१ स्त्रीसंभोग पश्वादिकांसही माहीत आहे; पण त्याविषयींचें जें कौशल्य तें कांहीं महत्त्वाचें आहे ह्मणून त्याचें येथें ग्रहण केलें आहे. याविषयीं **वात्स्यायन** ऋषीनें केलेलें **कामदर्शन** पहावें. ह्मणजे ज्याला त्या दर्शनाची माहिती नाहीं त्याचें आणि पश्वादकांचें विषयसेवन समान आहे असें वाटेल.

२ सुगंध, स्त्री, वस्त्र, गायन, विडा, बिछाना, अलंकार आणि सुरत यांस भोगाष्टक ह्मणतात. याविषयीं **स्कंदपुराण** सह्याद्रिखंड अ० २६ श्लो० ४७ पहा.

सैरंध्र ह्मणतात. त्यानें राजादिकांच्या अंगास सुगंधितैलादिक लावावें. पुष्प चंदनादिक शृंगारिक पदार्थांचा विक्रय करावा व राजाचे पाय घांसावे. हीं त्याचीं निर्वाहकर्में होत. आणखी केश विंचरणें, तैलमर्दन, चंदन लावणें, कस्तुरीचे वेलबुट्टे काढणें, नवीं नवीं शृंगाररचना करणें हेंही त्याचें जीवन होय. " त्याच्या बायकोस सैरंध्रिका ह्मणावें. " तिजविषयीं **विश्वंभरशास्त्रां**त—" वेणीफणी व अलंकार घालण्याविषयीं चतुर, अशा स्त्रीस सैरंधी ह्मणतात. शैव अथवा पाशुपत ( जंगम ) कोणीहि आरूढपतित होऊन, त्यापासून शूद्रस्त्रीचेठायीं जर पुत्र झाला तर त्यास भस्मांकुर[2] ह्मणावें. त्यानें शिवपूजन व त्याचें निर्माल्य विसर्जनादिक करावें. शिवाच्या वृत्तीवर[3] निर्वाह करावा. जटा भस्म इत्यादि धारण करून, शिवलिंगाची पूजा करावी. तांबूल, अक्षता, द्रव्य, गायी, शेतें, व कवड्या इत्यादि जें इतरांनीं शिवालाच अर्पण केलें असेल त्यावर निर्वाह करावा. त्या द्रव्यास चंडीश असें ह्मणतात. "वैदेहीचेठायीं अंबष्ठापासून झालेल्यास कुशीलव ह्मणतात. त्यानें नाच तमाशे करावे." असें सांगितलें आहे. **जातिविवेकां**त—"माहिष्यापासून मागधीचेठायीं जो शुद्धमार्गक नांवाचा पुत्र होतो; तोहि शूद्रधर्मवहिष्कृत होय. त्यानें निर्वाहार्थ ४ प्रकारच्या गायनाचा अभ्यास करावा." गायनाविषयीं **संगीतशास्त्रां**त सांगितलें आहे कीं,— " ३ प्रकारचें गायन ४ प्रकारचें वाद्य व १४ प्रकारचा नाच हीं सर्व गायनपूर्वक आहेत. असें कुशलांनीं वर्णन केलें आहे." ४ प्रकारचें वाद्य **अमरसिंहानें** सांगितलें आहे तें—"वीणादिक वाद्यांस तत १, मुरजा (मृदंग)—दिकांस आनद्ध २, पांवा, शंख इत्यादिकांस सुषिर ३, व तास झांज इत्यादिकांस घन ह्मणतात, असे ४ प्रकार आहेत." हें कर्म करणारास मृदंगजीवी ( मृदंगी ) ह्मणतात.

---

१ कांहीं संकट प्राप्त झाल्यामुळें—पतीचा वियोग होऊन अथवा त्याच्यासह दुसऱ्याच्या घरांत व्यभिचारादि न करितां सेवा करून पोट भरणारीस ' सैरंध्री ' ह्मणतात. हें **द्रौपदी-विराट**राजाच्या घरीं होती त्यावेळीं तिला सैरंध्री ह्मणत, व **दमयंती-सुबाहु**राजाच्या घरीं होती त्यावेळीं तिलाही सैरंध्रीच ह्मणत यावरून सिद्ध होतें. **अमरसिंहानें**ही—"**सैरंध्री परवेश्मस्था**" असें ह्मटलें आहे.

२ सांप्रत ज्यांस 'गुरव' ह्मणतात ते हेच असावे. बहुतकरून हिंदुस्थानांतल्या सर्व प्रदेशांत जीं जीं जुनाट शिवस्थानें आहेत तेथें वतनदार पुजारी गुरव असतात. यांत कित्येक लिंगायत आहेत. व कित्येक तर—जानवीं घालणारे, विधवांचें केशवपन वगैरे करून ब्राह्मणासारखे वागणारे असे आहेत, आणि कित्येक शूद्रासारखे वागणारे आहेत त्यांतून ब्राह्मणासारखे वागणारे हे कुंड अथवा गोलक असावे. आणि शूद्रासारखे वागणारे ते 'भस्मांकुर' असावे असें वाटतें.

३ शिवाचें निर्माल्यविसर्जन ब्राह्मणानें करूं नये. [ याविषयीं **धर्मसिंधु** प० ३ पूर्वार्ध हेंच प्रकरण पहा. ] अतएव ह्या संकरजातीची त्या कामीं योजना केली असावी. ४ केवळ **शिवाचा** नैवेद्य, तीर्थ, प्रसाद वगैरे घेऊं नये. जर त्यांत शालग्राम ( विष्णु ) असेल तर ग्रहण करण्यास प्रत्यवाय नाहीं. याविषयीं **धर्मसिंधु** पं० ३ पूर्वार्ध पूजाप्रकरण पहा.

आभीरापासून निर्मंडलकनामक होतो. त्यानें बाण घडवावे, व त्यांस पंखादिक लावावे. "उग्रस्त्रीचेठायीं मागधापासून होतो त्यास नापित ह्मणतात. त्यानें, हजामती करून लोकांचा चेहरा बनवावा. यानें केश व नखें छेदन करण्याविषयीं चतुर असावें. गांवांत राहून चारहि वर्णांची श्मश्रुकर्मरूप सेवा करून पोट भरावें. मनुष्यांत हा मोठा धूर्त आहे. हा शूद्राहून किंचित् उंच प्रतीचा आहे." **वृद्धमनु** ह्मणतो—"शूद्रकन्येचेठायीं ब्राह्मणापासून झालेला व त्यानें संस्कार केलेला हा पूर्वोक्त नापिताहून भिन्न व शूद्राहून धर्मानें किंचित् अधिक होय." **याज्ञवल्क्यानें** तर, शूद्रासच नापित ह्मटलें आहे. [ **शूद्रेषु दासगोपाल०** हें वचन पहा. ] **शंखानें** तर यासच प्रतिलोमज ह्मटलें आहे. जें **सूतसंहितेंत**,—"ऊर्ध्वनापित व अधोनापित[१]" असे २ प्रकार सांगितले आहेत, ते देशभेदानें व्यवस्थित जाणावे.

## ॥ अथ कायस्थोत्पत्तिः ॥

पाद्मे सृष्टिखंडे ॥ सृष्ट्यादौ सदसत्कर्मज्ञप्तये प्राणिनां विधिः ॥ क्षणं ध्याने स्थितस्तस्य सर्वकायाद्विनिर्गतः ॥ १ ॥ दिव्यरूपः पुमान्हस्ते मषीपात्रं च लेखनीम् ॥ चित्रगुप्त इति ख्यातो धर्मराजसमीपतः ॥ २ ॥ प्राणिनां सदसत्कर्मलेख्याय स नियोजितः ॥ ब्रह्मणातींद्रियज्ञानी देवाग्न्यो यज्ञभुक्सदा ॥ ३ ॥ भोजनाच्च सदा तस्मादाहुतिर्दीयते द्विजैः ॥ ब्रह्मकायोद्भवो यस्मात्कायस्थो जातिरुच्यते ॥ ४ ॥ नानागोत्राश्च तद्वंश्याः कायस्था भुवि संति वै ॥ स्कांदे रेणुकामाहात्म्ये ॥ एवं हत्वार्जुनं रामः संधाय निशितान् शरान् ॥ अन्वधावत्स तान् हंतुं सर्वानेवातुरान् नृपान् ॥ १ ॥ केचिद्गहनमागत्य केचित्पातालमाविशन् ॥ सगर्भा चंद्रसेनस्य भार्या दाल्भ्याश्रमं ययौ ॥ २ ॥ ततो रामः समायातो दाल्भ्याश्रममनुत्तमम् ॥ पूजितो मुनिना रामो ह्यर्घ्यपाद्यासनादिभिः ॥ ३ ॥ ददौ मध्याह्नसमये तस्मै भोजनमादरात् ॥ रामस्तु याचयामास हृदिस्थं स्वमनोरथं ॥ ४ ॥ याचयामास रामाच्च कामं दाल्भ्यो महामुनिः ॥ ततो द्वौ परमप्रीतौ भोजनं चक्रतुर्मुदा ॥ ५ ॥ भोजनानंतरं दाल्भ्यः पप्रच्छ भार्गवं प्रति ॥ यत्त्वया प्रार्थितं देव तत्त्वं शंसितुमर्हसि ॥ ६ ॥ राम उवाच ॥ तवाश्रमे महाभाग सगर्भा स्त्री समागता ॥ चंद्रसेनस्य राजर्षेः क्षत्रियस्य महात्मनः ॥ ७ ॥ तन्मे त्वं प्रार्थितं देहि हिंसेयं तां महामुने ॥ ततो दाल्भ्यः प्रत्युवाच ददामि तव वांछितं ॥ ८ ॥ यन्मया प्रार्थितं देव तन्मे दातुं त्वमर्हसि ॥ ततः स्त्रियं समाहूय चंद्रसेनस्य वै मुनिः ॥ ९ ॥ रामाय प्रददौ भीतां रामः प्रीतमना अभूत् ॥ राम उवाच ॥ यत्त्वया प्रार्थितं विप्र भोजनावसरे पुरा ॥ तन्मे शंस महाभाग ददामि तव वांछितम् ॥ १० ॥ दाल्भ्य उवाच ॥ स्त्रियो गर्भममुं

१ मलबार वगैरे देशांत ( खालचे ) केश काढणारे न्हावी आहेत तेच अधोनापित होत. यांची उत्पत्ति पुढें सांगेलें.

बालं तन्मे त्वं दातुमर्हसि ॥ ततो रामोब्रवीद्दाल्भ्यं यदर्थमहमागतः ॥ ११ ॥ क्षत्रियांतकरश्चाहं तं त्वं याचितवानसि ॥ प्रार्थितश्च त्वया विप्र कायस्थो गर्भ उत्तमः ॥ १२ ॥ तस्मात्कायस्थ इत्याख्या भविष्यति शिशोः शुभा ॥ एवं रामो महाबाहुर्हित्वा तं गर्भमुत्तमं ॥ १३ ॥ निर्जगामाश्रमात्तस्मात् क्षत्रियांतकरः प्रभुः ॥ कायस्थ एष उत्पन्नः क्षत्रिण्यां क्षत्रियात्ततः ॥ १४ ॥ रामाज्ञया स दाल्भ्येन क्षात्रधर्मात् बहिष्कृतः ॥ दत्तः कायस्थधर्मोऽस्मै चित्रगुप्तस्य यः स्मृतः ॥ १५ ॥ तद्गोत्रजाश्च कायस्था दाल्भ्यगोत्रास्ततोऽभवन् ॥ दाल्भ्योपदेशकास्ते वै धर्मिष्ठाः सत्यवादिनः ॥ १६ ॥ सदाचारपरा नित्यं रता हरिहरार्चने ॥ देवविप्रपितॄणां वै अतिथीनां च पूजकाः ॥ १७ ॥ माहिष्यवनिता सूनुं वैदेहाद्यं प्रसूयते ॥ स कायस्थ इति प्रोक्तस्तस्य कर्म विधीयते ॥ १ ॥ क्षत्राद्वैश्यायां माहिष्या । विप्रायां वैश्यजो वैदेहः । लिपीनां देशजातानां लेखनं स समाचरेत् ॥ गणकत्वं विचित्रं च बीजपाठी प्रभेदतः ॥ २ ॥ अधमः शूद्रजातिभ्यः पंचसंस्कारवानसौ ॥ चातुर्वर्ण्यस्य सेवा हि लिपिलेखनसाधनम् ॥ ६ ॥ व्यवसायः शिल्पकर्म तज्जीवनमुदाहृतं ॥ शिखां यज्ञोपवीतं च वस्त्रमारक्तमंभसा ॥ ७ ॥ स्पर्शनं देवतानां च कायस्थाद्यो विवर्जयेत् ॥ इति कायस्थः ॥

आतां कायस्थांची उत्पत्ति सांगतो.

याविषयीं **पद्मपुराणां**त सृष्टिखंडांत—"सृष्टीच्या पूर्वी प्राणिमात्रांचें चांगलें व वाईट कर्म कसें जाणावें ? ह्मणून सर्व कामें सोडून ब्रह्मदेव क्षणभर ध्यानस्थ बसला. इतक्यांत दिव्यरूपी आणि हातांत दऊत व लेखणी घेतलेला **चित्रगुप्त**-नामक पुरुष त्याच्या शरीरापासून उत्पन्न झाला. त्यास पाहून ब्रह्मदेवानें त्यास **यमधर्मा**जवळ जीवांचें चांगलें व वाईट कर्म लिहिण्यास नेमला. ब्रह्मदेवाच्या कृपेनें त्यास अतींद्रियज्ञान व देवांत मुख्यत्व मिळालें. ज्याहेतूस्तव तो प्रथम यज्ञभाग घेणारा ह्मणून, भोजनाच्या अन्नांतून ब्राह्मण त्यास प्रतिदिवसीं आहुति[1] देतात. ब्रह्मदेवाच्या कायापासून ( देहापासून ) झाला ह्मणून, त्यास कायस्थ[2] ह्मणतात. त्याच्या वंशांत झालेले अनेक गोत्री भूमीवर प्रसिद्ध आहेत." असें सांगितलें आहे. **स्कंदपुराणां**त **रेणुकामाहात्म्यां**त—"याप्रमाणें **परशुराम सहस्रार्जुना**स मारून, धनुष्यास तीक्ष्ण बाण लावून सर्व आतुर झालेल्या राजांस मारावें ह्मणून यांच्या मागें धांवला. त्यावेळीं कित्येक गहन अरण्यांत, व कित्येक पातालांत लपाले. **चंद्रसेन**[3] राजाची स्त्री गर्भिणी होती ती **दाल्भ्यऋषी**च्या आश्रमास गेली. मग सर्व राजे पळालेसें पाहून परशुराम—'क्षत्रियांचें बीजही ठेवणार नाहीं' ही आपली

१ ब्राह्मण लोक भोजनाच्या प्रारंभीं 'चित्राहुति' ह्मणून देत असतात त्या ह्याच होत.

२ हे चित्रगुप्त कायस्थ होत. हा यांतला पहिला भेद आहे. यांचीं गोत्रें अनेक आहेत. **गागाभट्ट** नावाच्या पंडितानें—**"कायस्थोत्पत्ति"** नांवाचा ग्रंथ केला आहे त्यांत त्यांचे धर्म वगैरे सविस्तर सांगितले आहेत. ३ हा राजा चंद्रवंशीय **उशीनर** राजाच्या कुळांतला असावा.

प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां त्या स्त्रीचा गर्भ नाश करावा' ह्मणून तिच्या मागून दाल्भ्याच्या आश्रमांत गेला. त्यास पाहून ऋषीनें सत्कारपूर्वक अर्घ्यपाद्यादिकानें त्याची पूजा करून, मध्यान्हीं आला ह्मणून आदरानें त्यास भोजन दिलें. त्यावेळीं चंद्रसेनाची स्त्री दाल्भ्यानें पाठीशीं घेतली आहे असें जाणून, आपला मनोरथ सिद्ध व्हावा एतदर्थ रामानें दाल्भ्यासीं वर मागितला. तो देण्याचें कबूल करून त्यानें उलट परशुरामापासीं वर मागितला तो रामानें देतों ह्मटल्यावर, दोघेहि परमसंतोषानें भोजन करूं लागले. नंतर दाल्भ्यानें रामास पुसलें कीं, जें तूं मागितलेंस तें काय तें सांग? राम ह्मणाला तुझ्या आश्रमांत चंद्रसेन राजाची गर्भिणी स्त्री आली आहे, ती मला दे. मी तिचा घात करणार, हें वाक्य दाल्भ्यानें मान्य करून सांगितलें कीं, तुझें इच्छित मी देतों परंतु मी मागितलें तें दे. असें ह्मणून त्या स्त्रीस बोलावून रामाचे स्वाधीन केली. मग राम संतुष्ट होऊन ह्मणतो, हे ऋषे! भोजनकालीं जें तूं मागितलेंस तें माग. दाल्भ्य ह्मणाला—हे रामा! या स्त्रीचा गर्भ मला दे. हें ऐकून राम खिन्न होऊन ह्मणतो—मी क्षत्रियांतक ह्मणून या गर्भाचा नाश करण्याकरितां आलों असून, तोच तूं मागतोस अतएव—कायांत (देहांत) असलेला गर्भ त्वां मागितलास ह्मणून या गर्भास **कायस्थ** असें ह्मणतील, असें बोलून तो राम स्वाश्रमास गेला. तो हा कायस्थ नामा, क्षत्रियीचेठायीं झाला असून, रामाज्ञेनें दाल्भ्यानें क्षत्रधर्मबहिष्कृत केला. यास चित्रगुप्ताचा धर्म (लेखन) दिला. त्याच्या वंशजांस दाल्भ्यगोत्र चालत आहे. दाल्भ्याच्या उपदेशानें ते धर्मिष्ठ सत्यवादी व आचारसंपन्न शिव, विष्णु देव ब्राह्मण, व अतिथींचे पूजक होत." माहिष्याची स्त्री (क्षत्रियापासून, वैश्यस्त्रीस झालेली कन्या) हिचेठायीं वैदेहापासून (ब्राह्मणीचेठायीं वैश्योत्पन्न) जो पुत्र होतो त्यासहि कायस्थ ह्मणतात. त्याचें कर्म सांगतो. भिरनिराळ्या लिपि लिहिणें, बीजगणितादि अनेक प्रकारचें गणित, इत्यादि त्यास विहित आहे. हा शूद्राहून अधम ह्मणून याचे पांचच संस्कार करावे. यानें लेखनद्वारा चारहि वर्णांची सेवा व शिल्प करून, निर्वाह करावा. ब्राह्मणी रीतीची शेंडी, यज्ञोपवीत, रक्त वस्त्र, यांचें धारण व देवस्पर्श इत्यादि करूं नये. हे पूर्वोक्त दाल्भ्यगोत्रीय कायस्थांहून भिन्न आहेत ॥ **इति कायस्थोत्पत्तिः** ॥

## ॥ अथसंकीर्णप्रकरणम् ॥

**मालाकाराच्च लावद्यः करण्यां मणिरंध्रकृत् ॥ मणिहारः मंजुरिति चोच्यते । कुनाल्यां शाल्मलो मंजोर्नागवल्यास्तु विक्रयी ॥ १ ॥ तांबूलक्रीतसंभूतं द्रव्यं तस्येह जीवनम् ॥ मालाकारात्क्षत्रियायां शिलींध्रो मर्दनक्रियः ॥ २ ॥ हीनः स शूद्रधर्मेभ्यो जीविकास्यांगमर्दनम् ॥ शिलींध्रात्क्षत्रियायां च कोल्हाटीनाम जायते ॥ ३ ॥ बहुरू-**

---

१ हे चंद्रसेन कायस्थ. हा यांचा दुसरा भेद होय. यांचें एकच दाल्भ्य गोत्र आहे.

२ हा यांतला तिसरा भेद होय. यांस—' संकरज कायस्थ ' ह्मणतात.

पीति प्रसिद्धः । वैश्यात्करण्यां यो जातो गोचारी वत्सपालकः ॥ नाम्ना छगलकं पुत्रं धटधानादजीजनत् ॥ ४ ॥ मंजुभार्यासुतो लोके अजपाल इति स्मृतः ॥ तथा ॥ कर्मचंडालभार्यायां यो जातः पुष्पशेखरात् ॥ स वै मंडलको नाम शुनां मंडलपोषकः ॥ ५ ॥ युगुलं शुनकानां स धर्तुं योज्यो महीभृता ॥ विधवायां यतेर्जातः कर्मचंडाल उच्यते ॥ ६ ॥ वापीकूपादिसृत्कर्मकर्ता चास्पृश्य एव सः ॥ जातिविवेके ॥ अंबष्ठाच्चैव वैदेह्यां जातः पुत्रः कुशीलवः ॥ संगीतज्ञो नृत्यकर्ता देशाद्देशांतरं व्रजेत् ॥ १ ॥ आयोगवान्मागधायां भ्रकुंस इति जायते ॥ स वर्णबाह्यो धर्मेषु सम्यक्संगीतकोविदः ॥ २ ॥ कांतानां नृत्यशालायां नृत्यं लास्यं च शिक्षयेत् ॥ रंगावतारः कर्तव्यो नाट्ये च नृपसंसदि ॥ चतुर्विधैरंगभावैर्देशभापांगसंभवैः ॥ अंगभावाश्च भरतेनोक्ताः ॥ कायिको वाचिकश्चैव आहार्यः सात्विकस्तथा ॥ चत्वारोऽभिनेयाः प्रोक्ता नाट्यशास्त्रविशारदैः ॥ १ ॥ संगीतशास्त्रे ॥ गीतं वाद्यं च नृत्यं च त्रयं संगीतमुच्यते ॥ संगीतशब्दो नृत्ये तु केवलेनैव गीयते ॥ २ ॥ सुकुमारं भवेल्लास्यमुद्धतं तांडवं विदुः ॥ तांडवं पदघाताद्यैर्लास्यं रससमन्वितम् ॥ ३ ॥ दृष्टिहस्तकभापाद्यैर्भ्रामरीचीरिकादिभिः ॥ कुचबाहूरुदृक्पातैस्तरुणीनां तदद्भुतम् ॥ ४ ॥ कायस्थवनिता या तु मालाकारेण संगता ॥ तस्यां यस्तेन पुत्रः स्यात्स शाकल्य इति स्मृतः ॥ ५ ॥ कांताकरेषु रचयद्गजदंतकलापिकाः ॥ स दीनः शूद्रजातिभ्यो मणीन्विरचयेत्सदा ॥ ६ ॥ स्फटिकान्बदरादींश्च कुर्यात्तद्द्रव्यजीविकाम् । वैदेहाच्छूद्रकन्यायां जातस्त्वांधसिकाभिधः ॥ ७ ॥ कुर्यादन्नानि भक्ष्याणि विक्रयार्थं ससंधितम् ॥ अतो विक्रयतो लब्धं तद्धनं तस्य जीवनं ॥ ८ ॥ कांदू इति प्रसिद्धः । करणीवैश्यसंयोगाज्जातो वत्सकसंज्ञकः ॥ स हीनः शूद्रधर्मेभ्यः शाड्वले गाश्च चारयेत् ॥ ९ ॥ वैश्यस्त्रीशूद्रसंयोगादायोगवकसंज्ञकः ॥ स शूद्राद्धीयते धर्मैः पापाणेष्टककर्मकृत् ॥ १० ॥ स कुर्यात्कुट्टिमां भूमिं चूर्णेनास्य च जीवनम् ॥ निपादकन्यका शूद्रसंगाद्यं जनयेत्सुतम् ॥ ११ ॥ स क्रोंचकः कुक्कुटक इति प्रोक्तो द्विसंज्ञकः ॥ टंकशालासु सर्वत्र बाणकानां विधायकः ॥ १२ ॥ यो मागधीक्षत्रिययोर्जात उल्मुकसंज्ञकः ॥ स लोहकर्मणा जीवेदुत्तमश्चांत्यजातितः ॥ १३ ॥ लोहकार इति ख्यातो लोहं कर्मास्य जीवनम् ॥ तेषां तु गुणसंयोगं ज्ञात्वा शस्त्रविधायकः ॥ १४ ॥ लक्षणकांडे ॥ शस्त्रांगुलं पट्समेतं सत्सहृच्छेदकाभिधः ॥ शस्त्रस्वामीशयोर्वैरं मृत्युकार्यन्यथा शुभम् ॥ १ ॥ इति लोहकारस्मृतिः । तैलभ्रमणयंत्राणां यावच्छब्दः प्रवर्तते ॥ तावत्कर्म न कुर्वीत शूद्रान्त्यजसमीपतः ॥ १ ॥ कुक्कुटस्येह भवति कुंभकारेण संगता ॥ तस्याः सूनुस्तु विख्यातः कुरुविंद इति स्फुटम् ॥ २ ॥ कौशेयानि स वस्त्राणि रचयेदात्मवृत्तये ॥ तुल्योऽसावन्त्यजातीनां स्वधर्मं स तु पालयेत् ॥ ३ ॥ सालीति प्रसिद्धः । संगता वेनवनिता कैवर्तेन यदा रहः ॥ तस्याः शाबरिकाभिख्यः पुत्रोऽसौ लोकसंमतः ॥ ५ ॥ स हीनस्त्वंत्यजातिभ्यः शुचिवासोविधायकः ॥ कुर्विंदः ॥ आभीरीकुक्कुटाभ्यां यो जातः सोखिरसंज्ञकः ॥ ५ ॥ स कुर्यात्तु सरीणां हि वासांसि स्वात्मवृत्तये ॥ तद्वैपरीत्याज्जातो यो नीलीकर्ता स कथ्यते

॥ ६ ॥ मार्गनापितयोर्जातो योसौ साखिल्यसंज्ञकः ॥ हीनः॰ स गुह्यकेशानां कुर्याद्वपनमंजसा ॥ ७ ॥ जलूकातुंबिशृंगाणि रक्तस्रावे प्रयोजयेत् ॥ जातो मैत्रेयशुक्लेन जांघिकायां स्वयं सुतः ॥ ८ ॥ असौ बंधुलसंज्ञोऽत्र अधमः सर्वजातिषु ॥ सुवर्णकारविपणेर्धूल्यां हेमादि पश्यति ॥ ९ ॥ निषादनारीसंयोगात्पौष्टिकं जनयेत्सुतम् ॥ स च पांसुलसंज्ञो हि शणसूत्रविधायकः ॥ १० ॥ कर्ता च गोणीपट्टानां जीविका तस्य तद्धनम् ॥ पुल्कसस्त्री पांसुलकात्सूते या वासिकाभिधं ॥ ११ ॥ कुर्यात्स तुरगादीनां शष्पेणैव च वर्त्तनम् ॥ 'घासी ॥ मेदस्य वनिताकायात्संगतांध्रेण चेद्रहः ॥ ११ ॥ सा सूते यवनं पुत्रं तुरुष्कः स प्रकीर्तितः ॥ प्रसिद्धो म्लेच्छदेशे यो गोवधेनास्य वर्त्तनम् ॥ १३ ॥ बंदिनीशूद्रसंयोगात् जातः स्पंदालिकाभिधः ॥ चतुर्वर्णविहीनोऽसौ मंजिष्ठारंगकारकः ॥ १४ ॥ तेन रंगेण वासांसि चित्राणि रचयेत्सदा ॥ हस्तलेख्यं विचित्रं च द्विधा तच्चित्रसाधनम् ॥ १५ ॥ स एव शुचिकः ख्यातः कर्त्तरीसूचिकाजेकः ॥ मागध्यां क्षत्रियाज्जात उल्मुको लोहकर्मकृत् ॥ १६ ॥ उग्रात्पारसवीपुत्रो मौकालिस्तैलिको भुवि ॥ रजको वर्णतो हीनः प्रथमश्चांत्यजेषु सः ॥ १७ ॥ वस्त्रनिर्णेजनं कुर्यादात्मवृत्त्यर्थमेव च ॥ उग्रजातं तु वैदेह्यां मंजूषं रजकं विदुः ॥ १८ ॥ शूद्रायां क्षत्रादुग्रः । विप्रायां वैश्याद्वैदेही ॥ वहेदसौ तैलयंत्रमुत्तमश्चांत्यजातितः ॥ तैलहिंसायंत्ररवाकर्षणात्पापसंभवः ॥ १९ ॥ अतो मौकलिको नित्यं निर्वास्यो नगराद्बहिः ॥ रथकारस्य दुहिता साऽऽयोगवसमागता ॥ २० ॥ सूते यं तनयं सोऽपि सूत्रधार इतीरितः ॥ जायाजीवश्च शैलूषो नाट्यशास्त्रविशारदः ॥ २१ ॥ वेन्यामावर्त्तकाज्जातः स चारः सूत्रवायकः ॥ छागली भृज्जकंटात्तु औरभ्रं मेषपालकम् ॥ २२ ॥ कुर्यादूर्णापट्टांश्चित्रान्मेषाणां परिपालनम् ॥ आवर्त्तकस्य भार्यायां क्षेमकादुष्ट्रपालकम् ॥ २३ ॥ रौमिकं देशिका मल्लाद्युक्तं लवणकर्मणि ॥ आयोगव्यां द्विजाज्जातो धिग्वणः कवचादिकृत् ॥ २५ ॥ स चर्मणाऽश्वपल्याणं यथाशोभं प्रकल्पयेत् ॥ मोचिसंज्ञः ॥ आयोगवी च कैवर्त्तं जज्ञे परसवात्सुतम् ॥ २५ ॥ स हीनः सर्वजातिभ्यो जालं स्वीकृत्य सर्वदा ॥ मत्स्यान् जलचरानन्यान् घातयेदात्मवृत्तये ॥ २६ ॥ नाव्यं कर्म प्रहरणं नद्यां वर्षासु वाहयेत् ॥ नदीमुत्तारयेल्लोकांस्तेभ्यश्चेच्छेद्धनं तथा ॥ २७ ॥ धिग्वण्यां तु निषादाद्यश्चर्मकारः स तु स्मृतः ॥ गोचर्मणा महिष्याश्च चर्मणा तस्य जीवनम् ॥ २८ ॥ आभीरस्त्री लभेद्वेनात्पुत्रं शौंडिकसंज्ञकम् ॥ सुरां स कृत्वा विक्रीय कुर्यात्तेन च वर्त्तनम् ॥ २९ ॥ कर्मचंडालकात्पुत्रं वैदेही पांडुशोपकम् ॥ लेभे बुरुडजातित्वं सदा वंशविदारणम् ॥ ३० ॥ जातो निषादाद्वैदेह्यां गारुडी डिंडिमोत्तमः ॥ इत्यादि । मनुः ॥ चंडालात्पांडुशोपाकस्त्वक्सारव्यवहारवान् ॥ आहिंडको निषादेन वैदेह्यामेव जायते [ म॰ स्मृ॰ अ॰ १० ] ॥ १ ॥ विप्रायां वैश्यजा वैदेही । त्वक्सारो वेणुः । तच्छेदक्रयादिजीवी । अयं बुरुडः वैदेह्यामेव । क्षत्रायां शूद्रजनिषादादाहिंडकः । अयं वेणुजीवी श्वपाकः । चंडालेन तु सोपाको मूलव्यसनवृत्तिमान् ॥ पुल्कस्यां जायते पापः सदा सज्जनगर्हितः [ म॰ स्मृ॰ अ॰ १० ] ॥ मूलं मुख्यं

व्यसनमसुवियोगो वध्यमारणं सैव वृत्तिः । क्षत्रायां शूद्रजो निषादः तस्माच्छूद्रायां पुल्कसी । अयं कसा (य) र इति प्रसिद्धः । निषादस्त्री तु चंडालात् पुत्रमंत्यावसायिनम् ॥ स्मशानगोचरं सूते बाह्यानामपि गर्हितम् [ म० अ० १० ] ॥ केचिदादिपुराणेप्युक्ताः निषाद्यामथ शूद्रेण कक्कुटः स्यात्करोति सः ॥ चक्रतोमरशूलासिलकुटप्रासतोमरान् ॥ १ ॥ चक्राणि शस्त्रजालानि भिंडिपालांश्च भूभुजाम् ॥ कुक्कुटानां प्रहर्त्ता च राजकुक्कुटखेलनः ॥ २ ॥ अंबष्ठ्यां जायते वेनो वैदेहेन करोति सः ॥ पटहं वादयन्स्फीतं राजादेशं प्रजास्वपि ॥ ३ ॥ पुल्कसः कुक्कुटो केनस्त्रय आरण्यवासिनः ॥ आयोगव्यां दस्युना च सैरंध्रो नाम जायते ॥ ४ ॥ दस्युः पौंड्रकादिः प्रागुक्तः ॥ मृगादिवधजीवी च पाशबंधेन नित्यशः ॥ राजस्त्रीणां सूतिकानां द्वाररक्षां करोति सः ॥ ५ ॥ आयोगव्यां निषादात्तु धीवरो नाम जायते ॥ नावो नदीनां कर्त्ता स तां च संवाहयेत्सदा ॥ ६ ॥ निषादादथ वैदेह्यां कारावारः करोति सः ॥ चर्मणां छेदनं नित्यं सीवनं क्रयविक्रयम् ॥ ७ ॥ निषाद्यामथ वैदेहाज्जायते चंद्रमेचकः ॥ आरण्यानां पशूनां स करोति च वधं सदा ॥ ८ ॥ तस्य स्त्रीगमनात्क्षत्ता श्वपाकं जनयेत्सुतम् ॥ श्वमांसादमरण्यस्थं पापशूर्पोपजीवनम् ॥ ९ ॥ चंडालादपि वैदेह्यां पांडुसोपाकसंज्ञकः ॥ उपानच्चर्मवेणूनां विक्रयं हि करोति सः ॥ १० ॥ आहिंडको निषाद्यां च वैदेहादपि जायते ॥ यो दस्यूनां तु वध्यानां परिरक्षां करोति च ॥ ११ ॥ अंत्यावसायी चांडालान्निषाद्यां जायते नरः ॥ स्मशानवासी तद्वृत्तिश्चंडालेष्वपि गर्हितः ॥ १२ ॥ अनाथं नगराच्छावं दूरं ते च नयंत्यपि ॥ शय्याभरणवस्त्राणि वध्यानां राजशासनात् ॥ १३ ॥ निर्दिष्टं वधदंडं तु कृत्वा गृह्णंति नित्यशः ॥ विवाहादि प्रकुर्वंति समाने वर्णसंकरे ॥ १४ ॥ मृता गोब्राह्मणार्थं तु कदाचित्संतरंति ते ॥ वसिष्ठः ॥ नौजीविका च निषादानां । कैवर्त्तानां मृगपशुपक्षिघातो मांसविक्रयश्च । आवृतानां हस्त्यश्वाधिकारः । आभीराणां गोजाविरक्षा । धिग्वणानां चर्मकरणं तद्विक्रयजीवनं च । कारावराणां चर्मच्छेदनं दीपासनरक्षणं छत्रधारणं नराणां वाहनं च । अयं कहारः भोई इति प्रसिद्धः । तंतुत्रायत्ववृक्षछेदनरोपणानि कुक्कुटानां । अंध्रमेदानां गृहद्वाराशुचिस्थानावस्कारशोधनं गुह्यांगस्पर्शनोच्छिष्टविण्मूत्रोहनं चक्रवृत्तिता च गुह्यांगस्पर्शः शौचं अधोनापितत्वं वा । चक्रवृत्तिता तैलिकत्वमिति स्मृतिमंजरी । मधूकानां प्रातर्नृपतिसंस्तवाख्यानवर्णनं निद्राबोधनम् । प्रव्रज्यावसितानां यावज्जीवं दासवृत्तित्वं । मूलवृत्तित्वं शूर्पकरणं च पुल्कसानां । मूलं वृक्षौषध्यादेः । चंडालांत्यावसायिनां वनस्मशानरक्षणं गराग्निविषप्रयोगश्च । स्त्रीणां भर्तृशुश्रूषा । नव्यंजनपानसंस्कारो नृत्यगीतकामसूत्राध्ययनं च । यत्पुंसामन्नव्यंजनादि कार्यं तत्तत्स्त्रीणामपि चारणादिस्त्रीणां तु नृत्यादि । सर्वे बाह्याः सर्वधर्मबहिष्कृताः । अन्यत्र प्राणिसंरक्षणात् अहिंसादिश्च धर्मः सर्वतुल्यः । अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ॥ दानं दमो दया शांतिः सर्वेषां धर्मसाधनमिति याज्ञवल्क्योक्तेः । पित्रोराब्दिके सजातिभोजनं वस्त्रहेमादिदानं कार्यमित्युक्तं प्राक् ॥

आतां संकीर्णप्रकरण सांगतो.

मालाकारा-( माळ्या ) पासून करणस्त्रीचेठायीं होतो त्यास लावद्य ह्मणतात. यानें रत्नादिकांस छेद पाडावे. यासच मणिहार अथवा मंजु ह्मणतात. यापासून कुंभारणीचेठायीं झालेल्यास शाल्मल ( तांबोळी ) ह्मणतात. यानें, विड्याचीं पानें इत्यादि विकून निर्वाह करावा. मालाकार ( माळी ) यापासून क्षत्रियीचेठायीं अंगाचें मर्दन करणारा शिलींध्र नामक होतो. तो शूद्राहून नीच. याची जीविका-उत्तम तैलादिकानें लोकांचें अंगमर्दन करणें ही होय. शिलींध्रापासून क्षत्रियेचेठायीं होतो त्यास कोल्हाटी[1] ( नाडे-बहुरूपी ) ह्मणतात. यानें भोरिप करून पोट भरावें. करणीचेठायीं वैश्यापासून होतो त्यास गोचारी[2] ( गुरेंराख्या ) ह्मणतात. यानें गुरें राखावीं. मंजुभार्येचेठायीं धटधानापासून होतो त्यास छागलक ( धनगर ) अथवा अजपाल ( शेळ्यारक्षक ) ह्मणतात. तसाच कर्मचांडालाच्या स्त्रीचेठायीं पुष्पशेखरापासून होतो त्यास मंडलक ह्मणतात. त्यानें बहुत कुत्रे पाळावे. राजानें कुत्र्यांचें जोडपें धरण्यास त्याची योजना करावी. कर्मचांडाल हें-संन्याशापासून विधवेचेठायीं झालेल्या पुत्राचें नांव आहे. यानें तळ्या विहिरी इत्यादि खोदणें व मातीचें काम, यांवर निर्वाह करावा. हा अस्पृश्य आहे. **जातिविवेकांत**-"अंबष्ठापासून, वैदेहीचेठायीं झालेल्यास कुशीलव ह्मणतात. यानें संगीतज्ञान संपादावें व निरनिराळ्या देशांत जाऊन नृत्यादिकानें निर्वाह करावा. अयोगवापासून मागधीचेठायीं होतो त्यास भ्रंकुस[3] ह्मणावें. तो धर्माविषयीं वर्णबहिष्कृत आहे. यानें संगीताचा अभ्यास करून, स्त्रियांस नृत्यशालेंत नृत्य व लास्य शिकवावें. राजसभेंत, नाटकप्रसंगीं रंगावतार[4] करावा. देशभाषा व अंगें यांच्या भेदापासून झालेले ४ प्रकारचे अंगभाव करावे." अंगभावांचे भेद **भरतानं** सांगितले आहेत. जसें-"कायिक, वाचिक,

---

१ 'बहुरूपी' अथवा 'भोरपी' हे दोन प्रकारचे आहेत. नाड्यावर चढून खेळ करणारे व-एकेक वेष घेऊन घरोघर दररोज फिरणारे. त्यांतून कोल्याटी हे 'नाडभोरपी' होत.

२ शुद्ध वैश्याला 'गोरक्षण' विहित आहे; पण तें गुरें राखणें हें विहित नाहीं. वैश्यपर लावतांना-'गोरक्षण' या शब्दाचा-गायीचें खिल्लार स्वामित्वेंकरून बाळगणें-असा अर्थ घेतला पाहिजे गुराखेपण हें येथें सांगितलेल्या संकरजासच विहित आहे.

३ जो स्त्रीचा वेष घेऊन नाचतो त्यास 'भ्रकुंस' कोठें कोठें 'भ्रुकुंस' आणि 'भ्रूकुंस' असें ही उपलब्ध होतें हें नांव पडण्याचें कारण, नाचत असतां-**भ्रुवा**-ह्मणजे भोंवयीनें आहे-**कुंसः**-ह्मणजे=भाषण ज्याचें तो; अर्थात् आपल्या भोंवयीनें प्रेक्षकांशीं भावगंभीर असें भाषणच करित आहे कीं काय; असें दिसतें ह्मणून त्यास हें नांव पडलें असावें असें वाटतें. देशभाषेंत ज्यांला 'भांड' ह्मणतात ते हेच असावे.

४ 'रंग'-हा शब्द नाटकशालेचा अथवा-नाटकशालेंत पुढें होणारा नाटकप्रयोग पाहाण्यास सामाजिक वगैरे सर्व आपापल्या ठिकाणीं बसले आहेत, वाद्यें, मंजुळ गायन वगैरे चालत आहे, अशास्थलास रंग ह्मणतात असें **दशरूपक** व **दर्पण** इत्यादिग्रंथांवरून वाटतें. याप्रकारच्या रंगांत नायकादिकांचे वेष घेऊन येणें याला 'रंगावतार' म्हणतात.

आहार्य व सात्विक असे नाट्यशास्त्रनिपुणांनीं चार प्रकारचे अभिनय सांगितले आहेत." **संगीतशास्त्रां**त-"गायन, वाद्य, व नृत्य, या तिहींस मिळून संगीत ह्मणावें. नृत्याविषयीं तर, केवळ संगीत शब्द आहे. तो तेवढ्याचाच वाचक. जें अतिसुकुमार असतें त्यास लास्य, व दांडगेपणाच्यास तांडव ( नृत्य ) ह्मणतात. जें हातपायांचा भूमीवर आघात करून, उद्धतपणानें करितात त्यास तांडव ह्मणतात. व जें दृष्टी, हात, भाषा, भ्रामरी, व चीरिका, मुद्रासहित, स्तन, मांड्या, दृष्टिपात इत्यादिकांनीं सरस व पुरुषांचें मन हरण करणारें त्यास अद्भुत लास्य ह्मणावें." असें सांगितलें आहे. कायस्थाच्या स्त्रीचेठायीं माळ्यापासून जो उत्पन्न होतो त्यास शाकल्य ह्मणतात. त्यानें बायकांच्या हातांत हस्तिदंताचीं वगैरे कांकणें करून घालावीं. तो शूद्राहून हीन आहे. त्यानें मणि, स्फटिक, बोरें इत्यादि करून त्यांवर निर्वाह करावा. वैदेहापासून शूद्रीचेठायीं उत्पन्न झालेल्यास आंधसिक अथवा कांदु ( मिठाईवाला ) असें ह्मणतात. त्यानें नानाप्रकारचे मिठाई वगैरे पदार्थ करून ते विकून निर्वाह करावा. करणीचेठायीं वैश्यापासून उत्पन्न होतो त्यास वत्सक ह्मणतात. तो शूद्राहून नीच होय. त्यानें कुरणांत गायी चाराव्या. वैश्यस्त्रीचेठायीं शूद्रापासून उत्पन्न होतो त्यास आयोगव ह्मणतात. तो शूद्राहून नीच आहे. त्यानें दगडांस टांकी लावून, चुन्याच्या संयोगानें एकप्रकारच्या भिंती तयार कराव्या. व चुना विकून निर्वाह करावा. निषादाची कन्या शूद्रापासून ज्यास उत्पन्न करिते; त्यास क्रोधक व कुक्कुटक असीं २ नांवें आहेत. त्यानें सर्वत्र टंकशाळेंत सोनें रुपें व तांबें यांचीं नाणीं करावीं. जो मागधी स्त्रीचेठायीं क्षत्रियापासून उत्पन्न होतो त्यास उल्मुक ह्मणावें. त्यानें लोखंडकामावर निर्वाह करावा. हा अंत्यजाहून कांहीं श्रेष्ठ आहे. त्यास लोहकार ( लोहार ) ही ह्मणतात. यानें लोखंडाचे गुण जाणून, त्याचीं शस्त्रें घडवावीं." शस्त्रांच्या लक्षणाविषयीं **लोहकारस्मृतीं**त लक्षणकांडांत सांगितलें आहे कीं,- "शस्त्र जितकें लांब व रुंद असेल त्याचें अंगुलप्रमाण काढून, त्यास ६ नीं गुणून ७ नीं भागावें. मग उर्वरित अंक एकापासून-५ पर्यंत आल्यास तें शुभकारक; ६ आल्यास मृत्युकारक, शून्य आल्यास तें शस्त्र घेणाऱ्याचें व यजमानाचें वैरकारक होतें.' जोंपर्यंत तेलाच्या घाण्याचा शब्द श्रवण होत असेल तोंपर्यंत, व तसेच शूद्र आणि अंत्यजांच्या सन्निध ब्राह्मणानें कर्म करूं नये." हें प्रसंगतः येथें सांगितलें आहे. कुक्कुटस्त्री कुंभारापासून जो पुत्र उत्पन्न करिते त्यास कुरुविंद (साळी ) ह्मणतात. यानें रेशमी वस्त्रें विणून निर्वाह करावा. हा अत्यंजासम आहे, तथापि यानें स्वधर्मपालन करावें. वेनजातीय स्त्री कैवर्तासीं संग करून ज्यास उत्पन्न करिते त्यास शाबरिक ह्मणतात. तो अंत्यजातीहून हीन आहे. यानें वस्त्रें धुवावीं. यास कुविंदहि ह्मणतात. गौळणीचेठायीं कुक्कुटा-

१ हा पूर्वोक्त संकरज कायस्थ होय.

२ हे लोक गुजराथेंत वगैरे आहेत. हस्तिदंती कांकणें घालण्याची चाल गुजराथ, मारवाड वगैरे देशांत आहे किंवा उत्तर हिंदुस्थानांतल्या बहुतेक प्रदेशांत आहे, असें ह्मटलें तरी चालेल.

३ याकरितांच-'तेलाचा घाणा गांवांत लावूं नये, असें **धर्मशास्त्रांत** सांगितलें आहे.

पासून उत्पन्न होतो त्यास सोखिर ह्मणतात. त्यानें निर्वाहार्थ लोकरीचीं वस्त्रें विणावीं. कुक्कुटस्त्रीचेठायीं गवळ्यापासून उत्पन्न होतो त्यास नीलिकर्ता ( नीळारी ) ह्मणतात. त्यानें निळीचें काम करावें. मार्गस्त्री व न्हावी यांपासून उत्पन्न होतो त्यास सौखिल्य ह्मणतात. हा न्हाव्यापेक्षां हीन आहे. यानें न दुखिवतां गुह्यस्थानावरचे केश काढावे. कोणास रक्तसंबंधी विकार झाला असल्यास त्याला जळवा, तुंबड्या व शिंगें लावून नासलेलें रक्त काढावें. मैत्रेयापासून जांधिकस्त्रीचेठायीं उत्पन्न होतो त्यास वंधुल अथवा झारा ह्मणतात. हा सर्व जातींत नीच. यानें सोनाराच्या आकळ्यांतील धूळ घेऊन, त्यांतलें सोनें वगैरे झारून काढून त्यावर निर्वाह करावा. निषादाच्या स्त्रीचेठायीं पौष्टिकापासून उत्पन्न होतो त्यास पांसुल ह्मणतात. त्यानें सणाचीं गोणताटें वगैरे विणावीं. पुल्कसाची स्त्री पांसुलकापासून ज्यास उत्पन्न करिते त्यास वासिक ( घासी ) ह्मणावें. त्यानें अश्वादिकांस उपयोगी गवत विकून निर्वाह करावा. मेदाची स्त्री आंध्रापासून ज्यास उत्पन्न करिते तो जातीचा यवन, त्यास तुरुष्क ह्मणावें. तो म्लेछभाषा बोलणारा, त्यानें गोवधादिकांवर निर्वाह करावा. वंदिनी शूद्रापासून ज्यास उत्पन्न करिते त्यास स्पंदालिक ( रंगारी ) ह्मणावें. तो ४ ही वर्णांहून नीच. त्यानें कुसुंब्यादिकांचे रंग करून वस्त्रें रंगवावीं. व त्यांवर नानाप्रकारचीं हस्तलिखित अथवा छापाचीं चित्रें काढून तीं विकावीं, हाच जर भिंतीवर चित्रें काढील तर त्याचा तो विशेषगुण समजावा. तोच सुयीचें व कात्रीचें काम करील तर त्यास सूचिक ( शिंपी ) ह्मणावें. मागधीचेठायीं क्षत्रियापासून झालेल्यास उल्मुक ह्मणावें. तो लोहकर्म ( लोखंडकाम ) करणारा होय. उग्रापासून पारसवीचेठायीं उत्पन्न झालेल्यास मौकालिक ( तेली ) ह्मणावें. त्यानें तेलाचा घाणा लावून निर्वाह करावा. रजक ( परीट ) हा वर्णतः हीन आहे; परंतु तो ७ प्रकारच्या अंत्यजांत प्रथम आहे. यानें उदरनिर्वाहार्थ वस्त्रें धुवावीं. वैदेहीचे ठायीं उग्रापासून झालेल्यासही रजक ह्मणतात. हा पूर्वोक्त रजकाहून भिन्न असून, ७ प्रकारच्या अंत्यजांपेक्षां उत्तम आहे. यानें तेलाचा घाणा वहावा. यास तेल काढतांना होणाऱ्या प्राणिहिंसेचा व यंत्राच्या आकर्षणापासून पाप होण्याचा संभव आहे, अतएव यास गांवाबाहेर ठेवावें. रथकाराच्या ( सुताराच्या ) स्त्रीचेठायीं आयोगवापासून पुत्र होतो त्यास सूत्रधार ह्मणतात. त्यानें स्त्रियांवर निर्वाह केल्यास शैलूष, व नाटकादि केल्यास भरत, अशा उद्योगाच्या संबंधानें

१ पूर्वीं सांगितलेला अधोनापित तो हाच असावा.

२ 'तुरुष्क' या शब्दाचाच अपभ्रंश होऊन—'तुरुक' असा शब्द झाला असावा. तुरुक हा शब्द कर्नाटक, द्राविड इत्यादि देशभाषांत वापरला जातो. सांप्रत आपण ज्यास तुर्की अथवा टर्कीं लोक ह्मणतों ते हेच असावे; आर्यधर्म न पाळणारे सर्वही यवन होत. त्यांतीलच हा एक पोटभेद आहे. महमदानें आपल्या धर्माची स्थापना केली त्या दिवसापासून मुसलमान ह्मणून एक जात स्वतंत्र झाली असें जें कित्येक अर्वाचीन लोकांचें मत आहे त्यास कांहींआधार नाहीं; अनार्य यवन लोक फार जुन्या काळीं देखील होते हें अनेक प्रमाणांवरून सिद्ध होतें व त्यांचा महमदी धर्माहून अन्य कोणता तरी धर्म होता, असेल यांत कांहीं संशय नाहीं.

त्यास २ संज्ञा आहेत. वेनाच्या स्त्रीचेठायीं आवर्तकापासून उत्पन्न होतो त्यास चार ह्मणतात. त्यानें सूत काढावें. भृज्जकंटकापासून छागली-( धनगरणी ) चे ठायीं जो मेंढरें रक्षण करणारा पुत्र होतो त्यास औरभ्र ह्मणतात. यानें लोकरीचीं चित्रविचित्र वस्त्रें करावीं. व मेंढरें राखावीं. आवर्तकीचेठायीं क्षेमकापासून उत्पन्न होतो त्यास उष्ट्रपालक ( सारवान् ) ह्मणतात. त्यानें उंट पाळावे व वहावे. देशिकाची स्त्री मल्लापासून ज्यास प्रसवते त्यास रौमिक[1] ह्मणतात. त्यानें मीठ पिकवून त्याच्या व्यापारानें निर्वाह करावा. आयोगवीचेठायीं द्विजापासून उत्पन्न होतो त्यास धिग्वण ह्मणावें त्यानें चिलखदें, ढाला व घोड्यावरील जिनें इत्यादि करून त्यावर निर्वाह करावा. यासच मोची ( जिनगर ) असेंहि ह्मणतात. आयोगवी पारसवापासून ज्यास उत्पन्न करिते त्यास कैवर्त ( कोळी ) ह्मणतात. तो सर्व जातींपेक्षां नीच होय. त्यानें नेहेमीं जाळें घेऊन, मत्स्य व अन्य जलचरांस मारून त्यांवर निर्वाह करावा. पावसाळ्यांत ( स्थलविशेषीं उन्हाळ्यांतहि ) नदीचेठायीं नौका वहावी. लोकांस नदीपलीकडे पोंचवून त्यांपासून मिळालेल्या द्रव्यानें निर्वाह करावा. धिग्वणीचेठायीं निषादापासून उत्पन्न होतो त्यास चर्मकार ( चांभार ) ह्मणतात. त्यानें गायी ह्मशी इत्यादिकांच्या कातड्यावर पोट भरावें. आभीरा ( गवळ्या ) च्या स्त्रीचेठायीं वेनापासून उत्पन्न होतो त्यास शौंडिक ( कलाल ) ह्मणतात. त्यानें दारू करून विकून निर्वाह करावा. कर्मचांडालापासून वैदेहीचेठायीं उत्पन्न होतो त्यास पांडुशोपक ह्मणतात. यास बुरुड जातित्व मिळालें आहे. यानें नेहेमीं वेळू, व चिवे वगैरे फोडून त्यांचीं पात्रें-सूप रोवळी इत्यादि करून त्यांवर निर्वाह करावा. निषादापासून वैदेहीचेठायीं उत्पन्न होतो त्यास गारुडी ह्मणतात.'' इत्यादि सांगितलें आहे. **मनु** ह्मणतो— ''चांडालापासून वैदेहीचे ठायीं पांडुशोपक ( बुरुड ) होतो. त्यानें वेळवांवर निर्वाह करावा. निषादापासून वैदेहीचेठायीं जो उत्पन्न होतो त्यास आहिंडक ह्मणतात. यास वेणुजीवी श्वपाक ह्मणतात. चंडालापासून पुल्कसीचेठायीं मूलव्यसनवृत्तिवान् सोपाक ( कसाय ) नामक होतो. येथें-'मूलव्यसनवृत्तिमान्' या शब्दाची व्याख्या असी आहे कीं,—मूल ह्मणजे मुख्य असें जें व्यसन ह्मणजे प्राणवियोग मारण्यास योग्य असलेल्यांस मारणें, अर्थात् प्राण घेणें तीच आहे वृत्ति ह्मणजे उदरनिर्वाहाचें कर्म ज्याचें त्यास मूलव्यसनवृत्तिमान् ह्मणावें. ''निषादाची स्त्री चांडालापासून अंतेवसायी नामक पुत्रास उत्पन्न करिते. त्यानें नित्य स्मशानांत असणें हें अंत्यजांसहि निंद्य असें कर्म करावें. यासच डोंब ह्मणतात.'' **आदिपुराणां**तही कित्येक सांगितले आहेत. ते-''निषादीचेठायीं शूद्रापासून उत्पन्न होतो त्यास कुक्कुट ह्मणतात. तो-चक्रें, तोमर, शूल, तरवारी, लगुड, प्रास, व नानातऱ्हेचीं चक्रें, शस्त्रजालें ( औटगोळे ), भिंदिपाल इत्यादि शस्त्रें घडवून राजास देऊन त्यावर निर्वाह करितो. तसेंच कोंबड्यांस मारतो. राजानें पाळलेल्या कोंबड्यांबरोबर खेळतो. अंबष्ठीचेठायीं वैदेहापासून वेन होतो. तो पटह ( हलगी ) नामक

---

१ कोकणांत 'गावडे' अथवा 'मीठगावडे' व देशांत 'लोणारी' असें ज्यांस ह्मणतात ते हेच असावे यांच्यांत पोटभेद आहेत; पण ते विशेष महत्वाचे नाहींत.

वाद्य वाजवून, जो उघडपणें सर्व प्रजांस एकसाहा राजाचा हुकूम कळविण्याचा असतो तो कळवितो ( दंवडी पिटवितो ). पुल्कस, कुकुट, व वेन, हे ३ ही अरण्यांत राहतात. आयोगवीचेठायीं पौंड्रकादि पूर्वोक्त दस्यूंपासून उत्पन्न होतो त्यास सैरंध्र ह्मणतात. त्यानें मृग मारून अथवा पाशानें त्यांस धरून त्यावर निर्वाह करावा. व राजाच्या किंवा इतर स्त्रियांच्या बाळंतिणीच्या सूतिकागृहद्वाराचें रक्षण करावें. आयोगवीचेठायीं निषादापासून धीवर नामक उत्पन्न होतो. त्यानें, नदींत नौका वहाव्या व नवीन कराव्या. निषादापासून वैदेहीचेठायीं कारावर नामक उत्पन्न होतो. त्यानें कातडीं कापावीं, शिवावीं, विकत घ्यावीं व द्यावीं ( यास चांभार ह्मणतात ). निषादीचेठायीं वैदेहापासून उत्पन्न होतो त्यास चंद्रमेचक ( व्याध ) ह्मणतात. त्यानें अरण्यांतील पशूंस मारावें. चंद्रमेचकाच्या स्त्रीचेठायीं क्षत्त्यापासून उत्पन्न होतो त्यास श्वपाक ह्मणतात. कुत्र्यादिकांचें मांस भक्षण हेंच त्याचें जीवन. चंडालापासून वैदेहीचेठायीं पांडुसोपाकनामक उत्पन्न होतो. तो चर्मी जोडे व वेळवादिकांचीं पात्रें यांवर निर्वाह करितो. निषादीचेठायीं वैदेहापासून उत्पन्न होतो तो राजाज्ञेनें चोर व वध्य ( देहांतशिक्षा देण्यास योग्य ) कैदीचें रक्षण करितो. निषादीचेठायीं चांडालापासून अंतेवसायी अथवा अंत्यावसायी नामक होतो. तो नेहेमीं स्मशानांत राहून निर्वाह करितो. हा चांडालांमध्येंही अति नीच आहे. यानें अनाथ प्रेत गांवांतून दूर स्मशानांत न्यावें. व फांशीं दिलेल्याचीं शय्या वस्त्रालंकारादिक राजाज्ञेनें घ्यावीं. व ज्या अपराध्यास फांशीं देण्याचें राजानें फरमाविलें असेल त्यास फांशीं द्यावें. त्यांनीं आपल्या बरोबरीच्या जातीसीं विवाहादिक करावे. हे कदाचित् गायी व ब्राह्मणाकरितां प्राणत्याग करितील तर जन्मांतरीं या नीचत्वापासून मुक्त होतील; अर्थात् उत्तम जन्मास पावतील." **वसिष्ठ** ह्मणतो–"कैवर्तांस–नौकाजीवन, निषादांस मृग पशु व पक्षि इत्यादिकांचा वध व त्याच्या मांसाचा विक्रय, आवर्तांस हत्ती घोडे इत्यादिकांवर अधिकार असणें, आभीरांस गायी शेळ्या इत्यादिकांचें रक्षण, धिग्वणांस चामडीं तयार करणें, व विकणें, कारावरांस कातडीं कापणें. दीप व आसनाचें रक्षण, छत्रधारण, पालखी म्याने इत्यादि वाहणें, ( यास काहार भोयी ह्मणतात. ) वस्त्रें विकणें, वृक्ष लावणें, तोडणें–हीं कर्में कुक्कुटांस. अंध्र व मेद यांस गृह दरवाजा अशुचिस्थान ( शौचकूपादिक ) मल इत्यादिकांची झाडलोट करणें, गुह्यांगस्पर्श–( मलद्वार धुणें अथवा खालचे केश काढणें ) उच्छिष्ट विष्ठा मूत्र इ० वाहणें व चक्रवृत्तित्व–" याचा अर्थ–'तेलाचा घाणा लावणें' असा **स्मृतिमंजरीं**त केला आहे. "हीं कर्में विहित होत. मधूकांस प्रातःकालीं राजाचें स्तवन व पुण्यकारक शूरपुरुषांचीं चरित्रें गावून राजास जागृत करणें हीं विहित होत. प्रव्रज्यावसितांस ( संन्यास घेऊन त्याचा त्याग करणाऱ्यांस ) आमरण सेवा करणें, पुल्कसांस—मूलवृत्तित्व ( वृक्ष औषधी इ० चीं मुळें भक्षण करून असणें ) सुपें रोवळ्या वगैरे करणें, चंडाल व अंत्यावसायी यांस अरण्य, स्मशान इत्यादिकांचें रक्षण व अग्निविषादिकांचे प्रयोग विहित आहेत. स्त्रियांस–पतीची सेवा, व्यंजन (लोणचीं पापड ), प्राशनद्रव्य, व इत्यादि करणें, तैलादिकांनीं अंगसंस्कार, गायन[1], नृत्य

१ सांप्रत कुलस्त्रियांस=गायन, नृत्य इत्यादिकांचा अभ्यास करवीत नाहींत; पण प्राचीन

कामसूत्रांचें अध्ययन, व जें पुरुषांस अन्य व्यंजनादि अपेक्षित असेल तें करणें हा सर्व साधारण स्त्रियांचा धर्म होय. चारणादिकांच्या स्त्रियांस तर–गायन, नाच इत्यादि विशेषेंकरून विहित आहे. चार वर्णांच्या बाहेरच्या ज्या जाती आहेत त्या सर्वेहि एक–प्राणिमात्राचें संरक्षणरूप धर्मावांचून इतर धर्म बहिष्कृत होत. अहिंसादि धर्म तर–सर्व जातींस सारखे लागू आहेत. कारण–"अहिंसा, सत्य, चौर्य न करणें, शौच, इंद्रियनिग्रह, दान, दम, दया, शांति, हे धर्म सर्व वर्णांस समान आहेत." असें **याज्ञवल्क्यानें** ह्मटलें आहे. तसेंच प्रतिवर्षीं मातापितर मेलेल्या दिवसीं सजातीयांस–भोजन, वस्त्रें, द्रव्य इत्यादि देणें हेंहि सर्ववर्णसमान आहे ह्मणून पूर्वीं सांगितलेंच आहे.

**शंखस्त्वन्यथाह ॥ सूतानामङ्गसंस्कारक्रियाकेशश्मश्रुरोमनखवापनस्नानविलेपनालंकरणाश्वदमनयोग्याशनपोषणानि कर्माणि । योग्याशनं घासादि । क्षत्तुःप्रतिहाररक्षादौत्ये । मागधानां मृदंगवीणावेणुवादननृत्यगीतसिद्धिकोपस्थानगाथालोकप्रत्यूषःप्रबोधनानि कर्माणि । सिद्धिरिति कोपसमये तच्छामकगाथां पठेत् । जयजीवेतिशब्दः सिद्धिशब्दार्थः । अंबष्ठानां कायशल्यशलाकाविमोचनोन्मादक्लीबज्वरापस्मारचिकित्सापोषणानि कर्माणि । कायाच्छल्यस्य शलाकाः शिराः तासां मोचनं भेदः । वैदेहकानां वस्त्रच्छेदनसीवनरंजनावनिर्णेजनवापीतडागोदकपानारामावकरशोधनानि कर्माणि । उग्राणां कुंजरग्रहणराजछत्रधारणपुरप्रधारणबंधनागारसंयमनानि । वेनानां लंघनप्लवनाक्रीडानियुद्धमायाशंबरेंद्रजालानि कर्माणि । नियुद्धं बाहुयुद्धं । मायाशंबरं लाघवाद्द्रव्यपरिवर्तनं । इंद्रजालमसद्वस्तुदर्शनादि । कुक्कुटानां प्रहरणचक्रतोमरभिंडिपालप्रासासिपरशुलगुडलोहजालिकासंधानानि । प्रहरणमायुधम् । लोहजालिका कवचं । आयोगवानामयस्करणतक्षणकुंभकरणानि सुवर्णरजतलोहासिचर्मवृत्तिता चेति । पुल्कसानां नगरवीथीसंरक्षणजागरणानाथमृतनिर्हरणालेख्यपत्रच्छेदनानि मधुपातनं माक्षिकोद्धरणं बिलकर्तनं कूपादिखननं च । चांडालानां स्मशानसंरक्षणशूलपरिवापनवध्यघातानि कर्माणि । श्वपचानां चैतत् । अत्रैकस्य नानाकर्मणां विकल्पः समुच्चयो वा । अन्ये जातिविवेके ज्ञेया इति संक्षेपः ॥**

**शंखानें** तर–कांहीं जातींचीं कर्में पूर्वोक्ताहून भिन्न सांगितलीं आहेत. तीं–"सूतांस–दुसऱ्याच्या अंगास तैलादि लावणें, हजामत करणें, स्नान घालणें, चंदन लावणें, अलंकार करणें, घोड्यांस दमविणें, व त्यांस चारापाणी देऊन जतन करणें हीं कर्में विहित आहेत. क्षत्त्यानें–द्वाराचें रक्षण व हेरपणा करावा. मागधांस–मृदंग, वीणा, पांवा इत्यादि वाद्यें वाजविणें, नाच, गायन, सिद्धिकोपस्थान ) राजास राग आल्यावेळीं त्याची शांतिकारक कांहीं गाथा ( पोवाडे ) गातात त्या जयजीव ( जय ) असें ह्मणणें हा सिद्धि शब्दाचा अर्थ आहे. गाणें व मंजुळ गायनानें प्रातःकालीं राजास जागृत करणें हीं कर्में विहित आहेत. अंबष्ठांस–लढाऊ लोकांच्या शरीरांस लागलेलीं शल्यें व बाणांचीं अग्रें काढणें, उन्मत्त, नपुंसक, उन्माद, ज्वरित, अपस्मार ( फेंपरें ) यांवर औषध देणें, व

कालीं मोठमोठ्या संगीत शाळा होत्या व त्यांत राजांच्या व इतर संभावित लोकांच्या मुली गायनादिकांचा अभ्यास करीत असत असें प्राचीन इतिहासावरून सिद्ध होतें.

पोषण हीं कर्मे विहित आहेत. वैदेहकांस–वस्त्रांच्या छिद्रांचा व फाटक्यांचा रफू करणें, वस्त्रें रंगविणें, स्वच्छ करणें, वापीतळ्याचें उदक, बागा, आकर, इ० शुद्ध करणें हीं कर्मे विहित आहेत. उग्रांस—हत्ती धरणें, राजाच्या मस्तकीं छत्र धरणें, नगर व वंदिखान्याचें रक्षण, हीं विहित आहेत. वेनांस–उंच उड्या मारणें, भिंती उडून जाणें, कुस्ती करणें, बाहुयुद्ध करणें, मायाशंबर, ( लाघवानें मोटे पदार्थ उचलणें, फिरविणें व ते अन्यस्थलीं नेणें इत्यादि ), इंद्रजाल ( खोटी वस्तु खरी करून दाखविणें ) इत्यादि कर्मे विहित होत. कुकुटांस–आयुध, चक्र, तोमर, भिंदिपाल, परशु, कुऱ्हाड, लगुड, लोहजालिका ( कवच ) यांचीं संधानें करणें, हें कर्म विहित आहे. आयोगवांस–लोहारकाम, सुतारकाम, कुंभारकाम व सोनें रुपें आणि लोखंड यांच्या वस्तु घडविणें, ढाल तरवार घेऊन लढणें, हीं कर्मे विहित आहेत. पुल्कसांस–नगर व मार्ग यांचें संरक्षण, शहरांत रात्रीं घस्त काढणें, अनाथ प्रेत नेणें, पत्रें नेणें व कागदांचे सांचे कापणें, मध काढणें, नेणें काढणें, विहीर खोदणें, हीं कर्मे विहित आहेत. चांडालांस–स्मशानाचें रक्षण व दंड्यांस शूलावर चढविणें हें विहित आहे. श्वपचांनींहि हेंच करावें.” यांत एकेक जातीस अनेक कर्मे सांगितलीं आहेत; पण त्यांपैकीं त्यांनीं एकेक अथवा सर्व करावीं. अन्य कित्येक जातिभेद आहेत. ते **जातिविवेका**वरून जाणावे. विस्तारभयास्तव येथें संक्षेपानें सांगितले आहेत.

**ननु कलौ क्षत्रियवैश्याभाव उक्तो भागवते नवमस्कंधे ॥ इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रांतो भविष्यति ॥ यतस्तं प्राप्य राजानं संस्थां प्राप्स्यति वै कलौ ॥ १ ॥ देवापियोगमास्थाय कलापग्राममाश्रितः ॥ सोमवंशे कलौ नष्टे कृतादौ स्थापयिष्यतीति ॥ द्वादशेऽपि । एतेषां नामलिंगानां पुरुषाणां महात्मनां ॥ कथामात्रावशिष्टानां कीर्तिरेव स्थिता भुवि ॥ १ ॥ देवापिः शंतनोर्भ्राता मरुश्चेक्ष्वाकुवंशजः ॥ कलापग्राम आस्नाते महायोगबलान्वितौ ॥ २ ॥ ताविहैत्य कलेरंते वासुदेवानुशिक्षितौ ॥ वर्णाश्रमयुतं धर्मं पूर्ववत्प्रथयिष्यतः ॥ ३ ॥ विष्णुपुराणेऽपि ॥ देवापिः पौरवो राजा मरुश्चेक्ष्वाकुवंशजः ॥ कृते युग इहागत्य क्षत्रप्रावर्तकौ हि तौ ॥ १ ॥ तथा । महापद्मपतिः कश्चिन्नंदः क्षत्रविनाशकृत् ॥ नंदश्च कलेरादौ परिक्षितोऽनंतरं जातः । आरभ्य भवतो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ॥ एतद्वर्षसहस्रं तु शतं पंचदशोत्तरं ॥ १ ॥ पुराणांतरेऽपि ॥ ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रा वर्णास्त्रयो द्विजाः ॥ युगे युगे स्थिताः सर्वे कलावाद्यंतयोः स्थितिः इति ॥ अतः कथं द्विजसंकरजाः उक्ताः । मैवं । कलौ तु बीजभूतास्तु केचित्तिष्ठंति भूतले ॥ तथैव देवापिपुरू सांप्रतं समवस्थितौ ॥ १ ॥ इति विष्णुपुराणाद्ब्रह्मक्षत्रविशः शूद्रा बीजार्थे य इह स्थिताः ॥ कृते युगे हि तैः सार्धं निर्विशेषास्तदाभवन्निति मात्स्योक्तेश्च प्रच्छन्नरूपाः स्वकर्मभ्रष्टाः क्षत्रिया वैश्याश्च संत्येव क्वचिदित्यस्मत्पितृचरणाः । यो भाट्टतंत्रगहनार्णवकर्णधारः शास्त्रांतरेषु निखिलेष्वपि मर्मभेत्ता ॥ योऽत्र श्रमः किल कृतः कमलाकरेण प्रीतोऽमुनास्तु सुकृती बुधरामकृष्णः ॥ ॥ इति श्रीमज्जगद्गुरुमीमांसकनारायणभट्टसूरिसूनुरामकृष्णभट्टात्मजदिनकरभट्टानुजकमलाकरभट्टकृते शूद्रधर्मतत्त्वे शूद्रसमसंकरजस्वरूपं तद्वृत्तिनिरूपणं च समाप्तम् ॥ समाप्तश्चायं निबंधः ॥**

यावर शंका येते कीं–"कलियुगांत क्षत्रिय व वैश्य हे २ वर्ण मुळींच नाहींत." असें **श्रीमद्भागवतीं** नवमस्कंधीं सांगितलें आहे. जसें–**इक्ष्वाकूचा** वंश सांगून, शेवटीं **सुमित्रनामक** राजाचें वर्णन करून **शुकाचार्य** ह्मणतो कीं—"हा इक्ष्वाकूचा वंश **सुमित्रापर्यंत** राहील. कांकीं, त्याच्या पुढें संततीच्या अभावास्तव कलियुगांत तो क्षय पावेल. मग या वंशांतला **मरु** व सोमवंशांतला **शंतनुराजाचा** बंधू **देवापी** हे दोघे ईश्वरकृपेनें चिरायु होऊन, कलियुग सरे तोपर्यंत **कलापग्रामांत** राहून, पुनः कृतयुगाच्या प्रारंभीं कलींत नष्ट झालेला, सूर्यवंश व सोमवंश यांची स्थापना करतील." तसेंच **द्वादशस्कंधांतहि**–"हे पूर्वोक्त महात्मे पुरुष केवळ ज्यांच्या कथा व कीर्ति मात्र भूमीवर राहिलेल्या आहेत, असें झालें असतां चंद्रवंशीय **शंतनुराजाचा** बंधु **देवापी** व सूर्यवंशीय **इक्ष्वाकुकुलोत्पन्न मरु** हे दोघेहि योगबलानें कलियुग सरेपर्यंत, कलापग्रामांत (हा हिमाचल प्रदेशांत असावा.) रहातील. नंतर कलीच्या अंतीं **वासुदेवाच्या** आज्ञेनें वर्णाश्रमयुक्त धर्माची पूर्ववत् स्थापना करितील." असें सांगितलें आहे. **विष्णुपुराणांतही**–"**पुरुवंशोद्भव देवापी** आणि **इक्ष्वाकुवंशज मरु** हे दोघेहि कृतयुगाच्या आरंभीं सूर्य व सोमवंशाची स्थापना करितील. तसेंच कलीच्या प्रारंभीं व **परिक्षिति**-जन्मानंतर कोणीएक महापद्मपति **नंदनामा** क्षत्रियांतक होईल." असें सांगितलें आहे. **नंद** हा **परीक्षितीनंतर** झाला असें सिद्ध होण्यास प्रमाण **श्रीमद्भागवतांत श्रीशुकानें** ह्मटलें आहे कीं,–"हे राजा, तुझ्या जन्मकालापासून **नंदाच्या** राज्यास आरंभ होईपर्यंत १११५ वर्षें होतील. नंतर कलि वृद्धिंगत होईल." असें सांगितलें आहे. अन्य-**पुराणांतही**–"ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तीन द्विज व शूद्र असे ४ वर्ण अन्य युगांत होते; परंतु कलियुगांत ब्राह्मण व शूद्र हे २ दोनच वर्ण आहेत. मधले २ वर्ण नष्ट झाले." असें सांगितलें आहे. ह्मणून, पूर्वीं क्षत्रिय व वैश्य यांशीं संबंध होऊन संकरजाती कशा सांगितल्या? असें ह्मणशील तर ह्मणूं नको. कारण–"कलींत बीजभूत कित्येक क्षत्रिय पृथ्वीवर आहेत. तसेंच **देवापी** व **मरु** सांप्रत आहेत. असें **विष्णुपुराणांत** सांगितलें आहे. व "ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांपैकीं जे बीजाकरितां या कलींत राहिले आहेत, त्यांसह कृतयुगांत अन्य होतील, मग कांहीं विशेष राहणार नाहीं." असें **मत्स्यपुराणांत** सांगितलें आहे. यावरून–"सांप्रत गुप्तरूपी व स्वकर्मभ्रष्ट असे क्षत्रिय व वैश्य कोठें कोठें आहेत."[१] असें आमचे वडील **रामकृष्णभट्ट** ह्मणतात. जो, **भाट्टतंत्र** हाच कोणी एक खोल समुद्र त्यांतील नावाडी व अन्य सर्वशास्त्रांचें मर्म जाणणारा असून मोठा पुण्यवान् असा माझा पिता जो **रामकृष्णभट्ट** तो; मी, (**कमलाकरानें**) या ग्रंथरचनेविषयीं जो श्रम केला आहे, त्यानें निश्चयेंकरून संतुष्ट होवो!!! **इति श्रीमद्रामचन्द्रचरणकमलमिलिन्दायमानमानसस्य पाणिनिशाङ्करदर्शनपारावारपारीणस्य इसलामपुरकरोपाभिधस्य भट्टगोविन्दसूरिसूनोर्वामनशर्मणः कृतौ शूद्रधर्मतत्त्वप्रकाशे शूद्रसमसंकरजवर्णनं तद्वृत्तिनिरूपणं च समाप्तम्। समाप्तश्चायं ग्रन्थः।**

---

॥ श्री ॥

## या ग्रंथांत ज्या ज्या ग्रंथांतलीं प्रमाणें घेतलीं आहेत त्यांचीं नांवें:—

१ अत्रिस्मृतिः
२ अपरार्कः
३ अपीपालः
४ आग्नेयपुराणम्
५ आचार्यचूडामणिः
६ आचारचिन्तामणिः
७ आचारादर्शः
८ आपस्तम्बस्मृतिः
९ आदित्यपुराणम्
१० आश्वलायनगृह्यसूत्रम्
११ आश्वलायनश्रौतसूत्रम्
१२ आङ्गिरसस्मृतिः
१३ उशनसस्मृतिः
१४ ऋग्वेदसंहिता
१५ ऋष्यशृङ्गस्मृतिः
१६ ऐतरेयब्राह्मणम्
१७ कल्पतरुः
१८ कातीयसूत्रम्
१९ कालिकापुराणम्
२० काश्यपस्मृतिः
२१ कात्यायनस्मृतिः
२२ कार्ष्णाजिनिस्मृतिः
२३ क्रियानिबन्धः
२४ कूर्मपुराणम्
२५ कृष्णयजुर्वेदसंहिता
२६ कृत्यचिन्तामणिः
२७ कृत्यतत्त्वार्णवः
२८ गर्गस्मृतिः
२९ गालवस्मृतिः
३० गार्ग्यस्मृतिः
३१ गृह्यपरिशिष्टम्
३२ गौतमस्मृतिः
३३ गौडनिबंधतत्वम्
३४ गौडशुद्धितत्वम्
३५ गौतमस्मृतिभाष्यम्
३६ गौडव्यवहारनिर्णयः
३७ गौडनिबन्धः
३८ चतुर्विंशतिमतम्
३९ छन्दोगाह्निकम्
४० छन्दोगपरिशिष्टम्
४१ जमदग्निस्मृतिः
४२ जयपालः
४३ जातूकर्ण्यस्मृतिः
४४ जाबालिस्मृतिः
४५ जातिविवेकः
४६ जैमिनिसूत्राणि
४७ ज्योतिर्निबन्धः
४८ ढोण्डुपद्धतिः
४९ तंत्ररत्नम्
५० तिथितत्वम्
५१ त्रिस्थलीसेतुः
५२ दक्षस्मृतिः
५३ देवलस्मृतिः
५४ देवीपुराणम्
५५ धनुर्विद्यादीपिका
५६ नागदेवाह्निकम्

१२५ वायुसंहिता
१२६ वायुपुराणम्
१२७ विवरणम्
१२८ विष्णुपुराणम्
१२९ विश्वम्भरशास्त्रम्
१३० विष्णुसहस्रनामभाष्यम्
१३१ विष्णुधर्मोत्तरम्
१३२ विष्णुस्मृतिः
१३३ विष्णुरहस्यम्
१३४ वृद्धशातातपस्मृतिः
१३५ वृद्धपराशरस्मृतिः
१३६ वृद्धमनुस्मृति.
१३७ वृद्धात्रिस्मृतिः
१३८ वृद्धवसिष्ठस्मृतिः
१३९ व्याससूत्राणि
१४० व्यासस्मृतिः
१४१ व्याघ्रपादस्मृतिः
१४२ शतपथब्राह्मणम्
१४३ शबराचार्यकृतं भाष्यम्
१४४ शास्त्रदीपिका
१४५ शारदातिलकः
१४६ शार्ङ्गधरः
१४७ शातातपस्मृतिः
१४८ शिवसर्वस्वम्
१४९ शिवरहस्यम्
१५० शुद्धिविवेकः
१५१ शूलपाणिः
१५२ शंखस्मृतिः
१५३ शाङ्करभाष्यम्
१५४ श्रीदत्तीयम्
१५५ षट्त्रिंशन्मतम्
१५६ षडशीतिः
१५७ सत्यव्रतः
१५८ सुमन्तुस्मृतिः
१५९ सूतसंहिता
१६० स्मृत्यर्थसारः
१६१ स्कन्दपुराणम्
१६२ स्मृतिकौमुदी
१६३ स्मृतिसंग्रहः
१६४ स्मृतिचन्द्रिका
१६५ स्मृतिरत्नावलिः
१६६ स्मृतिदर्पणम्
१६७ स्मार्तगौडाः
१६८ संवर्तस्मृतिः
१६९ सम्बन्धतत्वम्
१७० संग्रहः
१७१ हरिवंशः
१७२ हरिनाथः
१७३ हरिहरभाष्यम्
१७४ हारीतस्मृतिः
१७५ हेमाद्रिः